




# ॥ ग्रंथ समर्पण ॥



सकळ जन तरावे । वंशही उद्धरावे ॥
स्वजन जन करावे । रामरूपी भरावे ॥

ह्या महत्तम कर्तव्याच्या परिपूर्त्यर्थ ज्यांनीं ज्यांनीं आजवर आपल्या पंचप्राणाच्या कुर्बानीनें, यज्ञ तपाचा भोक्ता व सकल भूतमात्राचा जिवलग सखा अशा परमेश्वराचें यथार्थ ज्ञान करून घेऊन शाश्वत शांतीचें परमोच्च स्थान संपादिलें, त्यांच्या व त्यांचेंच हें परम दिव्य व्रत अखंडपणें पुढें चालविणाऱ्या सर्व पुण्यश्लोकांच्या पवित्र पदकमलीं ही अल्पशी कृती अत्यंत प्रेमादरानें व भक्तिपुरःसर अंतःकरणानें अर्पण केली जात आहे.

---

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरं ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥

श्रीमद्भगवद्गीता.



# प्रस्तावना



धर्मभास्कर मसरकर महाराज यांच्या नेतृत्वाखालीं आणि कर्तृत्वामुळें गोमांतकांत जें चिरस्मरणीय शुद्धिसत्र संपादित झालें त्याचें सविस्तर प्रतिवृत्त प्रसिद्ध करण्याचा संकल्प, दासबोध मासिकाच्या चालकांनीं सोहळ्यापासून त्या अंकाकडे सर्व महाराष्ट्राचे डोळे लागून राहिले होते. परंतु आज प्रसिद्ध होणार उद्यां प्रसिद्ध होणार म्हणून जितक्या वेळा त्यांची सूचना दिली गेली आणि इतक्या वेळा ती फोल ठरली, कीं, त्या अपरिहार्य अडचणींमुळें तो अंक असा लांब जातां जातां नित्याचाच दिरंगाई होतो कीं काय अशा शंकेनें आह्मांस स्वतःलाहि केव्हां केव्हां विषाद वाटल्यावांचून राहिला नाहीं. पण आतां तो अंक छापून आमचेकडे त्याचा जो सुट्या पानांचा भाग प्रस्तावनेसाठीं आला आहे त्यास पाहून आमचा तो विलंबाविषयींचा विषाद पार नाहींसा व्हावा जितका हा अंक सर्वांग सुंदर झाला आहे! हा विशेष अंक नसून हा एक शुद्धीकरणावरील उत्कृष्ट ग्रंथच प्रसिद्ध होत आहे असे त्याचा जो हा आलेला आहे त्या भागावरून तरी स्पष्ट होतें.

दुर्दैवानें आमचे हें समग्र ग्रंथ नाहीं. शेवटच्या दोन तीन प्रकरणांचीं पानें अजून छापावयाचीं आहेत. तीं जर पुढें असतीं तर समग्र ग्रंथाविषयीच आह्मास काय वाटतें तें सांगितलें असतें; परंतु जोवर तीं पानें पुढें नाहींत तोंवर "समग्र ग्रंथ पाहिल्याविण" त्यास दूषण किंवा भूषण लावणें हें अप्रस्तुत होणारें असल्यामुळें आह्मी जो भाग आमच्याकडे धाडण्यांत आला आहे त्या चवथ्या प्रकरणापर्यंतच काय तें बोलूं शकणार आहोंत.

त्या अपुऱ्या भागांतहि जें लिखाण आलेलें आहे तें खरोखरच जितकें सुसंबद्ध, ससंगत आणि समुचित आहे, त्यात ऐतिहासिक आणि सांप्रत घटनांची माहिती जितकी विपुल आणि साधार दिलेली आहे, कीं, अशा ग्रंथास 'चार ओळींची' प्रस्तावना घाईघाईनें लिहून देणें झणजे त्या ग्रंथाच्या महत्वाचा अुपमर्दच करणें आहे. ह्मणून त्याचा दोष आमच्यावर नाहीं, असे त्यांतील गोष्ट बाहेर सांगण्याचा थोडा चहाडखोरपणा केल्यावांचून आह्मास त्या दोषांतून सुटण्याचा दुसरा मार्गच नाहीं. बरोबर चोवीस तासांच्या अवधींत हा ग्रंथ वाचून त्याला प्रस्तावना लिहिली पाहिजे ह्मणून संपादकांकडून अगदीं निकडीचा आणि अनुल्लंघ्य आग्रह करण्यांत आला. आणि गोमांतकांतील गेल्या अपूर्व शुद्धिसत्रासारख्या महत्कार्यास आपल्या "चार" ओळींनीं देखील साहाय्य होणारें आहे असें जर त्याच्या कर्तृत्वशाली कार्यकर्त्यांस जितकें अुत्कटपणें वाटत आहे तर कोणत्याहि ग्रंथाचा सांगोपांग अभ्यास केल्यावांचून कोणची तरी ओबड अर्धवट किंवा दायित्वशून्य प्रस्तावना खरडण्याचा आमचा पारपाठ नसतांहि ह्या प्रसंगा पुरते कांहींतरी तडजोड काढून तो आग्रह मानणें आह्मास कर्तव्यच वाटलें.

ह्या ग्रंथाचें अनुसंधान युक्तियुक्त कुशलपणानें साधलें आहे, शुद्धीकरणाची खटपट किती आवश्यक आणि हितावह आहे हें जर सिद्ध करावयाचें तर अगदीं प्रथमतःच जगाच्या कल्याणार्थ हिंदुसंस्कृतीचा आणि तत्वज्ञानाचा प्रसार आणि प्रभाव अवश्य आहे हें सिद्ध केलें पाहिजे; यास्तव या ग्रंथांत ह्या प्रकरणाला जें अग्रस्थान दिलें आहे तें किती युक्तिसंमत आहे! प्रथम प्रकरण हिंदुसंस्कृतीचा प्रचार आणि प्रसार जगत्कल्याणार्थ अवश्य आहे हें दाखविण्याचा यत्न केल्यानंतर दुसरें प्रकरणीं त्या संस्कृतीस मूलतःच किंवा आपत्प्रसंगीं आंचवलेल्यांना तींत समाविष्ट करून घेतां येतें कीं नाहीं आणि येत असेल तर हें हिंदुकरण अथवा शुद्धीकरण पूर्वपरंपरेत धरून आहे कीं नाहीं याचें विवेचन ओघानेंच प्राप्त होतें. हें " हिंदूकरणाचें सनातनत्व " हें प्रकरण जितक्या साधार आणि विद्वत्तापूर्ण पद्धतीनें लिहिलें आहे कीं यांत दिलेल्या पुराव्यांचें एकदां समालोचन केलें ह्मणजे शुद्धीकरणाच्या शास्त्राधाराची शंका ह्मणून उरूंच नये. हिंदूकरण हें लोकहितार्थ अवश्य आहे इतकेंच नव्हे तर तें शास्त्रविहितहि आहे हें सिद्ध केल्यानंतर गोमांतकांत त्या शुद्धीचें जें महान् सत्र आरंभिण्यांत आलें, त्याच्या अवश्यकतेची आणि महत्तेची छाप वाचकांवर आपोआपच पडून ग्रंथांतील मुख्य विषयाचा डौलदार उठाव होऊं लागतो. परंतु गोमांतकांतील त्या शुद्धिसत्राच्या महत्तेच्या कल्पनेसह्च त्याच्या दुर्घटतेचीहि कल्पना येणें हें त्या कार्याचें यथातत्व स्वरूप कळण्यासाठीं अवश्यच असल्यामुळें चौथ्या प्रकरणांत गोमांतकांतील शुद्धीस ज्या आपत्तीनें अवश्य केलें त्या गोमांतकीय भ्रष्टीकरणाचा इतिहास देण्यांत आला आहे, तो इतिहास केवळ झालेल्या शुद्धिकार्याचें प्रतिवृत्तापुरताच महत्वाचा नाहीं तर या पुढील शुद्धिकार्य करण्यासहि उपकारक होणारा आहे, गोमांतकीय भ्रष्टीकरणानंतरं मग गोमांतकीयं शुद्धीकरण देऊन त्यांत या कार्यावर्ती ज्यांनीं ज्यांनीं प्रयत्न केले त्यांच्या मागामागानें जात धर्मभास्कर मसुरकरांस त्या प्रश्नाचा परिचय कसा झाला, त्यांनीं तो प्रश्न सोडविण्यास काय योजना आंखली आणि त्यांच्या कर्तृत्ववान् शिष्यमंडळीनीं किती संकटांस सोसून शेवटीं तो प्रश्न सोडविण्यांत इतकें महान यश संपादन केलें याचें चित्तवेधक आणि उद्बोधक वृत्त दिलें आहे.

या शुद्धीकरणाच्या ग्रंथाची भाषा त्यांतील विद्वत्तेस आणि विषयास साजेल अशीच शुद्ध गंभीर आणि स्पष्ट आहे. मराठी भाषाशुद्धीचें हें " दासबोध " मासिक पूर्वापार अभिमानी आहे. शिवरायानें अंगीकृत केलेल्या भाषा शुद्धीचा असा अभिमान शिवरायांच्या गुरुबंधूंच्या पीठानें—ह्या समर्थशिष्यपरंपरेनें—असा धरावा हेंच उचित. अनवश्यक उर्दू किंवा इंग्रजी शब्दांस या ग्रंथांत कुठेंहि बोलावूं दिलेलें नसून उलट त्यांच्या अनिष्ट स्पर्शापासून अकलंकित अशी शुद्ध आणि सकस मराठी भाषा हेतुपूर्वक योजलेली आहे.

गोमांतकांत हजारों लोकांस ब्रह्मचर्याश्रमानें केवळ शुद्ध करूनच घेतलें नाहीं तर त्या शुद्धीस पचविण्याचें जें जवळजवळ तितक्याच चिकाटीचें कार्य असतें, तेंहि तोच आश्रम गोमांतकस्थ कार्यकर्त्यांच्या साह्याय्यानें कसें पार पाडीत आहे ती माहितीहि या पुढील प्रकरणांत बहुधा येणारीच असेल.

अुत्तर हिंदुस्थानांत स्वामी श्रद्धानंदांच्या सामुदायिक शुद्धीनें आणि बंगाल्यांत हिंदु... शुद्धिकार्यानें जें यश संपादलें तेंच यश गोमांतकांतहि तितक्याच महत्त्वाच्या ह्या सामुदा... शुद्धींत मसूरकर महाराजांनीं संपादून महाराष्ट्राची बाजू अितरांच्या तुलनेंत लंगडी पडूं दि... नाहीं ह्याविषयीं महाराष्ट्र त्यांचा आणि त्यांच्या कर्त्या शिष्यांचा सदैव अभिमानी राहि...

गोमांतकीय शुद्धीचें हें प्रतिवृत्त प्रत्येक महाराष्ट्रीय वाचकानें आपल्या संग्रहास ठेव... संघटनेच्या प्रचारकांना तर हें पुस्तक अगदीं अत्यजनीयच आहे. कारण त्यांत शुद्धि-आंदोलना... तत्त्वाचें बौद्धिक ज्ञान आणि कार्याचें व्यवहारज्ञान खचून भरलेलें आहे.

पुर्तुगीजांनीं जे सहस्रावधि हिंदु भ्रष्ट केले त्यांस पुन्हां परत घेऊन हिंदुराष्ट्राचें बळ... प्रचंड शुद्धिकार्यानें सहस्रगुणें वाढविलें त्याच्या ह्या प्रतिवृत्ताच्या मागोमाग, त्याच पुर्तुगीजांनीं ब... विलेले जे हजारों खिश्चन मालवण ते रत्नागिरीपर्यंत पसरले आहेत, त्यांच्याहि शुद्धीकरणा... प्रचंड आंदोलनांत तसेंच यश संपादून ह्या ब्रह्मचर्याश्रमानें आपल्या अवतारकार्यांतील त... दुसऱ्या प्रतिवृत्तासहि प्रसिद्ध करण्याचा योग लवकरच येवो अशी आमची मनःपूर्वक अिच... प्रदर्शित करून, गोमांतक शुद्धिकार्याच्या थोरवीस साजेल असाच हा त्याच्या प्रतिवृत्ताचा जो... त्याचे सुयोग्य संपादक श्री. क्षीरसागर यांनीं प्रसिद्ध केला आहे, त्याच्या प्रस्तावनेच्या या घाव... घाअीनें लिहिलेल्या " चार ओळी " पुऱ्या करतो.

रत्नागिरी
२८-४-३० } वि. दा. सावरकर.



# हृद्गत.

काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें ।
परि त्या विश्वंभरें बोलाविलें ॥

—श्री तुकोबाराय—

सत्यसंकल्प भगवंताच्या कृपाप्रसादानें 'गोमांतकशुद्धीचा इतिहास' आज वाचकांच्या सेवेला सादर करतांना मनाला धन्यता वाटत आहे. गोमांतकांतील शुद्धिकार्य झाल्याला आतां दोन वर्षें होऊन गेलीं आहेत. विषयाच्या नाविन्याच्या दृष्टीनें प्रस्तुत ग्रंथ वस्तुतः ह्यापूर्वीच प्रसिद्ध व्हावयास पाहिजे होता व तो सत्वर प्रसिद्ध करण्याचें आम्हीं वाचकांना आश्वासनहि दिलें होतें. तथापि सर्व कार्यकर्त्यांच्या रोजनिशी (डायऱ्या) व त्यांचा समग्र पत्रव्यवहार, तद्वतच स्थळोस्थळींचे पुढारी, शिष्ट व आश्रमप्रेमी इत्यादि मंडळींचा आश्रमाशीं झालेला पत्रव्यवहार, प्रमुख वृत्तपत्रांचे संच—फायली, विषयाला आधारभूत होणारे शेंकडो कागदपत्र, चळवळीशीं संबंध आलेल्या अनेक व्यक्तींचीं व स्थळांचीं छायाचित्रें इत्यादि स्वरूपाच्या ग्रंथ—निर्मितीसाठीं आवश्यक असलेल्या साधनसामुग्रीची जमवाजमव करण्यासच प्रथम कल्पनेबाहेर वेळ लागला. इतक्यांत म्हैसूर येथें ग्रंथिक सन्निपातानें आपलें डोकें पुन्हां एकदां वर काढल्यामुळें तेथील कामाची सर्वच घडी विस्कटून गेली. नित्याचें 'दासबोध' मासिकाचें काम तर नियमितपणें चालविणें भागच होतें आणि संस्थाविषयक अन्य व्यवहारांतहि खंड पडूं देणें शक्य नव्हतें. त्यांतूनहि गोमांतकांत मत्सरी विरोधकांनीं आश्रमाविरुद्ध उठविलेल्या वादाच्या धुळवडीचे लोट जमीनीवर बसेपर्यंत थोडीशी वाट पाहणेंहि प्राप्त होतें. साहजिकच वरील स्वरूपाच्या सर्व नित्य नैमित्तिक अडीअडचणीमुळें ग्रंथ लेखनाला प्रारंभ करतां करतांच वर्ष सव्वा वर्ष निघून गेलें. अर्थातच तदनंतर ग्रंथाच्या व्यापक स्वरूपाच्या मानानें तो संपूर्णपणें सिद्ध होण्यास इतका कालावधि लागणें अपरिहार्यच कसें होतें, हें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत येईलच. तरी पण आम्हांलाहि तीव्र खेद वाटत असलेल्या ह्या अपरिहार्य विलंबाविषयीं वाचकवृंद क्षमा करील अशी आम्हांस दृढ श्रद्धा आहे.

प्रस्तुत ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग केलेले आहेत. पूर्वार्धांत पांच व उत्तरार्धांत सहा प्रकरणें आहेत. अंतीं कांहीं मननीय लेख व परिशिष्टेंहि जोडलेलीं आहेत.

पूर्वार्धांतील पहिल्या प्रकरणांत आर्यसंस्कृतीचें विश्वोद्धारक स्वरूप सिद्ध करून दाखविण्यांत आलें आहे. सद्गुणांच्या वा दुर्गुणांच्या अतिरिक्त किंवा एकांगी वाढीनें व्यक्तिसमाजाचें स्थैर्य नष्टभ्रष्ट कसें जाऊं शकतें ह्याची तात्विक मीमांसा केली आहे. सद्गुणांच्या एकांगी वाढीमुळें व्यक्ति वा समाज विपन्नावस्थेस जाऊं शकतो ह्या सिद्धांताला भारतीय संस्कृतीचा दाखला, तिच्या अधःपतनाचें जरा विस्तारपूर्वक वर्णन करून दिलेला आहे, व स्वार्थी आणि नीच मनोवृत्तींच्या एकांगी वाढीमुळें व्यक्ति वा समाज शांतिसौख्यास आंचवूं शकतो ह्याला हिंदेतर मानववंशाचा दृष्टांत देण्यांत आला आहे. तथापि सद्गुणांच्या एकांगी वाढीनें हिंदुसमाजानें फार तर स्वतःचें अपरिमित नुकसान करून घेतलें असेल, पण त्यानें जगताच्या शांतिसौख्यांत आणि विकासांत कधींहि अडथळा आणला नाहीं; पण हिंदेतर समाज स्वतःच्या दुष्ट वृत्तींच्या एकांगी वाढीनें सर्व जगताची होळी करण्यास प्रवृत्त झाले आहेत. साहजिकच जगताच्या स्थितिस्थापकते साठीं—विश्वमंगलासाठीं, अशा ह्या

दुष्ट प्रवृत्ति मानववंशांना यथायुक्त पद्धतीनें सुसंस्कृत करणें अत्यावश्यक कसें आहे आणि हें महत् विकट पण सर्वश्रे कार्य आर्यसंस्कृतीच इतर संस्कृतींच्या अपेक्षेनें कसें करूं शकेल हें, सद्यःकालीन मुख्य तीन संस्कृतींच्या-मुसल मान, ख्रिस्ती व हिंदु-तुलनात्मक अभ्यासानें सिद्ध केलें आहे. तदनंतर अशीहि विश्वोद्धारक आर्य संस्कृति सध्यांच्या निरयगतींत कां पडलेली आहे ह्याची कारणमीमांसा सांगून, जगच्छांतीच्या दृष्टीनें तिल संख्याधिक्यबलानें येथें जिवंत राखण्याची आवश्यकता सिद्ध करून दाखविली आहे. नंतर संरक्षक जयिष्णु अशा दोन्ही पद्धतीच्या ' हिंदुकरणा ' च्या उपायाचा अवलंब करून सर्व जग ' आर्यमय '- आर्यभावानें युक्त करण्याची आवश्यकता जगताच्या स्थितिस्थापकतेसाठीं-जगत्कल्याणासाठीं, विश्वमंग लासाठीं कशी आहे, हें प्रतिपादन करण्यांत आलें आहे. आर्यसंस्कृतीचें ह्याप्रमाणें विश्वमांगलिक-विश्वो द्धारक स्वरूप सिद्ध करून दाखविल्यानंतर दुसऱ्या प्रकरणांत ' विश्व आर्य करून सोडणारे व्हा ' 'कृण्वन्तो विश्वमार्यम् । ' ह्या दैवी आदेशानुसार श्रुतिस्मृतिपुराण कालापासून तों थेट सद्यःकालीन समाजापर्यंत येथील समाजधुरंधरांनीं हिंदूकरणाचे प्रयत्न कसकसे केलेले आहेत म्हणजेच हिंदूकरणाचें तत्त्व सनातन कसें आहे हें शास्त्रीय प्रामाण्यासह दाखवून देण्यांत आलेलें आहे. नंतर ह्या उज्ज्वल इतिहासाला अनुसरून गोमांतकांतील शुद्धीकरण मसुराश्रमानें केलेलें असल्यामुळें त्या गोमांतकाच भौगोलिक व ऐहासिक दृष्ट्या परिचय तिसऱ्या व चवथ्या प्रकरणांतून करून दिला आहे तदनंतर गोमांतकाला राजकीय मुक्तता मिळाली तरी तेथील स्वेच्छेनें वा परेच्छेनें परकीय धर्मांत मांद असलेल्या निम्याहून अधिक बाटलेल्या लोकांचा चारशें वर्षांवर भिजत पडलेला शुद्धीकरणाचा प्रश्न धर्मभास्क श्रीविनायक महाराज मसुरकरांनीं सोडविला, असें येथें ' सूतोवाच ' करून तो प्रश्न सोडविण्यासाठ विद्यारण्यांपासून सद्यःकालापर्यंत कसकसे शुद्धीकरणाचे प्रयत्न झाले त्याचें कृतज्ञतापूर्वक थोडक्यां दिग्दर्शन पांचव्या प्रकरणांत केलें आहे. येथें पूर्वार्ध संपतो. त्यानंतर उत्तरार्धातील पहिल्या प्रकरणांत श्रीमन्महाराजांची गोकर्णाची यात्रा व त्यावेळीं गोमांतकांतील परिस्थितीचें त्यांनीं केलेलें सूक्ष्म निरीक्षण व गावड्यांचें शुद्धिकार्य अंगीकृत करण्याचा त्यांचा संकल्प इत्यादि गोष्टी दिल्या आहेत. दुसऱ्या प्रकरणांत शुद्धिकार्यासाठीं श्रीमन्महाराजांनीं कायकाय उपाय योजना आंखली तें सांगितलें आहे, व त्या योजनेनुसार पुढें गोमांतकांत आश्रम पाठवून श्रीमन्महाराजांनीं एकंदर कार्याची उठावणी आस्ते आस्ते कसकशी केली व गावड्यांचीं मनोगतें स्वाधीन करून घेऊन त्यांना हिंदुधर्म प्रवेशाभिमुख कसकसे केले हें तिसऱ्या प्रकरणांत सांगितलें आहे. मग प्रत्यक्ष शुद्धिकार्य व हजारों गावड्यांचें हिंदुधर्मांत समाविशन, कार्यकर्त्यांची धरपकड, मोर्चे सरकारवर समस्त हिंदुजनतेचा, सन्मान्य पुढा- ऱ्यांचा व संस्थांचा प्रचंड दाब, कार्यकर्त्यांची सुटका, धुमधडाक्यांत कार्य, हनुमज्जयंतीला पोलिसाधिका- ऱ्यांच्या अवकृपेला बळी पडलेल्या अंबुले महालांत पुन्हां शुद्धिचक्राचें प्रवर्तन, धरपकड, सीमापारी, अ. भा. हिं. महासभेच्या शिष्टमंडळाचें आगमन, गव्हर्नरशीं शिष्टमंडळाची व नंतर आश्रमीय प्रतिनिधींची मुलाखत, आश्रमाला गोमांतकांत मुक्तद्वार, आश्रमाचे शुद्धि पचविण्याचे अविश्रांत परिश्रम इत्यादि स्वरू पाच्या असंख्य घडामोडी चवथ्या प्रकरणांत थोडक्यांत दिलेल्या आहेत. तदनंतर सरकारी विरोध नष्ट झाला तरी मत्सरी विरोधी कंपूकडून आश्रमाचा अनन्वितपणें व दुष्टपणें चाललेला छळ पांचव्या प्रकरणांत दिलेला आहे व सद्भाग्यांत ग्रंथाचा उपसंहार करण्यांत आलेला आहे.

गोमांतकीय शुद्धीचा इतिहास वरीलप्रमाणे प्रस्तुत ग्रंथांत यथामति निवेदन केला आहे. गोमांतकील शुद्धिकार्य ही हिंदुसमाजाच्या इतिहासांतील एक अत्यंत महत्त्वपूर्ण अशी घटना आहे. ही घटना निःसंशय दैवी होय. ज्या तिसवाडी महालांत ४०० वर्षांपूर्वी प्रथम बाटवाबाटवीला प्रारंभ होऊन १०००-१५०० लोक बाटविण्यांत आले, त्याच कडव्या धर्मांध पोर्तुगीज सत्तेखालीं, त्याच तिसवाडी महालांत पहिल्याच दिवशीं २१५० लोक हिंदुधर्मांत प्रवेश करूं शकतात, ही गोष्ट अपूर्व शुभमुहूर्ताची नव्हे तर काय? परमेश्वरी कृपाप्रसादाप्रमाणेंच पुण्यश्लोक पूर्वजांचीं पुण्याई, थोर मान्य पुढाऱ्यांचे आशीर्वाद, वृत्तपत्रकर्त्यांचें प्रेमळ प्रोत्साहन, समस्त हिंदुजनतेचा पाठिंबा, कार्यकर्त्यांचें बहुमोल साह्य इत्यादि गोष्टींमुळेंच प्रस्तुत घटना यशःसिद्धतेस गेली. ज्यांच्या ह्या अशा आशीर्वादबळावर आश्रमाला प्रस्तुतसारखी महत्तम धर्मसेवा पार पाडतां आली त्या सर्वांचे धन्यवाद किती म्हणून गावे? असाच सर्वांच्या नित्य आशीर्वादानें आश्रमाकडून देव-धर्म-सेवा सदैव उत्कृष्टपणें पार पाडली जावी, ह्यापरती आश्रमीयांची आणखी कोणतीहि इच्छा नाहीं.

सन्माननीय बॅ. तात्याजीराव सावरकर ह्यांनीं वेळांत वेळ काढून आश्रमाच्या विनंतीला अनुसरून तत्परतेनें प्रस्तुत ग्रंथास प्रस्तावना लिहून पाठविली व आमच्या अल्पशा वाङ्मय-कृतीचा प्रेमादरपूर्वक गौरव केला ह्याविषयीं त्यांचे आम्ही अत्यंत ऋणी आहोंत. तद्वतच ज्या सुहृन्मित्रांनीं व सहाध्यायांनीं वेळोवेळीं अनेक उपयुक्त सूचना देऊन मनोबुद्धीनें व रात्रंदिवस शक्येल ते काबाडकष्ट करून अंगमेहनतीनें प्रस्तुत प्रकाशनांत आम्हांस अमूल्य साह्य केलें त्या सर्वांचे किती आभार मानावे हेंच आम्हांस समजत नाहीं.

वरीलप्रमाणें अनेकांच्या साह्यानें ग्रंथ लिहून सिद्ध झाला ही गोष्ट खरी; पण लेखनानंतरची महत्त्वाची उत्तरदायिता मुद्रणाची असते. आणि तें तसें मुद्रणाचें उत्तरदायित्व सर्वस्वी आपलेपणाच्या भावनेनें अंगावर घेऊन अल्पावधींतच पार पाडण्याची स्पृहणीय कामगिरी मुंबईचे ज्ञानसागर लिथो प्रेसचे व रामदास मुद्रणमंदिराचे मालक, श्रीसमर्थकार्याभिमानी व सदैव आश्रमसेवातत्पर असणारे श्री. केशव गणेश अथवा बापूराव जोशी, ह्यांनीं, आपलीं सर्व महत्त्वाचीं कामें एका अंगाला ठेवून पार पाडली, ह्याविषयीं त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. तद्वतच पुण्याच्या बालोद्यानमुद्रण मंदिराचे मालक श्री. सहस्रबुद्धे ह्यांनींहि छायाचित्रांचे ठसे स्वल्पांत करून दिले व मुंबईच्या मौज प्रिंटिंग ब्यूरोनें ते नियमित वेळीं छापून दिले ह्याबद्दल त्या उभयतांचें आम्हीं हार्दिक अभिनंदन करतों. त्याचप्रमाणें 'वेदिक ओपिनिअन' मुद्रणमंदिराचे मालक श्री. परांजपे ह्यांनींहि त्यांच्याकडे दिलेल्या मुद्रणाचें काम नियमित व सुबकपणें करून दिलें ह्याबद्दल त्यांचे आम्हीं आभारी आहोंत. वे. शा. सं. गजानन बापु शास्त्री साखळे ह्यांनीं अत्यंत निरलसपणें व अगदीं आत्मीय भावनेनें प्रस्तुत ग्रंथाच्या मुद्रिताचें संशोधन केलें, त्याबद्दल आम्हीं त्यांचेहि आभारी आहोंत.

ह्याप्रमाणें अनेक लोकांच्या अमोलिक साह्यानें प्रस्तुत ग्रंथ वाचकांच्या सेवेला सादर करण्यासाठीं आतां हातावेगळा केला जात आहे. ग्रंथ अत्यंत त्वरेनें मुद्रित केला गेल्यामुळें त्यांत मुद्रणदोष बरेच राहून गेले आहेत. पण वाचक तिकडे कानाडोळा करतील अशी आशा आहे. मुद्रण दोषांप्रमाणेंच आणखीहि कित्येक दोष प्रस्तुत ग्रंथांत असणे सर्वथैव संभवनीय आहे, ह्याची आम्हांला जाणीव आहे. ते दोष आढळतील ते वाचकांनीं आम्हांस अवश्यमेव कळविण्याची कृपा करावी.

ज्यांच्या दिव्य सान्निध्यांत प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा झाली व ज्यांच्या कृपाप्रसादानेंच हा ग्रंथ सिद्ध होऊं शकला त्या श्रीसद्गुरुमहाराजांच्या चरणीं अभिवंदन करून, ही आमची वेडी-वांकुडी अल्पकृति, सहित्यहृदयी जनताजनार्दनाच्या सेवेला सादर करीत आहों. तिचा सर्वांनीं प्रेमळ अंतःकरणानें स्वीकार करावा, एवढीच आमची अंतिमची आग्रहपूर्वक नम्र विनंति आहे.

मुंबई.
अक्षय्य तृतीया
१८५२

शंकर धोंडो क्षीरसागर.

# अंतः संवेद,



गणानां त्वा गणपतिं हवामहे कविं कवीनामुपमश्रवस्तमम् ।
ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आ नः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम् ॥ १ ॥

न तमंहो न दुरितं कुतश्चन नारातयस्तितिरुर्न द्वयाविनः ।
विश्वा इदस्माद्ध्वरसो वि बाधसे यं सुगोपा रक्षसि ब्रह्मणस्पते ॥ २ ॥

त्वं नो गोपा पथिकृद्विचक्षणस्तव व्रताय मतिभिर्जरामहे ।
बृहस्पते यो नो अभि ह्वरो दधे स्वा तं मर्मर्तु दुच्छुना हरस्वती ॥ ३ ॥

उत वा यो नो मर्चयादनागसोऽरातीवा मर्तः सानुको वृकः ।
बृहस्पते अप तं वर्तया पथः सुगं नो अस्यै देववीतये कृधि ॥ ४ ॥

त्रातारं त्वा तनूनां हवामहेऽवस्पर्तरधिवक्तारमस्मयुम् ।
बृहस्पते देवनिदो नि बर्हय मा दुरेवा उत्तरं सुम्नमुन्नशन् ॥ ५ ॥

त्वया वयं सुवृधा ब्रह्मणस्पते स्पार्हा वसु मनुष्या ददीमहि ।
या नो दूरे तळितो या अरातयोऽभि सन्ति जम्भया ता अनप्नसः ॥ ६ ॥

त्वया वयमुत्तमं धीमहे वयो बृहस्पते पप्रिणा सस्निना युजा ।
मा नो दुःशंसो अभिदिप्सुरीशत प्र सुशंसा मतिभिस्तारिषीमहि ॥ ७ ॥

अदेवेन मनसा यो रिषण्यति शासामुग्रो मन्यमानो जिघांसति ।
बृहस्पते मा प्रणक्तस्य नो वधो नि कर्म मन्युं दुरेवस्य शर्धतः ॥ ८ ॥

तेजिष्ठया तपनी रक्षसस्तप ये त्वा निदे दधिरे दृष्टवीर्यम् ।
आविस्तत्कृष्व यदसत्त उक्थ्यं १ बृहस्पते वि परिरापो अर्दय ॥ ९ ॥

बृहस्पते अति यदर्यो अर्हाद्द्युमद्विभाति क्रतुमज्जनेषु ।
यद्दीदयच्छवस ऋतप्रजात तदस्मासु द्रविणं धेहि चित्रम् ॥ १० ॥

ब्रह्मणस्पते त्वमस्य यंता सूक्तस्य बोधि तनयं च जिन्व ।
विश्वं तद्भद्रं यदवन्ति देवा बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥ ११ ॥

भावार्थः—समुदायांचा प्रभु म्हणून तूं गणपति, तूं ज्ञानीजनांत अत्यंत ज्ञानी; ज्यांची कीर्ति अ‍ति-शय उत्कृष्ट त्यांच्या मध्येंहि तूं श्रेष्ठ, तूं राजाधिराज, तुला आम्ही आदरानें बोलावितों; हे स्तुतींच्या ब्र-ह्मणस्पते, आमची हांक ऐकून आपल्या सर्व शक्तींसह ( त्वरेनें ये आणि ) ह्या आसनावर विराजमान हो.

हे ब्रह्मणस्पते, भक्तरक्षणाविषयीं अत्यंत तत्पर असा तूं ज्या ( भक्ता )चें संरक्षण करतोस त्याच पातकाची बाधा होत नाहीं, त्याच्यावर कोठून कसलेंहि संकट येत नाहीं, आणि दुष्ट शत्रु काय कि

कपटी नीच काय, कोणीहि त्याच्यावर आपला पगडा बसविला असें कधींहि होत नाहीं. कारण (सन्मार्गापासून) भ्रष्ट करणाऱ्या सर्वच दुरात्म्यांना तूं आपल्या भक्तांपासून दूर हांकून लावतोस. २

सर्वद्रष्टा असा तूं आमचा भ्राता आणि सन्मार्गदर्शक आहेस. तुझ्या आशेवरूनच आम्हीं माननीय अशा स्तोत्रांनीं भजन करीत असतों. म्हणून हे बृहस्पते, (आमचा घात करण्याकरितां) जो कोणी आमच्याशीं कौटिल्य लढवील, त्याची ती दुष्टक्रिया खाडकन् त्याचाच नाश करो. ३

अथवा आमच्याशीं वैर धरणारा व गर्वानें ताठून जाऊन (परवित्ताचा) अपहार करणारा जो जो मनुष्य आम्हां (तुझ्या) निरपराधी भक्तांना पेंचांत आणूं पाहील त्याला, हे बृहस्पते, तूं आमच्या वाटेवून कायमचा काढून टाक आणि देवसेवा आमच्या हातून व्हावी म्हणून आमचा मार्ग सुगम कर. ४

जगत्तारका आमचा पाठिराखा आणि आम्हांवर प्रेम करून आमचें सांत्वन करणारा असा तूं त्या तुला आम्हीं धांवा करीत आहों; तर हे बृहस्पते, देवनिंदकांचा तूं निःपात कर आणि उत्कृष्ट सुखाचें जें निधान आहे तें पापबुद्धि दुष्टांस मिळालें असें होऊं देऊं नको. ५

आमची उन्नति तुझ्या हातीं, म्हणून हे ब्रह्मणस्पते, तुझ्या कृपेनें स्पृहणीय आणि लोकहितकर अशा वैभवाचा लाभ आम्हांस होवो; व आमच्याशीं वैर करणारे जे जे दुष्ट दूर बाजूस उभे राहून किंवा प्रत्यक्ष आमच्यावर घाला घालतील, त्या कर्मनष्टांचा तूं चुराडा करून टाक. ६

हे बृहस्पते तूं आमचे मनोरथ पूर्ण करणारा उदार, साहाय्यकारी आहेस, म्हणून तुझ्या दयेनें आम्हीं तारुण्याचा अस्सल जोम कायम राखूं शकतो. तेव्हां अभद्र भाषण करणारे आणि घातपात करणारे दुष्ट-ह्यांचा अधिकार आमच्यावर चालूं देऊं नको, आणि सत् भाषण करणारे जे आम्हीं त्या आमचा शुद्ध अंतःकरणाच्या योगानें उत्कर्ष होईल असें कर. ७

हे बृहस्पते, (पूर्णपणें) नास्तिक बनलेल्या आपल्या अंतःकरणानें जो तुझ्या भक्तांचा नाश करण्याची बुद्धि धरतो आणि आपण मोठे भयंकर आहों अशा घमेंडीनें आम्हांस ठार मारूं पहातो त्याच्या त्या मारक शस्त्राचा वार आम्हांस लागूं नये (इतकेंच नव्हे तर साधूंचा) उपमर्द करणाऱ्या त्या घातकी दुष्टाच्या क्रोधाची रग आतांच जिरवूं असें कर. ८

तुझा पराक्रम स्पष्ट दिसत असून सुद्धां पुनः ज्यांनीं ज्यांनीं तुझी निंदा केली असेल त्या दुष्ट राक्षसांना तूं आपल्या अत्यंत प्रखर तेजाच्या ज्वालेनें जाळून भस्म कर. हे बृहस्पते अत्यंत प्रशंसनीय असें तुझें शौर्य आहे तें आतां प्रकट कर आणि निंदकांचा धुव्वा उडवून दे. ९

हे बृहस्पते, ज्या ऐश्वर्याला भक्तिहीन मनुष्य कधींच पात्र होत नाहीं, जें देदीप्यमान व प्रज्ञाबलशाली असल्यामुळें लोकांत अतिशय सुशोभित दिसतें आणि जें आपल्या अंगच्या प्रभावानें प्रकाशित होतें, हे सत्यधर्म (रक्षणार्थ) प्रकट होणाऱ्या देवा, तें अद्भुत ऐश्वर्य आम्हांस देण्याची कृपा कर. १०

हे ब्रह्मणस्पते, तूंच ह्या (आमच्या) स्तवनांचा प्रेरक हो. आमच्या पुत्रपौत्रांची उन्नति कर. तुम्ही देव ज्याच्याकडे कृपादृष्टीनें पहाल तें सर्व मंगलरूपच होतें. तर (आम्ही आपल्या) शौर्यसंपन्न वीरांसह (यज्ञ) सभेंत तुझें महद्यश वर्णन करीत राहूं असें कर. ११ [ ऋ. मं. २–३ ]

# विषयानुक्रमणिका.





## पूर्वार्ध.



## उत्तरार्ध.



जयति जयति देवो देवकीनंदनोऽयं, । जयति जयति कृष्णो वृष्णिवंशप्रदीपः ।
जयति जयति मेघश्यामलः कोमलांगो, । जयति जयति पृथ्वी–भार–नाशो मुकुंदः ॥

× × × ×

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् । स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥

—भगवान् श्रीकृष्ण

श्री

# प्रकरण १ लें.

# विश्वोद्धारक आर्यसंस्कृति.

ॐ आसंयतमिन्द्रणः स्वस्ति शत्रुतूर्याय बृहतीममृध्राम् ।
यया दासान्यार्याणि वृत्राकरो वज्रिन् सुतुका नाहुषाणि ॥ ऋग्वेद. ॥

**भावार्थः**— हे भक्तप्रतिपालक परमेश्वरा ! ज्या अद्भुत सामर्थ्याच्या बळावर वज्रधर इंद्रानें दस्यूंना जिंकून आर्य बनविलें, तेंच अमोघ शक्तिसामर्थ्य आम्हांसहि तूं त्याच कामाकरितां दे.

अत्यंत हृदयस्पर्शी व अर्थपूर्ण असणारी अशी वरील धीर गंभीर प्रार्थना कित्येक सहस्र वर्षांपूर्वी विश्वोद्धाराचा म्हणजेच समस्त भूमातांच्या कल्याणाचा अहर्निश निदिध्यास वा छंद घेतलेल्या भारतवर्षीय पुण्यश्लोक ऋषिमुनीजनांच्या पवित्र व विशाल अंतःकरणांतून बाहेर पडली. भारतवर्षीय संस्कृति हीच समस्त विश्वाला निश्चितपणे शांति सुखाचा मंगल मार्ग दाखवूं शकेल, अशी दृढ श्रद्धा व विश्वास हजारों वर्षांच्या उग्र व अखंड तपश्चर्येनंतर त्यांना प्राप्त झाला होता. साहजिकच त्यांनीं या संस्कृतीविरुद्ध उठणाऱ्या शत्रूंचा निःपात करण्याला अमोघ शक्ति–सामर्थ्य देण्याविषयीं त्या धर्म–संरक्षक व दुष्ट–दमन परमेश्वराला श्रद्धा–भक्ति–समन्वित अंतःकरणानें नम्रतापूर्वक पण आग्रहानें विनविलें आहे. आर्य संस्कृति ही विश्वमंगलार्थ अवतरलेली आहे, ही त्या वंदनीय व संमाननीय पूर्वजांची स्वानुभूति, हा त्यांचा दृढ आत्मविश्वास यथार्थच कसा होता, हें प्रस्तुत प्रकरणांत यथामति सिद्ध करून दाखविण्याचा प्रयत्न करावयाचा आहे.

मानवी इतिहासाचें सूक्ष्मपणें निरीक्षण केलें असतां, असें आढळून येतें कीं पृथ्वीतलावर धर्मशून्य असा एकाहि भूप्रदेश अस्तित्वांत नव्हता, नाहीं किंवा पुढेंहि असणार नाहीं. आपल्या आवाक्या बाहेरची अशी एक लोकविलक्षण चिच्छक्ति अखिल विश्वाचें नियमन करीत आहे हा अनुभव प्रत्येक प्राणिमात्राला केव्हां ना केव्हां तरी आल्यावांचून रहात नाहीं. अशी ही विश्वशक्ति जाणण्याची उत्कंठा साहजिकपणेंच मानवाला असते. व तिचा अनुभव घेण्यासाठीं वेगवेगळ्या स्वरूपांत तो धडपड करीत असतो. तें अतर्क्य विश्वरहस्य काय असेल, तें कसें जाणतां येईल, त्या करितां आपला व्यवहार–वर्तनक्रम कसा ठेवावयास पाहिजे इत्यादि गोष्टींची विवेचना तो ओघानेंच करूं लागतो. अशा प्रकारें त्या गूढ सर्वश्रेष्ठ शक्तीचा जीव–जगताशीं असलेला संबंध अनुभवण्याची जी धडपड, तळमळ किंवा विवेचना असते तिच्यापासूनच धर्मांचा उगम होतो. अशा ह्या धर्मांचीं बाह्य स्वरूपें त्यांचीं नांवें किंवा त्यांच्या विवेचन पद्धति ह्या भिन्न भिन्न असूं शकतील. त्याचप्रमाणें त्या त्या मानव वंशाच्या बौद्धिक विकासाच्या अधिकार

भेदानें व देशकाल परिस्थितीप्रमाणें त्या त्या धर्माचें तत्वज्ञानाहि वेगवेगळ्या स्वरूपाचें असेल, तथापि अशा या भिन्न भिन्न बाह्य गोष्टींमुळें धर्माचें अस्तित्व पुसलें जाऊं शकत नाहीं. आणि म्हणूनच धर्म नाहीं असा काळ वा देश नाहीं, म्हणजे धर्म हा अनादि व सनातन आहे असें प्रतिपादण्यांत येत असतें. किंबहुना हृदयाच्या क्रियेवांचून ज्या प्रमाणें मनुष्यमात्र जगणें अशक्य आहे, तद्वतच धर्मावांचून पृथ्वी जगणेंच शक्य नाहीं, कारण धर्म हाच विश्वाचा व जगताचा प्राण, आधार किंवा प्रतिष्ठा आहे–' धर्मो हि विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ' असा श्रेष्ठांचा त्रिकालाबाधित सिद्धांत आहे.

धर्माला असें हें सर्व श्रेष्ठ, त्रिकालाबाधित व अत्युच्च स्थान मिळण्याचीं कारणेंहि पण तशींच आहेत. मानव जात आणि विश्वशक्ति यांमधील नित्यसंबंध निश्चित करून त्याचा अनुभव मनुष्य मात्राला आणून देत देत त्या योगें मानव कुलाचें अभ्युदय व निःश्रेयस, ऐहिक व पारलौकिक कल्याण साधून देण्यासाठींच धर्माचा अवतार झालेला आहे. त्याचप्रमाणें दुर्दैवानें जे अहंममतादि क्षुद्र व संकुचित भावनांच्यायोगें उपरोक्त श्रेष्ठ विश्वशक्तीला–त्या सर्व शक्तिमान परमेश्वराला विसरून जाउन स्वतःच भ्रामक शरीरसुखाभिवृद्धींतच गुंतून पडलेले असतात, अशा स्वकर्तव्य–विन्मुख अज्ञानी लोकांना उन्नतीच्या परमोच स्थानाकडे खेंचून नेऊन, त्यांना मनःशांति देण्यासाठीं धर्माची निर्मिति झालेली आहे. सर्व उच्च वृत्तींची व शक्तींची वाढ झाल्याविना मनुष्याला शाश्वत कल्याणाची प्राप्ति होणें कदापि शक्य नाहीं आणि अशी ही सर्वांगीण वाढ करण्याचें श्रेष्ठ कार्य धर्माचेंच आहे. धर्मापासूनच सर्व प्रकारच्या स्पृहणीय सद्गुणांची उत्पत्ति होत असल्यानें जगताला शांति सौख्य व आनंद देण्याचें महत् कार्य धर्म करीत असतो. शरीराची निरोगिता व सुदृढता, अंतःकरणाचें निःसीम पावित्र्य, मनाचा कल्पनांची उदारता, व बुद्धीची अप्रतिहत तेजस्विता, यांचा योग्य प्रकारें विकास करून मनुष्य मात्राचें जीवन कर्तृत्वमय, सुंदर, सुसंगत व ' पूर्ण 'करण्यासाठींच धर्माची संप्राप्ति येथें झाली आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर मनुष्यमात्राच्या सर्व आध्यात्मिक शक्तींना नवजीवन देऊन, व त्यांची यथा–योग्य प्रकारें वाढ करून विश्वमंगलार्थ, मनुष्याला देवत्व वा दिव्यत्व प्राप्त करून देणारी धर्म ही एक ' अमर वल्लीच ' आहे.

अशा प्रकारें धर्माचा मूलभूत हेतु जरी शुद्ध, पवित्र सोज्वल व उदात्त असा असला तरी या जगतलावर, आज पर्यंत धर्माचे नांवावर जितका भयंकर द्वेष, कलह व मत्सर उत्पन्न झाला, जितकी घोर रणकंदने माजलीं गेलीं, जितका विलक्षण रक्तपात झाला, तितका अन्य कोणत्याहि गोष्टींनीं झाला नसेल हें दिसून येईल. तथापि या अनर्थोत्पातमूलक दोषांचे खापर धर्माचे माथ्यावर कोणीं फोडूं लागलें तर तें संयुक्तिक होणार नाहीं, कारण हा दोष धर्म तत्वांचा नसून त्या तत्वांच्या वास्तविक स्वरूपांचा विसर पडलेल्या किंवा पाडलेल्या त्या धर्माच्या अनुयायांचा असतो. वस्तुतः या जगांत आढळून येणारे शेंकडों धर्म वा संप्रदाय हे मानवी अधिकारभेद व देशकाल परिस्थित्यनुरुप निर्माण झालेले असून, ते ज्या प्रमाणें भिन्न भिन्न नद्यांचें पाणी भिन्न भिन्न मार्गानें समुद्रास जाऊन मिळत असतें, त्या प्रमाणें आपआपल्या परीनें अंतिम शिखर गांठण्याचा प्रयत्न करीत असतात. अशी वस्तुस्थिती असतांना कांहीं पंथानुयायांस आपलाच पंथ खरा आहे असा अभिनिवेश किंवा दुराग्रह उत्पन्न होतो व त्या बरोबरच इतरांचा दीर्घद्वेष व मत्सर करण्याची प्रवृत्ति बळावते. या पंथाभिनिवेशालाच ' धर्म वेड ' असें म्हणतात. मनोबुद्धीच्या क्षुद्र संकुचितपणामुळेंच परमताबद्दल असहिष्णुता हा रोग मनुष्याला जडतो आणि त्या

गाच्या लहरींतच जुलूम जबरदस्ती, बलात्कार, जाळपोळ, लुटालूट, वाटवाटावी, आयाबहीणींची अब्रु इत्यादि अनर्थवाही व उत्पातकारी अशी भीषण परंपरा या जगांत जन्माला येते. धर्मवेडाची ही भयंकर लाट जर या पृथ्वीतलावर उद्भुत झाली नसती तर मानव जातीचा इतिहास कांहीं निराळाच लिहावा लागला असता हें निर्विवाद होय. असो.

उत्पत्ति, स्थिति व लय किंवा बाल्य तारुण्य व वृद्धावस्था या गोष्टी प्रत्येक वस्तु जाताला लागूच आहेत. उदयास्त, चढउतार किंवा भरती ओहोटी या अवस्थांपासून कोणाचीहि मुक्तता नाहीं. या सिद्धांताला धर्महि अपवाद नसावा यांत नवल तें काय ? साहजिकच जेव्हां जेव्हां धर्म पहिली व दुसरी अवस्था सोडून, तिसऱ्या अवस्थेंत जातो तेव्हां तेव्हांच धर्मग्लानीचा समय प्राप्त झाला आहे असें समजण्यांत येतें. आणि उपरोक्त सर्व मेसूर अनर्थोत्पात या ग्लानीच्या अवस्थेतच वाढीला लागून मानवी इतिहासांतील काळेकुट्ट व लांच्छनास्पद पान लिहविण्यास कारणीभूत होत असतात.

धर्मग्लानीचा प्रारंभ म्हणजेच धर्मानें प्रस्थापिलेल्या श्रेष्ठ तत्वांचा विसर पडणें हा होय. अशा प्रकारें विसर पडतां पडतां धर्म आपल्या खऱ्या कार्यापासून व मूळ उद्दिष्टापासून आस्ते आस्ते पराङ्मुख होत जातो आणि बाह्य दांभिक आचार विचार खऱ्या धर्माची जागा पटकावितात. जीवनांत कृत्रिमपणा ओतप्रोत भरला जातो. आयुष्य हें ईश्वरी कर्तव्य नसून तें एक चैनीकरितां प्राप्त झालेलें साधन आहे अशी दृढ समजूत सर्वत्र अविरोधीपणानें वावरूं लागते. अनीतिमत्ता उजळ माथ्यानें व स्वच्छंदपणें सर्वत्र धिंगाणा घालूं लागते. विवेक, न्याय, नीति इत्यादि आवश्यक गोष्टींना मूठमाती मिळते, नसत्याच गोष्टींना भलतेंच महत्व प्राप्त होतें व खुळचट कल्पना, अर्थशून्य अशे मूर्खपणाचे आचार विचार सर्वत्र उदित होतात. परंतु यापेक्षांहि महदाश्चर्याची गोष्ट ही कीं या धर्मग्लानीच्या वेळीं ज्याप्रमाणें कांहीं मंडळी अनीतिमत्तेच्या अगदीं एका टोंकाला जाऊन, समाजाला अनर्थ परंपरेत बुडवीत असतात, त्याच प्रमाणें दुर्दैवानें कांहीं श्रेष्ठ समजली जाणारी, किंवा स्वतःला म्हणविणारी मंडळीहि आपल्या भ्रामक नीतिमत्तेच्या कल्पनांनीं, किंवा कांहीं सद्गुणांच्या विकासाच्या विचारांनीं दुसऱ्या टोंकाला जाऊन समाज रसातळास नेण्यास कारणीभूत होत असतात. अभ्यासपूर्वक उत्कटावस्थेच्या अतिरेकाला नेलेल्या त्यांच्या सात्विक वृत्ती व सद्गुणच समाजाचें अत्यंत अनहित केल्यावांचून रहात नाहींत व साहजिकच उपाय करितां अपाय नेमका घडून येतो ! हें ऐकून कोणास नवल वाटेल परंतु वस्तुस्थिति तशी आहे हें मात्र खोटें नाहीं.

मनुष्य पूर्णावस्थेस जाण्यास त्याचा सर्वांगीण विकास होणें आवश्यक असतें. जोंपर्यंत मनुष्याच्या सर्व शक्तींचा सर्व बाजूंनीं संपूर्ण विकास झाला नाहीं तोंपर्यंत समाजांत चिरंतन शांतिसौख्य नांदूं शकत नाहीं, समाज बल्लीयसाली होऊन स्थिरतेप्रत जाऊं शकत नाहीं. मनुष्य स्वभावाची ओळख करुन देणाऱ्या त्याच्या अंतर्बाह्य शक्तींची वाढ किंवा विकास योग्य प्रमाणांतच व्हावा लागतो. म्हणजे श्रेष्ठ व योग्य अशा शक्तींना आद्य स्थान मिळत जावें आणि तद्व्यतिरिक्त शक्तींना आपआपल्या कक्षेंत वावरावयास अवसर मिळून त्यांच्याकडून इष्ट तेवढीच कार्यसिद्धी होत रहावी, अशा प्रकारच्या सप्रमाण वाढीवरच व्यक्तीची व समाजाची परिणतावस्था अवलंबून असते. परंतु जेव्हां अन्यत्र दुर्लक्ष होऊन एकाद्या विशिष्ट गुणाच्या वाढीवरच

सारखा भर दिला जातो तेव्हां तो विशिष्ट गुण कितीहि श्रेष्ठ व आदरणीय असला तरी तो अनर्थवाही झाल्याविना रहात नाहीं. उदाहरणार्थ, एखाद्या मनुष्याच्या फक्त थोडयाच इंद्रियांची पुष्कळशी वाढ झाली तर तो मनुष्य लोकविलक्षण ह्मणजे कुरुप दिसेल. कल्पना करा कीं एखाद्याचे डोळे किंवा डोकें अशा सारख्या प्रमुख शरीरावयवाचीच वाढ शरीरांत अतिरेकानें झाली तर हा वाढीचा अतिरेक त्या मनुष्याला विकृत स्वरुप देईल किंवा कुरुपता आणील. मनुष्याचा एकंदर शरीरबांधा तेव्हांच सुंदर व सशास्त्र ह्मटला जाईल कीं जेव्हां प्रत्येक अवयवाची योग्य प्रमाणांत वाढ होऊन तो शरीराच्या सामर्थ्यास व सौंदर्यास कारणीभूत होत राहील. बाह्य अवयवासंबंधीं हा सिद्धांत जितका सत्य आहे तितकाच किंबहुना अधिक तो अंतर्गत विकासासंबंधींहि आहे. अंतर्गत शक्तींच्या सप्रमाण वाढीच्या अभावीं व्यक्तींच्या जीवनक्रमांतील साम्यता–तोल ( balance ) नष्ट होतो व जीवित आनंददायक होण्याऐवजीं तापदायक व अनर्थकारी होऊन बसल्याविना रहात नाहीं. पाश्चात्य मानसशास्त्रवेत्ता जेम्स म्हणतो * 'अतिरेकानें घडून आलेल्या चुका सद्गुणाच्या बाबतींतहि खऱ्या होत असलेल्या आढळून येतात. मानवी शक्तींची अतिरिक्त वाढ म्हणजेच एककल्लीपणा अथवा समतोलपणाचा अभाव होय. एखाद्या कार्यांत अन्य सर्व शक्तींची जोड असेल तर विशिष्ट वृत्तीच्या अतिरेकाचें अस्तित्व कल्पितांहि येणार नाहीं. उत्कट प्रेमाला बळकट इच्छा'शक्तीची, अचाट कर्तृत्वाला तीव्र बुद्धीची, अलौकिक बुद्धि सामर्थ्याला उच्च मृदुभावनांची जोड असल्याविना आयुष्यांत समतोलपणा रहाणार नाहीं. आणि अशा समतोलपणाच्या जीवनक्रमांत विवक्षित वृत्तींचा अतिरेक संभवणार नाहीं, एवढेंच नव्हे तर त्या जीवनक्रमांत सर्वांग परिपूर्णताच आढळून येईल. साधुसंत मानल्या गेलेल्या व्यक्तींत आध्यात्मिक वृत्तींचाच परिपोष उत्कटत्वानें झालेला असतो; तथापि आध्यात्मिक बाबतींत दिसून येणारा अतिरेक हा बुद्धिमत्तेचा अभावच सिद्ध करीत असतो. हा बुद्धीचा संकुचितपणा आणि अत्यंत अल्प प्रमाणांत प्रवृत्तींचा इतरत्र कल

* We find that error by excess is examplified by every saintly virtue. Excess in human faculties means usually onesidedness or want of balance ; for it is hard to imagine an essential faculty too strong if only other faculties equally strong be there to co-operate with it in action. Strong affections need a strong will, strong active powers need a strong intellect, strong intellect needs strong sympathies to keep life steady. If the balance exist no one faculty can possibly be too strong. We only get the stronger all round character. In the life of saints technically so called the spiritual faculties are strong. But what gives the impression of extravagance proves usually on examination, to be a relative deficiency of intellect. Spiritual excitement takes pathological forms when-ever other interests are too few and intellect too narrow. We find this exemplified by all the Saintly attributes in turn—devoute love of God, purity, charity, as-cetism, all may lead astray' (The psychology of Religion p. 141).

ज्या ज्या ठिकाणीं दिसून येतो त्या त्या ठिकाणीं आध्यात्मिक शक्तींचा अतिरेक मूर्त स्वरूपांत दृग्गोचर होतो. परमेश्वराची आत्यंतिक भक्ति, पावित्र्य औदार्य, विरक्ति, हे सर्व सद्गुण सुद्धां अधोगतीला कसे नेऊं शकतील हें वरील विवेचनावरूनहि सिद्ध करून सांगतां येण्यासारखें आहे—

धर्मग्लानीच्या काळीं उपरोल्लिखित पद्धतीचें एकांडे शिलेदार ह्मणजेच विशिष्ट गुणाची अतिरिक्त वाढ झालेल्या व्यक्ति, समाजांत सर्वत्र उत्पन्न झालेल्या असतात. त्यांच्याकडून या त्यांच्या एककली वृत्तीमुळें समाजाची धारणा पोषणा करणाऱ्या सर्व संग्राहक व्यापक धर्म तत्वांकडे सर्वथैव दुर्लक्ष केलें जातें अर्थातच या अशा कांहीं नीतिमान व समंजस व्यक्तींच्या वर्तनाची फलश्रुति, दुर्दैवानें यथार्थ धर्म रक्षणाच्या उचित कृत्यांत अनीतिमान व अविचारी माणसांच्या वर्तनाप्रमाणेंच होत असते. अशा व्यक्तींच्या ठिकाणीं धर्मसंस्कृती विषयीं अढळ निष्ठा व जाज्वल्य अभिमान असला तरी त्यांच्या योगानें समाजाचें खरें धारण पोषण व श्रेष्ठ उत्कर्ष साधला जातो, त्या धर्मानें अंगीकारलेल्या नीतीनिर्बंधांची त्यांच्याकडून नकळत उपेक्षा होत जाते. पूर्वीच्या दूरदर्शी थोर ऋषिमुनीजनांनीं निषेधिलेलें व्यक्तिस्वातंत्र्य, स्वैरपणें अंगिकारलें जाते व उलट समाजहितदृष्ट्या आवश्यक ह्मणून सांगितलेल्या व्यक्तिस्वातंत्र्याचा त्यांच्या कडून संकोच केला जातो. त्या मुळें सामाजिक जीवन, सामाजिक वेदनें, व सामाजिक ऋणें या कल्पनांचा भराभर विसर पडत जाऊन व्यक्ती—व्यक्तींतलें अंतर्गत प्रेम, बंधुता किंवा आत्मीयत्व यांना मूठमाती मिळते. याप्रमाणें आवश्यक भावबंधनाच्या अभावीं पृथक् पृथक्पणाची घातुक प्रवृत्ति समाजांत शिरूं लागली कीं समाजाची दृष्टी सर्वांगांनींच आकुंचित होते व त्यांत अनेक दोषांचा उद्भव होतो! अशा अवस्थेंत विजातीय तत्वें समाजांत घुसून आपली सत्ता निःशंकपणें प्रस्थापित करतात व त्यांच्या बळावरच परकी शत्रू आपलें आसन स्थीर करण्यास चुकत नाहींत.

ज्या ज्या वेळीं समाजावर व त्याच्या संस्कृतीवर शत्रूची धाड येते त्या त्या वेळीं तो समाज आहारीं पाडण्याचें काम शत्रू केवळ बाह्य शस्त्रास्त्रांनींच किंवा लढायांनीं करितो असें नव्हे. रणांगणांतील लढाई अल्पकालीन असते. परंतु तत्पूर्वी समाज पोखरण्याचें काम भिन्न भिन्न मार्गांनीं व साधनांनीं अंतस्थ पद्धतीनें शत्रूकडून चाललेलें असतें. ह्मणजे समाजाचा सूक्ष्म दृष्टीनें अभ्यास करून शत्रू त्या समाजांतील मर्में किंवा मर्मस्थानें शोधून काढतो व अचुकपणें त्यांच्यावर तो आघात करतो, ही शत्रूची मर्मभेदक स्वारी जाणणें मोठें कठीण असतें. कारण प्रत्येक समाजाला कांहींना कांहीं मर्मस्थानें वैगुण्यें हीं कोठेंना कोठें तरी असावयाचींच; पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, तीं मर्मस्थानें शत्रूला लोकांच्या हलक्या किंवा क्षुद्र वृत्तींतच आढळतात असें नाहीं. तर कित्येक प्रसंगीं सात्विक किंवा उच्च मनोवृत्तींत सुद्धां शत्रूला घर करावयास जागा मिळते—शत्रू जसा राजस किंवा तामस वृत्तीचा लाभ घेतो तद्वतच सात्विक वृत्तींचाहि लाभ घेण्यास तो चुकत नाहीं. किंबहुना या 'सत्वस्थ' वृत्तींची अतिरिक्त वाढ हीच त्याला समाज संपूर्णपणें आपल्या पचनीं पाडण्यास अधिक उपयुक्त ठरते. ह्मणजे ज्याप्रमाणें कामक्रोधादि विकारांना त्यांचें खाद्य पुरवून त्यांच्या करवीं स्वतःचा स्वार्थ तो शत्रू साधून घेतो त्याचप्रमाणें समाजाच्या दया, क्षमा, शांति इत्यादि उच्च मनोवृत्तीं करवीहि तो आपला स्वार्थ संपादून घेऊं शकतो. याला हिंदुस्थानच्या इतिहासांतील पृथ्वीराजाचा दृष्टांत फार समर्पक होईल. तिलेरीच्या लढाईत सुलतान शहाबुद्दिन घोरी पृथ्वीराजाचें हातीं जीवंत सांपडला; पण त्या कालसर्पाला 'धर्मयुद्धेच्छु' रणशूर

पृथ्वीराजानें त्यावेळीं जीवदान दिलें. पुढच्या खेपेस सुलतान शहाबुद्दिन घोरीनें असें सांगतात कीं लाखों गाई खरेदी केल्या व 'गाईची पूजा करणारा यवन राजा' अशी भावना स्वतः संबंधीं लोकांत जागृत केली. अर्थात अविरोधानें तो थेट पृथ्वीराजापर्यंत चाल करुन जाऊं शकला व प्रत्यक्ष समरांगणांत आपल्या सैन्या भोंवतीं गाईंचा कोट तयार करुन त्यानें युद्धास आव्हान दिले. सहाजिकच गोमातेचें संरक्षण करण्याकरितां हिंदी सैन्यानें शस्त्रसंन्यास केला व महंमद घोरीचा हेतू सफल होऊन इन्द्रप्रस्थीचें राज्य अनायासें त्याचे हातीं आलें. अर्थात ज्या गायी वांचवावयास म्हणून ते गेले त्यांचा तर घोरीच्या सैन्यानें लढाई नंतर चट्टामट्टा केलाच परंतु तेव्हांपासून जो गाईचा संहार सुरु झाला तो अद्यापिही चालू आहेच. म्हणजेच पृथ्वीराजाच्या स्वरुपांत भारतीयांची भूतदया व धर्मयुद्ध प्रीति या सद्गुणांचा परकी शत्रूंनीं संपूर्ण लाभ घेऊन आपला स्वार्थ साधून घेतला.– कर्नल टॅाडनेंहि म्हटलें आहे. "रजपुतांनीं भूतदया किंवा औदार्य दाखविलें नसतें तर मोंगली राज्य अधिक लौकर नामशेष झालें असतें."

साहजिकच व्यक्तीच्या व समाजाच्या एकांगी वाढीनें–मग ती उच्च वृत्तीचीहि कां असेना, व्यक्ति समाजांचें स्थैर्य नष्टप्राय कसें जातें हें वरील दृष्टांतावरुन चांगलें समजून येईल. पृथ्वी राजाच्या या दृष्टांता प्रमाणेंच भारतीय संस्कृतीच्या चढउताराचा समग्र इतिहासहि वरील सिद्धांताची सत्यता सिद्ध करीत आहे. म्हणून त्याचें विहंगमावलोकन येथें जरा विस्तारानें करणें अप्रस्तुत होणार नाहीं. सुपीक जमीन अमूल्य व अपरंपार खनिज संपत्ति, निसर्ग–रमणीयता, दुर्गम, अभेद्य व उत्तुंग पर्वतांचे कोट, अफाट महासागरांचे दुर्लंघ्य खंदक, अपरंपार लोकसंख्या इत्यादि बाह्य गोष्टींनीं भारतवर्षाला जागतिक दृष्टीनें महत्व आहेच; परंतु बाह्य गोष्टींपेक्षां सांस्कृतिक, बौद्धिक, नैतिक, धार्मिक इत्यादि दृष्टींनीं जगताचा खरा स्पृहणीय व आदर्श इतिहास बनविण्याची जी सर्वश्रेष्ठ कामगिरी भारतवर्षीय संस्कृतीने बजाविलेली आहे तिचें महत्व कांहीं निराळेंच असल्यामुळे विशेषपणें अभ्यसनीय आहे.

भारतवर्षीय इतिहासाच्या अभ्यासनाचें महत्व प्रो. मॅक्समुल्लरसाहेबांच्याच शब्दांत असें सांगतां येईल कीं "भाषा, धर्म, पुराणकथा, कायदे, चालीरीती, प्राचीनकला, प्राचीन शास्त्रें इत्यादि जे मानवी मनोबुद्धीचे निरनिराळे विकास व विलास आहेत त्यांपैकीं कोणत्याहि एकाच्या विशेष अध्ययनास प्रारंभ केल्यावर, तुम्हांस आवडो वा न आवडो, तुम्हांस हिंदुस्थानाकडेच जाणें भाग पडेल! कारण मानवी इतिहासाच्या सामुग्रीपैकीं अत्यंत महत्वाच्या व अत्यंत बोधकारक सामुग्रीचें भांडार हिंदुस्थानांत–केवळ एकट्या हिंदुस्थानांतच सांठविलेलें आहे." *

आजपर्यंत या पृथ्वीतलावर भिन्न भिन्न स्थळीं व भिन्न भिन्न काळीं एकामागून एक अशा अनेक संस्कृती उदयास आल्या आहेत. असीरियन, बाबिलोनियन, इजिप्शियन, पर्शीयन, ग्रीक, रोमन इत्यादि

* Whatever sphere of the human mind you may select for your special study, whether it be language or religion or mythology or phylosophy, whether it be laws or customs, primitive art or primitive science, every where you have to go to India whether you like it or not, because some of the most valuable and most instructive materials in the history of a man retreasured up in India and India only"

अनेक संस्कृतीचे उदयास्त सर्वभक्षक काळानें उदरस्थ केले. परंतु आर्य संस्कृति या सर्वांच्या अगोदर जन्मास आली व त्या इतर संस्कृती केव्हांच नामशेष झाल्या तरीहि अद्यापि जिवंतच आहे व पुढेंहि जीवंत राहणार, एवढेंच नव्हे तर ती आपला आजपर्यंतचा त्या सर्वांच्या गुरुस्थानीं विराजमान होण्याचा अधिकार सांभाळून जिवंत राहणार ! कारण जोंपर्यंत जगताला शाश्वतीच्या शांतिसौख्याची आवश्यकता आहे तोंपर्यंत ईश्वराच्या सृष्टींतील या महा अश्वत्थ वृक्षाला मरण नाहीं आणि ह्मणूनच भारतीय संस्कृति नष्ट होईल त्या दिवशीं जगताचें अस्तित्व पुसलें जाईल हें निर्विवाद आहे. एवढ्यावरूनच आर्य संस्कृति ही जगताच्या पुरातनत्वाला साक्षीरूप आहे, ती सृष्टीचा सनातन अश्वत्थ वृक्ष आहे, ती सृष्टीचालक–इतिहास–विधात्या ब्रह्मदेवाकडून जणूं काय अमरत्वाचा पट्टा घेऊन आली आहे अशा प्रकारची स्तुती तिचे भक्तजन मुक्तकंठानें करतांना आढळून येतात.

अशा या श्रेष्ठतम आर्य संस्कृतीवर इतर संस्कृतींप्रमाणेंच काळाची वक्रदृष्टी अनेकदां पडली, नाहीं असें नव्हे. कोणत्याहि राष्ट्राच्या आयुर्मर्यादेंत सृष्टिनियमानुसार भरती ओहोटीचे किंवा चढती पडतीचे प्रसंग अनेकवार येतच असतात. समाजाची प्रगति होतां होतां तो उन्नतीच्या शिखरावर पोहोंचावा, जगांतील इतर संस्कृतीचे समाज त्यांच्यापुढें विनम्र व्हावे व त्याचा कीर्तिडिंडिम दिगंत निनादूं लागावा, अशा अवस्थेंत ज्या विचारपूर्वक आंखलेल्या न्याय–नीति–निर्बंधांनीं आतांपर्यंतची मजल गांठलेली असते, त्यांची पाळणूक जोंपर्यंत समाज एकनिष्ठपणें करीत असतो किंवा प्रसंग विशेषीं त्यांत पालट करावयाचे झाले तरी ते दूरदर्शीपणानें देशकालपरस्थितीला अनुसरून करीत असतो, तोंपर्यंत तो आपलें श्रेष्ठस्थान सोडीत नाहीं. पण एकदां कां या गोष्टीकडे दुर्लक्ष झालें किंवा दुर्दैवानें करविलें गेलें म्हणजे कांहीं गोष्टी निश्चयानें अतिरेकाला जातात व समाजाला पुनश्च उतरती कळा प्राप्त होते, असा चक्रनेमिक्रम इतिहासांत सर्वत्र दृष्टोत्पत्तीस येतो. त्याला अनुसरूनच भारतवर्षीय संस्कृतीनेंहि अनेक स्थित्यंतरें व गंडांतरें पाहिलीं व अनुभवलीं आहेत; तथापि प्रत्येक वेळेला या नवनवीन संकटांतून व भयंकर अग्निदिव्यांतून इतरांप्रमाणें नामशेष न होतां, भारतीय संस्कृति अधिकाधिक तेजस्वी होऊन बाहेर कशी पडली हें पाहणें व अभ्यासणें मोठें उद्बोधक, आनंददायक व कौतुकास्पद आहे.

ज्या वंदनीय पुण्यश्लोक तपोधन पूर्वजांनीं हजारो वर्षांपूर्वीं अत्युग्र तपाचरण करून जीव, जगत व परमेश्वर या सूक्ष्म व गूढ मूलतत्त्वांची आपल्या अपरंपार बुद्धिसामर्थ्यानें व लोकोत्तर धारणेनें सांगोपांग उपपत्ती लाविली व त्यांचे परस्पर संबंध सुनिश्चित करून जगताला बहुमोल ज्ञानाचा ठेवा हातीं आणून दिला, कीं जें त्यांचें ज्ञान सध्यांच्या भौतिक शास्त्राच्या चिकित्सक युगांतहि कोणत्याहि तऱ्हेनें हिणकस, विसंगत वा चुकीचें न ठरतां उलट अधिकाधिकच दृढ तर केलें जात आहे. त्या परम मंगलकालीं आर्य संस्कृति आपल्या वैभवाच्या उत्तुंग शिखरावर विराजमान झालेली होती.

' गायंति देवाः किल गीतकानि, धन्यास्तु
ये भारतभूमिभागे ॥
स्वर्गापवर्गस्य च हेतुभूते भवन्ति
भूयः पुरुषास्सुरत्वात् ॥ १ ॥

किंवा ' दुर्लभं भारते जन्म ' अशी जी स्तुति मुक्तकंठानें केलेली आढळते ती या काळाचीच होय. पूज्यपाद लो.. टिळकांनीं हा सर्वोत्कृष्ट काल खिस्तापूर्वी ४००० ते ५००० वर्षांच्या अलीकडे आणतां येत नाहीं असें सिद्ध केले आहे. प्राचीन संस्कृतीचे जन्मस्थान भारतवर्षच आहे असें कित्येक विद्वानांनीं निश्चित केलें आहे.. या तिच्या येथील प्राचीनत्वाला अलीकडील सिंध प्रांतांतील ' मोहेंजोदारो ' व पंजावांतील ' हरप्पा ' येथील सारख्या खोदकामावरून अधिक बळकटीच आली आहे. ' कौंट् जॉर्स्ट जर्ना ' व ' कर्नल अल्कॉट ' यांनींहि हिंदुस्थान हेच मानवी संस्कृतीचें आद्य स्थान मानलें आहे, तर पाश्चात्य पंडित सर वॉल्टर रॅले आपल्या जगाच्या इतिहासांत, भरतखंडांतच प्रथमतः मनुष्य प्राणी जन्मास येऊन तो सर्व पृथ्वीवर पसरला असें म्हणत आहे. पण तें कसेंहि असले तरी या कालांत भारत वर्षात एक अत्यंत उच्च, उदात्त, उन्नत व उज्वल संस्कृति नांदत असून ती जगताला गुरुस्थानीं वाटत होती हें निर्विवाद आहे. याचें कारण एकच कीं भारतवर्षीय मुनिसत्तम पूर्वजांनीं वेदांच्या द्वारें सर्वश्रेष्ठ व शाश्वत असा दिव्य धर्म अखिल जगताला प्रतिपादन केला. ह्मणूनच वेद हे सर्व धर्मांचें मूल म्हणून वर्णिलेलें आहेः—

' वेदोऽखिलो धर्ममूलम् ' । मनु

या वेदांचें अस्तित्व आर्यांच्या समजुतीप्रमाणेच नव्हे तर कित्येक पाश्चात्य पंडितांच्या मतेंहि जगाच्या प्रारंभापासून आहे. ' लुइस जाकोलियेट ' नांवाचा एक फ्रेंच तत्ववेत्ता आपल्या ' हिंदुस्थानांतील बायबल ' या ग्रंथांत ह्मणतो, ' जगांतील जुन्यांत जुन्या लिखाणांत अग्रपूजेचा मान वेदांचा आहे. ब्राह्मणांच्या मताप्रमाणें वेद अपौरुषेय आहेत म्हणजेच ते प्रत्यक्ष परमेश्वरनिश्वसित आहेत. परमेश्वराचा तो दिव्य संदेश आहे. इराण, एशियामायनर, इजिप्त, युरोप, इत्यादि स्थळीं मनुष्य वस्तीला प्रारंभ होण्यापूर्वीपासूनच या लिखाणांना असा अद्वितीय मान आर्यावर्तांत मिळत आला आहे." ' मानव जातीच्या पुस्तक संग्रहांतलि वेद हे अत्यंत जुने ग्रंथ आहेत ' असें प्रो. मॅक्समुल्लर साहेबांचें ह्मणणें आहे. अशाप्रकारें वेदांचें प्राचीनत्व तर सर्व संमतच आहे पण त्याबरोबरच जगांतील सर्व वाङ्मयाचें जनकत्वहि त्यांच्याकडेच आहे असें मानण्यांत येतें. साहजिकच प्राचीनता, जगाचें ज्ञानजनकत्व, खोल गंभीर तत्वज्ञान, तेजस्वी व तर्कशुद्ध विचारसरणी, मोहकशुद्ध गोड व प्रेमळ भाषा इत्यादि अनेक गुणाच्या योगानें वेदांचें महत्व लोकोत्तरच आहे, ह्मणूनच प्रो. मॅक्समुल्लर यांनीं ' इतर कोणत्याहि भाषेंतील ग्रंथानें जें काम झाले नसतें तें वेदांनीं जगाच्या इतिहासांत केले आहे. ह्मणून ज्याला त्याला स्वतःच्या पूर्वजांचा व आपल्या इतिहासाचा अभिमान आहे व आपल्या बौद्धिक विकासाची जो इच्छा करितो त्या प्रत्येकानें वेदांचा अभ्यास करणें आवश्यक आहे" अशी कळकळीची विनंति केली आहे. भारतीय संस्कृतीची संपूर्ण ओळख करुन देणारें हें अलौकिक वाङ्मय इतर भारतवर्षीय ग्रंथसंपत्तीप्रमाणे परकी शत्रूंच्या धर्मवेडाच्या अग्निल्यांत नामशेष झालें असतें. पण त्या दूरदर्शी तपोधनांनीं त्याचें सर्व संकटांतून रक्षण करण्याची एक अजब युक्ति काढिली आणि ती ह्मणजे वेदांतील प्रत्येक अक्षरन् अक्षर पद, क्रम, जटा इत्यादि प्रकारांनीं कंठस्थ करुन ठेवावयाची होय. सन्माननीय लोकमान्य टिळकांनीं ह्मटल्याप्रमाणें " प्राचीन इतिहास व सनातन धर्म ह्यांजवर ह्या भिक्षुक वर्गानें किती उपकार केले आहेत व आमच्या आर्यांच्या पुरातन कथा राखल्यामुळें आतां किती उपयोग होत आहे, ह्याचे मोल होणार नाहीं. असे ग्रंथ

कायम राखण्यासाठीं मुद्दाम वाढविलेल्या स्मरण शक्तीचें साह्य असावें लागतें. त्यांनीं मोठ्या निष्ठेनें परंपरा राखून अत्यंत पूज्य बुद्धीनें अक्षर, स्वर, मात्रा न चुकतां हजारों वर्षें वेद कायम राखण्याचें श्रेय घेतलें. त्याबद्दल त्यांचे किती उपकार मानावे हें समजत नाहीं. "*

हा वेदांतून प्रतिपादलेल्या धर्माचें अत्यंत प्राचीन स्वरूप म्हणजे केवळ यज्ञमय अथवा कर्मप्रधान होतें. या कर्ममार्गाचें पुढें पुढें महत्वच प्रस्थ माजलें व यज्ञयागादिकांनीं देवता संतुष्ट करून विश्वमंगल साधण्याचा मूलभूत हेतु सुटून कर्मासच देव मानण्यापर्यंत मजल गेली. तेव्हां साहजिकच प्रतिक्रिया होऊन परब्रह्माचें चिंतन व मनन केल्याविना त्याचें ज्ञान केवळ कर्मानें होणार नाहीं असें प्रतिपादन करणारीं उपनिषदें पुढे आलीं. याच सुमारास कपिल सारख्या मुनींची मूळच्या प्रवृत्तिधर्माविरुद्ध विचारसरणी सुरू होऊन सांख्यादि मतें प्रस्थापित केलीं गेलीं. पुढें ब्रह्मचिंतन करण्यास चित्ताची एकाग्रता आवश्य असल्यानें ती सांगणारा योगमार्ग निघाला, तर ॐकार, यज्ञाची निरनिराळीं अंगें व दैवतें या ऐवजीं पुढें मानवरूपधारी प्रतीक घेण्याची आवश्यकता सिद्ध झाल्यापासून भक्तिमार्गाची स्थापना झाली अशा प्रकारें या अध्यात्म विषयाची सारखी भवति न भवति होत राहिली होती. या सर्व मार्गांचा सुंदर समन्वय श्रीमद्भगवद्गीतेनें मोठ्या अधिकारवाणीनें केला व किंकर्तव्यमूढ बनलेल्या जनतेस शाश्वत सुखशांतीचा सुलभ राजमार्ग मोकळा करून दिला. गीतारहस्याच्या शब्दांतच सांगावयाचें तर 'उपनिषदांतील केवळ बुद्धिगम्य ब्रह्मज्ञानास प्रेमगम्य व्यक्त उपासनेच्या राजगुह्याची जोड देऊन कर्मकांडाच्या प्राचीन परंपरेप्रमाणें 'आपापल्या योग्यतेनुरूप आपापलीं सांसारिक कर्तव्यें लोकसंग्रहार्थ निष्कामबुद्धीनें आत्मौपम्यदृष्टीनें व उत्साहानें यावत् जीव करीत राहून तद्वारा पिंडब्रह्मांडांत सर्वभूतीं एकत्वानें भरलेल्या नित्य परमात्म देवतेचें नेहमीं भजन करा, त्यांतच तुमचें पारलौकिक व ऐहिक कल्याण आहे' असें अर्जुनास निमित्त करून सर्वांसच गीतेनें कंठरवानें उपदेशिलें. ( गी० र०.५०३ )

याच समयीं बृहस्पति—चार्वाक पंथाभिमानी दुर्योधनप्रभृति कौरव व अभिजात दैवी संपत्तीनें युक्त असलेले पांडव यांमध्यें घनघोर रणसंग्राम झाला, व त्यांत दैवी संपत्तीनें आसुरी संपत्तीवर विजय मिळविला. तथापि या भारतीय युध्दाचा प्रसंग म्हणजे केवळ भारतवर्षाच्या इतिहासापुरताच नव्हे तर सर्व जगांत मोठा क्रांतिमूलक होऊन गेला. भारतीय युध्दानें आर्यवंशीय क्षत्रीय जातींचाच नव्हे तर म्लेच्छ, यवन, शबर, शक इत्यादि आर्येतर जातींच्या क्षत्रियांचाहि चुराडा उडविला. येथूनच कलीयुगास प्रारंभ

* " The service which this ( Priest ) class has rendered to the cause of ancient history and religion by preserving the oldest traditions of the race is invaluable, and looking to the fact that a specially disciplined memory was needed for such preservation we cannot but gratefully remember the services of those whose heriditary devotion to the task, we might say the sacred religious task, rendered it possible for so many traditions to be preserved for a thousands of years letter for letter and accent for accent" ( Artic Home in the Vedas ).

होऊन तदनुषंगिक घोर आपत्तींचीं बीजें समाजांत रोविलीं गेलीं व पुढील अनार्य लोकांच्या आक्रमणाची संभवनीयता दृढमूल होऊन बसली.

भारतीय समाजाच्या या अध:पतन समयीं प्रथम जैन व नंतर बौद्ध मतांचा प्रादुर्भाव झाला. या मतांचा मुख्य कटाक्ष वेदप्रामाण्यावर, वेदविहित चातुर्वर्ण्य–संस्थेवर व यज्ञयागादि कर्मकांडावर होता. सनातन धर्मविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून हीं दोन मतें प्रचलित झाली पण पुढें बौद्धांनीं जैनांना मागें टाकून आपली कीर्ति दिगंत पसरविली. त्याकाळीं गौतमबुद्धाच्या दिव्य चरित्रानें सर्वांच्या दृष्टी दिपून टाकल्या. ऐन तारुण्य, प्रेम करणारीं मातापितरें, यशोधरेसारखी तरुण, सुंदर व एकनिष्ट पत्नी, संगमरवरी राजवाडे, हस्तीदंती पलंग, उंची भरजरी वस्त्रें इत्यादि प्रकारच्या सर्व ऐहिक ऐश्वर्यावर व वैभवावर लाथ मारून ' माझ्या वैयक्तिक सुखाची मला मुळींच परवा नाहीं. अथवा मी अखेरच्या प्रशांत अवस्थेंत एकटा राहाण्याला अगदीं इच्छित नाहीं, परंतु माझें वातें सर्वत्र चिरंतन असावा, माझ्या बरोबर प्रत्येक प्राणिमात्र मुक्त होऊन शाश्वत सुखाचा वाटेकरी व्हावा अशी माझी इच्छा आहे, व त्याकरितां जन्मोजन्मीं मी प्रयत्न करीन आणि तसें घडून आल्याशिवाय माझें कदापि समाधान होणार नाहीं. जगांतील प्रत्येक दु:ख व हाल यांचा पूर्ण निरास होऊन प्रत्येक व्यक्ती मजबरोबर निर्वाण सुख उपभोगण्यास पात्र होईल तेंव्हांच मी आपला प्रयत्न थांबवीन " अशी अमर्याद विश्वप्रेमानें धुंद होऊन गंभीर प्रतिज्ञा करणारा गौतमबुद्ध साहजिकपणें सर्वांना प्रिय व वंदनीय होऊन बसला व त्याचे हजारों अनुयायी झाले.

बुद्धाची लोकोत्तर बुद्धिमत्ता, त्याच्या विचाराची उदात्तता, त्याची जाज्वल्य सत्यनिष्ठा, त्याचें तीव्र वैराग्य, त्याची उच्च नीतिमत्ता, त्याचें अपरिमित औदार्य व कौतुकोत्पादक भूतानुकंपा, विश्वाच्या आत्यंतिक सुखाविषयींची त्याची दृढ श्रद्धा, त्याचें अगाध प्रेम इत्यादि गोष्टींचा प्रभाव वरिष्ठ समाजावरहि झालाच व त्याचीं नीति तत्वें, अहिंसा, संन्यास व सामान्य जनांत तत्त्वज्ञान प्राकृत भाषाद्वारा पसरविण्याची पद्धत ब्राह्मणांनींहि स्वीकारली. एवढेंच नव्हे तर बुद्धाची गणना श्रीकृष्णादिकांच्या बरोबर दशावतारांत होऊं लागली. बौद्ध धर्म हा अवैदिक किंवा वेदविरुद्ध होता ही गोष्ट खरी परंतु बौद्धांनीं ज्या ज्या पुराण कथा, *धार्मिक प्रमेयें, आचार विचार व शास्त्रीय सिद्धांताच्या गोष्टी प्रस्थापित केल्या त्या त्या प्रत्यक्ष हिंदुधर्मशास्त्र,* पुराणें व तत्त्वज्ञान यांच्या आधारावरच होय हें विसरून चालावयाचें नाहीं. त्यांना उपनिषदांतील कर्मविपाकांची व पुनर्जन्माची कल्पना मान्य होती. तद्वतच पंचमहायज्ञ व नीतिधर्म इत्यादिहि वैदिक ग्रंथांतूनच त्यांनीं घेतले होते. वैदिक देवता स्वर्गादि देवलोकांचें अस्तित्व त्यांना अमान्य नाहींत. वैराग्ययुक्त संन्यासानें मनाची निर्विषयता साधून अंतिम सुख मिळतें असा वैदिक धर्मप्रमाणेंच त्यांचा सिद्धांत आहे. म्हणूनच बौद्ध धर्माचा प्रसार हा भारतीय उज्वल संस्कृतीला परिपोषक व भूषणावह असाच झाला. बौद्ध धर्म म्हणजे वेदविहित चातुर्वर्ण्य संस्थे विरुद्ध, विशेषत्वानें ब्राह्मणांच्या कर्मकांडा विरुद्ध उभारलेलें बंड होय. त्यायोगें त्याला जरी क्रांतिकारक स्वरूप आल्यासारखें भासलें तरी ज्या कारणाकरितां हें बंड उभारलें गेलें होते तीं कारणें सनातन धर्मीयांनीं मोठ्या बुद्धिचातुर्यानें निर्मूल करविल्याबरोबर बंड नष्ट झालें. बौद्ध धर्माचा जन्म आर्य संस्कृति ठार करावयास झालेला नसून उलट आर्य धर्मांतील दया क्षमा शांति मूलक नैतिक आचार विषयक महत्वपूर्ण भागाला विशेष प्रकाशांत आणण्याची श्रेष्ठ व स्पृहणीय कामगिरी त्यानें केली. व



"माझ्या वैयक्तिक सुखाची मला मुळीच क्षिति वाटत नाही. अथवा मी अखेरच्या प्रशांत
स्थेंत एकटा राहण्याला अगदीं इच्छित नाहीं. परंतु माझा वास सर्वत्र चिरंतन असावा, माझ्याक
प्रत्येक प्राणिमात्र मुक्त होऊन शाश्वत सुखाचा वाटेकरी व्हावा अशी माझी इच्छा आहे, व त्या क
जन्मोजन्मीं मी प्रयत्न करीन आणि तसें घडून आल्याविना माझें कदापि समाधान होणार नाहीं. जगां
प्रत्येक दुःख व हाल यांचा पूर्ण निरास होऊन प्रत्येक व्यक्ति मजबरोबर निर्वाण-सुख उपभोगण्यास
होईल तेव्हांच मी आपला प्रयत्न थांबवीन."

—महात्मा गौतम बुद्ध.

या दृष्टीनें हिंदु धर्माची ती पुरवणीच होता, असें मानण्यांत येतें. मनुष्याला डोक्याप्रमाणेच अंतःकरणाची आवश्यकता असते–तेजस्वी बुद्धिमत्तेला उदात्त व थोर अंतःकरणाची संगति द्यावी लागते, त्या वेळेसच मनुष्याची पूर्णता होते, तद्वतच तत्कालीन यज्ञ यागमय कर्मकांडांत व आध्यात्मिक विचारांत दंग झालेली बुद्धि सामान्य जनांस उद्धाराचा मार्ग दाखविण्यास अक्षम झाली होती. बुद्धानें सर्व लोकांना कवटाळून वरील उणीव भरून काढण्याचा सुंदर उपक्रम केला. बुद्धानें जीव जगत परमेश्वर किंवा आत्मानात्मविवेक इत्यादि तत्वज्ञानाच्या गहन प्रश्नांकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. मनुष्यानें सदाचारानें वागून पापजन्य दुःखापासून स्वतःची मुक्ती करून घ्यावी, हा साधा व सर्वांस तत्काल पटणारा उपदेश त्यानें सर्व जगास केला. त्याच्या या उपदेशाची इमारत विश्वबंधुत्व, अहिंसा, सत्क्रिया, सत्य, संन्यास व अनासक्ति या तत्वांवर त्यानें उभारली होती. किंवा सर अरनोल्डच्या मार्फत सांगावयाचें म्हणजे अमर्याद विश्वप्रेमाचें सातत्य, विश्वाच्या आत्यंतिक सुखाच्या व स्वातंत्र्याच्या आशेचें अमरत्व व वैयक्तिक सुखाचा संपूर्ण निरास याच गोष्टी बुद्धप्रणीत धर्माचें सार होत. तथापि या गोष्टी पुढें केवळ बोलण्यापुरत्याच राहिल्या. बुद्धाची शिकवण पुढें लोपेनाशी झाली. बौद्ध धर्माचे यमनियम व शिस्त फार कडक असल्यामुळें, खेरीज भिक्षुक झाल्याविना निर्वाण–प्राप्ति नाहीं या सिद्धांतामुळें सांसारिक लोक या मार्गापासून विन्मुख होऊं लागले. तद्वतच बौद्धांकडून वैदिक धर्मावर नित्यशः केल्या जाणाऱ्या हल्ल्यामुळे सर्वत्र पाषांड मतें संचरूं लागलीं व धर्मसंस्थापकाचा अंतिम हेतु सुटला जाऊन बौद्ध भिक्षु किमया, भूतपिशाच्च विद्या जादूटोणा मंत्रतंत्र इत्यादि चमत्कार प्रयोग करून अज्ञजनांना मोहानें घालून आकर्षण करण्याच्या मार्गास लागले. ज्या मूर्तिपूजेविरुद्ध प्रथमारंभीं इतकी हाकाटी करण्यांत आली तीच मूर्तिपूजा भिक्षूंच्या हाडाची, केसाची इत्यादि प्रकारांत मोठमोठ्या भव्य विहारांतून होऊं लागली. बौद्ध मठांत कोणास घ्यावें व कोणास नाहीं याचा विधिनिषेध उरला नाहीं. चोर, भिकारी, दुराचारी लोक, निर्वाहाचें व चैनीचें साधन म्हणून, मठांचा उपयोग करूं लागले. खेरीज बर्बर, तार्तरादिक ज्या कित्येक असंस्कृत जाती त्यावेळीं बौद्ध धर्म दीक्षित केल्या गेल्या होत्या त्यांच्यावरचाहि दाब सुटून त्या जातींचे जन्मजात दुराचार, चमत्कारिक, भोळसट, खुळचट व भ्रामक समजुती, खोट्या व घातक कल्पना यांना पुनश्च ऊत आला व उत्पादकाचा मूळ हेतु गंगोघाप्रमाणें कितीहि शुद्ध व पवित्र असला तरी अज्ञ आडमुठ्या समाजाचे अनेक नदनाले येऊन मिळाल्यामुळें, तो गढूळ झाला–नव्हे तो किळसवाणाहि झाला. साहजिकच विचारी जगांत बौद्धधर्म आस्तेआस्ते तिरस्कारास पात्र होऊं लागला.

अशा अवस्थेत कुमारिल भट्टादिक वैदिक पंडितांस जोर चढून त्यांनीं वैदिक धर्माच्या आचार अंगाचें म्हणजे विधींचें पुनश्च संस्थापन केलें. या अवधींत रामायण, महाभारत, मनुस्मृति आदि ग्रंथांच्या आधारें सनातन धर्माची महती जोरजोरानें प्रतिपादन करण्यांत आली. याच समयीं ब्रह्मा, विष्णु, शंकर, गणेश, देवी इत्यादि देवतांची उपासना शिकविणारे पुराण ग्रंथ निर्माण झाले. पुनश्च अनेक पंथ व मतमतांतरें यांचा बुजबुजाट व गलबला झाला. इतक्यांत लवकरच भगवान आद्य शंकराचार्य यांचा जन्म झाला या बाल मूर्तीनें आपल्या असामान्य बुद्धिमत्तेनें, श्रेष्ठ तपोवैभवानें, व अचाट कर्तृत्वानें सर्व पाखंडी मतांचा यथायोग्य समाचार घेतला. जनतेची झालेली दिशाभूल नष्ट करून कर्तव्याचरण

करण्याची नवी दृष्टी व नवचेतना प्राप्त करुन दिली व देहाला शीण देणारें वैदिकांचें निरस कर्मकांड व बुद्धीला व्यर्थ ताण देणारा बौद्धांचा लटकी शून्यवाद किंवा जैनांचा ' स्याद्वानवा ' हा संशयवाद हे सर्व निरुपयोगी ठरवून, अद्वैत ब्रह्मांत बुद्धि स्थीर करण्यानेंच शाश्वत शांति ह्मणजे मोक्ष कसा प्राप्त होतो हैं पटवून देण्याकरितां वैदिक तत्वज्ञानाची सुंदर व भव्य इमारत उभारली. आणि अशा प्रकारें जैन बौद्ध प्रभृति नास्तिक पंथवाल्यांनीं सर्वत्र पसरविलेले पाषांड नष्ट करुन पुनश्च श्रुति स्मृति विहीत सनातन धर्माचें प्रभुत्व प्रस्थापित केलें. श्रीशंकराचार्यांच्या ह्या पुनरुज्जीवनाच्या प्रयत्नांना प्रथम शुंग घरण्याच्या राजानें व नंतर गुप्त घरण्यांतील राजानें मोठा आश्रय देऊन अत्यंत महत्वाची कामगिरी केल्यानें वैदिक धर्मध्वज पुन्हां सर्वत्र निर्वेधतेनें फडकूं लागली. भगवान शंकराचार्यांनीं ३२ वर्षांच्या आपल्या अल्पायुष्यांत उभा भरतखंड धर्म प्रसारानें निनादून सोडला, एवढेंच नव्हे तर आपल्या पश्चात्.

यतो विनष्टिर्महती धर्मस्यात्र प्रजायते

मांद्यं संत्याज्यमेवात्र दाक्ष्यमेव समाचरेत् ॥ मठाम्नाय०

अशी स्पष्ट आज्ञा आपल्या शिष्यवृंदाला करुन ठेवण्यासहि ते विसरले नाहींत. यामुळें धर्मोद्धाराचा दिव्य संदेश घरोघर - नेऊन पोंचविण्यांत आला. धर्म जागृतीची ही प्रचंड आरोळी—हा प्रचंड शंखनाद ज्यांच्या ज्यांच्या कर्णपथावर जाऊन आदळला ते ते सनातन धर्मांत पुनश्च समाविष्ट झाले व बौद्धधर्म त्याच्या जन्मभूमींतच विरळा होऊन बसला.

या प्रमाणें भगवान शंकराचार्यांनीं वैदिक धर्माची उभारणी केली तथापि त्यांनीं प्रतिपादन केलेलें अद्वैतमत हें अत्यंत ज्ञानगम्य असल्यानें थोडक्या समंजस व्यक्तींच्या बुद्धीलाच तें कायमचें आकलन होण्यासारखें होतें. सर्वसामान्य जनसमूह क्लेशदायक असणाऱ्या अव्यक्त, अचिंत्य व अनिर्देश्य अशा परब्रह्माच्या ठिकाणीं संलग्न होऊन राहाणें शक्य नव्हतें. मनबुद्धीला इतका विलक्षण ताण सर्व साधारण लोकांकडून दिला जाणें शक्यच नाहीं. त्यांना परमेश्वर प्राप्तीचा कांहीं ' सुलभ उपावो ' दाखवून देणें क्रमप्राप्तच होतें. मान्यवर गीतारहस्यकार ह्मणतात " सर्वज्ञ, सर्व शक्तिमान, सर्वव्यापी व निराकार ब्रह्मस्वरुप सगुणाहि आहे पण तें केवळ बुद्धिगम्य व अव्यक्त ह्मणजे इंद्रियांना अगोचर असल्यामुळें उपासनेला क्लेशमय होतें. यासाठीं या दोन्हीं परमेश्वर स्वरुपापेक्षां जो परमेश्वर अचिंत्य, सर्वसाक्षी, सर्वव्यापी व सर्व शक्तिमान जगदात्मा असूनहि आपल्याप्रमाणें आपल्याशीं बोलेल, आपल्यावर ममता करील, आपल्याला सन्मार्गाला लावून सद्गति देईल, ज्याला आपण आपला असें ह्मणूं शकूं, आपल्या सुखदुःखांचा ज्याला कळवळा येईल किंवा जो माझे अपराध पोटांत घालील, ज्याचा मी आणि जो माझा असे प्रत्यक्ष संबंध जेथें आमच्यामध्ये उत्पन्न होतील, जो माझें पित्याप्रमाणें रक्षण करील, माझी माउली होईल अगर ' गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृद् '—माझी गती, माझा पोषणकर्ता, माझा धनी, माझा साक्षी. माझ्या निवाऱ्याचें व आरामाचें घर, माझा अखेरचा आधार व विसांवा, माझा सखा व कैवारी ह्मणून लेंकराप्रमाणें मी ज्याचे प्रेमाने व लडिवाळपणानें आकलन करूं शकेन असा सत्यसंकल्प, सकलैश्वर्य संपन्न, दयासागर, भक्तवत्सल, परम पवित्र, परमोदार, परम कारुणिक, परमपूज्य, सर्वसुंदर, सकलगुणानिधान, किंवा थोडक्यांत सांगणें असल्यास जिव्हाळ्याचा, सगुण, प्रेमगम्य व व्यक्त ह्मणजे प्रत्यक्ष रुपधारी सुलभ



यतोविनाशिर्महति धर्मस्यात्र प्रजायते ।
मांद्यं संत्याज्यमेवात्र दाक्ष्यमेव समाचरेत् ॥

स्मेश्वरच मनुष्य भक्तीसाठीं स्वभावतःच स्वीकारीत असतो. " हा मनुष्य स्वभाव लक्षांत घेऊनच श्री कराचार्यांच्या अद्वैत बुद्धिगम्य तत्वज्ञानांत सामान्य जनांस वाटणारा रुक्षपणा त्यांच्या पश्चात् रामानुज, ध्व, वल्लभादिक आचार्यांनीं व रामानंद, चैतन्य, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकारामादिक साधुसंतांनीं ागवत धर्माची संस्थापना करून नष्ट करून टाकला.

परंतु या काळांत परकीय विधर्मी लोकांच्या भयंकर स्वाऱ्यांनीं अगदीं कहर उसळून दिला व ह्या महावलाढ्य आक्रमणाला हिंदुसमाज बळी पडल्यासारखा झाला. श्रीशंकराचार्यांच्या पूर्वींहि परकीयांच्या वाऱ्या भारत वर्षावर झाल्या होत्या. इराणचा राजा ' डरायस—हिस्टेसपेस ' ( दारा ) असिरियाची राणी मिरामिस, ' शिकंदर व त्याचा सेनापति सेल्युकस त्याचप्रमाणें बॅक्ट्रियन, 'इंडोसिथीयन किंवा तुराणी, गलिर किंवा हूण इत्यादिकांच्या झालेल्या मोठमोठ्या स्वाऱ्या इतिहास—प्रसिद्धच आहेत. या स्वाऱ्या भारत यींनें केव्हांच पचनीं पाडून टाकल्या. त्यांच्यामुळें भारतीयांच्या अंतस्थ शक्तीला प्रत्यक्षतः पराभवाचा स्पर्श होऊं शकला नाहीं किंवा परकीयांच्या संस्कृतीची छापहि त्यांच्यावर बसूं शकली नाहीं. मध्ययुगीन भारतकार म्हणतात त्याप्रमाणें " हर्ष राजाच्या अंतापर्यंत ( सातव्या शतकाच्या मध्यापर्यंत ) आपल्या या ब्रह्मावर्तात परस्थांचें पाऊल कायमचें असें रोवलें गेलें नव्हतें. स्वाऱ्या होत पण बहुधा शत्रूंचाच पराभव होई. त्या खेरीज शत्रूपक्ष विजयी झालाच तर त्याचा परिणाम आर्यावर्तात फारसा जाणवत नसे. कारण या वाऱ्या करणाऱ्यांपैकीं कोणी चुकून माकून येथें वस्ती केलीच तर त्या अनार्य लोकांना हिंदु समाज अस्तावधीत्व पचनीं पाडी " परंतु यापुढें झालेल्या मुसलमानांच्या स्वाऱ्या भयानक स्वरूपाच्या होत्या. एकट्या महंमद कासीमची इ० स० ७११ मधील सिंधमधील स्वारी, पुढील सर्व स्वाऱ्यांची यथार्थ कल्पना आणून देऊं शकेल. खलिफ वदीलच्या अनुज्ञेनें महंमद कासीमनें सिंधवर स्वारी केली. देवाल नांवाचें शहर प्रथम त्याच्या भक्ष्यस्थानीं पडलें. तेथें त्यांनीं नगरांतील सर्व पुरुष मंडळींची प्रथम कत्तल उडविली. मुसलमानी धर्म स्वीकारण्याच्या अटीवर कांहींना जीवदान देण्यांत आलें. हजारों स्त्रिया भ्रष्टवून दासी करून टाकल्या गेल्या, अपरंपार संपत्ति लुटली गेली. सिंधचा रणशूर राजा दाहर मारला गेला, त्याची धर्मपत्नी ' बाई ' हिनें कित्येक रजपूत स्त्रियांबरोबर अग्निकुंडांत आपला देह धर्मरक्षणार्थ फेकून दिला! येथूनच रजपूत स्त्रियांच्या जोहाराला प्रारंभ झाला असें म्हणतात; तथापि ज्यांना या दिव्यांत उडी घेणें शक्य झालें नाहीं अशा साठ हजार सुंदर रूपवती हिंदु स्त्रिया दासदासी करून धरून नेण्यांत आल्या! असें चचनाम्यांत झटलें आहे.

महंमद कासिमानंतर गझनीचा महंमद घोरी, चेंगीझखान, अल्लाउद्दीन खिल्जी, तैमूरलंगादिक मुसल्मान सरदारांच्या झालेल्या स्वाऱ्या प्रसिद्धच आहेत. या सर्वांत जाळपोळ, लुटालूट, मूर्तिभंजन, बलात्कार, भ्रष्टाकार, स्त्रीधनापहार, ग्रंथ विध्वंस, विद्वानांची कत्तल इत्यादि पूर्वींच्या इतिहासाचीच प्रत्येक खेपेस पुनरावृत्ति कसकशी केली गेली हें विस्तारानें सांगण्याचें येथें प्रयोजन नाहीं. पूर्वींच्या आक्रमणापेक्षां हें आक्रमण वैशेषिक स्वरूपाचें होतें व त्याच्या भयंकर माऱ्यानें हिंदुसमाज आमूलाग्र खिळखिळा झाला. प्रस्तुत स्वाऱ्यांचें हे विशेष स्वरूप प्रथम वर्षींच्या आमच्या श्रीदासबोध मासिकाच्या ६ व ७ अंकांत विस्तार पूर्वक सांगण्यांत आलेंच आहे. वाचकांच्या सोईकरितां त्यांतील कांहीं महत्वाचा भाग येथें सांगणें अयोग्य होणार नाहीं.

या स्वाऱ्यानें बाह्य स्वरुप पाहिलें तर तें केवळ सुवर्णभूमी म्हणून नांवाजलेल्या हिंदुस्थानांतून, अपार धनसंपत्ति लुटावी, एवढाच हेतु त्यांच्या बुडाशीं असावा असें दिसून येतें. पण हें बाह्य स्वरुपाचें कवच फोडून अंतरंगाचें निरीक्षण करुं लागल्यास '' अंदरकी बात ' कांहीं वेगळीच दिसूं लागते, हिंदुस्थानांत मुसलमानी राज्यस्थापना स्थापण्याचा हेतु त्या स्वाऱ्या करणाऱ्यांच्या मनांत नव्हता असें म्हणतां यावयाचें नाहीं, तर ती गोष्ट त्यांना तितक्या त्वरित साधण्या सारखीच नव्हती. राजसत्ता स्थापणें शक्य होतांक्षणींच ती स्थापिल्यावांचून ते राहिलेच नाहींत, यावरुनच ही गोष्ट सिद्ध होत आहे, उलटपक्षीं हिंदुस्थानांत मुसल्मानी राजसत्ता स्थापण्याचा दूरवरचा उद्देश मनांत बाळगूनच त्याच्या शक्यतेची अधिकाधिक व्यवस्था प्रत्येक स्वारीच्या वेळीं करण्यांत येत असे. हिंदुस्थानावरील मुसल्मानी स्वाऱ्यांचे नेते हे पुष्कळसे बाटून मुसल्मान झालेले पण मूळचे हिंदुच असल्यानें त्यांना हिंदूंची समाज रचना अवगतच होती, अर्थात अचुक मर्मस्थानावरच घाव घालणें त्यांना तितकेसें अवघड नव्हतें. हे लोक बाटले गेलेले ह्मणून साहजिकच बहिष्कृत या नात्यानें वागविलेले, त्यामुळें बहिष्कृतत्वाच्या लांछनानें व अपमानास्पद स्थितीनें चिडलेल्या व संतापलेल्या लोकांची मनःप्रवृत्ति इतरांना आपल्या सारखें करुन आपली लोकसंख्या वाढवावी व आपल्या पंथाचा प्रसार प्रबळ करावा या दिशेनेंच व्हावयाची हें उघड होतें. धर्म व संस्कृति यांच्या नियंत्रणामुळेंच हिंदु समाज वरिष्ठ वर्गापासून कनिष्ठ वर्गापर्यंत आमूलाग्र इतका सुसंघटित होता कीं, कोणत्याहि परकी शत्रूच्या कितीहि भयंकर आघाताचा सहजासहजी त्याच्यावर परिणाम होण्यासारखा नव्हता. कोणतेंहि धर्ममत कोणतीही चालरीत, कोणतेंहि नीतितत्व, कोणतीहि विद्या, कोणताहि शोध किंवा कोणतीहि वस्तु, यापैकीं कशाचाहि विशिष्ट प्रभाव पाडून हिंदुसमाजांतील लोकांचीं मनें आपल्याकडे आकर्षून घेणें या परकीयांना शक्य नव्हतें. कारण तशी आकर्षक अशी प्रभावी श्रेष्ट गोष्ट त्यांच्यापाशीं वस्तुतः कोणती नव्हतीच. तेव्हां सर्वतोपरि बलिष्ठ अशा हिंदु समाजाला कोठून भोंसका पाडावा असा मोठा पेच या इस्लामी शत्रूंना बराच काळपर्यंत पडून राहिला होता. व तो सोडविण्याचे कामीं आचारभ्रष्टतेमुळें समाज बहिष्कृत होण्याच्या धर्मक्रांतीचा जो प्रसंग इस्लामाच्या आद्य प्रचारकांनीं स्वतःच्या लोकांवरच आणिला होता, तो अनुभवाचा असल्यानें या उपयांचा यांनींहि हिंदुस्थानांत अवलंब केला. हे उपाय ह्मणजे मुख्यत्वें करुन बाटवा बाटवी स्त्रियांचे भ्रष्टीकरण व अपहार हे होत.

अर्थातच प्रत्येक मुसल्मानी स्वारींत बाटवाबाटवी व त्यांतहि विशेषें करुन हिंदु स्त्रियांचें भ्रष्टीकरण हे प्रकार प्रामुख्यानें करण्यांत येते आणि आपलें धोरण ओळखून त्यावर प्रतिगामि मारक उपाय योजले जाऊं नयेत ह्मणून समाजांतील तत्त्ववेत्ते दूरदर्शी, बुद्धिवान विचारी, कर्ते व धुरीण लोक खडया सारखे निवडून काढून त्यांचा उच्छेद करणें व ग्रंथ संपत्तीचा नाश करणें या प्रकारांची महत्त्वाची जोड त्या भ्रष्टीकरणाला देण्यांत येई. मुसल्मानांच्या स्वारीची टोळधाड नाना अनन्वित प्रकार करुन परत गेली कीं, त्यांनीं बाट्यून भ्रष्टवून टाकलेल्या लोकांवर पुन्हां कोणा तरी जवळ पासच्या हिंदुराजाची सत्ताच साहजिकपणें चालू होई. हिंदु धर्मीय राजवटींत हे बाटविलेले व भ्रष्टविले गेलेले लोक धर्म पतित व व्यवहारबाह्य म्हणून लेखले जात. पूर्वीच्या हिंदुधर्माच्या पवित्र संस्कारामुळे स्वतः त्यांचें त्या लोकांनाहि धर्मांतराचें दुःख मनांत सारखें टोंचीत राही, हिंदु समाजांतील विद्वान तत्ववेत्ते व विचारी लोक यांचा

मुसलमानांनीं बुद्धिपुरःसर उच्छेद केलेला असल्यानें व त्या प्रमाणेंच ग्रंथसंपत्तीहि नष्ट करून टाकली असल्यानें हिंदु समाजाच्या या डोळ्या देखत चाललेल्या भयंकर ऱ्हासाला आळा घालणारी कांहीं योग्य रोडही वरिल निघत नसे. अशा प्रकारें वरचा योजक आपल्या लोकांचा वर्ग नाहींसा झाल्यानें राहिलेला खालचा मोठा मोठला भ्रष्टीकृत सामान्य जनसमाज, धर्मापरी धर्माला मुकलेला समाजापरी समाजाला तुटलेला व नेतृत्वापरी नेतृत्वाला आंचवलेला असा हीन दीन असहाय होतसाता किंकर्तव्यमूढ होऊन पडून राही. अशा स्थितींत सांपडून अडकून पडलेल्या त्या लोकांची सर्व अंगांनीच कुचंबणा झाल्यामुळें मुसलमानी धर्मप्रचारकांच्या कार्याला तें आयतेंच उत्तम क्षेत्र मिळून तेथें त्याचें चांगलेंच फावत असे. साधू, फकीर, उलेमा, काजी, हकीम, जादू टोणेवाले, ताईतवाले, मंतरतंतरवाले इत्यादि नाना प्रकारच्या सोंगांनीं मुसलमानी धर्मोपदेशक त्यांच्यांत सोडून देण्यांत येत. एकीकडून धर्मभ्रष्टतेच्यापायीं हिंदु समाजांत उजळ माथ्यानें वावरतां येईनासें झाल्यामुळें लांच्छनास्पद अपमानाच्या स्थितीचें मनांत टोंचत रहाणारें शल्य, ह्या भ्रष्टीकृत लोकांना आपल्या भोंवतालचे आणखी दुसरे लोक बाटविण्याला साहजिकपणेंच उद्युक्त करी. आणि दुसरीकडून मुसलमानी धर्म प्रचारकांची तशी चिथांवणी व तसें प्रोत्साहनहि अनून मिळत असे. क्रमाक्रमानें मुसलमानी धर्ममतें व मुसलमानी चालीरीति त्यांच्या अंगवळणीं पाडण्यांत येत. याच्या योगानें पुढें साहजिकच त्यांच्या भावनांना मुसलमानी धर्मवेडाचें पाणी चढून वाटेल त्या प्रकारानें हिंदु धर्मावर उठण्याला ते आपोआप प्रवृत्त होत. त्यांतच राज्यकारभारविषयक अधिकारांचें विलोभनीय आमिष त्यांना दाखविण्यांत येऊन त्यांच्या स्वार्थी वृत्ती जागृत केल्या जात. उच्च हिंदु तत्त्व विचारांचा आधार तुटल्यामुळें ते भ्रष्टीकृत लोक त्या मोहाला सहजच बळी पडत. आणि हिंदु धर्मीयांवर शस्त्र उगारण्याला सदैव सिद्ध झालेले असत. अर्थातच या लोकांना हिंदुस्थानाबाहेरील मुसलमानांची स्वारी ह्मणजे एक पर्वणीच असे व ते तिची उत्कंठेनें मार्ग प्रतिक्षाच करीत. त्यायोगें प्रत्येक स्वारींत बलात्कार, भ्रष्टीकरण, जाळपोळ, लुटालूट, स्त्रीधनापहार, बाटवाबाटवी, ग्रंथनाश, मूर्तिभंजन, देवळें पाडणें, तीर्थक्षेत्रें मोडणें, इत्यादि नाना अनन्वित प्रकारांनीं हिंदूंचा उच्छेद करण्याच्याकामीं येथीलच धर्मभ्रष्ट हिंदुंचा बिनबोभाट व प्रामुख्यानें उपयोग करण्यांत येई. याच रीतीनें मुसलमानांची प्रत्येक स्वारी अधिकाधिक प्रखर स्वरुपांत होत गेली आणि त्यापुढें हिंदु राजांनीं शुद्धीवर येऊन प्रतिकारार्थ केलेले मोठमोठे संघटित प्रयत्नहि वेळीं दुर्बळ ठरले. होता होतां परिणाम असा झाला कीं मुसलमानी धर्माला पाठिंबा देऊन त्याचा पुरस्कार करणारी राजसत्ता हिंदुस्थानांत अधिष्ठित होतसाती बद्धमूलही झाली !

हिंदु संस्कृतीवर कोसळलेल्या ह्या भयंकर आपत्तीच्या निवारणार्थ तशाच श्रेष्ठतम जयिष्णु व जोरकस साधनांचा अंगिकार करणें आवश्यक होतें. पण दुर्दैवानें ह्या वेळीं समाजांतील वरच्या अधिकाराच्या विचारी नेत्यांकडून अंगिकारली गेलेली तत्त्वज्ञानाची विचार सरणी ही समाजाला अत्यंत अनुपकारक ठरली. ऐहिक अभ्युदयाचें सीमान्त गांठलें गेल्या कारणानें त्या समाजाग्रणींची दृष्टी निःश्रेयस प्राप्तिकडे वळली. अखिल जगाचें कल्याण आपल्याला साधावयाचें आहे खरें पण त्या करितां इतर समाजांवर आक्रमण करून त्यांना उद्धाराचे धडे आपल्या हातानें शिकवीत बसण्याचें कारण नाहीं. आपल्या निर्मलाचरणाचा उत्कृष्ट आदर्श आपण जगापुढें मांडावा व तदनुसार आपापली अभ्युन्नतावस्था घडवून आणण्याची पूर्ण मोकळीक इतर समाजांना द्यावी हाच जगाचें कल्याण साधण्याचा खरा उत्तम मार्ग होय असें त्यांना वाटलें.

इतर परकीय समाज आपल्यावर चालून येतील ही कल्पना त्या तत्त्वज्ञानी पुरुषांना झाली नसेल असें नाहीं; पण शत्रू आला तरी तो आपलें काय नेऊं शकणार आहे ? बोलून चालून ही ऐहिक संपदा नाशिवंत, त्रैलोक्याचें राज्यहि जिच्यावरून ओंवाळून टाकावें ती मोक्षाची अविनाशी श्रीमंती लाभत असतांना ती सोडून देणें हें कांहीं श्रेयस्कर नव्हे. अशा ह्या विचारांचा अंश त्या तत्वज्ञानांत शिरला होता. आणखी, कर्मविपाकानुसार चालणाऱ्या सृष्टीच्या क्रमाला विरोध न करणें यांनच सर्वांचे हित आहे, हा एक त्या तत्वज्ञानाला फुटलेला तिसराच फांटा होय. त्यांतूनहि परकीय शत्रू अगदीं घरांत घुसले, तरी आपली सुधारणा आपण केलीच आहे, तेव्हां आपल्यांतील चांगलें-चांगलें तेंच त्यांना मिळेल व त्यानें ते स्वतःची सुधारणा करतील, आणि अशा रीतीनें अंतीं आपोआपच सर्व जगाचा उद्धार घडून येईल ! अशा प्रकारच्या या आणखी किती तरी अनेक फांटे फुटलेल्या तत्वज्ञानात्मक विचारसरणीचाहि पगडा हिंदु समाजाच्या मनावर असल्या वांचून राहिला नाहीं.

ऐहिक अभ्युदयाची परिपूर्णता झाली अशा समजुतीनें समाजांतील वरच्या अधिकाराच्या तत्वेत्या व विचारी लोकांनीं आपली दृष्टी निःश्रेयस प्राप्तीकडे वळविल्यामुळें साक्षात् त्यांच्या मार्गदर्शकत्वाला तर समाज अंतरलाच. पण नुसतें तेवढ्या हानीं वरहि भागलें नाहीं. त्या त्यांच्या प्रवृत्तीचे आणखीहि अतीदूरवर पोचणार असे कित्येक दारुण परिणाम आपल्या समाजाला भोगावे लागून, त्यावेळींच काय पण आज मितीपर्यंत भोवत आलेले आहेत. निःश्रेयस किंवा मोक्ष प्राप्तीकडे वळलेल्या त्यावरच्या लोकांत नाना पक्षोपपक्ष उत्पन्न होऊन त्याचा मोठा दुष्परिणाम असा झाला कीं पारलौकिक मोक्षाविषयींचीं अनेक नसतीं व उसनीं भांडणें इहलोकांत चालू झालीं. त्यांच्या त्या भांडणाचे धक्के समाजावर आदळूं लागले. विद्वानांची व बुद्धिमंतांची बुद्धिमत्ता तीं भांडणें कुशलतेनें मांडण्यांतच व्यय पावूं लागली, व त्यायोगें नव्यानव्या शोधांनीं होत असलेली नाना शास्त्रांची प्रगति कुंठित झाली.

लॉर्ड बेकनच्या चरित्रावर मेकॉलेनें लिहिलेल्या एका टीकारूप निबंधांत म्हटल्याप्रमाणें "...पुरातन तत्वज्ञान हा एखाद्या विशिष्ट ध्येयाकडे जाणारा मार्ग नसून, स्वतः भोंवतीं फिरणाऱ्या चक्रासारखा आहे. स्वतः भोंवतीं फिरणाऱ्या भोंवऱ्याच्या स्वरूपाचे प्रश्न व चर्वित चर्वण स्वरूपाचे वाद हे पुरातन तत्वज्ञानाचे मुख्य विषय होते. बुद्धीला पुष्कळ शीण, परंतु प्रगतीचा अभाव अशा प्रकारची पुरातन तत्वज्ञान ही एक अजब चीज होती. सर्वांत श्रेष्ठ प्रकारचें कल्याण कशांत आहे, वेदना हें दुःख आहे कीं काय, जगांत घडणाऱ्या गोष्टी दैवामुळें घडतात किंवा कसें, कोणत्याहि गोष्टीबद्दल निश्चित असें कांहींच विधान करतां येत नाहीं असें खात्रीनें म्हणतां येणें शक्य आहे कीं काय, ज्ञानी मनुष्य दुःखी असणें शक्य आहे किंवा कसें, खऱ्या मार्गापासून निरनिराळ्या मानवी प्राण्यांचे परिवर्तन हें सारखेंच दोषास्पद आहे कीं काय, या व असल्या प्रकारच्या प्रश्नांचा ऊहापोह करण्यांत सुधारलेल्या राष्ट्रांतील अत्यंत हुशार माणसांचे मेंदु, जिभा व लेखण्या शतकानुशतकें गुंतल्या होत्या...मानवी बुद्धीचें ह्यामुळें पुढें पाऊल पडण्याऐवजी ती एकाच ठिकाणीं स्थिरावली गेली. किंवा स्वामी विवेकानंदांच्याच शब्दांत सांगावयाचें तर "आपल्यांतील शेंकडों जाणतीं माणसें डाव्या हातांत भांडे धरून पाणी प्यावें कीं उजव्या हातांत बाहेरून आल्यावर तीनदां पाय धुवावेत कीं चारदां, तसेंच चुळा पांच वेळां टाकाव्या कीं सहा वेळां, ह्या गोष्टींचा वर्षेच्या वर्षे खल करीत होतीं, ह्मणजेच आमचा धर्म स्वयंपाक

घरांत जाऊन बसला. स्वयंपाक घर हाच आमचा धर्म, भाताचें तपेलें हाच आमचा देव, आणि ' मला शिवूं नको ' ' मी सोंवळा आहे ' हाच ' आमचा वेदान्त ' झाला—"

'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः' ह्या न्यायानें सामान्य लोकांचें लक्षहि वरील नसत्या भांडणांनीं व वाद विवादांनीं आपल्याकडे वेधलें. आणि जो उठला सुटला तो ' मुक्ती ! मुक्ती ! ' ह्मणून वैयक्तिक मुक्तीचाच हव्यास धरून त्या दिशेला धांव घेऊं लागला. एतावता अभ्युदयाविषयीं एका प्रकारची तीव्र उदासीनता समाजांत वावरूं लागली. अर्थात तीं भांडणें भांडणारांना परलोकींचें मोक्षपद काय मिळालें असेल कीं नसेल, तें जरी निश्चयानें येथें सांगावयाचें नसलें, तरी इहलोकींचा मृत्यु मात्र त्या भांडणांनीं जागा होऊन आपल्या उग्र भीपण स्वरुपानें भेवडावीत सर्वच समाजाच्या समीप येऊन ठेपला खरा.

बाह्य जगताची विश्वबंधुत्वाच्या दृष्टीनें तितकी अवस्था आली नसतांना, अकालींच अतिशय उच्च ध्येयाच्या पाठीमागें लागण्याची वरील सारखी विचारसरणी अंगिकारल्यामुळें हिंदुसमाजाचें आक्रमणाचें शील सुटून गेलें. स्थितिमानाचें ज्ञान होईनासें झालें. समाजांतील निरनिराळ्या वर्गांतील लोकांना बाहेरचें विस्तृत क्षेत्र कार्य प्रसाराला मोकळें राहिलें नाहीं. तेणें करून नाना लोकांचें ठायीं स्फुरण पावणाऱ्या नाना उत्साही व उत्कट वृत्ती, त्यांच्या योग्य विकासासाठीं वाव न मिळून असह्य कुचंबणमुळें आपापसांत झगडूं लागल्या व कांहीं तेथल्या तेथेंच शांत झाल्या—विराम पावल्या. अर्थातच समाजाचें सर्व धारण पोपणहि ज्या नानाविध शक्तींवर चालावयाचें त्याहि दुर्बळ होऊं लागून समाजांत नकळत एक प्रकारच्या निस्त्राणपणाची छटा पसरत चालली. वेदांताचें महत्व थोर खरें, पण तें सांभाळण्यास व्यक्तीच्या नाहीं पण समाजाच्या तरी प्रपंचाची दळकटी अभंग ठेवावी लागते, ह्या तत्वाची आठवण रूलीन झाली, स्वर्ग मोक्षांची नसतींच भांडणें सामान्य जनांपर्यंत पोचून, ते ऐहिक अभ्युदयाला पराङ्मुख झाले व त्यायोगें परलोकींचा स्वर्गमोक्ष दूर राहून इहलोकींचीं भांडणें लावून देण्याला व त्यांतच परभारें उभय पक्षाच्या सोक्षमोक्षाचें कार्य साधण्याला शत्रूंना फावत आहे ह्याची कल्पना आली नाहीं. परमार्थाच्या प्रवृत्तींत स्थूल व जड या भ्रामक कल्पनेनें सत्तेची सत्ता तर गेलीच, पण आपल्या संस्कृतीची सत्ता तरी बाहेरच्या व निदान स्वकीय लोकांवर अबाधित राखणें त्या परमार्थाकरितांच अवश्यमेव आहे, हें धोरणसुद्धां त्याबरोबर राहिलें नाहीं; देशकालवर्तमानाचा विचार सुटला; चालीरीतींना अवास्तव महत्व दिलें गेलें व व्यक्ती व समाज यांच्यांत अंतर पडत चाललें; चांगल्या व वाईट दोन्ही ही आचारांचा व्यक्ती व समाज यांच्या मेंदूवर संस्कार होतो, हें तत्व पूर्ण अवगत असून सुद्धां अठरापगड जातींत शिरून निरनिराळ्या प्रकारांनीं शत्रू कडून करण्यांत येत असलेली दिशाभूल; वाईट चालीरितींचा करण्यांत येत असलेला प्रसार, हलक्या प्रतीच्या लोकांना सत्ता कनक व कामिनी ह्यांच्या आमिषानें उठावणी देऊन आपला कावा साधून घेण्याकरितां समाजांतील शिष्टत्व किंवा नेतृत्व देण्याचे शत्रू कडून चाललेले नानाप्रकार इत्यादि गोष्टींकडे दुर्लक्ष झालें. . अशा प्रकारें एक ना दोन हजारों दोषांचा हिंदुसमाजांत सुळसुळाट झाला व ते दोषच परकीय शत्रूंना नेमक्या माऱ्याच्या जागा होऊन बसले. समाजांतील ह्या मर्मस्थानांचा यथा-

योग्य अभ्यास करून शत्रूंनीं ह्यांचा पुरापूर उपयोग करून घेतला, व त्याच्या बळावर आपले हातपाय सर्व देशभर पसरले. समाजांतील विद्वान् समयज्ञ, धोरणी व कर्ती माणसें आणि अमूल्य अशी ग्रंथसंपत्ति यांचा शत्रूंनीं सारखा अपहार व विध्वंस करण्याचें जणूं व्रतच स्वीकारल्यामुळें पूर्वींच्या थोरथोरऋषीमुनींच्या दूरदर्शी शिकवणीचे परंपरागत धागेदोरे पार तुटून जाऊन सर्वत्र अविद्येचें अंधःकारमय भीषण साम्राज्य पसरलें व त्यांत ही विपरीत परिस्थिती उलटण्याची आशा दिसत नाहींशी झाली—

इस्लामी धर्माच्या अशा ह्या सर्वभक्षक टोळधाडीपासून हिंदुदेवधर्मसंस्कृतीचें संरक्षण करण्यासाठीं हजारों हिंदुवीरांनीं आपलें शीर हातांत घेऊन व छातीचा कोट करून सतत पांच सहा शतकें झुंज खेळली नाहीं असें नव्हे. परंतु अंतीं त्यांचा निरुपाय झाला. पण त्या घटनेंत आश्चर्य तें काय? ज्या इस्लामी धर्माच्या प्रचंड लाटेखालीं युरोप आफ्रिका व पश्चिम आशियांतील देशच्या देश एकदम झोडपून काढले जाऊन आपल्या प्रियतम समाज संस्कृतीला आंचवले गेले, त्याच लाटेला वरील हिंदु रणशूरांनीं पिढ्यान पिढ्या रणसंग्राम देऊन जागच्या जागींच थोपवून धरलें, ही गोष्ट काय कमी झाली? हिंदुत्व ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें "ज्या वावटळीनें हा एवढा भूमाग हलवून सोडला व इतके देश बेचिराख केले, त्या वावटळीनें हिंदुस्थानची कांहीं काळपर्यंत दुरवस्था केली असली तर त्यांत नवल काय? नवल जर असेल तर हेंच आहे कीं, अशा या दुर्जय, असह्य झंझावाताला धैर्यानें थोपवून धरून, क्षणोक्षणीं पडत असतां, क्षणोक्षणीं उठून, अखेर त्याचा प्रचंड वेग याच देशांत क्षीणरेला जाऊं लागला. जो वृक्षचे वृक्ष उन्मळून पाडी तो झंझावात झाडें झुडपेंहि हलविण्यास असमर्थ झाला व अखेर याच हिंदभूमींत तो हताश होऊन विरळून गेला. व त्यामुळें ब्रम्हदेश, चीन, जपान, हे देश व त्यांची बुद्धसंस्कृति अजिबात बचावली गेली. चीनचें संरक्षण जितकें त्याच्या प्रचंड भिंतीनें केलें नाहीं, तितकें या हिंदभूमीच्या वीरांच्या निधड्या छातीनें केलें आहे."

इस्लामी धर्माची प्रचंड लाट मागें परतविण्याचा असाच एक वंदनीय प्रयत्न विजयनगराच्या हिंदु साम्राज्यानें श्री विद्यारण्य माधवांच्या नेतृत्वाखालीं केला. परंतु विजयनगरच्या साम्राज्याचें चढतें वाढतें वैभव मुसलमानी सत्तांना सहन न होऊन त्यांनीं सर्वांनीं एकवटून विजयनगरचा निःपात करण्याकरितां मोठी स्वारी केली. शके १४८७ मध्यें तालिकोट येथें घनघोर संग्राम झाला व हिंदूंच्या दुर्दैवानें विजयनगरचें साम्राज्य धुळीस मिळालें. विजयनगरच्या रणशूर रामराजाचा शिरच्छेद करून त्याचें शीर विजयाचें चिन्ह म्हणून विजापूरचे वेशीवर टांगण्यांत आलें!!!

श्री विद्यारण्य माधवांच्या नंतर शके १५३० मध्यें श्रीसमर्थांचा अवतार झाला व त्यांनीं आपल्या महनीय तपःसामर्थ्यानें, अलौकिक बुद्धिचातुर्यानें प्रचंड कर्तृत्वानें महाराष्ट्र धर्माचें पुनरुज्जीवन करून श्री शिवरायां करवीं त्या मदांध इस्लामी सत्तेला कायमचीच थप्पड दिली. ती पुन्हां वर डोकें काढूं शकली नाहीं. "विजयनगरच्या साम्राज्य नाशानंतर कोणाहि हिंदु राजाला स्वतंत्र राजा—छत्रपती म्हणून अभिषेक करून घेण्याचें धैर्य झालें नव्हतें! या राज्याभिषेकानें मुसलमानी सत्तेच्या अजिंक्यतेच्या भ्रमाचा भोपळा कायमचा फोडून टाकला, कारण या नंतर रणक्षेत्रांत मुसलमानांना हिंदूंची बरोबरी कधींच करतां आली नाहीं."* हा संस्मरणीय व अभिमाननीय इतिहास सर्वांच्या निकट परिचयाचाच आहे.



प्रसंग हा तडातडी । करा विवेक तांतडी ।
सुचीत व्हा, घडा घडी । प्रबोध घ्या खडाखडी ॥
देशकाल वर्तमान । सर्वांहि अवेवधान ।
कोणतें विधिविधान । सावधान ! सावधान !!

—श्रीसमर्थ रामदास स्वामी.

पण या इस्लामी सत्तेचीं पाळेंमुळें खणून काढण्याच्या दीर्घ प्रयत्नांचा विलक्षण ताण या नूतन संस्थापित कोंवळ्या हिंदु साम्राज्यावर शक्ति बाहेर पडल्यामुळें, याच सुमारास अन्य दिशेनें स्वारी करून येणाऱ्या नवीन भौतिक शास्त्रीय साधनसंपत्तीनें युक्त, महाबलाढ्य, युक्ति बुद्धिवंत, महाधोरणी, कावेबाज, सुसंघटित व एक शिस्तीच्या अशा दुसऱ्या मोठ्या पाश्चात्य समाजाला यशस्वी रीतीनें तोंड देण्याचें सामर्थ्य त्याजपाशीं राहिलें नाहीं. एका बलाढ्य मल्लाला कुस्तींत लोळवून मोकळें व्हावें, तोच दत्त ह्मणून पुढें उभा असलेल्या पहिल्यापेक्षांहि बलवीर्यशाली दुसऱ्या मल्लाशीं सामना करण्याचा प्रसंग यावा तशीच ही गोष्ट झाली व अर्थातच सतत कित्येक वर्षें झुंज खेळून खेळून थकला भागलेला हा भारतीय मल्ल या समयीं दुर्दैवानें पराभूत केला गेला व अद्यापिहि तो त्याच पराजित अवस्थेंत खिन्न व विपण्ण होऊन पडला आहे.

या पाश्चात्य संस्कृतीच्या लोकांची हिंदु धर्मावरील आक्रमणाची दिशाहि कांहीं निराळ्याच स्वरूपाची होती. क्रॉस तागडी व तरवार ह्या क्रमानें तिनें सर्व हिंदुस्थान कसा पादाक्रांत केला ह्याचा रोमांचकारी इतिहास चिन्मय जगतच्या ' आशिया अंकांत ' आलेलाच आहे.

त्या वेळीं ख्रिस्ती पाद्री येसूचें शुभ वर्तमान सर्वांना ऐकविण्याकरितां देशभर फिरत असत. त्यांचें वर्णन करतांना स्वामी श्रद्धानंद ह्मणतात, " येसू ख्रिस्ताचें चारित्र सांगतांना हे पाद्री लोक त्याच्या विशेष गोष्टींवर पांघरूण घालीत असत व खेडवळ लोकांत रूढ असलेल्या चमत्कारिक कल्पनांना पोषक अशीं त्यास वळणें देत असत. पाद्र्यांची चलाखी येथेंच संपली नसून त्यांच्या कावेबाजीचा कहर पुढें आहे. जेसुइट लोकांनीं हिंदु लोकांच्या मनाचा अभ्यासून पूर्ण ठाव घेतला होता. त्यांना पूर्ण ठाऊक होतें कीं हिंदु मन जादुटोणा, व दैवी चमत्कार यांना भाळून जातें—वश होतें, तेव्हां त्यांनीं त्या दिशेनें प्रयत्न करण्यास कमी केलें नाहीं. रोमहून खोट्या नाट्या साधूंचीं ह्मणून शिरें-कवट्या आणित, आणि त्यांच्या विषयींच्या दैवी चमत्काराच्या अफवा सगळीकडे उठवीत. तारेच्या साह्यानें व विशेष हातचलाखीनें शुभाशुभ शकून वर्तविण्याच्या आणि भविष्य सांगण्याच्या हालचाली बाहुल्यांकडून करवीत, व हा सर्व दैवी चमत्कार आहे असें 'जांबुवंती' आत्र आणून सांगत. कारोमांडेल किनाऱ्यावर मिलीयापूर येथें " सेंट थामस " गृहस्थाच्या नांवावर त्यांनीं एक कबर निर्माण केली व तिच्या संबंधानें असें सांगण्यास सुरवात केली कीं, ही कबर फार मोठ्या साधूची आहे. तो एक दिव्य हुतात्मा होऊन गेला. त्या महंतानें सिंधूनदी पासून तों दक्षिणेंत थेट कर्नाटक पर्यंत सर्वत्र संचार करून धर्मप्रसार केला व शेवटीं मिलियापूर येथें तो परमेश्वराचा दिव्य व उज्ज्वल संदेश लोकांस सांगत असतां एका नराधमानें त्याची हत्या केली. अशीं रसभरित व्याख्यानें ते सर्वत्र पैलावीत. याशिवाय मोठमोठ्या साधूंच्या हाडांच्या योगानें आम्ही भूतावेतांशीं सामने करून त्यांना चारी मुंड्या चीत करतों असेंहि ते सांगत. . अशा असंख्य तऱ्हेनें खेडवळ लोकांच्या डोळ्यांत ते धूळ फेकीत. " तद्वतच दीन

* ' Since the fall of Vijayanagar never had a Hindu prince dared to have himself crowned as an independent ruler as a Chatrapati ! This coronation broke the spell of Mahomedan superiority in arms, never again did they prove a match for the Hindus in the battle fields. " ( हिंदुपदपादशाही पृ. ९ )

अनाथ पंगू यांना कपडालत्ता अन्नवस्त्रादिक देऊन व आजारी माणसांना औषधोपचार करून उपकार वद्धतेनें ख्रिस्तीधर्म दीक्षित करण्याचाहि त्यांचा उपक्रम असे, पण ख्रिस्तीधर्मप्रसार या सौम्य उपायानेंच केला गेला नाहीं. मध्यंतरीं त्यांनीं मुसल्मानांच्या पावलांवर पाऊल ठेवून त्यांच्याप्रमाणेंच किंबहुना त्यांनाहि लाजविणारें बाटवाबाटवीचें भीषण सत्र अंगिकारिलें. [ त्यासंबंधींचा गोमांतकांतील शोक इतिहास पुढील प्रकरणांत दिलाच आहे. ] बाटवाबाटवीच्या या सौम्य व उग्र उपायांनीं त्यांच्या सत्तेचे गोडवे गाणारे व तिला बळकटी आणणारे असे त्यांच्याच धर्माचे लोक त्यांना येथें निर्माण करतां आले. परंतु अत्याचारी मताचा अंगिकार पुढील समंजस लोकांना स्वार्थरक्षणाच्या दृष्टीनें करणें उचित वाटलें नाहीं. त्यांनीं पाहिलें कीं शस्त्रास्त्रांनीं गाजविलेली सत्ता ही जित लोकांच्या मनांत त्याविषयीं अप्रीति व द्वेष निर्माण करते. अर्थात या कायमच्या अप्रीतीच्या पायावर सत्तेचें आसन डळमळीतच असणार. तें आसन स्थिर करावयाचें तर अप्रीतीच्या जागीं आत्मीयपणा निर्माण केला पाहिजे हें जाणून, अप्रीति ज्या स्थानीं निर्माण होते त्या स्थानांत म्हणजे बुद्धींत त्यांनीं प्रवेश केला व तिच्यावर आपणांस इष्ट ते संस्कार करण्यास सुरवात केली. अशा पद्धतीनें प्रजाजनांच्या बुद्धीवर संस्कार करण्यांत त्यांना काय लाभणें शक्य होतें तें मेकॉलेसाहिबांचे मेहुणे सर सी. ट्रिव्हलीन यांनीं १८५३ इ० स० मध्यें हाउस ऑफ लॉर्डस्‌पुढें झालेल्या आपल्या साक्षींत स्पष्टपणें सांगितलें आहे. ते म्हणतातः—" आपणांला जी पद्धति प्रचलित करावयाची आहे, ती पुरातन हिंदुधर्माच्या पुरस्कर्त्यांबरोबर नसत्या चीड आणणाऱ्या कलहांत उतरून उत्पन्न करावयाची नाहीं, तर तद्देशियांना श्रेष्ठ प्रतीचें ज्ञान देण्याची अगदीं एक नवीनच दिशा दाखविण्याचा उपक्रम आम्हांस करावयाचा आहे. ह्या नूतन योजनेचा पहिलाच परिणाम त्यांच्या मनावरील स्वकीय संस्कृतीचा दाब नष्ट करण्यांत होईल. बहुतेक जणांना तर तिचें तोंडओळखहि झालेली नसते. नवीन पिढींतूनच भावी राष्ट्र निर्माण होत असतें हें महत्सत्य आहे, आणि जर आपल्याला त्या राष्ट्राच्या जीवन क्रमांत यथार्थ परिवर्तन घडवून आणावयाचें असेल तर त्यांना लहानपणींच हातांशीं धरून आपणांला इष्ट त्या पद्धतीनें शिक्षित केलें पाहिजे, म्हणजे आपलें सर्व मांडवल यथायोग्यपणें गुंतलें असें होईल. मग आपणांला दुराग्रहाशीं तोंड देण्याचा प्रसंग कधींच येणार नाहीं, कारण सत्वशून्य व पुळचट बनविलेल्या लोकांशींच आपला नित्य व्यवहार घडेल, आणि त्या समाजामध्यें सुशिक्षित व वजनदार तरुणांचा आपण असा एक वर्ग निर्माण करूं शकूं कीं जो अल्पावधींतच, आमच्या साह्यानें किंवा साह्याविनाहि आपल्या संस्कृतीचा उत्साही प्रचारक बनेल. "*

---

*" What we are doing is not to enter into an unseemly and irritating conflict with the upholders of this ancient system (Hinduism) but to give an entirely new key to the natives opening to them a very superior knowledge. The first effect of this introduction to a new system is to destroy the influence of the acient system upon their minds. In most instances they are not even initiated in it. It is a great truth that the rising generation becomes the whole nation of a few years, and if we desire to make an effectual change in the character of the people we must take them when they are young and

वरील प्रकारच्या पध्दतीनें आपले प्रजाजन सुशिक्षित करण्यांत, त्यांचें खिस्ती धर्मांत आपोआपच पाऊल पडूं शकेल असा माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन साहेबांचाहि विश्वास होता.*

साहजिकच या उपाय योजनेमुळें प्रत्यक्ष बाटवाबाटवीचे परिश्रम वाचले—ह्मणून ते त्यांनीं सोडून दिले आहेत असांतला भाग अर्थांतच नाहीं. ! या संस्कारचक्रांतून जाणारी बहुधा प्रत्येक व्यक्ती अर्धीमुर्धी तरी पाश्चात्य संस्कृतीची भजक झाली. स्वबुद्धीनें विचार करण्याची यथार्थ व उचित दृष्टी नष्ट होऊन परप्रत्ययनेयत्वाचा अंगिकार विनदिक्कतपणें केला जाऊं लागला. अर्थांतच स्वधर्म, स्वसंस्कृति व स्वसमाज यांच्या विषयींचा आवश्यक स्वाभिमान लुप्तप्राय होऊं लागून, आर्यसंस्कृतीचा अनन्य उपासक उपहासास्पद होऊन बसूं लागला. या श्रेष्ठ प्रतीच्या ( ! ) संस्कार पद्धतीमुळें स्वतःचें संरक्षक कवच नष्टप्रत जाऊं लागलें—साहजिकच पाश्चात्य आक्रमणवाले आपल्या उपाय योजनेंत यशस्वी ठरल्यासारखे झाले ! !

भारतीयांच्या प्रस्तुतच्या ह्या वस्तुस्थितिसंबंधीं श्रीमत स्वामी विवेकानंद ह्मणतात + " या हिंदुस्थाना ! ही परप्रत्ययनेयता तुला मोठा दगा करील, परंतु हिचा तुजवर एवढा विलक्षण अंमल बसत चालला आहे कीं, हिजपुढें सुविचार, न्याय, विवेक किंवा शास्त्रोक्ति यांच्या आधारानें बऱ्यावाईटाचा निवाडा करण्याचें तुला सुचेनासें झालें आहे. पाश्चात्य लोक ज्या रीतिभाती मान्य करतील, त्या काय त्या चांगल्या; ते नापसंत

train them in the way, we would have them go, all of our money then will be well laid out, we shall have no prejudices to contend with, we shall have supple minds to deal with ; and we shall raise up a class of influential and intelligent youth, who will in the course of a few years become the active propagators of our system, with little or no assistance from us."

* I am convinced that the conversion of the natives must infalliably result from the diffusion of knowledge among them."—

M. Stuart Elphinstone.

×"O India! this is your terrible danger"! The spell of imitating the west is *getting such a strong-hold upon you, that what is good* or what is bad is no longer decided by reason, judgment, discrimination or reference to the Shastras. Whatever ideas, whatever manners the white men praise or like, are good ; what ever things they dislike or censure are bad! Alas! What can be a more tangible proof of foolishness than this? The westerners disapprove of our dress, decorations, food and ways of living, therefore, they must be very bad ; the westerners condemn image worship as sinful ; surely then image worship is the greatest sin, there is no doubt of it. The westerners hold caste distinctions to be obnoxious ; therefore let all the different castes be jumbled into one!"

करतील त्या वाईट, हेंच तुझें शास्त्र. हरहर ! या परता अधिक मूर्खपणा तो काय असावयाचा ! आपला पोषाख, आपले अलंकार, आपलें खाणेंपिणें, आपली राहाणी पाश्चात्यांना नापसंत आहे, त्या अर्थी अर्थातच तीं सर्व वाईटच असलीं पाहिजेत, ते मूर्तिपूजेचा निषेध करतात, त्याअर्थी मूर्तिपूजा हें महत्पातक असलेंच पाहिजे यांत काय शंका ? आपल्यांतील जातिभेद पाहून पाश्चात्य नाकें मुरडतात—( कारण हिंदुस्थानांतील उद्योग धंद्यांची उभारणी जातिनिविष्ट असल्यामुळें ते उद्योग धंदे ठार मारण्यास त्यांना जाती नामशेष केल्याच पाहिजेत, एरव्हीं त्यांचा तरणोपायच नाहीं ) तेव्हां त्याला आह्मींहि तिलांजली देऊन सब गोलंकार केलाच पाहिजे, अशी तुझी मती फिरून गेली आहे. " असो.

ह्याप्रमाणें भारतीय संस्कृतीचे चढउतार वा उदयास्त येथवर अल्पशा विस्तारानें दिग्दर्शित करण्यांत आले. त्यावरून भारतवर्षीय समाज सात्विक वृत्तीच्या अगदीं उच्च शिखराला गेला तरी त्याचा बाह्य जगताच्या स्थितिमानाचा विचार सुटल्यामुळें, तो मूळच्या संपन्न सुदृढ व सुस्थिर अवस्थेंतून सध्यांच्या शोचनीय विपन्नावस्थेंत कसकसा येऊन पडला, हें कळून येईल. तथापि उत्कृष्टावस्थेस नेलेल्या ह्या सद्गुणांच्या वाढीनें हिंदु समाज फार तर आपलें स्वतःचेंच नुकसान करून बसला असेल. आपल्या कोणत्याहि वृत्तीसाठीं त्यानें जगताच्या शांतिसौख्यांत कधींहि ढवळाढवळ केलेली नाहीं, अशी इतिहास साक्ष देत आहे. पण हिंद्वेतर मानववंशांनीं आजपर्यंत आपल्या क्षुद्र व नीच वृत्तीसाठीं जगतावर सारखा हाहाःकार उडविला व पुढेंहि त्यांनीं तेंच व्रत चालविलें आहे. त्यांच्या त्या अधम व स्वार्थी वृत्तीच्या अतिरिक्त व एककल्ली वाढीमुळें प्रस्तुत काळीं समस्त जगतच्या जगतच, त्याचा समतोलपणा ( Equillibrium ) नष्ट करविला गेल्यामुळें घोर अनर्थ परंपरेकडे खेंचलें जात आहे. जगाच्या शांतिसौख्याची कायमची होळी व्हावी हा त्याचा निश्चित परिणाम आहे.

जगांत शांतिसौख्य नांदावयाचें तर येथील सर्व मानव वंश परस्पर प्रेमानें एकोप्यानें व बंधुभावानें तद्वतच अत्यंत सच्छीलतेनें वागत असले पाहिजेत. परंतु कांहीं लोकांचे समाज जेव्हां स्वार्थांधतेनें नीच प्रकृतीचे बनतात तेव्हां इतर निरुपद्रवी व सद्गुणी समाजांवर साहजिकच ते झडप घालतात आणि त्या त्यांच्या क्षुद्र स्वार्थापायीं सर्व जगभर भयंकर धुमाकूळ सुरु होतो. स्पर्धा, मत्सर, कलह, मारामारी, तंटे बखेडे लटाया ह्यांना ऊत येतो. व जिकडे तिकडे अशांतता व अस्वस्थता पसरते. जगताचा समतोलपणा ( Equillibrium ) नष्ट होतो. अशा अवस्थेंत त्या दुष्ट प्रवृत्ती मानववंशांच्या वर्त्तांत आणि मेंदूंत यथायोग्य ते संस्कार केल्याविना जगताचा बिघडवून टाकलेला तोल ताळ्यावर यावयाचा नाहीं हें उघड आहे. पण आतां अशा सत्ताविभवानें मदांध झालेल्या ह्या जगच्छांतिविघातक मानववंशांना यथायुक्त पद्धतीनें सुसंस्कृत करून त्यांच्या दुष्ट स्वभावांत आमूलाग्र पालट करावयाचा व त्या योगें जगताची स्थिति स्थापकता घडवून आणावयाची, हें महत्कार्य संपादण्याइतकें दिव्य सामर्थ्य कोणत्या संस्कृतिपाशीं आहे ? असा प्रश्न उपस्थित होतो. ह्या प्रश्नाचा दूरवर व खोल विचार केल्यास ' जगदुद्धाराची ही महनीय कामगिरी यशस्वीपणें पार पडण्याचें सामर्थ्य एकट्या आर्यसंस्कृतींतच आहे, असें कोणाहि निःपक्षपाती व्यक्तीला आढळून आल्याविना राहाणार नाहीं. तथापि विश्वोद्धाराचें हें दिव्य सामर्थ्य इतर मानव वंशीय संस्कृतींच्या अपेक्षेनें आर्यसंस्कृतींतच कसें आहे हें त्या संस्कृतींच्या तुलनात्मक अभ्यासानेंच समजून देणारें असल्यामुळें तसा तुलनात्मक दृष्टीचा थोडासा अभ्यास येथें करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

एखाद्या मनुष्याची परीक्षा ज्याप्रमाणें त्याच्या मित्रावरून होते, त्याचप्रमाणें एखाद्या समाजाची परीक्षा त्याच्या धर्मसंस्कृतिवरून होते असें ह्मणतात. 'धर्म' याचा अर्थ केवळ आचारात्मक असंख्य गोष्टींच्या करामती करणें असा नव्हे. कोणत्याहि धर्माला दोन अंगें असतात. एक तात्त्विक व दुसरें आचारात्मक. गीतारहस्यांत ह्मटल्याप्रमाणें 'कोणताहि धार्मिक संप्रदाय घेतला तरी त्याचे स्वभावतःच दोन भाग होतात. पहिला तत्त्वज्ञानाचा व दुसरा आचरणाचा. पहिल्यांत पिंडब्रह्मांडाच्या विचारांनीं परमेश्वरस्वरूप काय निष्पन्न होतें तें सांगून मोक्ष कशाला ह्मणावें याचा शास्त्र दृष्ट्या निर्णय केलेला असतो व दुसऱ्यांत तो मोक्ष मिळविण्यास साधन किंवा उपाय ह्मणून मनुष्यानें या जगांत कसें वागलें पाहिजे याचें निरूपण असतें " या दोन्ही गोष्टींच्या आधारावरच त्या त्या समाजाचें चारित्र्य किंवा स्वभाव बनत असतो. ह्मणजे ज्या मानानें त्या लोकांचे विचार शुद्ध पवित्र व परिणतावस्थेला गेलेले आणि आचारहि त्यालाच अनुसरून घडत असलेला, अशी अवस्था असेल त्या मानानें त्या समाज संस्कृतीची पदवी जागतिक कामगिरींत लहान वा थोर गणली जाते. अर्थात् तत्त्वज्ञान व आचार व्यवहार या उभय दृष्टींनीं पैकीं संस्कृतींकडून जगताच्या खऱ्या कामगिरींत ह्मणजेच जगताला शांतिसौख्य देण्याच्या कामांत कोणता भार उचलला गेला आहे हें पाहिलें ह्मणजे जगताला उपकारक संस्कृति कोणची आहे तें समजून येईल आणि मग ओघानेंच तिच्या गळ्यांत विजयश्रीची माळ घालणें प्राप्त होईल.

ह्या पृथ्वीतलावर मुसलमान, ख्रिस्ती व हिंदु अशा धर्मांचे किंवा संस्कृतींचे तीन मोठमोठे समाज वावरत आहेत. बौद्ध–धर्मीयांची संख्याहि मोठी आहे तथापि बौद्धधर्म हा हिंदुधर्मांतर्गतच कसा आहे, किंवा श्रीविवेकानंदांच्या शब्दांत सांगावयाचें तर तो धर्म हिंदधर्माचेंच एक बंड–खोर मूल कसें आहे हें मागें दाखविलेंच आहे. * अर्थातच प्रस्तुत कालीं अगदीं भिन्नभिन्न स्वरूपांत वावरणारे मुसलमान, ख्रिस्ती व हिंदू हे तीनच मोठे मानवी विभाग विचाराकरितां घेणें युक्त होईल. बाकीचीं सर्व भिन्नभिन्न मतांतरें वा पंथ ह्या तीन भागांत कोठेंना कोठें अंतर्भूत होतील. तेव्हां ह्या प्रमुख तीन संस्कृतींचा तुलनात्मक दृष्ट्या विचार करून त्यांच्यापैकीं जगताला उपकारक अशी कोणती संस्कृति ठरेल हें आतां पाहूं.

उपरोक्त तीन संस्कृतींपैकीं अर्वाचीनत्वाच्या दृष्टीनें प्रथमतः इस्लामी किंवा मुसलमान संस्कृति विचाराकरितां घेणें युक्त होईल.

इस्लाम धर्माचे इमान ( विचार ) व दीन ( आचार ) असे दोन मुख्य विभाग आहेत, ह्मणजेच एक, तत्त्वज्ञानात्मक व दुसरा आचारात्मक भाग होय. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें विचार करतां इस्लाम धर्मांत पिंडब्रह्मांडादि गूढ आध्यात्मिक विषयांची सोपपत्तिक मांडणी किंवा विचारणाहि अगदीं केलेली आढळून येणार नाहीं. सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधानेंहि कांहींतरी भरमसाट कल्पना कोंबलेल्या आहेत. त्यांचें मुख्य तत्त्वज्ञान म्हटलें ह्मणजे हेंच कीं परमेश्वर हा एकच एक आहे व महंमद हा त्याचा दूत–प्रेषित आहे– " ला–इला–इल्लिल्ला, महंमद रसुलिल्ला. " कुराण हा एकच धर्मग्रंथ परमेश्वरानें आकाशांतून जगाच्या कल्याणासाठीं पाठविलेला आहे. कुराणाच्या या स्वर्गीय आशंबद्दल निस्सीम भक्ति प्रगट करून तसा

* " Ours is the religion of which Budhism with all its greatness is a rebel child and of which christianity is a very patchy imitation." Vivekanand.

करतील त्या वाईट, हेंच तुझें शास्त्र. हरहर ! या परता अधिक मूर्खपणा तो काय असावयाचा ! आपला पोषाख, आपले अलंकार, आपलें खाणेंपिणें, आपली राहाणी पाश्चात्यांना नापसंत आहे; त्या अर्थी अर्थातच तीं सर्व वाईटच असलीं पाहिजेत, ते मूर्तिपूजेचा निषेध करतात, त्याअर्थी मूर्तिपूजा हें महत्पातक असलेंच पाहिजे यांत काय शंका ? आपल्यांतील जातिभेद पाहून पाश्चात्य नाकें मुरडतात—( कारण हिंदुस्थानांतील उद्योग धंद्यांची उभारणी जातिनिविष्ट असल्यामुळें ते उद्योग धंदे ठार मारण्यास त्यांना जाती नामशेष केल्याच पाहिजेत, एरव्हीं त्यांचा तरणोपायच नाहीं ) तेव्हां त्याला आम्हींहि तिलांजली देऊन सब गोलंकार केलाच पाहिजे, अशी तुझी मती फिरून गेली आहे. " असो.

ह्याप्रमाणें भारतीय संस्कृतीचे चढउतार वा उदयास्त येथवर अल्पशा विस्तारानें दिग्दर्शित करण्यांत आले. त्यावरून भारतवर्षीय समाज सात्विक वृत्तीच्या अगदीं उच्च शिखराला गेला तरी त्याचा बाह्य जगताच्या स्थितिमानाचा विचार सुटल्यामुळें, तो मूळच्या संपन्न सुदृढ व सुस्थिर अवस्थेंतून सध्यांच्या शोचनीय विपन्नावस्थेंत कसकसा येऊन पडला, हें कळून येईल. तथापि उत्कटावस्थेस नेलेल्या ह्या सद्गुणांच्या वाढीनें हिंदु समाज फार तर आपलें स्वतःचेंच नुकसान करून बसला असेल. आपल्या कोणत्याहि वृत्तीसाठीं त्यानें जगताच्या शांतिसौख्यांत कधींहि ढवळाढवळ केलेली नाहीं, अशी इतिहास साक्ष देत आहे. पण हिंद्वेतर मानववंशांनीं आजपर्यंत आपल्या क्षुद्र व नीच वृत्तीसाठीं जगतावर सारखा हाहाःकार उडविला व पुढेंहि त्यांनीं तेंच व्रत चालविलें आहे. त्यांच्या त्या अधम व स्वार्थी वृत्तीच्या अतिरिक्त व एककल्ली वाढीमुळें प्रस्तुत काळीं समस्त जगताच्या जगतच, त्याचा समतोलपणा ( *Equillibrium* ) नष्ट करविला गेल्यामुळें घोर अनर्थ परंपरेकडे खेंचलें जात आहे. जगाच्या शांतिसौख्याची कायमची होळी व्हावी हा त्याचा निश्चित परिणाम आहे.

जगांत शांतिसौख्य नांदावयाचें तर येथील सर्व मानव वंश परस्पर प्रेमानें एकोप्यानें व बंधुभावानें तद्वतच अत्यंत सच्छीलतेनें वागत असले पाहिजेत. परंतु कांहीं लोकांचे समाज जेव्हां स्वार्थांधतेनें नीच प्रकृतीचे बनतात तेव्हां इतर निरुपद्रवी व सद्गुणी समाजांवर साहजिकच ते झडप घालतात आणि त्या त्यांच्या क्षुद्र स्वार्थापायीं सर्व जगभर भयंकर धुमाकूळ सुरु होतो. स्पर्धा, मत्सर, कलह, मारामारी, तंटे बखेडे लढाया ह्यांना ऊत येतो. व जिकडे तिकडे अशांतता व अस्वस्थता पसरते. जगताचा समतोलपणा ( Equillibrium ) नष्ट होतो. अशा अवस्थेंत त्या दुष्ट प्रकृती मानववंशांच्या वत्तीत आणि मेंदूंत यथायोग्य ते संस्कार केल्याविना जगताचा बिघडून टाकलेला तोल ताळ्यावर यावयाचा नाहीं हें उघड आहे. पण आतां अशा सत्तावैभवानें मदांध झालेल्या ह्या जगच्छांतिविघातक मानववंशांना यथायुक्त पद्धतीनें सुसंस्कृत करून त्यांच्या दुष्ट स्वभावांत आमूलाग्र पालट करावयाचा व त्या योगें जगताची स्थिति स्थापकता घडवून आणावयाची, हें महत्कार्य संपादण्याइतकें दिव्य सामर्थ्य कोणत्या संस्कृतिपाशीं आहे ? असा प्रश्न उपस्थित होतो. ह्या प्रश्नाचा दूरवर व खोल विचार केल्यास ' जगदुद्धाराची ही महनीय कामगिरी यशस्वीपणें पार पडण्याचें सामर्थ्य एकट्या आर्यसंस्कृतींतच आहे, असें कोणाहि निःपक्षपाती व्यक्तीला आढळून आल्याविना राहाणार नाहीं. तथापि विश्वोद्धाराचें हें दिव्य सामर्थ्य इतर मानव वंशीय संस्कृतींच्या अपेक्षेनें आर्यसंस्कृतींतच कसें आहे हें त्या संस्कृतींच्या तुलनात्मक अभ्यासानेंच समजून येणारें असल्यामुळें तसा तुलनात्मक दृष्टीचा थोडासा अभ्यास येथें करणें अप्रशस्त होणार नाहीं.

एखाद्या मनुष्याची परीक्षा ज्याप्रमाणें त्याच्या मित्रावरून होते, त्याचप्रमाणें एखाद्या समाजाची परीक्षा त्याच्या धर्मसंस्कृतिवरून होते असें ह्मणतात. ' धर्म ' याचा अर्थ केवळ आचारात्मक असंख्य गोष्टींच्या करामती करणें असा नव्हे. कोणत्याहि धर्माला दोन अंगें असतात. एक तात्विक व दुसरें आचारात्मक. गीतारहस्यांत ह्मटल्याप्रमाणें ' कोणताहि धार्मिक संप्रदाय घेतला तरी त्याचे स्वभावतःच दोन भाग होतात. पहिला तत्वज्ञानाचा व दुसरा आचरणाचा. पहिल्यांत पिंडब्रह्मांडाच्या विचारांनी परमेश्वरस्वरूप काय निष्पन्न होतें तें सांगून मोक्ष कशाला ह्मणावें यान्या शास्त्र दृष्ट्या निर्णय केलेला असतो व दुसऱ्यांत तो मोक्ष मिळविण्यास साधन किंवा उपाय ह्मणून मनुष्यानें या जगांत कसें वागलें पाहिजे याचें निरूपण असते " या दोन्ही गोष्टींच्या आधारावरच त्या त्या समाजाचें चारित्र्य किंवा स्वभाव बनत असतो. ह्मणजे ज्या मानानें त्या लोकांचे विचार शुद्ध पवित्र व परिणतावस्थेला गेलेले आणि आचारहि त्यालाच अनुसरून घडत असलेला, अशी अवस्था असेल त्या मानानें त्या समाज संस्कृतीची पदवी जागतिक कामगिरींत लहान वा थोर गणली जाते. अर्थात् तत्वज्ञान व आचार व्यवहार या उभय दृष्टींनीं येथील संस्कृतींकडून जगताच्या खऱ्या कामगिरींत ह्मणजेच जगताला शांतिसौख्य देण्याच्या कामांत कसकसा भार उचलला गेला आहे हें पाहिलें ह्मणजे जगताला उपकारक संस्कृति कोणची आहे तें समजून येईल आणि मग ओघानेंच तिच्या गळ्यांत विजयश्रीची माळ घालणें प्राप्त होईल.

ह्या पृथ्वीतलावर मुसल्मान, ख्रिस्ती व हिंदु अशा धर्मांचे किंवा संस्कृतींचे तीन मोठमोठे समाज वावरत आहेत. बौद्ध–धर्मीयांची संख्याहि मोठी आहे तथापि बौद्धधर्म हा हिंदुधर्मांतर्गतच कसा आहे, किंवा श्रीविवेकानंदांच्या शब्दांत सांगावयाचें तर तो धर्म हिंदमातेचेंच एक बंड–खोर मूल कसें आहे हें मागें दाखविलेंच आहे. * अर्थातच प्रस्तुत कालीं अगदीं भिन्नभिन्न स्वरूपांत वावरणारे मुसल्मान, ख्रिस्ती व हिंदू हे तीनच मोठे मानवी विभाग विचाराकरितां घेणें युक्त होईल. बाकीचीं सर्व भिन्नभिन्न मतांतरें वा पंथ ह्या तीन भागांत कोठेंना कोठें अंतर्भूत होतील. तेव्हां ह्या प्रमुख तीन संस्कृतींचा तुलनात्मक दृष्ट्या विचार करून त्यांच्यापैकीं जगताला उपकारक अशी कोणती संस्कृति ठरेल हें आतां पाहूं.

उपरोक्त तीन संस्कृतींपैकीं अर्वाचीनत्वाच्या दृष्टीनें प्रथमतः इस्लामी किंवा मुसल्मान संस्कृति विचाराकरितां घेणें युक्त होईल.

इस्लाम धर्माचे इमान ( विचार ) व दीन ( आचार ) असे दोन मुख्य विभाग आहेत, ह्मणजेच एक, तत्वज्ञानात्मक व दुसरा आचारात्मक भाग होय. तत्वज्ञानाच्या दृष्टीनें विचार करतां इस्लाम धर्मांत पिंडब्रह्मांडादि गूढ आध्यात्मिक विषयांची सोपपत्तिक मांडणी किंवा विचारणाहि अगदीं केलेली आढळून येणार नाहीं. सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधानेंहि कांहीतरी भरमसाट कल्पना कल्पिलेल्या आहेत. त्यांचें मुख्य तत्वज्ञान म्हटलें ह्मणजे हेंच कीं परमेश्वर हा एकच एक आहे व महंमद हा त्याचा दूत–प्रेषित आहे– " ला–इला–इल्लिल्ला, महंमद रसुलिल्ला. " कुराण हा एकच धर्मग्रंथ परमेश्वरानें आकाशांतून जगाच्या कल्याणासाठीं पाठविलेला आहे. कुराणाच्या या स्वर्गीय आशंबद्दल निस्सीम भक्ति प्रगट करून तसा

* " Ours is the religion of which Budhism with all its greatness is a rebel child and of which christianity is a very patchy imitation." Vivekanand.

मागेल तोच खरा इस्लाम धर्मानुयायी होय व त्यांच्यावर विश्वास न ठेवणारा " काफर " होय. कुराणाची आज्ञा अशी आहे कीं * असे काफर जेथें जेथें मिळतील तेथें तेथें त्यांना ठार मारून टाका, कत्तली पेक्षांहि काफरपणा फार नीच आहे. काफरांच्या बरोबर असे लढा कीं त्यांचें नांव येथें शिल्लक राहाणार नाहीं, व अल्लाचा धर्म सर्वत्र होईल. काफरांचें निर्मूलन करण्याच्या या महत्कार्यांत मी तुम्हांला सहा हजार दूतांसह साह्य होईन. आणि ह्याप्रमाणें काफरांना जे नष्ट करतील किंवा नष्ट करण्याच्या कामांत मारले जातील त्यांच्यावर परमेश्वर अत्यंत दया करील. व जेथें दूध, मध व शुद्ध पाणी ह्यांच्या मोठमोठ्या नद्या आहेत, जेथें सुंदर तरुण पऱ्या आहेत. खाण्याकरितां मेवा मिठाईचे ढीगच्या ढीग आहेत; लोळण्याकरितां जरीचे पलंग, चांगल्या बिछायती, तक्के, गाद्या गिरद्या आहेत, नयनमनोहारी पशुपक्षी जेथें स्वच्छंदपणें क्रीडा करीत आहेत........अशा विषय भोग परिपूर्ण स्वर्गाचे ते वाटेकरी होतील. असा आनंददायक संदेश त्यांना सांगितलेला आहे.†

*[ ॥ अल्लाहके मार्गमें लडो उनसे जो तुमसे लडते है ॥ मार डालो तुम उनकुं जाहां जावो ॥ कत्तलसे कुफ्र बुरा है ॥ यहांतक उनसे लडो कीं कुफ्र न रहे ॥ और होवे दीन अल्लाहका ॥ ...और काटे जड काफिरोंकी, मैं तुमको सहाय दूंगा सात सहस्र फरीस्तोंके पीछे पीछे आनेवाले ( मं. १ सि. २ सू. २ आ. १७४ ते १७९ व मं. २ सि. ९ सू. ८ आ. ७ ते ९ ].

†[" जो तुम अल्लाहके मार्गमे मारे जावो वा मर जाओ अल्लाहकी दया बहुत अच्छी है ! ! और आनंदका सन्देसा दे उन लोगोंको की ईमान लाए और काम किए अच्छे यहकी उनकी वास्ते बहीस्ते हैं जिनके नीचेसें चलती है नहरें जब उसमेसे मेवोंके भोजन दिये जावें तब कहेंगे की वह वो वस्तु है जो हम पहिले इससे दिये गये थे और उनके लिये पवित्र बिबियां सदैव वहां रहनेवाली हैं ! ! तारिफ उस बहिस्त की की प्रतिज्ञा किये नहरें हैं बिनबिगडे पानीकी और नहरे है दूधकी नहीं बदला मजा उनका और नहरें है शराब की मजा देनेवाली वास्ते पीनेवालोंके और नहरें शहद साफ किये गये की और वास्ते उनके बीच उनके मेंवे है प्रत्येक प्रकारसे दान मालीक उनसेके ॥ ...जबकी हिलाई जावेगी पृथ्वी हिलाये जानेपर ॥ और उडाए जावेंगे पहाड उडाये जानेपर ॥ बस हो जावेंगे भुनगे टुकडे २ ॥ बस साहेब दाहनी और वाले क्या है साहब दाहनी ओर के ॥ और बाई ओर वाले क्या है बाई ओरके ॥ उपर पलंग सोनेके तारोंसे बुने हुये है ॥ तकीये किये हुये हैं उपर उनके आमने सामने ॥ और फिरेंगे उपर उनके लडके सदा रहने वाले ॥ साथ आब खोरोंके और आफताबोंके ॥ और प्यालोंके शराब साफसे ॥ नहीं माथा दुखावे जावेंगे उससे और न विरुद्ध बोलेंगे ॥ और मेवे उस किस्मसेकी पसंद करे ॥ और गोस्त जानवर पक्षियोंके उस किस्मसें कि पसंद करे ॥ और वास्ते उनके औरतें है अच्छी आखोंवाली ॥ मानिंद मोतियो छिपायें हुओं कीं ॥ और बिछौने बडे । निश्चय हमनें उत्पन्न किया है औरतोंको, एक प्रकारका उत्पन्न करना है ॥ बस किया है हमने उनको कुमारी ॥ सुहागवालीयां बराबर अवस्था वालियां ॥ बस मरनेवाले हो उससे पेटों को ॥ बस कसम खातां हूं मैं साथ गिरने तारोंकि ॥

( मं. १ सी. ४ सू. ३ आ. १४०, मं. १ सि. १ सू. २ आ. २८, मं. ६ सि. २६ सू. ४७. आ. १३, १५, मं ७ सि. २७, सू. २६ आ. ४ ते ९, १५ ते २४, ३५ ते ३८, ३८ ५४ ते ७५. ]

कुराणांतील ह्याचमारख्या अनेक पवित्र (!) आज्ञांच्या आधारावर, ह्याच कुराणांतर्गत तत्वज्ञानाच्या बळावर मुसल्मान लोकांनीं अखिल जगतावर हयदोस घातला, सर्वत्र थयमान घालून मुसल्मानेतर जगाला 'त्राहि भगवन्' करुन सोडलें! कुराणाच्या ह्या अशाच शिकवणुकीमुळें, मीर कासीम, गझनीचा महमूद, तैमूरलंग, चंगीझखान, अल्लाउद्दीन खिल्जी, औरंगजेब ह्या सारखे मुसल्मान गाझी (धर्मवीर) पुरुष निर्माण झाले व त्यांनीं इस्लामधर्म प्रसारार्थ पृथ्वीतलावर रक्ताचा सडा शिंपडला—नव्हे रक्ताच्या महानद्या वाहविल्या, छलबलानें लाखों लोक बाटविले. अनेकांची त्यांतल्या त्यांत विशेषतः कर्त्या विद्वान समाज धुरीणांची सरसहा कत्तल उडविली, कित्येकांना कडेलोट केले, कित्येकांना जिवंत जल–समाधी दिल्या, तर कित्येकांना भिंतींत चिणून टाकले, कित्येकांना तेलांत उकळविले, तर कित्येकांना त्यांच्या सुहास्य वदन अर्भकांचें व गाईचें मांस तोंडांत कोंबूत जिवंत जाळले. एवढेंच नव्हे तर त्यांचीं देव मंदिरें व पवित्र स्थानें धडाधड पाडून जाळून पोळून उध्वस्त केलीं. बुद्धगाया, नालंद, उदंतपुरी येथील सारख्या नऊनऊ मजली इमारतींचीं कित्येक अफाट ग्रंथसंग्रहालयें भरामर अग्निसमर्पण केलीं जाऊन, महिनेच्या महिने हमाम खाने पेटत ठेविले. त्यांच्या डोळ्यांदेखत त्यांच्या प्रिय पत्नींच्या अब्रूचे, पातिव्रत्याचे धिंडवडे काढले, राखरांगोळी केली. असे एकना दोन हजारों भीषण अत्याचार *बेधडकपणें व निःशंकमनानें, आणि महदाश्चर्याची गोष्ट ही कीं धर्मांच्या आज्ञा म्हणून केले गेले.* दिल्ली हस्तगत केल्यानंतरची हकीकत तैमूरलंगानें आत्मवृत्तांत लिहिली आहे. तींत तो म्हणतो, "दिल्लीस *माझा मुक्काम फक्त १५ दिवस होता. हा काल मी अतीशय आनंदांत आणि सुखोपभोगांत घालविला;* यावेळीं मी सरदार मानकऱ्यांचे मोटमोठाले दरबार भरविले व मेजवान्या दिल्या या सुखांच्या वेळीं माझें मन मला अशी ग्वाही देई कीं तूं हिंदुस्थानांतील या नास्तिकांशीं–कांफरांशीं–सामना देण्याकरितां आला आहेस. या साहसांत तूं जेथें जेथें गेलास तेथें तेथें तुला यश आलें. तुझ्या सर्व संकटांतून तूं विजयी मुद्रेनें व उल्हासित अंतःकरणानें बाहेर पडलास. लक्षावधि धर्मद्रोह्यांना व मूर्तिपूजकांना यमसदनीं धाडलेस व तुझ्या कमरेस लटकत असलेल्या समशेरीस असंख्य शत्रूंचें रक्त पाजलेस. आतां तुला विजय प्राप्त झाला आहे तरी सुद्धां सुखोपभोगांत दंग होऊं नकोस, सुखशय्या सोड आणि हिंदुस्थानांतील तुझ्या धर्मद्रोह्यांशीं एकसारखा खडा सामना चालूं ठेव." (हिंदु संघटण पृ. ३५). "

अशा प्रकारें मुसल्मानेतर जगाचे वाटेल त्या अघोरी मार्गांनीं सर्वस्व हरण करण्यास शिकविणारें कुराणी तत्वज्ञान जगाला कोणत्या शांतिसौख्य–पदीं विराजमान करील हें सांगावयास पाहिजे असें नाहीं इस्लाम धर्माची संप्राप्ति जगच्छांति करितां आहे असें सांगण्यांत येतें. इस्लाम या शब्दाचा अर्थच 'शांतता' असा आहे असें क्लॉड साहेबांनीं केलेल्या आपल्या इस्लामाच्या व्याख्येंत म्हटलें आहे.* तद्वतच इस्लामीधर्म ह्या भ्रातृभावपूर्ण आहे असें हि प्रतिपादण्यांत येतें! + परंतु·· जे

* "Islam comes from a word meaning in the first instance to be at rest, to have done one's duty, to be at perfect peace!"

+ [निश्चय अल्लाह दुर्रे लोगों और काफिरोंकी जमा करेगा दोजखमें.॥ ऐ इमानवालों मुसल्मानोंको छोड काफिरोंको मित्र मत बना ओ। (मं. १० सि. ५ सु. ४ आ. १३८ व १४३).

' काफर ' आहेत त्यांना मी निश्चयानें भयंकर नरकांत पाठविणार. तुम्हीं त्यांच्याशीं कदापि मैत्री करूं नका–अशी स्पष्ट आज्ञा जें कुराण जोरजोरानें प्रतिपादन करीत आहे, तें मानव जातीशीं कोणता भ्रातृभाव किंवा प्रेमसंबंध स्थापन करूं शकेल? जें कुराण एकाद्या नीचही मुसल्मानाला मग तो व्यभिचारी, चोर, ठग, लुटारु, दारुबाज असा का असेना–सदाचार संपन्न, शीलवान, सद्‌गुणी अशा मुसल्मानेतरांपेक्षां श्रेष्ठ प्रतीचा ह्मणून ठरविते, ज्या कुराणाच्या आज्ञेनुसार त्याचे भक्त महात्मा गांधीजींसारख्या श्रेष्ठ विभूतीलाहि एकाद्या रस्त्यावरील बदमाषापेक्षां नीचतम लेखितात त्या कुराणाला कोणता भ्रातृभाव संमत आहे म्हणून ह्मणावयाचें? ज्या शरीफ कुराणांतील ' अनफाल ' सुरा लुटीला मदत देणारा ' वाक आ ' ' कहफ ' ' रहमना ' हे सुरे शराब, कबाब, सोन्या चांदीचीं कंगनें, हुऱ्यापऱ्यादिक स्वर्गीय सुख देणारे आणि ' अवराव ' सुरा मुसल्मानेतरांची ' कुफ्र ' ( काफीर ) ह्मणून सरसहा कत्तल करण्यास सांगणारा आहे तें कुराण वरीलसारखे असंख्य सुरे इस्लामेतर हृदयांत खुपसून जगतांत कोणता भ्रातृभाव किंवा कोणती शांति प्रस्थापित करणार आहेत, हे तो कुराण रचयिता अल्लाहच जाणे!

कुराणांत कांहीं कांहीं ठिकाणीं सामान्य अगदीं सामान्य नीतितत्वें आढळून येतात, नाहीं असे नाहीं. जसे, " क्षमेचा स्वीकार कर, योग्य गोष्टीबद्दल आज्ञा कर, व अडाणी लोकांपासून दूर रहा ( सु. आराफ २४ ) जे सुखांत व दुःखांत दान करितात व क्रोधाचें दमन करितात व लोकांवर क्षमा करतात, अल्लाह त्या सर्व सत्कर्मशील मनुष्यांवर प्रेम करतात. ( सु. ' आल इमरान ' र. १४ ) अल्लाह अत्याचारी माणसांवर प्रेम करीत नाहींत. ( सु. आ. इ. र. १४ ) भांडण तंटा पृथ्वीवर करूं नका. ( सु. ७ आ. ७३ ) " अशासारखीं कांहीं वचनें कुराणांत आहेत. पण उपमाच द्यावयाची तर तीं *अरबस्थानांतील अफाट रखरखलेल्या वाळवंटामधील कधीं कधीं दृष्टीपथांत येणाऱ्या लहान लहान झुडुपा*-प्रमाणेंच आहेत. परंतु हीं झुडुपेंहि काफरांचें उच्चाटन करण्याच्या आवेशांत कोठेंच होरपळून जातात.

परमेश्वर चरणीं तनमनधनानें लागण्याची किंवा आत्मसमर्पण करण्याची सर्वमान्य उदात्त कल्पनाहि इस्लाम धर्मांत आहे–कार्लाइल्नें इस्लामचा आत्मसमर्पण हाच अर्थ दिला आहे. *

परंतु कुराण न मानणारा रेवढा काफीर व त्याला जेथें सांपडेल तेथें ठार मारणें व त्यायोगें अल्लाहचा *धर्म जगभर पसरवून स्वतःला ऐषाराम परिपूर्ण स्वर्ग प्राप्त करून घेणें ह्या एकाच साध्या–साठीं हें* आत्मसमर्पण असल्यामुळें, ह्यांतील उदात्त निष्कामता व उज्वल पवित्रताहि कोठेंच विरळून जाते! रावणानेंहि महादेवाच्या चरणीं शिरकमलें वाहिलीं. परंतु त्याच्या आसुरी स्वार्थामुळें त्या आत्मसमर्पणाचें मूल्यहि पण तितकेंच केलें गेलें!

कुराणांत २–४ ठिकाणीं आपला धर्म प्रसार सक्तीनें वा बलात्कारानें करूं नका अशीहि अल्लाहची आज्ञा आढळून येते, ही महदाश्चर्याची गोष्ट आहे. जसें कीं " धर्माच्या कामांत सक्ती नाहीं. खरोखर चुकीच्या मार्गापासून परावृत्त करून सन्मार्गाला लावण्याकरितां धर्माचा अवतार झाला आहे " [ सुरह बाकर र, ] आणि जर तुमच्या प्रतिपालकानें अशी इच्छा केली असती तर पृथ्वीमध्यें जे लोक

* " Islam means in its way denial of self, annihilation of self."
[ Hero and Hero worship. p. 61. ]

रहात आहेत ते एकदमच सगळे एकाच पंथांत समाविष्ट झाले ; असते, तेव्हां जोंपर्यंत लोकांच्या विश्वासास पात्र झाला नाहीं तोंपर्यंत तुही सक्ति करून काय उपयोग ? [ सुरह युनस, र १० ] "

जे लोक अल्लाहला सोडून अन्य देवतेचीं उपासना करतात त्यांना दुर्वचनें बोलूं नका, तुम्ही दुखवूं नका कारण त्यामुळें ते लोक आपल्या अडाणीपणामुळें अल्लाची अधिक निंदा करूं लागतील " [ सु आर्नआम र १ ]

" आणि तुमच्या प्रभूच्या मार्गाकडे खरें ज्ञान व उपयुक्त उपदेश यांच्या साहानें लोकांना वळवा व त्यांच्याशीं उत्तमरीतीनें वादविवाद करून त्यांच्या मनाची शांति करा " [ सु नहल र १६ ]

कुराणाच्या ह्या सुस्पष्ट आज्ञा असतां इस्लामियांनीं जगतांत असा कहर कां उसळून दिला असा प्रश्न उद्भवतो. परंतु ह्या पुळचट आज्ञा इष्कबाजी करितां हपापलेल्यांच्या पथ्यावर कशा पडाव्या ? इहपरलोकींच्या विषय सुखाला लाल्चावलेल्यांना ' हे नबी, काफर आणि, शत्रू यांच्याशीं झगडा कर आणि त्यांच्यावर सक्ती कर—–काफीरां बरोबर येथ पावेतों लढा कीं त्यांचें सर्व दल हरण केलें जाईल. आणि सर्वत्र अल्लाहचा धर्म होईल आणि तुम्ही हें जाणा कीं, तुम्ही जें जें कांहीं लुटाल तें तें सर्व अल्लाह साठीं आहे त्यांत पांचवा भाग रसूलाचा आहे, " *

ह्याच आज्ञा आवडावयाच्या, शिरसावंद्य धारण केल्या जावयाच्या ! स्वार्थातुर कामातुर, किंवा विषयातुर झालेल्यांना लोक—लज्जा किंवा शास्त्र—लज्जा काय होत ? स्वतःच्या क्षुद्र व ग्राम्य विषय सुखा साठीं " काफरांना हैराण करण्याला कुराणानेंच आज्ञापिलें आहे " असें ते बेधडकपणें व उजळ माथ्यानें प्रतिपादन करीत रहाणार ! धन्य तो कुराण निर्माता अल्ला व धिक्कार धन्य त्याचे अनुयायी ! ! !

कुराणांत कित्येक ठिकाणचें तत्वज्ञान फारच मजेचें व हास्यापद आहे. जसें " अल्लाहनें काफिरांच्या हृदयावर व कानांवर मोहर करून ठेवली आहे व डोळ्यांवर पडदे फेकले आहेत, त्यांच्या ठायीं रोग वाढविले आहेत, अल्लाहहि मनुष्याला गुमराह करतो—सन्मार्गापासून परावृत्त करतो. मींच सैतानाला पाठवून काफिरांना बहकावून सोडतों. त्यांच्या जवळ मी पण ठकपणा केल्या विना रहात नाहीं.— ×

+ तद्वतच अल्लाह महा दुःख देणारा आहे अनंत काल पावेतों पाहिजे त्याला वाटेल तो दंड देतो.

---

* [ ए नबी झगडा कर काफिरो और गुप्त शत्रु ओसे और सख्ती कर उपर उनके और लडो उनसे यहांतक की न रहे फित्ना अर्थात वाल काफिरी का और होवे दीन तमाम वास्ते अल्लाहके ! और जानो तुम यह की जो कुछ तुम लुटो किसी वस्तुसे निश्चय वास्ते अल्लाह के है पांचवा हिस्सा उनका और रसुलके " ( मं सि २८ सु ६६ आ ९, मं २ सि १ सु ८ आ ३९-४१ ) ]

× [ अल्लाहने उनके दिलो कानोपर मोहर करदी ॥ और उनकी आंखोपर पर्दा है ॥ ओर उनके वास्ते बडा अजाब है ! उनके दिलोमें रोगह अल्लाहने उनका रोग बढा दिया ॥ अल्लाह गुमराह करे उसको कदापि मार्ग न पावेगा ॥ क्या नही देखा तूने येहकी भेजा हमने सैतानोको उपर काफिरों के बहकाते है एक मकर और मैं भि मकर करता हूं ॥ ( मं. १ सि. १ सु. २ आ. ६–९ ) मं. १ सि. ५ सु. ४ आय ८७; मं. ४, सि. १६ सु. १९ आय. ८१, मं. ७ सि. २० सु. ८६ आ. १५–१६ )]

+ और यह की अल्लाह कठोर दुःख देनेवाला है। खुदा जिस को चाहे अनंत रिजग देवे । जिसको चाहे नीति देता है वह की जिसको चाहेगा क्षमा करेगा ॥ जिसको चाहे दंड देगा ॥ क्यों की वह सब वस्तुपर बलवान है ॥ अल्लाह पापीयो को मार्ग नहि दिखलाता ( मं. १ सि. २ सु. २ आ. १५१–१९७; मं १ सि. ३ सु. २ आ. २५१–२६६, २४०. )

त्याच्या मर्जीस येईल त्याला तो नीति देतो. ज्याला पाहिजे त्याला क्षमा करतो किंवा दंड करतो. अल्लाह पापी माणसांना मार्ग दाखवीत नाहीं.

जर अल्लानें काफिरांचें हृदय व कान मोहरबंद करून ठेविले आहेत व त्यांच्या डोळ्यांवर पडदे फेकिले आहेत तर कुराणाचें पवित्र ज्ञान त्यांस न झाल्यास दोष कोणाचा ? ज्यांना परमेश्वरच सैतान पाठवून बहकावीत आहे व सन्मार्गापासून परावृत्त करीत आहे, त्यांना नरकाची शिक्षा काय ह्मणून ! अशा निरपराध माणसांचे हाल हाल करण्यास आज्ञा काय ह्मणून ? जर पापी लोकांना अल्लाह मार्ग दाखवणार नाहीं तर या पापमय भूमींत त्याची आवश्यकता काय ? साहाजिकच अशा कठोर, निर्घृण व निर्दय परमेश्वरावर विचारवंतांची कशी श्रद्धा व भक्ति जडावी ! तो ईश्वर पापी लोकांचा उद्धार करणारच नाहीं उलट त्यांना ठकबाजी करून अधिकाधिक खड्यांतच टाकणार आहे व मुसल्मानांवरच तेवढी दया दाखवून त्यांचा उद्धार करणारा आहे " शिक्षा और दया वास्ते मुसल्मानोके " ( मं. ३ सि ११ सु. ११ आ. ५५ ) तर अशा पक्षपाती परमेश्वरावर ज्ञानी माणसांचें प्रेम कसें जडावें. कुराणी तत्वज्ञानाच्या ह्या कठोर खरखरीतपणामुळें सदय अंतःकरणाच्या कशा चिंधड्या उडतात हे मुं. अबदुल गफुर B. A. मुख्य अध्यापक इस्लामिया हायस्कूल गुजरानवाला यानीं १४ जून १९०३ ईसवीमध्यें जेव्हां आर्यसमाजद्वारा वैदिक धर्माची दीक्षा घेतली तेव्हां हजारों लोकांसमक्ष केलेल्या त्यांच्या भाषणावरून उत्कृष्टपणें निदर्शनास येतें. *

कांहींजण म्हणतात त्याप्रमाणें इस्लामी धर्म आपल्या जन्मकाळीं आडदांड जंगली क्रूर व अडाणी अशा आरब लोकांना उन्नतीकारक झाला असेल; त्यांच्या तत्कालीन अगदीं भ्रष्ट जीवितक्रमांत त्यायोगें थोडी

---

* [ते ह्मणतात, "आर्य समाज के किसी आदमीने मुझे नहीं खींचा किंतु उस सभ्यताने मुझे आकर्षित किया जो भविष्यमे मेरी समान बहुतो को खींचेगी, वह सत्यता क्या ? वह वैदिक धर्म की जिसके चिन्ह मे यहां आपने आसपास कहीं द्वार और भींतोपर देख रहाहूं । इस सत्यताके जलने मेरे पिपासा कुलित हृदयको आर्दित किया जबकी कुरानके मारु स्थली तट मेरी पिपासाकी शांती न करसके । जब कुरानकी बुद्धि विरुद्ध बाते मेरे डावा डोल और क्लेदित मस्तकको कुच्छ संतोष न देसकी । कुरानके बहुतसे जंगली और दया रहीत प्रकरन मेरे नम्र हृदयको संतुष्ट न कर सके जब कुरानकी नीच कक्षा की शिक्षा मेरे उच्च विचारोको साथ न देसकी । जब कुरानके माननेवालेका नैष्ठिक जीवन ( अमली जिन्दगी ) मुझपर आरोग्य प्रद और आल्हादिक प्रभाव नडाल सकी, जब मै इस अंधकार अच्छादित वायुचक्रमे इधर उधर हात मार कर खेदित और क्षमा कुलित हो रहाथा तो मुझे अंदरसे निकालनेके निमित्त वैदिक शिक्षाके प्रकाशित भुवन भास्करकी रश्मीओने मेरे पथको प्रकाशित किया, और मुझे अंधकूपसे निकालकर प्रकाशम भूमीमें पहुचाया । मै आरब के मरुस्थलसे निकलकर गंगा और यमुनाके तटोपर आया जहां वेदोक्त शिक्षाका वह मिष्टांबु ( शरबत ) मिला जिसने मेरी हार्दिक पिपासाको शांत कर दिया, मेरे हृदय और मस्तिष्कको शांती प्राप्त हुई " ( तर्के इस्लाम पृ. ५ ) ].

सुधारणाहि घडून आली असेल. परंतु पुढें संग्राहक स्वरूपाच्या व व्यापक दृष्टीच्या अभावीं तो प्रगमनशील होऊं शकला नाहीं. कल्पांतकाळींहि कुराणाच्या आंतील अक्षरसुद्धां कोणी बदलावयाचें नाहीं. ह्या कडक व भयंकर निर्बंधनांत योग्य वाढीला किंवा विकसनाला अवकाश न ठेवला गेल्यामुळें इस्लामी धर्मांत जिवंतपणा राहिला नाहीं प्रेताचें काठिण्य त्याला आलें '. [Faiths of the world] नामक पुस्तकांत लॉर्ड हॉटन यानें ह्मटल्याप्रमाणें " महंमदाचें तत्वज्ञान त्याच्या पवित्र पुस्तकांतच असल्यामुळें जगाच्या उत्क्रांतीबरोबर न जातां ते मृताच्या हाताप्रमाणें निश्चेष्ट राहतें "*—किंवा त्याच पुस्तकांत पुढें ह्मटल्याप्रमाणें " ह्या मुसल्मानी धर्माचें वैशिष्ट्य ह्मणजे प्रगमनशीलतेचा अभाव हेंच होय. विकास पावणाऱ्या तत्वांचा त्यांत समावेश केलेला नाहीं किंवा उच्च किंवा उदात्त गोष्टी ज्यापासून निर्माण होतील अशीं बीजेंहिं त्यांत नाहींत. तो धर्म त्याच्या ईश्वराप्रमाणेंच वांझ त्याच्या आदिम तत्त्वाप्रमाणेंच निर्जीव व ज्याला खरें जीवित असें ह्मणतां येईल त्याला सर्वथैव अनुपयुक्त असा आहे." ¶

अर्थात् स्वतःच जें तत्वज्ञान प्रगमनशील किंवा विकासोन्मुख नाहीं तें जगतालाहि अधोगतीच्या खड्यांतच ढकलणार हें निःसंशय आहे. महर्षि दयानंद ह्मणतात त्याप्रमाणें " कुराणांतील अल्पसा सत्यांश सोडून दिल्यास बाकी सर्व अविद्यामूलक भ्रमोत्पादक मनुष्याला पशुवत् बनवून सोडणारें, शांतिभंगकारक व उपद्रव माजवून मनुष्या मनुष्यांत द्रोह पसरविणारें आणि परस्परांना दुःख-सागरांत बुडविणारें आहे. कार्लाइल्नेंहि कुराणासंबंधीं असेच उद्गार काढले आहेत. ×

ह्याप्रमाणें संकुचितपणा, रुक्षपणा, पक्षपातीपणा, विसंगतपणा, तर्काशुद्धता, असहिष्णुता इत्यादि अनेक दोष कुराणी तत्वज्ञानांत असल्यामुळें, तें सर्व जगताच्या प्रेमादरास पात्र होणें शक्य नाहीं. उलट तें अनेक आपत्तिमूलकच असल्यामुळें तुर्कस्थान, अफगाणिस्थान, ईजिप्त, इराण इत्यादि मुसल्मान देशांतून त्याचें यथा योग्य पद्धतीनें उच्चाटण करण्याचा विचार तेथील दूरदर्शी व सूज्ञ समाजधुरीण प्रस्तुत काळीं करीत आहेत. अर्थातच जगताच्या शांति-सौख्याला किंबहुना स्व-समाजाची यथार्थ उन्नती करण्यालाहि हें तत्वज्ञान अनुपकारक व सर्वथैव घातक आहे ही गोष्ट ते समाजधुरीण स्वोदाहरणानें सिद्ध

---

* "Mahommed's truth lay in a holy book
So while the world rolls on from change to change.
And realms of thoughts expand,
The letter stands without expanse or range.
Stiff as a dead man's hand" (St. Gile's lectures p. 396).

¶ " The essential character of the religion itself is improgressive. There are in it no principles capabale of develorment, no germs from which higher things can be evolved. " It is sterile like its God-lifeless like its first principle in all that constitutes life."

× I must say it is as toilsome reading I ever under took, a wearisom confused jumble crude, in condite endless iterations, long windedness, entanglement most in crude in condite-insupportable stupidity in short." (Hero and Hero W. p. 69).

करीत आहेत. या राष्ट्रांतील विचारी लोकांप्रमाणेंच इतर मुसल्मान जनसमूहानें जर स्वतःला व जगाला घातक असलेल्या आपल्या तत्वज्ञानांतील दोषांचा पुरस्कार करण्याचें सोडून दिलें तर जगावर निःसंशय महदुपकार झाल्याविना राहणार नाहींत. त्यांच्या उन्नतीचाहि तोच श्रेयस्कर मार्ग आहे. Faiths of the world पुस्तकामध्यें म्हटल्याप्रमाणें "मुसल्मानी धर्माच्या अमलाखालील कोणताहि समाज आपल्या इस्लामी धर्माचा त्याग केल्याविना उन्नतीचा मार्ग आक्रमण करूं शकणार नाहीं, जगांतील प्रगमनशील राष्ट्रांबरोबर अशा समाजाचा चिरकालीन देवघेवीचा व्यहार होऊं शकणार नाहीं" *

येथवर इस्लामी धर्माचें समालोचन करून तें मत वा ती संस्कृति जगताला अनुपकारक कशी आहे हें दाखविल्यानंतर आतां त्याच्या आधीच्या खिस्ती मताचा वा संस्कृतीचा विचार करावयास घेणें सयुक्तिक होईल.

मानवांच्या कल्याणाकरितां परमेश्वरानें आपला एकुलता एक पुत्र येशू हा पृथ्वीतलावर पाठविला व बायबल हा पवित्र धर्म ग्रंथाहि देवानेंच दिला असे खिस्ती लोक मानितात. + येशूखिस्तावर व बायबलावर जे विश्वास ठेवतील त्यांनाच स्वर्गांत प्रवेश मिळेल असा खिस्ती धर्माचा सिद्धांत आहे. ( प्र. यु. अ. २१ ओ. २७ ) खिस्ती धर्म हाच एकटा खरा असून बाकीचे धर्म खोटे आहेत व त्या धर्मावर विश्वास ठेवणारे 'हीदन'—जंगली होत असे खिस्त्यांचें ह्मणणें आहे. परधर्माविषयींच्या ह्या असहिष्णुतेंतच खिस्ती धर्मीयांनीं जगभर घातलेल्या रणधुमाळीच्या हुतूचें बीज आहे. वस्तुतः कांहीं विशिष्ट व्यक्तींच्या विशिष्ट आज्ञांचें अंध विश्वासपूर्वक परिपालन करणें किंवा कांहीं ठराविक प्रार्थना तोंडानें पुटपुटणें, किंवा कांहीं ठराविक आचारांची दांभिक क्रिया करणें ह्मणजे 'धर्म' नव्हे. असें असतां आपल्या धर्मांचे अशा स्वरूपाचे कांहीं आचार विचार मान्य नसणाऱ्या व्यक्तींवर जंगलीपणाचा-'हीदनपणाचा-' आरोप करून त्यांना तुच्छ व वंध्य लेखणें ही गोष्ट सर्वथैव अयुक्त नव्हे काय ? परंतु या सारासार विवेकाच्या अभावीं खिस्त्यांनीं धर्माच्या नांवाखालीं भयंकर अनर्थोत्पात येथें घडवून आणले. स्पेन पोर्तुगालचा इतिहास ह्या भीषण अत्याचारांची जिवंत साक्ष देत आहे †

* "No race swayed by Mahommadanism can ever advance except by renouncing their religion. There can be no permanent 'Modus Vivendi' between such a race and the progressive nations of the world."

+Ye might believe that Jesus is the Christ the son of God; and believing ye might have life through his name.

—*St. John*— XX 31.

† Spain carried on a fierce persecution against the moors and the Jews. She burned them by thousands she tortured and mangled them; weary of slaughter she exiled them. Her roads were strewn with corpses during that great exodus, corpses of old men of women of nursing mothers of little children; the tears, the cries of the weak she crushed so pitilessly because the avengers who hounded her to ruin and she sank from being mistress of Europe to the little regarded power she is to day. (Brother-hood of Religions p. 6-7.)

. . . पिंडब्रह्मांडादि आध्यात्मिक विषयांची सोपपत्तिक मांडणी बायबलांत केलेली नाहीं. परमेश्वर एक आहे आणि तीनही आहे, या तीन परमेश्वरांतला एक, मनुष्याच्या उद्धारासाठीं पृथ्वीवर अवतार घेतो, आणि मरून थडग्यांत गेल्यानंतर तेथून उठून पुनश्च स्वर्गांत जातो, अशा सारखीं कित्येक तर्कशून्य असंबद्ध व भ्रमोत्पादक तत्त्वें इतस्ततः आढळून येतात. जुन्या करारांतील सृष्टीनिर्मितीच्या विचित्र हकीगती, सूर्याच्या उत्पत्तीच्या अगोदर दिवस रात्रीची कल्पना, मिसर देशस्थ मुलें माणसें व पश्वादिकांची परमेश्वराकडून कत्तल, चवथ्या पिढीपर्यंत बापाच्या पापाबद्दल मुलाबाळांना केलें जाणारें शासन, भाकरीचा तुकडा हें खिस्त देवाचें मांस व दारू हें त्याचें रक्त असें मानून तें भक्षण करण्यानें अंगीं पावित्र्य आणणें, इस्राएल कुलांत मरीचा आजार पाठवून सत्तर हजार माणसांचा फन्ना उडविणें, तद्वतच नव्या करारांतील कुमारी मेरीचें मातृपद, आकाश उघडून शब्दनिर्मिति, खिस्ताचें आकाशात वसणें, आदमच्या अपराधाबद्दल सर्व मानव जातीवर परमेश्वरानें सूड उगवणें, पाप निवृत्तिसाठीं आपला एकुलता एक पुत्र जगांत पाठविणें व त्याचा वध करून सर्वांना पापमार्ग मोकळा करून देणें, ह्या पापाचें क्षालन बाप्तिस्मा विधीनेंच होण्याची शक्यता दाखविणें, नोहाचा प्रलय, मरणानंतर सर्वांना एकाच दिवशीं न्याय दानासाठीं पुनरुत्थापित केलें जाणें...इ. इ. प्रकारच्या कित्येक गोष्टी बायबलाचें अंतरंग स्वरूप जाणवूं शकतात. तद्वतच मूर्तिपूजा निषिद्ध मानणारेच पूजनासाठीं संतांचे अवशेष, संतांच्या प्रतिमा, देवांच्या आईच्या प्रतिमा इत्यादि गोष्टी मानीत असलेले पाहून, हे विसंगत व विचित्र प्रकार विचारवंताला विश्वसनीय व श्रद्धनीय कसे वाटावे ? आधुनिक शास्त्रीय शोधांमुळें बायबलांतील कित्येक गोष्टींचें हास्यास्पद वैफल्य पाश्चात्यांच्याहि दृष्टीला धडधडीतपणें दिसून येऊं लागल्यामुळें त्यांचाहि विश्वास बायबलावरून उडत चालला आहे, डार्विनचा उत्क्रांति तत्त्ववाद व बायबलची शिकवणूक ह्यासंबंधीं अमेरिकेंत आज कित्येक दिवस जुन्या नव्या मतवादी लोकांत चाललेली खळबळ वरील गोष्टच सिद्ध करीत आहे. अशा अवस्थेंत जंगलीपणाचा दोष वरीलसारख्या खुळचट कल्पना न मानणाऱ्यांच्या माथीं येतो कीं त्या कल्पना प्रतिपादन करणाऱ्यांकडे येतो ह्याचा विचार सुज्ञांनींच करावा.

बायबलांत पुनर्जन्म मानलेला नाहीं, मेल्यानंतर परमेश्वर सर्व माणसांस पुन्हा सजीव करील व तेव्हां प्रत्येकाला आपल्या पापपुण्याचा झाडा द्यावा लागेल व त्याला अनुसरून सुखदुःखाचें माप पदरीं टाकण्यांत येईल असा सिद्धांत बायबलांत आहे. न्यायदानाचे दिवशीं पापपुण्याचें फळ मिळणार; पण पुनर्जन्मच नाहीं मग तें उपभोगावयाचें केव्हां, कोठें व कसें ? खेरीज सृष्टीच्या प्रथमारंभाच्या काळीं उत्पन्न झालेल्या पुरुषाला प्रलय कालपर्यंत न्यायदानासाठीं थडग्यांतच कुजत पडून रहावें लागणार ही दीर्घ कालिक शिक्षा त्याला काय म्हणून ? म्हणजे प्रलय काळीं मरेल त्याला तात्काळच न्यायदान मिळणार हा अन्याय नव्हे का ? तथापि पुनर्जन्माच्या अभावीं आणखीहि एक महदापत्ति उद्भवते, मरणाबरोबर जर सर्वच बाजार आटपत असला तर विशिष्ट प्रकारचेंच सदाचरण काय म्हणून करावयाचें ? एका जन्मांत आयुष्याचें सर्व कोडें उकलूं शकेल काय ? श्री. चापेकर ह्यांनीं आपल्या लेखसंग्रहांत लिहिल्याप्रमाणें "पुनर्जन्म आपण मानला नाहीं तर धर्मग्रंथांत सांगितलेलीं बंधनें आपण कां पत्करावीं हा प्रश्न अनुत्तर रहातो; देहावसाना बरोबर जीवाचाही अंत होत असेल, तर विशिष्टाचरणाचें प्रयोजन रहात नाहीं, या

जन्मांतच परमेश्वरानें कृपाळू होऊन आपणास सुख-संपत्ति द्यावी अशा भावनेनें प्रेरित होऊन मनुष्य जर परमेश्वराची आराधना करील अगर धर्माचरणानें वागेल तर त्यास बहुतेक प्रसंगीं निराश होण्याचीच पाळी येईल व मग धर्मावरून त्याची श्रद्धा क्षीण होऊं लागली तर त्यांत कांहीं आश्चर्य मानण्याचेंहि कारण राहणार नाहीं. ह्या जन्मांत तर परमेश्वर आपल्या सहायास येत नाहीं, व पुन्हां तर जन्म देणें नाहीं, मग परमेश्वराची करुणा कां भाकावी ? राजपुरुषास शासन करतां येणार नाहीं असें पाप कां करूं नये ? विषयसुख सोडून बौद्धिक सुखाची अपेक्षा कां करावी ? शरीरसामर्थ्य वृद्धीपेक्षां आत्मिक-उन्नतिकडे विशेष लक्ष कां द्यावें, ह्याचीं समर्पक उत्तरें देणें कठीण जाईल, " ( नि. ले. पृ, ७३ ) अशा अवस्थेंत साहजिकच ऐहिक कायदा व न्याय नीति बंधनांतून युक्तीनें सुटका करून घेऊन मनुष्य स्वार्थ संपादनाकडे खेंचला जातो, मग त्याची पशुवृत्ति निःशंकपणें वावरूं लागतें व ती जनदृष्टीपासून सात्विक सोंगानें छपवून ठेवून पुनः उजळ माथ्यानें समाजांत वावरण्यास मिळावें, एवढ्याकरितां त्याचें सर्व बुद्धिवैभव तिकडेच खर्चिलें जातें. मग त्याच बुद्धीच्या बळावर आपला दुष्ट जीवितक्रम न्याय्य आहे असें सिद्ध करून दाखवून, माणसें माणसांचा बळी घेण्यास उद्युक्त होतात व त्यामुळें जगांतील शांति समाधान नष्ट होतें.

ख्रिस्त भक्तांनींहि प्रस्तुतकालीं अशीच दुःखप्रद परिस्थिति निर्माण केली आहे. सर्व मनुष्यांचा परमेश्वर हाच पिता आहे आणि सर्व मनुष्यें त्याचींच लेंकरें असून त्या सर्वांत पूर्ण बंधुत्वाचें नातें आहे या श्रद्धेनें चालणारांचेंच जीवन मंगलमय होईल, अशी ज्याची खरी श्रद्धा असेल तोच यथार्थ ख्रिस्तानुयायी होय. व ह्या दृष्टीनेंच "आपल्या शेजाऱ्यीं विषयीं खोटी साक्ष देऊं नको, आपल्या शेजाऱ्याचें असेल त्यावर लोभ ठेवूं नको " अशासारख्या आज्ञा येशूनें केल्या आहेत ( निर्गम. अ. २० ओ १६-१७ ) तथापि कंठरवानें आपल्या अनुयायांस ख्रिस्तानें दिलेल्या अशासारख्या शिकवणुकी ख्रिस्तभक्तांकडून निर्धास्तपणें प्रत्यहीं पायातळीं तुडविल्या जात आहेत, त्यांचेंहि कारण वरील मनोभूमिकेंतच आहे. ख्रिस्ती राष्ट्रांच्या ह्या मनः प्रवृत्तीचें चित्र काउंट टॉलस्टॉय असें रेखाटतात कीं 'आजच्या ख्रिस्ती राष्ट्रांनींहि धर्माचा पूर्ण त्याग केला आहे. हीं राष्ट्रें आपसांत कितीहि भांडलीं तरी एका बाबतींत त्यांचा एकोपा आहे. लुटारुपणाच्या बाबतींत सर्वांचें एक मत होतें. दरवडेखोरांची ही एक प्रचंड टोळी बनली असून चोऱ्या, दरोडे, लुटालूट, खून वदफैलीपणा इत्यादि अनीतीचीं कृत्यें व्यक्तिशः अथवा समूहशः कोणीं केलीं तर त्यांपैकीं कोणाच्याहि अंगावर शहारे येत नाहींत अथवा कोणाचें चित्त यत्किंचितहि कंपायमान होत नाहीं. " यथार्थ तत्वज्ञानाच्या अभावीं ख्रिस्ती लोक कोणत्या भयंकर अवस्थेला जात चालले आहेत, हें वरील विवेचनावरून कळून येईल. आतां नैतिक दृष्टीनें विचार करतां नैतिक आचरणाच्या विधिनिषेधात्मक अशा किती तरी आज्ञा ख्रिस्तानें केलेल्या आढळतात. परंतु ते विधिनिषेध कां व कशाकरतां पाळावे ह्याची सोपपत्तिक छाननी त्यानें न केल्यामुळें त्यांच्यावर सर्वांचाच विश्वास बसूं शकत नाहीं. कोणत्याहि गोष्टीचें महत्व बुद्धीला पटलें किंवा पटविलें गेलें ह्मणजे ती आत्मसात् करण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति असते, परंतु तसें न करितां केवळ 'तूं असें कर वा असें करूं नको ' अशा दंडेलीच्या हुकुमानें मनुष्य उन्नतिपथ आक्रमूं शकत नाहीं. स्वामी रामतीर्थ ह्मणतात " नीतिपाठ सक्तीच्या आज्ञा,' व्यवहाराचे कृत्रिम नियम यांनीं जगाची नीतिमत्ता कधीं सुधारणार नाहीं.........नीति वचनांनींच जग सुधा-

यावयाचें असतें तर बायबलांत अभिवचन दिलेलें 'देवाचें राज्य' या पूर्वीच येथें सुरु व्हावयास पाहिजे होतें." परंतु जग तसें सुखमय न होतां अधिकाधिक दुःखमयच होत चाललें असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत आहे. नैतिक निर्बंधांचें लोढणें गळ्यांत बाळगण्यास पाश्चात्य समाज अनुत्सुक झालेला आहे व त्यामुळेंच तो भयंकर अधःपतनास जात चाललेला पाहून त्याचे विचारवंत पुढारी चिंतामग्नच दिवस कंठित आहेत. बायबलच्या शिकवणुकीत हें अधःपतन टाळण्याचें सामर्थ्य नाहीं ही गोष्ट त्यांनाहि आतां स्पष्टपणें दिसून आलेली आहे. मग जी शिकवणुक त्यांच्याच समाजाचें तारण करण्यास असमर्थ म्हणून सिद्ध होत आहे, तीच शिकवणुक इतर समाजांचा तरी उद्धार कशी करूं शकेल ?

साहजिकच खऱ्या विचारवान् पुरुषांचें समाधान करणें बायबलप्रणीत ख्रिस्ती धर्माला शक्य होत नाहीं. ह्याचें एकच उदाहरण असें कीं ख्रिस्ती धर्मावर मनःपूर्वक प्रेम करणारे मुंबईतील प्रार्थनासमाजाचे अध्वर्यु श्री दादोबा पांडुरंग, ह्यांचें मनःसमाधान बायबलच्या पन्नास वर्षांच्या सतत अभ्यासानंतरहि होऊं शकलें नाहीं, असें न्यायमूर्ती रानडे ह्यांनीं सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत म्हटलें आहे.*

कोणी म्हणेल ख्रिस्ती धर्माची नैतिक व आध्यात्मिक कामगिरी मोठी नसली तरी त्याची भौतिक शास्त्रीय शोधाची कामगिरी जगाला अत्यंत उपकारक झालेली आहे. 'परंतु यथार्थत्वानें बोलावयाचें तर ख्रिस्ती धर्माचा व भौतिक उन्नतीचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं.' स्वामी रामतीर्थ म्हणतात "ख्रिस्ती धर्माचा युरोपांत उदय हेंच रोमच्या ऱ्हासाचें मुख्य कारण होय. प्राचीन काळचें ख्रिस्ती धर्माचें वारें न लागलेलें तें वैभवशाली ग्रीस राष्ट्र कोठें आणि ख्रिस्ती धर्म उराशीं बाळगणारें दैन्यवाणें आजचें ग्रीस कोठें ! ख्रिस्ती धर्माचा उदय झाल्यावर एक हजार वर्षेपर्यंत ज्याला तामस युग म्हणतात त्या तामस युगाच्या अंधःकारांत सारें युरोप खंड चांचपडत होतें, जगांत कधींहि न दिसणारें विलक्षण अज्ञान, धर्मभोळेपणा आणि औदासीन्य हजार वर्षे युरोप खंडांत थैमान घालीत होतें. हजार वर्षे ख्रिस्ती धर्माचा युरोपांत प्रवेश झाल्यावर त्याला जीं फळें आलीं तीं हीं अशीं होतीं... चेटक्यांना जिवंत जाळणें, शास्त्रज्ञांचा नाना तऱ्हेनें छळ करणें, इन्क्विझिशन सारख्या जुल्मी संस्था काढणें या गोष्टी ख्रिस्ती धर्मानेंच केल्या. ज्या ठिकाणीं शास्त्रानें मान वर करण्याचा प्रयत्न केला त्याच ठिकाणीं ख्रिस्ती धर्मानें त्याचा गळा दाबून प्राण घेतला." म्हणजेच पाश्चात्यांनीं ख्रिस्तीधर्माविरुद्ध झगडत झगडतच आपली भौतिक उन्नति करून घेतली. अर्थातच भौतिक संपत्तेचें श्रेय ख्रिस्ती धर्माच्या शिकवणुकीकडे नाहीं.

---

* "It is a great relief to us to find that as the result of 50 year's study Dadoba, though he reveres the Holy Bible and has made Christianity the favourite study of his life, has failed to accept the current doctrines of the Christian religion. There is not a single point among the Cardinal doctrines of the Christian Churches to which Dadoba has been able to subscribe his unqualified adhesion, any more he has expressed his dissent from the philosophy and rationale of these doctrines with unmistakable freedom."

पण या वरहि कोणी म्हणेल कीं ख्रिस्तिधर्मवाल्याच माणसांनीं जगाला भौतिक ऐश्वर्य संपन्न केलें कीं नाहीं? जड सृष्टीवर सत्ता चालविण्याचा मार्ग दाखवून त्यांनीं जगाला अधिक सुखी केलेंच कीं नाहीं? होय, केवळ जड दृष्टीनें किंवा वरवर विचार करणाऱ्याला पाश्चात्यांचा हा भौतिक विजय आनंद दायक वाटेल. पण भौतिक शोधांनीं संपादिलेल्या नफ्याचा विचार करतांनाच, त्यांनीं मानवी जीविताची उडविलेली दैना दृष्टी आड करून चालावयाचें नाहीं. काउंट टॉलस्टॉय म्हणतात, "आज मनुष्य जाती स्वभावानें दुष्ट बनून गेली आहे. या स्थितीचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे आजच्या जीवन क्रमाची विलक्षण गुंतागुंती हेंच होय. पूर्वीच्या साधेपणाचा अंशहि त्यांत उरलेला नाहीं. त्यांतून या गुंतागुंतीचें स्वरूप अशा प्रकारचें आहे कीं मनुष्याच्या दुष्टपणाचे परिणाम त्याच्या नजरेसमोर ढळढळीतपणें दिसून येत नाहींत. जुन्या काळचे चंगीजखान आणि त्यांचे दुसरे भाउबंद कितीहि दुष्ट असले आणि त्यांचीं कृत्यें केवढींहि घोर असलीं तरी त्यांचे परिणाम जगाच्या चवाठ्यावर मांडले जात होते. त्यांचीं कृत्यें दुष्टपणाचीं आहेत अशी जाणीव प्रत्येकाला होत होती. यामुळें हा दुष्टपणा हळू हळू कमी होत जाईल अशी सबळ आशा वाटत होती. पण आमच्या आजच्या दुष्टपणाचा प्रकार तसा नाहीं. आजच्या कृत्यांचीं फळें आज इतक्या शिताफीनें दडविलीं जातात कीं अमुक दुष्कृत्याचा हा परिणाम असा कार्यकारण भाव कोणाच्याहि लक्षांत येत नाहीं. यामुळें हा दुष्टपणा नाहींसा झाला पाहिजे अशी वृत्ती कोठें उत्पन्न होत नाहीं. व तो आज कमी होण्याच्या ऐवजीं वाढत वाढत एवढें भीषण स्वरूप पावला आहे कीं, असा प्रकार जगानें पूर्वीं कधींहि पाहिला नव्हता. एकोणिसाव्या शतकांत अर्वाचीन जड शास्त्रांनीं मोठी सुधारणा केली हें खरें, पण दुसऱ्यापक्षीं माणुसकी, नीति, दयाबुद्धि इत्यादि सौम्य गुणांचा अभाव सध्यां इतका झाला आहे कीं, अशी स्थिती चंगीजखान ॲटिला किंवा नेरो यांच्या काळींहि नव्हती."

प्रस्तुत मुद्या संबंधीं पुण्याच्या 'केसरींत' नुकताच प्रसिद्ध झालेला एक 'प्रासंगिक बोल' मननीय आहे. केसरीकार म्हणतात,—

सार्वत्रिक शिक्षणप्रसार, उद्योगधंद्यांची भरभराट, बेकारीचा अभाव, संपत्तीचा वाढता पूर, स्वातंत्र्य आणि लोकनियंत्रित राज्यकारभार हीं आधुनिक सुधारणेचीं प्रमुख अंगें मानलीं जातात. पण इतक्या सुधारणांनीं युक्त अशा राष्ट्रांत गुन्हेगारीचें प्रमाण कमी न होतां उलट तें एकसारखें वाढतच चाललेलें पाहून, समाजाची नैतिक उन्नति या बाह्य सुधारणांच्या साधनावर अवलंबून नसतें असें म्हणणें प्राप्त आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत प्रारंभीं नमूद केलेलीं सुधारणेचीं सर्व अंगें प्रामुख्यानें दृष्टीस पडतात. परंतु तेथील तुरुंगांतील कैद्यांची संख्या सारखी वाढतच आहे! १९०४ सालीं एक लाख लोकवस्तींत ३२०६ कैदी असें प्रमाण होतें. १९२६ सालीं हेंच प्रमाण ४१०८ झालें. न्यूयॉर्क शहराचेच आंकडे घेतल्यास गुन्हेगारीची भयंकर वाढ आढळून येते! १९१७ सालीं तेथील कैद्यांचें लोकसंख्येशीं प्रमाण लक्षांत ५३ होतें तें १९२८ सालीं दर लक्षांत ८० इतकें वाढलें. अशा रीतीनें गुन्हेगारांची संख्या झपाट्यानें वाढत असल्यानें सरकारनें केवळ तुरुंगाचा कायदा अधिक कडक केला म्हणून कांहीं बंदिवानांची संख्या मागें हटणार नाहीं. एवढेंच नव्हे तर कित्येक ठिकाणीं कैद्यांची मुक्तता करण्याकरितां बंडासारखे धाडसाचे प्रयत्न मात्र करण्यांत येत आहेत. आबर्न येथील सरकारी तुरुंगांत नुकतेंच तीन आठवड्यापूर्वीं एक बंड झालें. तें बंड

मोडतांना १८ इसम मारले गेले आणि सुमारें ७० लक्षांची मालाची वगैरे नुकसानी झाली ! गेल्या सहा महिन्यांत अमेरिकन तुरुंगांत बंड झाल्याचा हा दुसरा प्रयत्न होय. यावरून देश स्वतंत्र झाला, कितीहि संपन्नतेला पोंचला तरी नागरिक नीतिमान निपजतीलच असें नाहीं; आणि ह्मणूनच व्यावहारिक शिक्षणाला धार्मिक, नैतिक शिक्षणाचा पाठिंबा असल्याविना देशांत शांतता व सुख नांदूं शकत नाहीं हें उघड आहे " असो.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पाश्चात्यांच्या ह्या भौतिक शोधांनीं मनुष्याच्या पशुवृत्तीवरचा दाब सुटून त्या स्वच्छंदपणें नंगा नाच घालूं लागल्या. अर्थात या शोधापेक्षांहि बहुमोल असणारें मानवी जीवन कवडीमोल होऊन बसलें. भौतिकसुधारणेनें मानवी जीवितांत शांति घडवून आणून अनेक शोधांच्या स्वल्पांत मानवाला बाह्यतः सुखी केलें ही गोष्ट खोटी नाहीं. परंतु जीविताचा अंतिम हेतु, सफलता किंवा सार्थक्य ज्या मनुष्यत्वाच्या जोरावर साध्य करुन घ्यावयाचें, तेंच मनुष्यत्व तीच माणुसकी जर नष्टतेस जातें चालल्याचें उघडकीस येत आहे तर या आपाततरमणीय सौख्याची संप्राप्ति होऊन तरी काय उपयोग ! बायबलनेंहि ह्मटलेंच आहे कीं आत्मनाशानें सबंध जग हस्तगत झालें तरी त्यांत काय लाभ ! *

वरीलप्रमाणें ख्रिस्ती धर्मांतर्गत तात्विक विचार पाहूं गेल्यास ते अर्धकचे, अपुरे व असमाधानकारक आहेत; नैतिक विचार सोपपत्तिक व तर्कशुद्ध पद्धतीनें पटवून दिलेले नसल्यामुळें त्यांच्या आचरणांत आनंद वाटत नाहीं; व प्रत्यक्ष व्यवहार किंवा लोकांचा जीवनक्रम लक्षांत घेतल्यास ते ख्रिस्ताच्या आज्ञा न जुमानतां दिवसानुदिवस पशुवृत्तीकडेच अधिकाधिक खेंचले जात आहेत; त्यामुळें पाश्चात्यसमाजांत असमाधान अशांति, व तज्जन्य मानवी प्रकृतीची विकृत स्वरुपें सर्वत्र दृष्टिगोचर होत आहेत. पण ही हानी एवढ्या वरच न थांबतां पाश्चात्य संस्कृति सर्व जगभर पसरावी म्हणून तिच्या उपासकांनीं चालविलेल्या अट्टाहास-पूर्वक प्रयत्नांमुळें जे जे समाज त्यांच्या निकट सहवासांत येत आहेत तेहि त्यांच्याप्रमाणेंच शांति सौख्याला आंचवत आहेत. सर जॉनसन कँबेल ह्यांनींहि प्रस्तुत विषयांत अशीच साक्ष दिली आहे. ×

एका पाश्चात्य पंडितानें दिलेल्या त्या निःपक्षपातित्वाच्या साक्षींत पाश्चात्यसंस्कृतीचें अंतरंग कोणालाहि स्पष्ट दिसून येईल, व त्यावरुनच ती संस्कृति जगताला उपकारक आहे कीं, अनुपकारक आहे हाहि निर्णय बांधतां येईल.

मुसलमानी धर्म व ख्रिस्ती धर्म यांच्या स्वरुपाचें अल्पसें दिग्दर्शन येथवर झाल्यानंतर आतां हिंदु धर्माचा विचार करावयाचा राहिला. इतर धर्मांप्रमाणें हिंदु धर्माची उभारणी, ही एखाद्या पूज्य विभूतीच्या चारित्र्यावर किंवा प्रमाण वचनांच्या आधारावर झालेली नाहीं. स्वामी विवेकानंदांनीं ह्मटल्याप्रमाणें हिंदु धर्म एखाद्या प्रमाण ग्रंथानें किंवा एखाद्या विशिष्ट व्यक्तीच्या अस्तित्वानें वा अनस्तित्वानें मर्यादित झालेला नाहीं. त्याचा कोणीहि एक संस्थापक नाहीं. तो सनातन आहे. तो व्यक्तिप्रधान नसून तत्त्वप्रधान आहे. महंमद व त्याचें कुराण व येशू आणि त्याचें बायबल ह्यांच्यावर विश्वास ठेवणारालाच मोक्षपद मिळतें अशासारखा दुराग्रह हिंदुधर्मांत नाहीं. इतर धर्मीयांप्रमाणें एकाच व्यक्तीच्या म्हणण्यास मान न

* "What shall it profit a man if he gain the whole world but lose his own soul"?

× The longer we possess a province the more common and grave does perjury become (Oriental Religions—India p. 288).

देतां अनुभवजन्य ज्ञानावर हिंदुधर्माची भिस्त आहे; हिंदुप्रमाणेंच हिंदेतरालाहि, त्यानें यथा-सांगपणें अभ्यासपूर्वक परिश्रम केल्यास मोक्षप्राप्ति होईल, असा महनीय व स्पृहणीय सिद्धांत हिंदुधर्माचा आहे. हिंदुधर्मानें मोक्षदरवाजा सर्वांस मोकळा ठेविला आहे. यथोचित प्रयत्न केल्यावर मग तो चिनी, तार्तर, ख्रिस्ती, पारसी कोणीहि असो त्याला आत्मप्रत्यय आल्याविना राहणार नाहीं. त्याला आत्मसाक्षात्कार 'रोकडा' व 'याचि जन्मीं येणेंचि काळें' होईल अशी रोखठोक शिकवण हिंदुधर्माची आहे. हिंदुधर्मानें महंमद किंवा येशूप्रमाणें आपलीं तत्वें न मानणाऱ्यांना त्यांच्या कानांवर मोहर ठोकून, आणि डोळ्यांवर पडदे टाकून प्रथम नास्तिक करण्याची व नंतर वध्य ठरविण्याची अमानुष क्रिया केलेली नाहीं. *

तद्वतच "जगाचा अंत होईल तेव्हां सर्व माणसांचा न्याय होईल. त्यावेळीं चांगलीं माणसें वेगळीं काढलीं जातील, व वाईट माणसें वेगळीं काढलीं जातील. पापी माणसांना प्रज्वलित अग्नींत टाकण्यांत येईल. तेथें तीं रडत व दांत खात राहतील" ( मत्तय १३-४९.५०. ) असें ख्रिस्ताप्रमाणें, किंवा "अल्लाह पापी माणसांना मार्ग दाखवीत नाहीं" असें महंमदाप्रमाणें न म्हणतां, "अरे तूं पाप्यापेक्षां जरी महापापी असलास तरी तुझा उद्धार मी करीन" असें आश्वासन, व अभयदान हिंदु धर्म देत आहे—

अपिचेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥
अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥
मांहि पार्थ व्यपाश्रित्य । येऽपि स्युः पापयोनयः ॥
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥

धर्मानुयायांत जों जों आपलाच संप्रदाय खरा मोक्षदाता असा अभिनिवेश चढतो तों तों धर्माच्या नांवाखालीं तंटे मारामाऱ्या लढाया सुरू होऊन जग दुःखांत बुडून जातें. अर्नेस्ट हेकेल ह्यांनीं म्हटल्या-प्रमाणें "एखादा धर्म किंवा पंथ दुरभिमानानें आपल्याचकडे मुक्तीचा मक्ता घेऊं लागला आणि असली समजूत अधिकाधिक पोटाशीं धरून बसला, म्हणजे त्याचे अनुयायी चिडखोर होऊन इतर धर्मांचा व पंथांचा द्वेष करूं लागतात. आणि त्यामुळें इतिहासांत काळेकुट्ट पान लिहविण्यास कारणीभूत होणाऱ्या धर्मांच्या म्हणून अनेक भयंकर लढाया होतात." + परंतु हिंदुधर्मानें असला प्रसंग कधींहि आणला नाहीं.

* "He had blinded their eyes and hardened their heart that they should not see with their eyes nor understand with their heart and be converted—" (Gospel Historyp. 556).

+ The more confidently a particular sect considers itself "the only ark of salvation" and the more ardently this conviction is cherished, the more zealously does it contend against all other sects and give rise to the fearful religious wars that form the saddest pages in the book of history.—Riddle of the Universe p. 107.

गॅलीलिओ, कोपरनिकस, ब्रूनो आदिक तत्त्वज्ञान्यांचा पाश्चात्यांनी केलेल्या भयंकर छळाप्रमाणे कपिल, गौतम, कणाद, महावीर, बुद्ध आदिक निरीश्वरवादी तत्त्वज्ञांचा हिंदुधर्मीयांनी कधींच छळ केला नाहीं. हिंदुधर्माचें निशाण रक्तस्त्रावानें विटाळलेलें नाहीं. समशेरीच्या बळावर, हट्टात्कारानें, छलबलानें, दम्या-फटक्यांनीं किंवा गारद्यांना नाडून हिंदुलोकांनी आपल्या धर्मास परमान्यता कदापि मिळविली नाहीं. उलट प्राचीन काळच्या दस्यु, मत्स्यादिक अनार्य जातींना आत्मसात करून घेऊन व अर्वाचीनकालच्या पारसी, ज्यू, ख्रिस्ती, आदिक जातींना प्रेमभरानें उदार आश्रय देऊन हिंदुधर्मानें आपला अलौकिक थोरपणा जगताच्या प्रत्ययास आणिला आहे.

कोणी कोणत्याहि देवतेची उपासना करो, त्याची त्याची ती ती श्रद्धा त्या त्या ठायींच मी स्थिर करितों--

यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥

किंवा,

सर्वदेवनमस्कारः केशवंप्रति गच्छति ।

अशी दुराग्रहशून्यता फक्त एकट्या हिंदुधर्मानेंच दाखविली आहे.

वरीलसारख्या श्रेष्ठ विचार सरणींतच हिंदूंच्या आदर्श नीतिमत्तेचें बीज आहे. नास्तिक सिद्धांत कितीहि उच्च असले तरी ते जर कृतींत उतरत नसले तर त्यांचा काय उपयोग? उक्ती प्रमाणेंच कृती असावी हा हिंदुधर्माचा कटाक्ष—आग्रह आहे. देवमंदिरादि विवक्षित स्थळीं वा विवक्षित अवस्थेंत कांहीं विशिष्ट धर्माचार पाळावे. इतर ठिकाणीं धर्माचा व आयुष्याचा कांहीं संबंध नाहीं अशी अन्य धर्मांप्रमाणें विचित्र शिकवण हिन्दुधर्माची नाहीं. राजशासनाच्या निर्बंधांतूनहि मनुष्य पळवाट काढून स्वतःला दोषमुक्त ठरवून घेऊं शकेल. पण नैतिक निर्बंधांतून मात्र त्याला तसें केव्हांहि करतां येणार नाहीं. मनुष्याचा प्रत्येक विचार जोंपर्यंत शुद्ध व पवित्र झाला नाहीं, व त्याची प्रत्येक कृतीहि तदनुसार यथायुक्त होत नाहीं तोंपर्यंत त्याला अमृतत्वाची प्राप्ति होणार नाहीं. मनुष्य मनानें, वाचेनें व कृतीनें म्हणजेच अंतर्बाह्य श्रेष्ठवृत्तींचा असावयास पाहिजे. उच्च वृत्तींतील क्षणिक अवस्था ही मनुष्यास तारूं शकणार नाहीं, ह्या दृष्टीनेंच आचारविचारांचें अखंड पावित्र्य सांभाळण्याविषयीं हिंदुधर्माची आज्ञा आहे. म्हणजेच जीवन पावित्र्य-पूर्ण, अर्थात अंतर्बाह्य धर्ममय होण्यासाठीं नैतिक आचारांचीं कडक बंधनें धर्मप्रणेत्यांनीं घातलीं आहेत. ह्या आचारधर्मांचीं लक्षणें अनेकविध स्वरूपांत प्रतिपादन केलेलीं आहेत. याज्ञवल्क्य महामुनींनीं, अहिंसा, सत्य, अस्तेय, शौच, इंद्रियनिग्रह, दान, दम, दया, क्षमा, शांति, अशीं धर्मलक्षणें सांगितलीं आहेत.

'अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।
दानं दमो दया शांतिः सर्वेषां धर्मसाधनं'॥

किंवा व्यास महर्षींच्या मताप्रमाणें

'सत्यं दानस्तपः शौचं संतोषो ऱ्हीः क्षमार्जवं
ज्ञानं शमो दयाध्यानमेष धर्मः सनातनः '॥

अथवा श्रीमद्भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें

'अभयं सत्त्व संशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥
अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ऱ्हीरचापलम् ॥
तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ॥'

हीं दैवी संपत्तीचीं लक्षणें आहेत. ह्या अभिजात दैवी संपदेनें युक्त असणारी व्यक्तीच स्वतः तरून लोकांसहि तारण्यास समर्थ होते, असा हिंदुधर्माचा सिद्धांत आहे.

दैवी संपत्तीचे वर दिलेले हे सव्वीस गुण ह्मणजे "नीतीचा एक अत्युत्तम अग्रहारच आहे. व त्यावरून निदान नीतीच्या आवश्यक गुणांपैकीं पौर्वात्य लोकांना पाश्चिमात्य लोकांनीं शिकविण्यासारखें कांहीं उरलें नाहीं, असें दिसून येईल. सर्व धर्मांचीं पवित्र पुस्तकें आह्मीं धुंडाळलीं परंतु मानवाच्या अंगीं थोरवी आणणाऱ्या गुणांचें वर्णन इतकें सुंदर दुसरें कोठेंहि आढळलें नाही." असें एका पाश्चात्य तत्त्ववेत्त्यानें अंतःकरणपूर्वक उद्गार काढलेले आहेत. * असो.

वैयक्तिक विकासाची दिशा दाखवितांनांच कौटुंबिक व सामाजिक जीवनहि सुसंगत, सुसंबद्ध, संपूर्ण व आदर्शभूत होण्यासाठी हिंदु धर्मशास्त्रांत वर्णाश्रम पद्धतीचा अवलंब केला आहे. वर्णाश्रम धर्मामुळें प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या अधिकारानुरुप कर्तव्याचरण करण्यास मिळून, व्यक्तींच्या गुणांचा व सामर्थ्याचा यथायोग्य पद्धतीनें विकास होत होत समाजांतही स्पर्धा-कलहशून्य अशी विकासोन्मुखता व शांतता नांदू शकते. हर्बर्ट स्पेन्सर प्रभृति पाश्चात्य उत्क्रांति वाद्यांचा असा सिद्धांत आहे कीं, 'सजीव वा सचेतन पदार्थांची जसजशी उत्क्रांति होत जाते तसतसे त्याचे निरनिराळे शारीरिक व्यापार व कर्में करण्यास निरनिराळे अवयव व इंद्रियें उत्पन्न होत जातात.' हेंच महत् सत्य प्राचीन कालीं थोर पूर्वजांच्या निदर्शनास येऊन त्यांनीं आनुवंशत्व, श्रमविभाग, भावबंधन, स्वत्वसंरक्षण, इत्यादि दृष्टीनें सामाजिक स्थिरस्थापकतेसाठीं वर्णाश्रम धर्मपद्धति प्रचलित केली. सांप्रतकालीं मध्यवर्ती राजशासनाच्या अभावीं ही पद्धती जरी ढळमळली असली तरी तिची उपयुक्तता विचारी जगाला पटल्याविना राहिलेली नाहीं. इतर सर्व समाजांच्या अपेक्षेनें हिंदु समाजांत सद्यःकालींहि जें शांतिसौख्य व समाधान नांदत आहे त्याला ही वर्णाश्रम व्यवस्थाच कारणीभूत झालेली आहे. प्रस्तुत पद्धतीच्या वैशेषिक व अनन्य साधारण स्वरूपाविषयीं पाश्चात्य पंडित सिडने लो

* This eloquent epitome of virtue is alone sufficient to show how little the East has to learn from the West in regard to the essential ideas of religion. We know no other passage in the sacred books of any religion which more beautifully expresses the union of man's finer qualities—Ethics of great Religion p. 30..

ह्मणतात, "वर्णव्यवस्थेमुळेंच हिंदुसमाजाचा पाया खंबीर व मजबूत राहून त्यांत समाधान नांदलें; आणि ह्यां गुणांमुळेंच राज्यक्रांत्या व पंचमहाभूतांचे उत्पात यांशीं अनेक शतकें एकसारखी टक्कर देत राहण्याचें हिंदु समाजांत सामर्थ्य आलें यांत तिळमात्र संदेह नाहीं. समाजांतील प्रत्येक माणसास त्याचें योग्य स्थान, योग्य धंदा, योग्य कर्तव्य व योग्य मित्र दाखवून देण्याचें कार्य हीच जाती–व्यवस्था करते. प्रत्येक व्यक्ति एकटी, स्वतंत्र व असहाय्य अशी न राहातां तिला प्रारंभापासूनच एका वर्गाचा व जातीचा अवयवाहि बनवून टाकते. आणि सामाजिक मत्सर व मनोरथभंगाची निराशा या दुर्धर रोगांची त्याला आमरणांत बाधा होऊं देत नाहीं. त्याचे स्थितीस व धंद्यास योग्य असे समशीलाचे स्नेही सोबती व बांधव त्यास मिळवून देऊन त्याचे मनांतहि त्यांचें विषयीं स्नेहाची व बंधुत्वाची भावनाहि दृढ करते. युरोपियन समाजांत क्लब, व्यवसायसंघ (Trade union), परस्पर साह्यकारी संस्था (Mutual Benefit Society) व धर्मखातें या संस्था जीं कार्यें करितात, तीं सर्व एकटी जातिव्यवस्था हिंदुसमाजांत करिते. हिंदुस्थानांत युरोपाप्रमाणें अनाथगृहें (Work houses) नाहींत व अद्यापि त्यांची आवश्यकताहि उत्पन्न झालेली नाहीं. याचें खरें कारण हेंच कीं आपलें आप्तेष्ट, स्नेही व ज्ञातिबांधव यांस संकटकाळीं सर्व प्रकारें साह्य करणें हें आपलें कर्तव्य आहे अशी हिंदु समाजांत सार्वत्रिक भावना आहे. आणि कुटुंबाचे सांसारिक पाश तसेंच सहवास व समव्यवसाय यांनीं उत्पन्न केलेलीं बंधनें जातीव्यवस्थेनें विशेष दृढ केल्यामुळेंच वर सांगितलेली कर्तव्यभावना उत्पन्न झाली आहे यांत शंका नाहीं. सारांश हिंदुस्थान व वर्णव्यवस्था यांचा इतका एक जीव झालेला आहे कीं जातिशून्य अशा हिंदुस्थानाची नुसती मनांत कल्पना करणेंहि दुर्घट आहे."

ह्याप्रमाणें आयंतवंत म्हणून दुःख योनी असणाऱ्या भोगाचें आपात–रमणीय स्वरूप प्रकट करून, मानवास इहपर दृष्टीनें श्रेयस्कर असा जीवनक्रमाचा मार्ग आंखून देणाऱ्या हिंदुसंस्कृतीच्या त्यागप्रधान शिकवणुकीनें, हिन्दुधर्मीय व्यक्ती ही अन्य भोगप्रधान संस्कृतीच्या कोणाहि व्यक्तीपेक्षां सद्गुणाधिक्यानें श्रेष्ठ ठरावी ह्यांत नवल तें काय? मानवीबुद्धीच्या सर्वांगीण विकासाचीं उत्कृष्ट दृश्यें हिन्दुसमाजासारखी अन्य समाजांत आढळावयाचीं नाहींत. हिंदुलोक सत्यप्रिय, न्यायी, विश्वासु, सरळ, प्रामाणिक, उदार, इंद्रिय निग्रही, दयाळु, प्रेमळ, निरुपद्रवी, शांत, इमानी, समाधानी, परोपकारी, कृतज्ञ कसे आहेत ह्याची साक्ष निःपक्षपाती इतिहासकार देतच आहेत. कोणत्याहि समाजाच्या शीलाची परीक्षा त्यांतील व्यक्तींच्या गुणसंपदेवरूनच केली जाते. ह्या दृष्टीनें विचार करतां हिंदुसंस्कृतिव्यतिरिक्त अन्य कोणत्या संस्कृतीला आपल्या भक्तांच्या गुणांचें वरील मासले वर्णन छातीठोकपणानें करतां येईल? सर टॉमस मनरोची साक्ष प्रस्तुत विषयांत मनन करण्यासारखी आहे. ते म्हणतात "श्रेष्ठ प्रतीचें कृषीबल अतुलनीय व असामान्य कलाकुसरीपणा, सोय किंवा चैन यांस आवश्य असलेल्या सर्व गोष्टी निर्माण करण्याचें शक्तिसामर्थ्य; गांवोंगांवीं लिहिणें वाचणें व गणित शिकविण्याच्या शाळा, परस्परांशीं आदरसत्कारांचें सभ्यतेचें व उदारपणाचें वर्तन आणि विशेषतः स्त्रीवर्गाशीं विश्वासाची व मार्दवयुक्त वागणूक–ह्या गोष्टी जर सुधारलेल्या लोकांचीं लक्षणें असतील तर हिन्दुलोक युरोपियन राष्ट्रांपेक्षां कदापि हिणकस नाहींत. आणि सुधारणा किंवा संस्कृति ह्या

वस्तूची जर दोन राष्ट्रांमध्यें देवघेव करावयाची असेल तर हिंदुस्थानचा हा माल आयात करण्यांत इंग्लंडचाच पुष्कळ नफा होईल अशी मला खात्री आहे. "*

परंतु ह्या सर्व गोष्टींपेक्षांहि हिंदुधर्माचा तेजस्वीपणा त्याच्या लोकविलक्षण व सर्व श्रेष्ठ अशा तत्त्वज्ञानांत आहे. शरीर, इंद्रियें, मन, बुद्धि, पंचमहाभूतें, सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, लय, जन्ममरण, आत्म्याचें अमरत्व, पुनर्जन्म, सुखदुःखोद्भव, कर्मविपाक इत्यादि अनेक गूढ प्रश्न, जे अन्यधर्मीयांना कधींच उकलतां आले नाहींत, ते हिंदुधर्मीयांनीं सहस्त्र वर्षांपूर्वीं आपल्या अगाध बुद्धिमत्तेनें सोडविले. एवढेंच नव्हे तर जीव, जगत् व परमेश्वर यांचे अन्योन्य संबंध सुनिश्चित करून त्या दृष्टीनें अभ्युदय-निःश्रेयस-मूलक आचारकुशलतेचा मार्ग सर्वांना दाखवून दिला. जगांतील आत्यंतिक दुःखाची निवृत्ति होऊन शाश्वत सुखशांति साध्य करून घेण्यासाठीं परमात्मप्राप्तीविना अन्य उपाय नाहीं,–नान्यःपंथा विद्यते अयनाय। ज्याच्या प्राप्तीपरता अन्य कोणताहि लाभ असूं शकत नाहीं; यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः–ज्याच्या सान्निध्यांत महद्दुःखवर्षावानेंहि चित्त कंपायमान होऊं शकत नाहीं,–यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते–ज्या पदाला गेलें असतां प्राणी जन्ममरणरूपी सुखदुःखाच्या फेऱ्यांत पुनरपि अडकला जात नाहीं–यं प्राप्य न निवर्तन्ते–त्या परमपदाची प्राप्ति हेंच हिंदुधर्माचें अंतिम साध्य आहे. तो सकल गुणनिधान परमेश्वर सर्व चराचराला व्यापून दशांगुळें उरला आहे. ब्रह्मा, विष्णु, महेश आदिक अनेक भिन्नभिन्न स्वरूपांत तो पुरुषोत्तम त्याच्या भक्तजनांकडून ओळखला जातो.-एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति बाह्यतः अनेक देवांचें बंड जरी हिंदुधर्मांत कोणाला भासमान होत असलें, तरी त्या देवांच्या असंख्य प्रतिमा त्यांच्या त्यांच्या अधिकार व स्वभाववैचित्र्यानुरूप केवळ एकाच निराकार, निर्विकार परमात्म्याच्या म्हणून कल्पिल्या जाऊन उपासिल्या जातात. उपासनेकरितां घेतलेली मूर्ति प्रतिमा किंवा प्रतीक म्हणजेच कांहीं अनंतकोटी ब्रह्मांडनायक नाहीं ह्याची जाणीव प्रत्येक भक्ताला असतेच. सूर्य प्रकाश सर्व भूतलावर विस्तारलेला असला तरी ज्याप्रमाणें त्याचे किरण सूर्यकांत मण्यांतून खालीं पाडले असतां केंद्रीभूत होऊन विवक्षित पदार्थ पेटवूं शकतात, त्या प्रमाणें विश्वव्यापि परमेश्वराचे किरण कोणत्याहि प्रतिमां-तून घेतले असतां अंतरस्थ चैतन्य ज्योत प्रज्वलित करूं शकतात. आतां प्रतीक भेदानें प्राप्त होणारें मानसिक सामर्थ्य हें जरी भिन्नभिन्न वा कमी अधिक स्वरूपानें असलें तरी तें एकाच परमात्म्यापासून मिळत असतें. हिंदु धर्मांत जी प्रतीकोपासना आहे ती अशा प्रकारची आहे–तथापि

* If a good system of agriculture, unrivalled manufacturing skill, a capacity to produce whatever can contribute to either convenience or luxury, schools established in every village for teaching reading, writing and arithmetic, the general practice of hospitality and charity amongst each other and above all a treatment of the female sex full of confidence, respect and delicacy are among the signs which denote a civilized people, then the Hindus are not inferior to the nations of Europe and if civilization is to become an article of trade between England and India, I am convinced that England will gain by the import cargo." (Mills History vol. I. p. 371).

त्याचाहि आग्रह न धरतां ज्याला ज्या मार्गानें जाणें शक्य असेल त्यानें त्या मार्गानें मग तो भक्तियोग, ज्ञानयोग, कर्मयोग, हठयोग कीं अन्य कोणताहि योग असो, परमेश्वर प्राप्ति करुन घ्यावी, व त्या आत्म्याची ओळख अन्य सर्व गोष्टी बाजूला सारुन प्रथम करुन घ्यावी–तमेवैकं जानथ । अन्या वाचो विमुंचथ । त्याला जाणण्यानेंच अमृतत्वाची प्राप्ति होईल–अमृतस्यैष सेतुः । अशी हिंदु धर्माची स्पष्ट आज्ञा आहे. जगांतील भोग हे क्षणभंगुर असल्यामुळें सदैव दुःखमूलक व शांतिभंजक आहेत, अर्थात अशांत वृत्तीला सौख्य समाधान कसें मिळावें–अशांतस्य कुतः सुखं ? म्हणूनच हें अमृतत्व विषयोपभोगानें कधींहि साध्य होणारें नव्हे. तें कर्मापासून, प्रजेपासून, धनापासून, अध्ययनापासूनहि लाभत नाहीं. तर तें एकट्या एक त्यागाच्या बळावरच हस्तगत होणारें आहे–न कर्मणा न प्रजया न धनेन न श्रुतेन। त्यागेनैकेन अमृतत्वमानशुः । ह्याप्रमाणें त्या परमात्म्याचें भोगत्यागपूर्वक अखंड श्रवण मनन निदिध्यासन घडलें असतां जीवशिवाचें ऐक्य म्हणजेच ‘ तत्वमसि ’ हा महासिद्धांत अनुभवास येतो. साहजिकच प्रत्येक वस्तुजात परमेश्वर स्वरूपांत प्रतीत होऊं लागतें. अशा ह्या विश्वतोमुख परमात्म्याच्या दर्शनानें सकळ वृत्ति शांत व स्थिर होतात. निखिल प्राणिमात्रांविषयीं अमर्याद प्रेम व अकृत्रिम सुहृद्भाव निर्माण होतो व कर्मानें, मनानें आणि वाचेनें सर्वभूतहित साधण्याविषयीं निःसीम तत्परता अंगीं बाणते. अशा अवस्थेंत ‘ माझें सर्व जावो तुझें नाम राहो ’ किंवा ‘ सकळ जन तरावे वंगही उद्धरावे ’ ह्या अत्युच्च कल्पनेनें प्रेरित होऊन त्या पुरुषोत्तमाच्या भक्तजनांकडून वैयक्तिक सुखाच्या संपूर्ण निरासानें जगदुद्धार घडून आल्याविना राहात नाहीं, असें हिंदु धर्माचें म्हणणें आहे.

वरील प्रकारचें श्रेष्ठ तत्त्वज्ञान विचारवंत सज्जनांना शिरोधारणीय वाटावें यांत आश्चर्य तें काय ! म्हणूनच सर्व संस्कृतींचा परिश्रमपूर्वक अभ्यास केल्यानंतर थोरो इमर्सन, वॉल्ट् व्हिटमन्, सर एड्विन आरनोल्ड, सर वुइल्यम जोन्स, प्रो. मॅक्स मुल्लर, कार्लाइल, शोपेनहार, विक्टर कुसिन, श्लेगेल आदिक पाश्चात्य महापंडितांना हिंदुसंस्कृतीच्या तत्त्वज्ञानाचा उत्तानपणा पटून * त्यांत त्यांना अनिर्वचनीय समाधान वाटलें, व तें तसें त्यांनीं प्रांजलपणें जगताला निवेदनहि केलें आहे. प्रो. मॅक्स मुल्लर म्हणतात "शोपेनहार सारख्या स्वतंत्र श्रेष्ठ तत्ववेत्त्याच्या शब्दांना दुसऱ्या कोणी पुष्टी देण्याची आवश्यकता असेल तर ती देण्यास मी सिद्ध आहे. जगांतील सर्व धर्मांचें व तत्त्वज्ञानांचें आजन्म परिशीलन केल्यानंतर माझेंहि मत शोपेनहार यांच्याप्रमाणेंच झालें आहे. मृत्यु सुखानें यावा हेंच जर तत्त्वज्ञानाचें अंतिम साध्य असेल तर वेदान्ततत्त्वज्ञाना इतकें दुसरें कोणतेंहि तत्त्वज्ञान या कामीं उपयोगी पडणार नाहीं हें मी प्रांजलपणें मान्य करतों. वेदान्ताबद्दल शोपेनहारप्रमाणें मलाहि सप्रेम आदर वाटतो हें येथें स्पष्टपणें सांगण्यास मला यत्किंचितहि भय किंवा लज्जा वाटत नाहीं. कारण माझा आयुष्क्रम सुखाचा होण्यास वेदान्तच अनेक प्रकारें कारणीभूत झाला असून त्याबद्दल वेदान्ताचा मी ऋणी आहे. "

अशाप्रकारें जें तत्त्वज्ञान लहानापासून थोरांपर्यंत, कनिष्ठांपासून वरिष्ठांपर्यंत, अडाण्यापासून जाड्या विद्वानापर्यंत सर्वांच्याच मनोबुद्धीला यथोचित समाधान देऊं शकतें तेंच अखिल विश्वसंमानित

* In comparison with the Hindoo thought the highest stretches of European philosophy appear like dwarfish pigmies in the presence of grand majestic titans. ( Schlegel ).

व्हावें हें उघड आहे. ह्या दृष्टीनें विचार करतां वरील सारखें सर्वमान्य तत्त्वज्ञान निर्माण करणारा हिन्दुधर्मच सकल मानवजातीचा धर्म ह्मणून ह्मणवून घेण्यास पात्र आहे, हें निराळें सांगण्यास पाहिजे असें नाहीं. हिन्दुधर्माच्या तत्त्वज्ञानाची विचारसरणी सुसंबद्ध, तर्कशुद्ध व विवेकपूर्ण पायावर उभारली असल्यामुळें, "यस्तर्केणानुसंधत्ते स धर्मं वेद नेतरः" या मनुवचनाप्रमाणें हिन्दुधर्मच धर्म या संज्ञेस सर्वथैव पात्र आहे. गुण विकासाचें तत्त्व आर्य धर्मालाच लागू आहे, इतर धर्मांना नाहीं. तर्कांची कसोटी आर्यधर्माला लागू पडेल तशी दुसऱ्या धर्मास लागू पडणार नाहीं. अन्य धर्म एकतंत्री आहेत तर आर्यधर्म बहुतंत्री आहे. आर्यधर्म कोणाहि एका व्यक्तीची महति गात नसून तत्त्वदर्शन तेवढें रोखठोकपणें करतो. व्यक्तीतंत्र धर्म सर्व मानव कुलाला सारखाच ग्राह्य कसा होईल ? साहजिकच त्रिकालाबाधित तत्त्वज्ञानाच्या अखंड पायावर हिंदुधर्माची उभारणी झालेली असल्यामुळें तोच सकल मानव जातीचा धर्म होण्यास सर्वथैव पात्र आहे. हिंदुधर्माच्या ह्या सर्वव्यापि व विश्वमांगलिक स्वरूपाविषयीं डॉ. ॲनीबेझंट बाई म्हणतात "हा हिंदुधर्म म्हणजे जगांतील यच्चयावत् राष्ट्रांचा कित्ता आहे, कारणें त्यांत सर्वांची सोय आहे. तो इतका विश्वव्यापि आहे कीं त्यानें मानवी विचारांची सर्व उंची खोली व्यापली असून शेतांतल्या शेतकऱ्यालाहि तो ज्ञान शिकवितो व एकांतांत तात्त्विक व आधिभौतिक विचार करीत बसलेल्या जिज्ञासूंनाहि अक्कल सांगतो. असा हा विश्वव्यापि धर्म मानवजातींतील प्रथमशाखीय ऋषीश्रेष्ठांच्या वाणींतून प्रसिद्ध झाला. तथापि हा केवळ तात्त्विक धर्मच नव्हे तर यांत व्यवहारांतील सांपत्तिक व सामाजिक व्यवस्थेचीहि घटना सुंदरपणें रचलेली आहे. ही व्यवस्था मनूच्या अक्कलहुशारीनें आखलेली असून ती त्यानेंच प्रथम प्रचलीत केली. एवढेंच नव्हे तर प्रत्येक जीवात्म्याच्या उन्नतीचाहि मार्ग त्यानें क्रमशः चढत जाणारे वर्णाश्रम धर्माचे नियम घालून फारच चतुराईनें आंखून दिला. त्या वर्णाश्रमाच्या अंगभूत जातिव्यवस्था ठरली, व प्रत्येक जीवात्म्यानें आपले कर्मानुसार या जातींतून वर चढत जावें असें केलें. अशा प्रकारें अद्भूत चतुराईनें आंखलेला व पूर्ण विचाराअंतीं निर्माण केलेला हा धर्म, जेथें प्रेमाची स्फूर्ति व शहाणपणाची सत्ता नियंत्रण करीत आहे तेथें कसा उत्कर्षप्रद होतो हें जगताला दाखविण्यासाठींच मानवजातीला दिला गेला आहे."

---

* It has served as the model—a world model for a nation. A religion embracing the heights and depths of human thought, able to teach the Ryot in his field, able to teach the philosopher and metaphysician in his secluded study; a world embracing religion had been proclaimed through the lips of the Rishis of this first offshoot of the race. Not only a religion but also a polity an economic and a social order planned by the wisdom of a Manu ruled at first by that Manu himself. Not only a religion of polity but also the shaping of the individual life on the wisest lines—the successive 'Varnas', the successive 'Ashrams', the stages of life in the long life of the individual were marked in the castes and each caste life of the embodied 'Jivatma' reproduced in its main principles in the individual lifethe 'Ash-

येथवर वरीलप्रमाणें तीनहि संस्कृतींच्या स्वरुपाची अल्पशी विचारणा झाली. त्यावरून इस्लामी व ख्रिस्ताई ह्या दोन्ही संस्कृती जगच्छांति–विघातक कशा आहेत व हिंदुसंस्कृति हीच जगताला शांति सौख्यदायक व म्हणूनच उपकारक कशी आहे, हें कोणाच्याहि प्रत्ययाला आल्याविना राहणार नाहीं. पण हिंदुसंस्कृति जर अशी उदात्त व सर्वश्रेष्ठ स्वरुपाची आहे, तर तिचे अनुयायी निरयगतीच्या नीच अवस्थेत कां खितपत पडावे हा प्रश्न उपस्थित होतो. आतां कोणत्याहि संस्कृतीचे अनुयायी श्रेष्ठपदीं विराजमान व्हावयाचे तर त्यांनीं त्या संस्कृतींत आज्ञापिलेल्या तत्त्वांप्रमाणें स्वतः आचरण तर करावें लागतेंच पण त्याबरोबर बाह्य जगताच्या स्थितिमानाचाहि विचार अखंडपणें करीत राहणें भाग असतें. केवळ स्वतः उच्च आचारविचारांनीं युक्त होऊन भागत नाहीं; तर भोंवतालच्या आपल्या संस्कृतीचा विनाश करण्याकरितां टपलेल्या शत्रूंचाहि अवश्यमेव विचार करावा लागतो. संस्कृतीचें रक्षण व्हावयाचें तर तिला विरोध करणाऱ्या मानववंशावर तिच्या अनुयायांची राजकीय सत्ता असावी लागते; परंतु ती नसेल तर त्याच्यावर सांस्कृतिक सत्ता तरी अवश्यमेव पाहिजे; पण तसेंहि शक्य नसेल तर त्या विरोधकाचा आपल्या लोकांशीं संस्कृति–विनाश–मूलक असा संबंध न येईल अशी व्यवस्था करणें प्राप्त असतें. पण हें करीत असतांना आपल्या लोकांस त्या विजातीय समाजाशीं मिसळण्याचा नुसता प्रतिबंध करून भागत नाहीं; तर त्या परकीयांचे आपल्या संस्कृतीच्या लोकांमध्यें नानास्वरुपांत घुसण्याचे जे जे म्हणून मार्ग असतील ते ते सक्तीनें बंद करावे लागतात. म्हणजेच शत्रूंच्या अंतर्बाह्य भयंकर आक्रमणाना यशस्वी पद्धतीनें तोंड देईल, अशी त्या संस्कृतीची पाठीराखी असणारी राजकीय सत्ताच असावी लागते. पण वरील स्वरूपाच्या आवश्यक गोष्टींकडे दुर्लक्ष झाल्यामुळें, किंवा उदात्त व उदार ध्येयानें प्रेरित होऊन तसें दुर्लक्ष केल्यामुळें, भारतवर्षीय संस्कृतीवर भीषण अनर्थ परंपरा कशी कोसळली हें मागें विस्तारपूर्वक सांगितलेलेंच आहे.

इतिहास घडघडीत साक्ष देत आहे कीं, जेव्हां जेव्हां या आर्यसंस्कृतीच्या उच्च शिकवणुकीला अनुसरून तिचे अनुयायी वागले त्या त्या वेळीं ते वैभवोत्कर्षाच्या श्रेष्ठपदीं विराजमान झाले, एवढेंच नव्हे तर *आगम्नान्यतेस पोंचून जगताली मार्गदर्शकहि झाले.* पण जेव्हां जेव्हां संस्कृतिमातेनें आज्ञापिलेलीं उदात्त तत्त्वें त्यांच्याकडून जाणतां किंवा अजाणतां धिःकारलीं गेलीं वा पायांतळीं तुडविलीं गेलीं; तेव्हां तेव्हां दैन्यावस्थेच्या घोर यातना भोगणें त्यांच्या नशिबीं आलें. माननीय गीतारहस्यकार म्हणतात त्याप्रमाणें ' हा नीट धर्म ओळखून केवळ कर्तव्य म्हणून सर्वभूत हितार्थ शेंकडों खटाटोप करणारे महात्मे व कर्ते पुरुष जेव्हां या भरतभूमीस अलंकृत करीत होते तेव्हां हा देश परमेश्वराचे कृपेस पात्र होऊन ज्ञानाच्याच नव्हे तर ऐश्वर्याच्याहि शिखरास पोंचला होता; आणि हा उभयत्र श्रेयस्कर पूर्वतर धर्म सुटला तेव्हां त्याला निःकृष्ट स्थिति प्राप्त झाली हें कोणासहि सांगावयास नको. " ( गी. र. ५०३ ) या मागील अनुभवांतच सध्यांच्याहि अवनतीचीं बीजें हातीं लागूं शकतात. अर्थात आर्यसंस्कृतीच्या लाडक्या लेंकरांनीं अधोगतीचें

rams ' through which a man passed between birth and death. Thus perfectly thought out, thus marvellously planned, this infant civilization was given to the race as a world model, to show what might be done when wisdom ruled and love inspired."

हें मूळ जाणून तें खणून काढण्याचा व त्या योगें आपल्या मातेला पुनश्च स्वस्थानीं स्थापण्याचा अट्टाहास पूर्वक श्रेष्ठ प्रयत्न अंगिकारावयास पाहिजे. आर्यसंस्कृति जगवण्याचा हा उपक्रम केवळ स्वार्थासाठींहि नव्हे तर जगत् कल्याणाकरितां विश्वमंगलाकरितां करावयाचा आहे, कारण आर्य संस्कृतिविना विश्व दुःखसागरांतून कदापि बाहेर येणें शक्य नाहीं—हें परोपकाररत किंवा परार्थैकप्राण हिंदवासीयांनीं अवश्यमेव ध्यानांत ठेवावें.

आतां आर्यसंस्कृति या जगांत जगवावयाची ह्मणजे काय? आर्यसंस्कृतीचीं उदात्त तत्त्वें तर निःशेष जगाच्या प्रेमादरास पात्र आहेतच, व तीं त्रिकालाबाधित ह्मणजेच चिरंजीवाहि आहेत; पण हीं तत्वें नुसतीं हवेंत जगून उपयोग काय? त्या तत्वांचा प्रत्यक्षतः आचरण करणारा मानवीसमाज पृथ्वीतलावर अस्तित्वांत नसेल तर आर्यसंस्कृतीचें शाब्दिक स्वरूप इतिहासांत वाचावें लागेल. ही आपत्ति टाळण्याकरितां आर्यसंस्कृतीचा असा मानववंश येथें जीवंत असणें उचित आहे व त्या प्रमाणें तो भारतवर्षांत आहेहि. पण तो जीवंत राहाण्याच्या अवस्थेंत मात्र नाहीं. कारण प्रत्यहींच काय पण प्रत्येक क्षणाला इस्लामी—खिस्ती धर्मप्रसारकांनीं त्याची उघड उघड लयलूट मांडली आहे. जें भारतवर्ष पूर्वकाळीं अपरंपार हिंदू लोकांनीं गजबजून गेलें होतें—श्रीकृष्णाच्या काळच्या छपन्न कोटी यादवांचा विचार सोडला तरी मुसल्मान लोकांनीं प्रवेश केला तेव्हां येथें साठ कोटी हिंदूंची लोकवस्ती होती असें पेरिस्त्यानें ह्मटलेलें आहे—त्याच भारतवर्षांत त्याच हिंदुस्थानांत, म्हणजे हिंदु लोकांच्या स्थानांत आज पुरे २४ कोटीहि हिंदू नाहींत! ज्या हिंदुंच्या, परम पवित्र निवासस्थानांत एक मुसल्मान किंवा खिस्ती कांहीं काळापूर्वी औषधालाहि सांपडणें कठीण होतें, तेथेंच आज ७ कोट मुसल्मान व ५०-६० लक्ष खिस्ती गजबजलेले आढळून येतात, ही एकच गोष्ट विधर्मीय लोकांच्या आक्रमणाचें अंतरंग जाणवूं शकेल. १८८१ सालापासून या हिंदुधर्माच्या ओहोटीचा विचार केल्यास ज्या हिंदुंचें १८८१ मध्यें दर दहा हजारीं ७४३२ इतकें प्रमाण पडत होतें, तेंच प्रमाण १९२१ सालीं दर दहा हजारीं ६८४१ इतकें झालें, असें १९२१ च्या शिरगणतीच्या प्रतिवृत्तांत ( भाग १ ला ) ह्मटलें आहे. अर्थात इतर धर्मीयांची वाढहि त्या मानानेंच वाढलेली आहे जसें:—

| लोक | १८८१ सालीं ( दरदहाहजारीं ) | १९२१ सालीं ( दरदहाहजारीं ) |
|---|---|---|
| हिंदु............ | ७४३२ होते............ | ६८४१ उरले |
| जैन............ | ४८ ,, | ३७ ,, |
| मुसल्मान | १९७४ ,, | २१७४ झाले. |
| खिस्ती. | ७३ ,, | १५० ,, |

केवळ १९११ ते १९२१ या दहा वर्षांत खिस्ती लोकांची वाढ ८७७८६१ ह्मणजे पावणे नऊ लक्षांनीं झाली असें त्याच शिरगणतीच्या प्रतिवृत्तांत पुढें ह्मटलें आहे. हिंदुसमाजांतील या भयंकर ओहोटीची यथार्थ कल्पना येण्याकरितां ती ओहोटी प्रांतनिहाय कसकशी झाली, हें खालील कोष्टकावरून समजून येईल.

खिस्ती लोकांची संख्या.

| प्रांत | वर्ष १९११ | वर्ष १९२१ |
|---|---|---|
| अजमीर मेवाड. | ५४३२ | ५५३१ |
| अंदमान निकोबार. | ५६६ | १५८६ |
| आसाम. | ६६५६२ | १३२१०६ |
| बलुचिस्थान. | ५०८५ | ६६१३ |
| बंगाल. | १२९७४६ | १४९०६९ |
| बहार ओरिसा, | २६८२६५ | ३०२३५८ |
| मुंबई | २४५६५७ | २६९०६२ |
| ब्रह्मदेश. | २१००८१ | २५७१०६ |
| मध्यप्रांत वऱ्हाड. | ७३४०१ | ७७७१८ |
| कुर्ग. | ३१८२ | ३५७३ |
| दिल्ली–पंजाब. | १९९७५१ | ३४६२४९ |
| वायव्य सीमाप्रांत. | ६७१८ | १३९१६ |
| संयुक्त प्रांत. | १७९६९४ | २०३१७९ |
| मद्रास. | १२०८५१५ | १३८०६७२ |
| संस्थानें इ० | १२७३१७७ | १५९४६२७ |
| | ३८७६२०३ | ४७५४०६४ |

## ख्रिस्ती लोकांची १० वर्षांत एकंदर वाढ ८७७८६१

१९११ च्या खिरगणतीच्या प्रतिवृत्तांत पृष्ठ ११२ वर झटल्याप्रमाणें ".हिंदुस्थानांत हिंदूंच्या संख्येचें प्रमाण गेल्या ३० वर्षांत शेंकडा ७४ चें जवळ जवळ ६९ वर आलें आहे." याच आंकड्यांनीं कर्नल मुकर्जी यांनीं स्वामी श्रद्धानंदांना कलकत्त्यास विचारलें कीं 'हिंदुंची लोक संख्या शेंकडा ५ नें कमी होण्यास ३० वर्षे लागतात व आतां आपण हिंदु शेंकडा ६९ आहोंत तरी ७० आहोंत असें धरून चालें, तेव्हां ही संख्या पूर्णपणें संपुष्टांत येण्यास किती वर्षे लागतील ?

या साध्या (?) त्रैराशिकाचें उत्तर अर्थात् ४२० वर्षांनीं समस्त हिंदुसमाज नामशेष होईल असें आलें पण या उत्तरानें माझे डोळे खाडकन उघडले असें स्वामी श्रद्धानंदांनीं झटलें आहे. अर्थात या आंकड्यांतील भीति प्रदपणा स्वामी श्रद्धानंदांना सुव्यक्त झाला, त्यामुळें त्यांच्या आयुष्याला निराळें वळण लागलें. त्यांच्या धर्माभिमानाचा वन्हि चेतविला गेला व त्याच धर्मसेवेच्या यज्ञाहुतींत त्यांनीं आपलें जीवित बलिदान केलें–आपल्या पंचप्राणांची कुर्वंडी केली! प्रत्येक हिंदुमात्राला स्वधर्मरक्षणाची अशी ही तीव्र जाणीव होईल तो सुदीन समजावयाचा.

वरील आंकडे सिद्ध करतात कीं गेल्या ४० वर्षांत हिंदुंची संख्या एककोटी त्र्याहत्तर लक्षानें कमी झाली. ह्मणजेच प्रत्येक वर्षी जवळजवळ साडेचार लक्ष हिंदुलोक स्वधर्मांतून ओढून परधर्मांत नेले गेले. एका वर्षांत साडेचार लक्ष लोक ह्मणजे प्रत्येक दिवशीं परधर्मांत प्रवेश करणाऱ्यांची संख्या १२०० च्या वर

जाते. अर्थात प्रत्येक तासाला आपल्या डोळ्यांदेखत आपले ५० धर्मबांधव निःशंकपणें भ्रष्ट केले जात आहेत ! हें भयानक दृश्य पाहून " हाच कां तो हिंदुंचा धर्माभिमान, हीच कां हिंदुंची धर्मपरायणता, ' परावें आत्मवत् ' मानणाऱ्या हिंदुंचें हेंच कां तें स्वजनप्रेम " असा जर एकाद्यानें प्रश्न विचारला तर हिंदुसमाज त्याला काय उत्तर देईल ! वस्तुतः धर्म हाच जीविताचा हेतु आणि त्याचाच अभिमान नसल्र तर त्या जिण्यांत बाणेदारपणा कोठून कसा यावा ! स्वधर्माभिमानशून्यता ही नामर्दपणाची द्योतक आहे.

श्रीस्वामी विवेकानंदांनीं एकदां आपल्या शिष्यास विचारलें ' गड्या सिना! तुझ्या आईची जर कोणी खोडी काढली तर तूं काय करशील तें सांग पाहूं ? ' सिनानें एक क्षणाचा विलंब न लावतां उत्तर दिलें ' मी थाडकन त्याच्या थोबाडींत देईन आणि त्याची कणीक इतकी तिंबीन कीं त्याची आठवण तो जन्मोजन्मीं विसरणार नाहीं. ' ' शाबास! गड्या शाबास ' ! ! स्वामीजी ह्मणाले ' आतां तूंच विचार कर कीं स्वतःच्या आईबद्दलची जितकी पूज्यबुद्धि आहे, तितकीच जर स्वधर्माबद्दल असेल तर आपला हिंदुधर्मी मनुष्य परक्यांनीं बाटविलेला तूं पाहिलास तर तुझी आग मस्तकाला गेली पाहिजे कीं नाहीं ? आपलाच धर्म खरोखर आपल्या देशाची माता आहे. तथापि प्रतिदिवशीं आपल्या डोळ्यांसमक्ष आपल्या प्रिय धर्मांतील कितो तरी लोक हे ख्रिस्ती पाद्री बाटवीत असतांहि तुह्मांला त्याचें कांहींच वाटत नाहीं याला काय ह्मणावें! भल्या माणसांनो ! हीच का तुमची धर्मश्रद्धा आणि हाच का तुमचा स्वदेशाभिमान ? या पाद्री मटर्जीनीं प्रत्येक दिवशीं तुमच्या तोंडावर तुमच्या धर्माची यथेच्छ नालस्ती करतांना पाहून सात्विक रागानें लाल होणारे हरीचेलाल तुमच्यांत कितीसे निघतील बरें?" याच समयीं त्यांनीं स्वतःची एक गोष्ट सांगितली. पश्चिमेंतील कामगिरी संपवून परत येत असतांना एडन व कोलंबो यांच्या दरम्यान बोट होती. बोटीवरील दोन तरुण ख्रिस्ती पाद्री आपल्या नित्याच्या स्वभावानुसार कांहीं तरी कुरापत काढून हिंदु-धर्माचा कमीपणा प्रस्थापित करण्याकरितां स्वामीजवळ मुद्दाम वादविवाद उकरून काढूं लागले. परंतु स्वामींनीं चार प्रश्न करून त्यांस तेव्हांच निरुत्तर केलें. वादविवादांत स्वामींनीं आपणांस फजीत केलें हें पाहून वरील पाद्री दुक्कल इतकी चिडली कीं समस्त हिंदु लोकांना व हिंदुधर्माला शिव्या देण्यास तिनें प्रारंभ केला. स्वामी कधीं संतापावयाचे नाहींत, परन्तु एकदिवस त्यांनाहि त्या शिव्या ऐकवेनाशा झाल्या व कांहीं थट्टेनें, कांहीं रागानें पुढें जाऊन त्यांनीं पाद्रयापैकीं एकाची मानगुटी पकडली व ते त्याला ह्मणाले ' याद राख, बचंजी ! तुला पुन्हा जर माझ्या धर्माला अशा शिव्या देतांना मीं ऐकलें तर एकदम तुझी गाठडी उचलून समुद्रांत फेकून देईन ! तुझी अगदीं गय करणार नाहीं, ' स्वामींचा हा रुद्रावतार पाहातांच पाद्रीबुवा थरथर कापूं लागले व हात जोडून ह्मणाले ' क्षमा करा महाराज ! मला आतांची वेळ गय करा, पुन्हां मी असें कधीं करणार नाहीं—

असें उत्कट धर्मप्रेम व असा ज्वलत् अभिमान हिंदुसमाजांत केव्हां निर्माण होणार ? आज कोट्यावधी हिंदु लोक स्वधर्माच्या शीतल कृपाछयांतून ओढून नेले जात आहेत, त्यांचा विचार हिंदुसमाज कांहींच करणार नाहीं काय ? ज्या आया बहिणी किंवा मुनालेकी प्रतिदिनीं फसवून, फूसलावून वा बला-त्कारानें पळवून नेल्या जाऊन भ्रष्टविल्या जात आहेत व ज्या आपणांला आपला कोणी भाऊ बाप किंवा

सुखासोयरा सोडवावयाला येईल म्हणून आशापूर्ण उत्कंठेनें मार्गप्रतिक्षा कर करून निराश झाल्यावर निरुपायानें त्याच प्रष्टावस्थेंत तळमळत दुःखाश्रु टाळीत पसल्या आहेत किंवा बसत आहेत, त्यांच्या त्या अखंड तळतळाटाला हिंदु समाज काय उत्तर देईल? तद्वतच जीं अजाण वा सुजाण मुलें अज्ञानानें मोहानें किंवा फसगतीनें प्रत्यहीं परधर्मात खेंचून नेलीं जाऊन हिंदुसमाजाचे जीवंत शत्रु बनविलीं जात आहेत, त्यांच्या उत्तरदायित्वाचा विचार हिंदु समाज करणार नाहीं काय? दुष्काळ, प्लेग, इन्फ्लुएंझा आदिक साथींपेक्षांहि ही धर्मांतरानें 'शत्रु' उत्पन्न करणारी महासाथ जर वेळींच निर्मूल केली नाहीं तर हिंदुसमाजाच्या द्वारीं मृत्यु ठाकलेलाच आहे. आरोग्य इच्छिणाऱ्यांनें वाढणाऱ्या रोगांची जशी उपेक्षा करून चालत नाहीं, तद्वतच शत्रूकडेहि दुर्लक्ष करतां कामा नये अशी शिष्टांची शिकवणूक आहे.

उत्तिष्ठमानस्तु परो । नोपेक्ष्यः पथ्यमिच्छता ॥
समौ हि शिष्टैराम्नातौ । वर्त्स्यंतावामयःसच ॥

अर्थात धर्मांतरामुळें उद्भूत झालेला हा वाढता शत्रूरूपी रोग उचित उपायावलंबनाच्या अभावीं हिंदुसमाजाला प्राणांतिक अवस्थेंत ढकलल्याविना राहाणार नाहीं हें सुनिश्चित आहे.

दुःसाध्य रोगावर उपाय पण रामबाणच करावा लागतो किंवा रसायन पण दिव्यच द्यावें लागतें. आयुर्वेदशास्त्रांत 'रसायनं तु तद्द्रव्यं यज्जरामृत्युनाशनं' ह्मणजे जरा मृत्यु नाश करणारें द्रव्य तें रसायन, अशी रसायनाची व्याख्या केली आहे. अर्थात हिंदुसमाजाला आलेलें वैकल्य व त्यामुळें त्याला नित्यशः भेडावीत जवळ उभा असलेला मृत्यु या दोहोंपासून त्याची मुक्तता करणाऱ्या दिव्य रसायनाची योजना करणें आवश्यक आहे. प्रतिदिनीं विधर्मी लोक वारंवार हिंदूंचा एक एक लचका तोड तोडून नेत असल्याकारणानें हा प्रचंड ओघ थांबल्याविना, हिंदु समाजरूपी मोठ्या हौदाची ही अखंड गळती बंद केल्याविना, हिंदुसमाज सशक्त व धष्टपुष्ट होणें शक्य नाहीं हें उघडच आहे. समुद्र कितीहि अफाट असला ह्मणून जर वाफ होऊन निघून जाणाऱ्या पाण्याची भरपाई नद्यांकडून सतत केली जाणार नाहीं तर तोहि कोरडा ठणठणीत पडल्याविना राहणार नाहीं, हें श्रेष्ठ तत्व किंवा हा सृष्टिस्वभाव लक्षांत घेऊन विचारवंतांनीं मरणोन्मुख हिंदुसमाजाला देण्याकरितां एक दिव्य रसायन, जें वंदनीय पूर्वजांनीं संमानिलेलें व अनुभवलेलें होतें तें बाहेर काढलें. तें रसायन ह्मणजेच 'हिंदुकरण' हें होय. यालाच शुद्धिकरण असेंहि ह्मणतात. पण शुद्धीकरणापेक्षां हिंदुकरण हा शब्द अधिक व्यापक खोल व अर्थगांभिर्यानें युक्त असा असल्यानें हिंदुकरण हेंच नामाभिधान प्रस्तुत रसायनाला देणें युक्त होईल.

हें हिंदुकरण ह्मणजे तरी काय? हिंदुकरणाचा अगदीं सरळ अर्थ 'हिंदुधर्मदीक्षित करणें' 'हिंदु बनविणें'-ज्याला इंग्रजींत Hinduization असें म्हणतां येईल-असा आहे. हिंदु करण दोन पद्धतीचें आहे. एक संरक्षक, व दुसरें जयिष्णु, आक्रमणशील किंवा चढाईचें. ह्मणजे स्वधर्मांतून जे हिंदु लोक जाणतां अजाणतां परधर्मांत नेले गेले आहेत त्यांना प्रायश्चित्त देऊन पुनश्च स्वधर्मांत समाविष्ट करणें हा हिंदुकरणाचा एक प्रकार झाला. मध्यंतरीच्या कांहीं काळांत या उपायाचा अवलंब न होऊं शकल्यामुळेंच हिंदुसमाजांतून असंख्य लोकांचा प्रवाह सारखा परधर्मांत सुरू केला गेला; आणि हिंदु लोकच बाटवून त्यांना हिंदुधर्मीयांच्या विरुद्ध लढणारे शत्रू बनविण्याच्या युक्तीच्या बळावरच हिंदुंचें

साम्राज्य-सत्ता-वैभव सर्व धुळीस मिळवून त्यावर परकीयांनीं आपलें आसन कसें स्थीर केलें हें मागें दाखविलेंच आहे. अर्थात हिंदुसमाजाची ही गळती किंवा ओहोटी अशीच अव्याहतपणें चालू ठेवणें ह्मणजे हिंदुसमाज स्वहस्तें लौकरच नामशेष करणें होय हें स्पष्ट आहे. श्रीमान् तात्याराव केळकर यांनीं कानपूर हिंदुमहासभेच्या अध्यक्षपदावरुन सांगितल्याप्रमाणें, '' इतर जातींचीं कार्यक्षेत्रे अफाट, त्यांचे संबंध जगभर पसरलेले, वाहातुकीचीं साधनें अमूप; हिंदुसमाजाचा मात्र परकी राष्ट्रांशीं कांहीच संबंध नाहीं. त्यानें आपल्याला एका जागेंत स्वतः कोंडून घेतलेलें आणि त्या कोंडण्याच्या जागेंत देखील अशी व्यवस्था कीं त्या जागेंतून बाहेर पडण्यास वाव नाहीं, पण एकाद्या उपटसुंभाला आंत येऊन नंगा नाच घालण्यास मात्र मोकळीक ! '' अशा भयप्रद अवस्थेंत हिंदु समाजाची धडगत कशी लागावी ? म्हणूनच ही अखंड गळती थांबविण्याच्या ' हिंदुकरणाच्या ' श्रेयस्कर मार्गाचा अवलंब करणें अपरिहार्य आहे. ह्मणजेच परधर्मांत खेंचून नेल्या गेलेल्या किंवा जात असलेल्या माणसांना स्वधर्माचें द्वार हिंदु समाजानें सताड उघडें करुन ठेविलें पाहिजे. एरव्हीं संख्याबलानें प्रत्यहीं क्षीण होत चाललेला हिंदुसमाज जगणें शक्य होणार नाहीं.

समाजस्थैर्याच्या कामांत संख्या बलाचें महत्व विशेष आहे. आत्मा किती जरी बलवान असला तरी शरीराच्या साह्याविना तो कर्तव्यभूमींत उतरूं शकत नाहीं, तद्वतच संख्या बल हें समाजरूपी आत्म्याचें शरीर आहे. एकाद्या कुटुंबांत ५।२५ कर्ती सवरतीं माणसें असलीं ह्मणजे तें कुटुंब किंवा तें घराणें जर सरारून पुढें आल्याविना राहात नाहीं, तर अशा विपुल माणसांचीं अनेक कुटुंबें जो समाज धारण करीत असेल, तो समाज तरी दैन्यावस्थेंत कां खितपत पडावा ? राजसत्तावालेलोक सुद्धां रानोमाळ भटकून महारापोरांच्याहि भरतीनें स्वसमाज वाढविण्याची पराकाष्टा करीत असतात, ह्या एकाच गोष्टीवरुन संख्या बलाचें महत्व समजून येत नाहीं काय ?

खेरीज सध्याच्या लोकसत्तातत्वाच्या काळांत संख्याबलाचे महत्व किती असतें हें सर्वांना विदितच आहे. प्रस्तुतचा काल बहुमताच्या बळावर चालणारा आहे. अर्थातच लोकसंख्येच्या मानानेंच सर्व समाजांना अधिकारांची किंवा हक्कांची प्राप्ति होणार. कल्पना करूं या कीं, हिंदुसमाज स्वतःच्या गळतीकडे सर्वथैव दुर्लक्ष करुन बसला तर-कांहीं दिवसांनीं असा एक काळ येईल कीं, ज्या वेळीं हिंदुस्थानांत हिंदुपेक्षां परधर्मीयांची लोकसंख्या अधिक वाढलेली असेल. त्यावेळीं साहजिकच विधर्मी लोक बहुमतानें कोणतीहि गोष्ट हिंदूंच्या विरुद्ध ठरवूं शकतील व तीर्थक्षेत्रांची नासाडी, गोमातेचा संहार, हिंदु मंदिरांचा विध्वंस, इत्यादि गोष्टी कायद्यानें प्रस्थापित केल्या जातील. सध्याच्या काळांतच पंजाब, सिंध, बंगाल, संयुक्तप्रांत या प्राजल्या हां हां ह्मणतां केवळ मुसलमानांची लोकसंख्या हिंदूंच्या पेक्षां अधिक वाढून, काय अनर्थ ओढवत आहेत हे पाहिले ह्मणजे हिंदुकरणाच्या द्वारें संख्या-बल-वर्धनाची हिंदुसमाजाला केवढी आवश्यकता आहे हें समजून येईल.

यावर कांहीं विद्वानांचें म्हणणें असें कीं, ''ही अशी खोगीर भरती करुन काय उपयोग ? हिंदुधर्म अशा खोगीर भरतीनें थोडकाच जगावयाचा आहे ? या अशा असंख्य अर्धाकच्च्या माणसांपेक्षां अगदीं अल्प जरी तत्वनिष्ठ माणसें समाजांत असलीं तरी चालेल.'' मनूं या, अशा कांहीं अगदीं एकनिष्ठ व्यक्तिंच

समाजांत राहिल्या व बाकीचे अर्धवट लोक सर्व परकी शत्रूंच्या गोटांत नेले गेले. साहजिकच हिंदुसमाजाचें अस्तित्व पुसून टाकण्याच्या परधर्मीयांच्या प्रयत्नांत हें नूतन सैन्यहि साह्यकारी होणारच! याला गतेतिहास साक्ष देत आहेच. मग अशा असंख्य शत्रूंच्या वेढ्यांत हीं चार तत्त्वनिष्ठ माणसें सुखासमाधानानें नांदूं शकतील कीं काय, हा प्रश्नच आहे. अपरंपार शत्रूंच्या माऱ्यांत या अल्पशा व्यक्तींना आपला देवधर्म, आपलें कुटुंब आपले आचार–विचार यथायोग्य पद्धतीनें सांभाळून जीवंत राहाणें संभवनीय होईल काय! जोंपर्यंत इतर परकीय समाज हिंदुत्वाच्या उच्चाटणाची इच्छा न करितां वावरतील तोंपर्यंत ठीक आहे; परंतु पृथ्वीवरील सर्व समाज प्रेमानें व एकमेकांच्या सोईनें वागण्याचा तो सत्ययुगाचा काल केव्हां यावयाचा असेल तो येवो. तथापि तशी अवस्था प्रस्तुत कालीं आली नसतांना, उलट इतर सर्व समाज हिंदुसमाजाचें सर्वस्वापहरण सूक्तासूक्त मार्गानें करण्यास चंग बांधून बसले असतां, सत्ययुगीन कर्तव्याचरणाचा मार्ग सध्यां जर अवलंबिला गेला, तर तें समंजसपणाचें होणार नाहीं.

वरील गोष्टीवरून हें ओघानेंच सिद्ध होतें, कीं, जर हिंदुसमाजाला स्वत्व संभाळून या पृथ्वीवर ह्यावयाचें असेल तर त्यानें त्याच्या भोंवताली अपरंपार पसरलेल्या व प्रत्यहीं सारख्या वाढत असलेल्या शत्रुसमाजांचा विचार करणें अवश्य आहे; त्याला केवळ संरक्षक धोरण स्वीकारून भागावयाचें नाहीं. तर आणखी पुढें जाऊन पूर्वीची जयिष्णु किंवा आक्रमणशील वृत्ति अंगिकारली पाहिजे. स्वधर्मांतून भ्रष्टविलेल्या लोकांनाच केवळ हिंदुत्व देऊन भागावयाचें नाहीं—तें तर त्याचें प्रथमचें कर्तव्य आहे—तर भोंवतालच्या इतर शत्रुसमाजांनाहि त्यानें हिंदुत्वाची दीक्षा देण्यास बद्धपरिकर व्हावयास पाहिजे. हिंदूकरणाच्या जयिष्णु उपायाचें अवलंबन केल्याविना हिंदुसमाजाचें अस्तित्व तर जगांतून पुसलें जाईलच; तथापि त्यामुळें अखिल विश्वाचीहि स्थितिस्थापकता विघडविल्याचें महत् पातक त्याच्या शिरावर येईल. कारण, आर्यपद्धति शिकविण्याच्या अभावीं जग निःसंशय अधोगतीस जाणार, हें विचारवंत सज्जनांनीं सुनिश्चित केलें आहे. आर्येतर संस्कृतीची शिकवणूक हिणकस व जगाच्या शांतिसौख्याला व प्रगतीला विघातक कशी आहे हें मागें प्रतिपादन केलेलेंच आहे. अर्थात् हिंदुसमाजानें स्वतःचें अस्तित्व सांभाळून, शिवाय जगतालाहि ‘आर्य’ किंवा ‘हिंदुवृत्ति’ बनविण्याची महत्तम कामगिरी आपल्या शिरावर आहे, हें विसरून चालावयाचें नाहीं. इतर परकी समाजांचें अनार्यत्व व त्यांचा असंस्कृतपणा नष्ट करण्याकरितां त्यांना आर्यसंस्कारयुक्त करावयाचें, त्यांना आर्यभावयुक्त करावयाचें, ही श्रेष्ठ कामगिरी म्हणजेच हिंदुकरणाचें दुसरें अंग किंवा दुसरा प्रकार होय. या आक्रमणशील हिंदूकरणाला अनुसरून म्लेंच्छांवर हिंदुत्वाचा पद्धतशीर संस्कार केला कीं त्यांच्या म्लेंच्छवृत्ति मावळून ते मूर्तिभंजकांचे मूर्तिपूजक व गोभक्षकांचे गोरक्षक होतील किंवा भविष्य पुराणांतील प्रतिसर्ग पर्वांत म्हटल्याप्रमाणें ‘आर्यधर्मकरा म्लेच्छा बभूवुः सर्वतोमुखाः!’ जसे पूर्वी झाले तसे हेच म्लेंच्छ आर्य–धर्म–कर म्हणजे हिंदुधर्म संरक्षक होतील. साहजिकच त्या योगें सध्यां समाजांत सर्वत्र उपस्थित होणाऱ्या नाना जटिल प्रश्नांची बरीचशी अडगळ कमी होईल.

एका अहिंदूचा हिंदु केल्यानें समाजाचा केवढा लाभ होतो हें एका विद्वान् अर्थशास्त्रज्ञ पंडितानें मोठ्या मजेदार पद्धतीनें दाखवून दिलें आहे. तो म्हणतो, जर एक इसाई अथवा मुसल्मान सकाळीं पाव-

शेरे व सायंकाळीं पावशेर गोमांस खात असेल, तर एका महिन्यांत त्याला १५ शेर गोमांस लागेल. अर्थात् एका गाईएवढें मांस तो एक महिन्यांत खाईल. साहजिकच एक वर्षभरांत त्याला १२ गाई लागतील व कमींतकमी आयुष्यांत त्यानें २५ वर्षेच मांसाहार केला अशी कल्पना केली तरी तो त्याच्या हयातींत २५×१२=३०० गाई फस्त करून टाकील, हें उघड आहे. ह्याच हिशोब पुढें चालविला तर प्रत्येक गाईचें दर एक दिवशींचें १॥ शेर दूध धरल्यास एका महिन्यांत ४५ शेर व ती वर्षभर दूध देत राहिली अशी कल्पना केल्यास तिचें एकंदर दूध १३॥ मण होईल. ती गाय आपल्या हयातींत १० वेळां व्याल्यास तिचें सर्व आयुष्यांतील दूध कमींत कमी १३५ मण होईल. आतां हें दूध प्रत्येकाला १ शेरप्रमाणें दिल्यास जवळ जवळ ५००० माणसांचें त्याच्यावर पोषण होईल. तद्वतच या गाईपासून निर्माण होणाऱ्या संततीचा-गाई व बैल यांचा फायदा विचारांत घेतल्यास आणखीहि हा हिशोब किती तरी लांबवावा लागेल. अर्थात् एका अहिंदूला हिंदु करणें म्हणजे जवळ जवळ ३०० गायींना जीवदान देण्याप्रमाणें आहे व कमींत कमी पंधरा लक्ष लोकाना दूध पाजण्यासारखें आहे.

पण या आर्थिक दृष्टीपेक्षांहि जगांतील सध्यां पेटलेल्या सांस्कृतिक लढयांना हिंदूकरणानें जी मूठमाती मिळणार आहे तीच त्याची कामगिरी विशेष स्वरूपाची आहे. चालू जगांतील सामान्य प्रवृत्ति पाहिली तर बहुधा सदाचारापेक्षां दुराचाराकडे किंवा पुण्यापेक्षां पापाकडे असलेली आढळून येईल. धर्मबंधनांच्या अभावीं मनुष्य पशुवृत्तीकडे खेंचला जात आहे. त्यामुळें अनैतिक आचार विचार व स्वभाव यांचा दुष्टपणा सर्वत्र निरंकुशपणें वावरत आहे. एवढेंच नव्हे तर सत्तासामर्थ्याच्या बळावर गरीबांना नाडून व नागवून पुन्हां आपलीं दुष्कृत्यें जगापासून छपविण्याकरितां त्यांना मोहक व सात्विक स्वरूप देण्यांत सर्व बुद्धिमत्ता लढविली जात आहे.

कौंट टॉलस्टॉय यांनीं म्हटल्याप्रमाणें "त्यांचा (आधुनिकांचा) स्वार्थ, त्यांचा अहंकार, आणि त्यांचा निर्दयपणा हीं सध्यां इतक्या पल्ल्याला पोहोंचलीं आहेत कीं, प्रेम आणि स्वार्थत्याग या कोमल भावनांची पुकाची शाब्दिक आठवणाहि त्यांना खपत नाहीं. त्यांची जीवितक्रमाची पद्धति आज परांच्या वळणावर गेली आहे. या वळणांत बदल व्हावा अशी त्यांची इच्छा नाहीं आणि असल्या जीविताचा उपहास ज्या कारणांनीं होण्याचा संभव आहे त्या कारणांचा उगम सद्गुणांतून होत असला तरी तीं त्यांना द्वेष्य वाटतात; यामुळेंच त्यांच्या अहंकाराचा आणि पशुवृत्तीचा परिपोष जीं मतें करतात, तीं त्यांना प्रिय वाटतात, यांत नवल नाहीं. या मतांची मांडणी अर्धीकची घर-सोडचिी आणि तुटपुंजी आहे, या गोष्टींकडे त्यांचें लक्षच जात नाहीं. दुसऱ्यांचे जीव घेऊनसुद्धां स्वतःच्या इंद्रियांचे कोड पुरवावेत या त्यांच्या जीवितक्रमाची न्याय्यता जें मत सिद्ध करील तें त्यांना प्रिय होतें. प्रेम आणि लोकसेवा हा मानवी जीविताचा आधारस्तंभ नसून परस्पर भक्षण हाच त्याचा प्रकृतिसिद्ध कायदा आहे असें त्यांना पक्केपणीं वाटूं लागतें. मग एकमेकांना भक्षण करण्यांतच त्यांची अहमहमिका सुरू होते. आपल्या बुद्धीचें आणि देहाचें सारें सामर्थ्य दुसऱ्यांना भक्षण करण्यांत ते खर्चूं लागतात."

साहजिकच अशा दुःखदावस्थेंत समाज-समाजामध्यें भयंकर रणधुमाळी माजून प्रत्येकजण दुसऱ्याच्या नाशार्थ टपलेला राहावा व येनकेन प्रकारेण दुसऱ्याच्या सर्वस्वानें स्वतःचा तळिराम गार करावा ही एकच

एक भावना भिन्न भिन्न स्वरूपांत सात्विक सोंगानेंहि शमविली जावी ह्यांत नवल तें काय! अन्य समाजांना पायांतळीं तुडवून, किंबहुना सर्व जगाची होळी झाली तरी चालेल, ह्या दुष्ट व स्वार्थी भावनेनें राष्ट्रधर्मासारख्या (Nationalism) मपकेबाज नांवाखालीं, सध्यांच्या सुधारलेल्या म्हटल्या जाणाऱ्या लोकांकडून स्वतःच्या राज्यतृष्णेची अनावर हाव, वाटेल त्या कुटिल मार्गानें शमविण्याची चाललेली प्रचंड धडपड, वरील गोष्ट सिद्ध करीत आहे. अर्थात् अशा दुष्ट व भयंकर प्रकृतीचे मानववंश जोंपर्यंत पृथ्वीतलावर स्वच्छंदपणें वावरत आहेत, तोंपर्यंत जगताची स्थितिस्थापकता ही सदैव धोक्यांतच राहाणार. बाह्यात्कारी केवढाहि संभावितपणाचा आव आणून शांततापरिषदा, आरमारनियंत्रणाच्या व शस्त्रसंन्यासाच्या योजना किंवा युद्ध प्रतिबंधाचे ठराव केले गेले व ह्या श्रवणसुखद कल्पनेनें क्षणभर जरी जगाला चकवितां वा मोहवितां आलें, तरी जोंपर्यंत वरील मनोभूमिका ज्याच्या त्याच्या जवळ जशीच्या तशीच स्थिर आहे तोंपर्यंत जगांतील अशांतता व अस्वास्थ्य नष्ट होणें कदापि शक्य नाहीं. मग विकासाची गोष्ट तर दूरच राहिली. तेव्हां स्वतःच्या स्वार्थी व दुष्ट अशा एकांगी वाढीनें समस्त जगताचा तोल—साम्यावस्था (Balance) ढांसळून टाकणाऱ्या ह्या अशा मानववंशांच्या रक्तावर व मेंदूवर यथायोग्य ते संस्कार करून त्यांची दुष्ट व नीच प्रकृति आमूलाग्र पालटून टाकणें—त्यांच्या राष्ट्रधर्माच्या संकुचित व अनर्थोत्पातकारी कल्पना नष्ट करून त्यांना मानवधर्मासाठीं [Humanism] सर्वभूतहितेरतत्वासाठीं ह्मणजेच जगत्कल्याण साधून विश्वमंगल करण्यासाठीं, शिक्षित व दीक्षित करणें ही कामगिरी जगच्छांतीच्या व जगद्विकासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाची आहे.

वरील दृष्टीनें विचार करतां मनुष्यमात्राच्या उच्छृंखल पशुवृत्तीला बरोबर स्वाधीन ठेवून त्याला सर्व श्रेष्ठ व स्पृहणीय अशा मनुष्यत्वाच्या पूर्णावस्थेकडे योग्यमार्गानें खेंचून नेण्याचें दिव्य सामर्थ्य इतर संस्कृतींच्या अपेक्षेनें एकल्या एक आर्यसंस्कृतींतच आहे. पाश्चात्य संस्कृतीमुळें प्रस्तुतची मानवजाति इतकी घोर अधःपतनास जात चालली आहे, कीं, ती एकदम सर्वस्वी नष्ट होऊन एखादी 'अति मानवजाति' (Super Human Race) कोठून तरी निर्माण झाल्याविना जगतांत शांतिसौख्य नांदूं शकणार नाहीं, असें थोर थोर पाश्चात्य तत्ववेत्तेहि आतां ह्मणूं लागले आहेत; पण त्यांच्या ह्या 'अति मानवपणा'च्या दृष्टीनेंहि विचार करतां, त्यांचें हें सुखस्वप्न एकटी आर्यसंस्कृतिच खरें करूं शकेल, हें निर्विवाद आहे. पाश्चात्य लोकांनीं आपलें अंतर्गत जीवन अधिक शुद्ध, अधिक व्यापक, अधिक सार्वत्रिक किंवा यथार्थत्वानें ह्मणावयाचें तर खरेंखुरें मानुष आणि या येथील क्षणभंगुर जीवनालाच नव्हे तर परिणत व शाश्वत अशा चिरंतन जीवनाला वाहिलेलें असें बनविण्याकरितां आर्यसंस्कृतीकडेच धांव घेतली पाहिजे, अशी भट्ट मोक्षमुल्लरांची घोषणा आहे. तद्वतच आत्मवंचित, कृत्रिम, क्षुद्र, जड सुधारणांनीं युक्त व अत्यंत तिरस्करणीय अशा जीवनक्रमाला पौर्वात्य व्यापक दृष्टिविना अन्य तरणोपाय नाहीं, असें सुप्रसिद्ध पाश्चात्य तत्ववेत्ता इमर्सनहि म्हणतो *

---

* By the law of contraries, I look for an irresistible taste for Orientalism. For a self-conceited modish life, made up of trifles, clinging to a corporeal civilisation, hating ideas—there is no remedy like the Oriental largeness.—Emerson.

# तुम्हीं हिंदु आहांत याबद्दल अभिमान बाळगा !

· या हिंदुस्थाना ! परक्याचें अर्थशून्य आणि अंध अनुकरण, परावलंबन, अत्यंत दौर्बल्य, असल्या प्रकारचे जडजड धोंडे गळ्यांत बांधून सुधारणेचें आणि वैभवाचें अत्युच्च गिरिशिखर गांठण्याची तुझी इच्छा कधीं तरी सफल होणार आहे काय ? शौर्याला आणि निधड्या छातीलाच जें स्थान प्राप्य तें असल्या नामर्दपणानें तुझ्या हातीं कधीं तरी येणार आहे काय ! या आर्यावर्ता ! सीता, सावित्री, दमयंती हा तुझा स्त्रीत्वाचा आदर्श आहे हें विसरूं नको. तुझा देव त्याग्यांतला त्यागी आहे, हें विसरूं नको. स्मशानवासी शंकराचा तूं उपासक आहेस, हें विसरूं नको. सर्वसंगपरित्यागी आणि शुद्ध भस्मधारी उमापति हाच तुझा देव. विवाह, संपत्ति संतति इत्यादि ऐहिकवस्तु केवळ आपल्या चैनीसाठीं नाहींत हें तूं विसरूं नको. एकाच व्यक्तीच्या सुखासाठीं आपण देह धारण करीत नाहीं, हें तूं विसरूं नको. विश्वजननीच्या सुखाप्रीत्यर्थ तिच्याच स्थंडिलावर स्वतःचें बलिदान देण्यासाठीं आपला जन्म आहे, हें तूं विसरूं नको. तुझी समाज रचना अनंत विश्वव्यापी मातृभावाचें प्रतिबिंब आहे हें विसरूं नको. दरिद्री, अविद्य, अस्पृश्य, चांभार, धेड इत्यादि सारे लोक एकाच रक्तमांसाचे आहेत, एकाच आईचीं हीं मुलें आहेत, आणि या सर्वांत बंधुभाव आहे, हें विसरूं नको. आर्यभूमीच्या शूर पुत्रा, जरा अधिक धैर्यशाली हो. आपला जन्म हिंदमातेच्या पोटीं झाला आहे या गोष्टीचा अभिमान तुला वाटूं दे. 'मी हिंदु आहें आणि प्रत्येक हिंदु माझा भाऊ आहे, असें सदभिमानानें बोलण्यास कचरूं नको. जो हिंदी आहे तो अज्ञ असो, कंगाल असो, ब्राह्मण असो, अथवा वर्णबाह्य पंचम असो तो माझा भाऊ आहे असें धीटपणानें व स्पष्टपणें सांगण्यास भिऊं नको. आर्यमातेच्या दरिद्री पुत्रांनो, तुमच्या कमरेभोंवतीं गुंडाळलेल्या फाटक्या चिंधीवांचून दुसरें वस्त्रहि तुह्मांजवळ नसलें तरी आपण हिंदु आहों असें तुह्मी अभिमानानें ह्मटलें पाहिजे. आह्मी हिंदु आहों, आह्मी सारे हिंदु भाऊ भाऊ आहों, हिंदभूमि हाच माझा जीवभाव, हेंच माझें सर्वस्व, हिंदमातेच्या पूज्य देवदेवता हाच माझा परमेश्वर, हिंदु समाज हा माझा बाल्यदशेतील पाळणा, तोच माझ्या तारुण्यांतील बागबगीचा आणि तोच माझ्या वृद्धावस्थेंतील स्वर्ग, तोच माझी वाराणसी ' असें उच्च घोषानें सर्व जगाला विदित करा. हे हिंदु बांधवहो, ' हिंदुस्थानाची भूमी तीच माझा अत्युच्च स्वर्गलोक, हिंदुस्थानाचें कल्याण तेंच माझें कल्याण' हा मंत्र नित्य जपत जा. ' हे गौरीनाथा, हे विश्वजननी, मला पौरुष दे. हे विश्वशक्ति, माझें दौर्बल्य लयास ने, माझ्या भीरुतेचा नाश कर, मला खरा पुरुषार्थी पुरुष कर ' अशी प्रार्थना नित्य करा.

श्रीमत् स्वामी विवेकानंद.



भविष्यकाली काय घडणार आहे, हें जाणण्याचें सामर्थ्य मला नाहीं; आणि त्याची मी पर्वाहि करीत नाहीं. पण आमची वृद्ध माता पूर्वीच्याहून अधिक तेजानें विलसत असून आपल्या उच्च पदीं पुनः आरूढ झाली आहे, हा देखावा मात्र माझ्या दृष्टीपुढें टळटळीत दिसत आहे. तिनें दिलेला शांतिसौख्याचा आशीर्वाद सर्व जगास पोंचविण्याचें काम तुमचें आहे!

— स्वामी विवेकानंद.

## प्रकरण २ रें.

# हिंदुकरणाचें सनातनत्व.

'इन्द्रं वर्धन्तोऽप्तुरः कृण्वन्तो विश्वमार्यम् । अपघ्नन्तोऽराव्णः' ॥ ऋग्वेद.

(भावार्थ) हे भारतीयांनो सर्वस्वाचें अपहरण करणाऱ्या अनार्यांचा यथेच्छ समाचार घेऊन परमेश्वराच्या सुयशाचा सर्वत्र मोठ्या उत्साहानें व उल्हासानें प्रसार करीत करीत समस्त विश्व 'आर्य' करून सोडा !

सकल विश्वास दुर्गतीच्या दुर्दम्य जाचांतून सोडविण्यास, एकली एक आर्यसंस्कृतीच सर्वसमर्थ आहे, हें सिद्ध झाल्यानंतर तिचा प्रसार सर्वत्र करण्यास झटणें हें ओघतःच प्राप्त होतें. आर्यसंस्कृतीच्या या प्रदानाला व प्रसारालाच हिंदुकरण किंवा शुद्धीकरण असें म्हणण्यांत येतें. अशा या हिंदुकरणाचे प्रयत्न पूर्वापार कसकसे होत आले आहेत, हेंहि पाहाणें अयोग्य वा अनाठायीं होणार नाहीं. कारण पुष्कळांना अद्यापिहि अशी दीर्घ शंका आहे, कीं शुद्धीकरण हे उपटसुंभासारखें आतांच निघालें आहे, तें ख्रिस्ती व मुसल्मानी तत्त्वाची दुसरी आवृत्ति आहे, असला हा धर्मवेडेपणा आपल्या वेदांनीं, शास्त्रांनीं किंवा पूर्वजांनीं कदापीहि मानला नसता, इत्यादि प्रकारच्या या आक्षेपांचें खण्डण करणें आवश्यक आहे. तेव्हां हिंदुकरण हें थोतांड नसून तें पूर्वापार संमानित व शाश्वतीचें श्रेष्ठ तत्त्व कसें आहे हें प्रस्तुत प्रकरणीं पहावयाचें आहे.

अगदीं वेदकालापासूनच प्रारंभ करावयाचा तर 'हे मानवांनो ! आपली जीवितयात्रा सुखशांतिपूर्ण करण्याकरितां, वेदाज्ञांचा अवमान करीत करीत स्वैर संचार करणाऱ्या दस्यूंना (अनार्यांना) योग्य पद्धतीनें शिक्षित करा म्हणजे अधार्मिक कृत्यांचा व वृत्तींचा उच्छेद होऊन सर्वत्र प्रेमसाम्राज्य पसरेल. हे विद्वान् लोकहो ! अधोगतीला जाणाऱ्या पतितांना उत्थापन देऊन पवित्र करा, त्यांना नवजीवन द्या. गर्तस्थापहार

उत देवा अवहितं देवा उन्नयथा पुनः ।
उतागश्चक्रुषं देवा जीवयथा पुनः ॥ ऋ. १०–१३७–१.

इन्द्रं वर्धन्तोऽप्तुरः कृण्वन्तो विश्वमार्यम् । अपघ्नन्तोऽराव्णः ॥ ऋ.
आसंयत–मिन्द्रणः स्वस्तिशंत्रुतूर्याय बृहतीममृध्राम् ।
ययादासान्यार्याणि वृत्राकरो वज्रिन् सुतुकानाहुषाणि ॥ ऋ. ६-२२-१०
अधत्वा विश्वे पुर इन्द्र देवा एकं तव संदधिरे भराय ।
अदेवो यदभ्यौहिष्ट देवान् स्वर्षाता वृणत इन्द्रमत्र ॥
त्वंहनुत्य ददमायो दस्युरेकः कृष्टीरव नो रार्याय ॥ ऋ.

अशा सारखीं कित्येक श्रेष्ठ प्रकारचीं वचनें आढळून येतात. आर्य लोकांची वसाहत जसजशी खालीं पसरत जाऊं लागली तसतसे त्यांना दस्युव्रात्यादिकांचे निरनिराळे अनार्य समाज भेटूं लागले; परंतु त्या समाजांचा किंवा संघांचा पाश्चात्य नीतितत्वाप्रमाणें नायनाट किंवा समूळ उच्छेद न करतां त्या श्रेष्ठ ऋषिमुनिसत्तमांनीं त्यांचें अनार्यत्व नष्ट करुन त्यांना स्वसमाजांत समाविष्ट करुन घेतलें. अथर्ववेदांत तर आर्यांनीं व्रात्यस्तोम संस्कारानें या अनार्यांचें सत्कारपूर्वक समावेशन केल्याचा स्पष्ट उल्लेखच आहे. अनार्य जातींच्या समावेशनाचा तो हृदयंगम इतिहास दृष्टीसमोर आणल्यास ते पुण्यश्लोक वेदवेत्ते ऋषिमुनिजन आपली आर्यसंस्कृति थोर मनानें सर्वांना मुक्तहस्तें देण्यास किती तत्पर असत हें आढळून आल्याविना राहणार नाहीं.

स्मृतिग्रंथांचाहि विचार करितां ज्या स्मृतिकारांनीं ' समस्त पृथ्वी–तलावरील प्राणिमात्रांनीं आप-आपलीं चरित्रें भारतीयांच्या चारित्र्यावरुन बनवून घ्यावीं '—

एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।
स्वंस्वं चरित्रं शिक्षेरन पृथिव्यां सर्वमानवाः ॥ मनु २–२०

अशी स्पृहणीय व अभिनंदनीय घोषणा केली त्यांना पृथ्वी आर्यमय व्हावयास नको होती असें म्हणणें धाष्टर्याचें होणार नाहीं काय ? अर्थात् चातुर्वर्ण्यबाह्य अशा संस्कारविवर्जित लोकांना जे आर्यधर्माची दीक्षा देण्यास उत्सुक होते; ' ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वंगनागमः ' अशासारख्या महापातकांनासुद्धां ज्यांनीं प्रायश्चित्त रुपानें निष्कृति सांगितली आहे, ते स्वधर्मांतील जाणतां किंवा अजाणतां ' असन्मताचा ' अंगिकार करुन पतित झालेल्या माणसाला पुनश्च स्वधर्मांत प्रवेशण्याचा मार्ग रोधून ठेवितील हें कदापि श्रद्धनीय व संभवनीयहि वाटत नाहीं. प्रायः असें कोणतेंच पाप नाहीं कीं ज्याची निष्कृति प्रायश्चित्तानें होत नाहीं. या तत्वावरच स्मृतिग्रंथांतील प्रायश्चित्त विभाग वंदनीय स्मृतिकारांनीं रचला आहे; त्यामुळें छलावलानें व हटातटानें करविलेल्या धर्मांतराचें पाप नष्ट होणार नाहीं, हें शक्य वाटत नाहीं. त्याकाळीं धर्मांतराचा प्रश्न नसल्या कारणानें तशा पापाची स्पष्ट शब्द-योजना उपलब्ध होणार नाहीं हें खरें, तथापि मनूनें वर्णिलेल्या ३९ उपपातकांत ' असच्छास्त्राधिगमनं ' म्हणजे 'नास्तिक्यं' किंवा श्रुतिस्मृतिविरुद्ध 'शास्त्रशिक्षणं' किंवा 'चार्वाकादिग्रंथस्याधिगमः' हें ३४ वें उपपातक

म्हणून सांगितलेलें आहे. याज्ञवल्क्यांनींहि या पातकाची उपपातकांतच गणना केली आहे व ह्या उपपातकांना——

उपपातकशुद्धिः स्यादेवं चांद्रायणेन वा ।
पयसा वापि मासेन पराकेणाथवा पुनः ॥

अशी निष्कृतिहि सांगितली आहे; पण हीहि गोष्ट क्षणभर बाजूला ठेविली तरी ज्या पापांची निष्कृति शास्त्रांत सांगितलेली नसेल त्या पापांचें प्रायश्चित्त देश, काल, वय, शक्ति व पापाचें स्वरुप पाहून द्यावें अशी स्मृतिकारांची स्पष्ट आज्ञा आहे—

अनुक्तनिष्कृतीनां तु पापानामनुपत्तये ।
शक्तिं चावेक्ष्य पापं च प्रायश्चित्तं प्रकल्पयेत् ॥ मनु ११–२०९
अनिर्दिष्टस्य पापस्य तथोपपातकस्य च ।
तच्छुद्धये पावनं कुर्याच्चाद्रायणं समाहितः ॥ बृ० पा० ६–१११
देशः कालं वयः शक्तिं पापं चावेक्ष्य यत्नतः ।
प्रायश्चित्तं प्रकल्प्य स्यादत्र चोक्ता न निष्कृतिः ॥ याज्ञ० ३–२९४.

सामान्य विधिप्राप्त धर्मांचा उपदेश न केलेल्या स्थळीं एकादा द्विजोत्तमहि जो निर्णय देईल तोच परमधर्म समजावा–'एकोऽपि वेदविद्धर्मं यं व्यवस्येत् द्विजोत्तमः । स विज्ञेयः परो धर्मो नाज्ञानामुदितोऽयुतैः' मनु. १२–११३ कारण अशा या धर्मवेत्त्या विद्वान् ब्राह्मणांच्या पवित्र वाणीनेंच कोणत्याहि पातकाची निष्कृति झाल्याविना रहात नाहीं.—

सा तेषां पावनाय स्यात् पवित्रा विदुषां हि वाक् । मनु.

असें भगवान् मनूचें स्पष्ट वचन आहे.

प्रत्येक वर्णाच्या व जातीच्या माणसानें जीवन, व्यवसाय आणि खाद्यपेयादि गोष्टी यासंबंधीं स्मृतिग्रंथांनीं विशिष्ट प्रकारच्या आज्ञा करून ठेविल्या आहेत खऱ्या, पण त्याबरोबरच त्या आज्ञांचें परिपालन सर्वांकडून अगदीं अचुकपणें केलें जाणें संभवनीय नाहीं, हें त्यांस पूर्णपणें विदित होतें. 'भ्रांतिः पुरुषधर्मत्वात्' या न्यायें ज्ञानानें वा अज्ञानानें मनुष्य चुकणारच आणि मग साहजिकच त्या मनुष्याकडून आज्ञापित आचारांचे विरुद्ध आचरण झाल्यामुळें तो मनुष्य 'अशुद्ध' ठरेल व मग ज्ञातिबांधवांशीं व्यवहार करण्यास तो कायमचा अपात्र होईल. मनुष्यमात्राच्या या प्रमादशील वृत्तीचा जर विचार करून ठेविला नाहीं तर आचारकाठिण्यामुळें मनुष्यमात्र त्या धर्मबंधनांतून कायमचाच एका अंगाला सरेल आणि प्रत्यहीं असा एकएक घटक नष्ट होऊं लागला तर कांहीं दिवसानंतर समाजाला अस्तित्वच राहणार नाहीं–संस्कृति रक्षणार्थ घालून दिलेले कायदे पाळण्यास समाजांत व्यक्तीच उरणार नाहीं. मग त्या नियमांचा वा विधिनिषेधांचा उपयोग काय? अशी आपत्ति न यावी म्हणूनच ज्याला आपल्या कृतपापांचा पश्चात्ताप झाला आहे, त्याला त्याच्या पापानुरूप त्या पापांचें परिमार्जन करणारे निरनिराळे प्रायश्चित्तविधि सांगितलेले आहेत. जसेः—

सुरायास्संप्रपानेन गोमांसे भक्षणे कृते ।
तप्तं कृच्छ्रं चरेद्विप्रो मौंजीहोमेन शुद्ध्यति ॥ बृ० यम स्मृ० ५–६

अमेध्यरेतो गोमांसं चांडालान्नमथापि वा ।
यदि भुक्तं तु विप्रेण कृच्छ्रं चांद्रायणं चरेत् । पारा० ११–१
कापिलायाश्च गोर्दुग्ध्वा धारोष्णं यः पयः पिबेत् ।
एष व्यासकृतः कृच्छ्रः श्वपाकमपि शोधयेत् ॥ देवल० ६८
गायत्र्याः शतसाहस्रं सर्वपापहरं स्मृतम् । बृ० पा० ६–२९१.
स्वर्णदानं च गोदानं भूमिदानं गवाह्निकम् ।
विप्रेभ्यः संप्रयच्छेत प्रायश्चित्ती विशुद्ध्यति ॥ देवल० ७३.
अनाविष्कृतपापास्तु जपैर्होमैश्च शोधयेत् । अ० स्मृ० ११–१२६.
बलाद्दासीकृतो म्लेच्छैश्चाण्डालाद्यैश्च दस्युभिः ।
अशुभं कारितं कर्म गवादिप्राणिहिंसनम् ॥
उच्छिष्टमार्जनं चैव तथा तस्यैव भक्षणम् ।
तत्स्त्रीणां च तथा संगस्ताभिश्च सहभोजनम् ॥
कृच्छ्रान् संवत्सरं कृत्वा सांतपनान् शुद्धिहेतवे ।
ब्राह्मणः क्षत्रियस्त्वर्धकृच्छ्रान् कृत्वा विशुद्ध्यति ॥ आपस्तंब०

इत्यादि वचनांवरून प्रायश्चित्तांचे भिन्न भिन्न प्रकार कळून येतात; परंतु मनुष्यस्वभावाची कल्पनातीत परीक्षा असणारे ते श्रेष्ठ स्मृतिकार ततकृच्छ्र, चांद्रायण, इत्यादि पापनिष्कृतीच्या प्रकारावरच थांबले नाहींत. कदाचित् मनुष्यप्राणी या कठिणतर तीव्र प्रायश्चित्तांना भिऊन निरुपायानें पुनश्च आपल्या व्यवसायांत रत होईल म्हणून 'ज्याला जाणतां किंवा नेणतां घडलेल्या पापकर्माबद्दल खेद होत आहे, ज्याला तीव्र संताप झाला आहे, त्यानें मी पुनरपि असें कृत्य करणार नाहीं एवढें मनःपूर्वक म्हटल्यास त्याची त्या पापापासून निवृत्ति होते, तो शुद्ध होतो—

अज्ञानाद्यदि वा ज्ञानात् कृत्वा कर्म विगर्हितम् ।
तस्माद्विमुक्तिमान्विच्छन् द्वितीयं न समाचरेत ॥ ११–२३२.
कृत्वा पापं हि संतप्य तस्मात् पापात् प्रमुच्यते ।
नैवं कुर्यां पुनरिति निवृत्त्या पूयते तु सः ॥' मनु०११–२३०.

अशी स्पष्टोक्ति करून ठेविली आहे. अनाचारोद्भव पापकर्मांनीं पश्चात्तप्त झालेल्या अशा व्यक्तींचा त्या त्या ज्ञातींनीं अंगिकार केला व ब्राह्मणांनीं कृपानुग्रह केला म्हणजे त्यांचीं सर्व पाप–किल्मिषें ल्याला जातात.

अंगीकारेण ज्ञातीनां ब्राह्मणानुग्रहेण च ।
पूयन्ते तत्र पापिष्ठा महापातकिनोऽपि ये ॥
अत्रि० स्मृ० २७४.

परंतु अशा या प्रायश्चित्त घेऊं इच्छिणाऱ्या आलें माणसांना जर कोणीं प्रायश्चित्त दिलें नाहीं तर या व्यक्तीचें पाप त्यांच्याहि वांट्याला आल्याविना राहणार नाहीं.

आर्तानां मार्गमाणानां प्रायश्चित्तानि ये द्विजाः ।
जानन्तो न प्रयच्छन्ति तेऽपि तद्दोषभागिनः ॥ प्रा० कदंब

किंवा ज्ञातींत समावेश न केलेल्या माणसाकडून जें पाप होईल त्याचीहि जबाबदारी सर्वथा त्या ज्ञातीवर व समाजावरच आहे.

ज्ञातित्यक्तो हि कुरुते पापं ज्ञातिविवर्जितः ।
तत्पापं ज्ञातिबंधूनां जायते मनुरब्रवीत् ॥

ही भगवान् मनूनें केलेली महत्वाची आज्ञा लक्षांत घेण्यासारखी आहे. तथापि ही श्रेष्ठांची आज्ञा दुर्दैवानें यथोचित पद्धतीनें पार न पाडली गेल्यामुळें ज्ञानानें वा अज्ञानानें फसल्या गेलेल्या व्यक्तींकडे, त्यांच्या पापाची निष्कृति न करविल्यामुळें, ते त्या पापी अवस्थेंतच राहिले; कालांतरानें त्यांचा संस्कारलोप झाला, व पौंड्र, चौंड्र, द्रविड, कांबोज, यवन, शक, पारद, पल्हव, चीन किरात, दरदादिक क्षत्रिय जाती म्लेंच्छतेप्रत गेल्या व त्यांनींच आपल्या पाहिल्या समाजाचें कट्टर शत्रुत्व पत्करून हिंदुसमाज व हिंदुसंस्कृति नामशेष करण्याचे प्रयत्न चालविले. त्याचें प्रायश्चित्त सद्यःकालींहि भारतवर्षीयांस भोगावें लागत आहे.—

पौंड्रकाश्चौड्रद्रविडाः कांबोजा यवनाः शकाः ।
पारदाः पल्हवाश्चीनाः किराता दरदाः खशाः ॥
शनकैस्तु क्रियालोपादिमाः क्षत्रियजातयः ।
वृषलत्वं गता लोके ब्राह्मणाऽदर्शनेन च ॥ मनु० १०–४३–४४.

उपरोक्त सर्व विवेचन, वंदनीय स्मृतिकारांचा आशय सुव्यक्त करण्यास सर्वथैव पुरेसें आहे, असें वाटतें.

स्मृतिग्रंथांतील उपरोक्त वचनांप्रमाणेंच पुराणांतूनहि पापाची निष्कृति करण्याचे प्रकार आढळून येतात; पण त्या पापाचें प्रायश्चित्तविधान अत्यंत सुलभ असें सांगितलेलें आहे. पुराणाचें उद्दिष्ट किंवा सारसर्वस्व पाहूं गेल्यास मानवाची अध्यात्म ज्ञानाकडे प्रवृत्ति करावी, हेंच आहे. या दृष्टीनें प्रत्येक पुराणांतून भिन्न भिन्न देवतांचीं आध्यात्मिक रहस्यानें परिपूर्ण भरलेलीं अशीं अनेकविध कथानकें रचलेलीं आहेत. त्या देवता म्हणजे अमूर्त ब्रह्माकडे निरनिराळ्या दृष्टीनें पाहिल्यामुळे उत्पन्न झालेलीं मूर्त वा सगुण स्वरूपें होत. अशा सगुण देवतांच्या ठायीं एकनिष्ठापूर्वक निःसीम प्रेम जागृत झाल्यानें मनुष्याची पापप्रवृत्ति नष्ट होऊं लागून तो उन्नतावस्थेस जाऊं लागतो. श्रद्धापूरित अंतःकरणाच्या परमेश्वरार्थी झालेल्या तादात्म्यभरानें मानवाला ज्ञानप्राप्ति होते व ज्ञानानें पापक्षय होतो. ही कारणपरंपरा लक्षांत घेऊनच पुराणकारांनीं समस्त पातकांचा अपहार करण्यास त्या त्या देवतांची निष्ठापूर्वक भक्ति करावयास सांगितली आहे. देवभक्तीचा हा ‘ सुलभ उपावो ’ तप्तकृच्छ्रादि प्रायश्चित्तविधीपेक्षांहि विशेषत्वानें पापहारक आहे; किंवा हरिस्मरण अथवा श्रद्धापूर्वक केलेला शिवाश्रय, तद्वतच गंगास्नान हीं सर्व ज्याप्रमाणें गरुड सर्पांना निर्विष करतात त्याप्रमाणें मानवांचीं पापविषें दग्ध करून टाकतात, अशी पुराणकारांची स्वानुभूति आहे:—

प्रायश्चित्तानि सर्वाणि तपःकर्मात्मकानि वै ।
यानि तेषामशेषाणां कृष्णानुस्मरणं परम् ॥ वि. पु. २-६-३७
वेदमार्गबहिष्ठानां जनानां पापकर्मणाम् ।
मनःशुद्धिविहीनानां हरिनाम्नैव निष्कृतिः ॥ नारद पु० ६
दुराचारोऽपि सर्वाशी कृतघ्नो नास्तिकः शठः ।
समाश्रयेदादिदेवं श्रद्धया शरणं हि यः ॥
निर्दोषं विद्धि तं जंतुं प्रभावात् परमात्मनः ॥ स्कं. पु.
भवन्ति निर्विषाः सर्पा यथा तार्क्ष्यस्य दर्शनात् ।
गंगाया दर्शनात्तद्वत् सर्वपापैः प्रमुच्यते ॥ वि. पु.

भगवंताच्या दर्शनस्मरणानें जर महाघोर पापांचा चुराडा उडतो तर म्लेंच्छसंसर्गोद्भवपातित्य यांसारख्या उपपातकांचा केव्हांच नायनाट होऊन जात असेल, हें काय सांगावयास पाहिजे ? साहजिकच किरात, हूण, आंध्र, पुलिंद, पुक्कस, आभीर, कंक, यवनादि म्लेंच्छतेप्रत गेलेल्या जाती ज्या भगवान् विष्णूच्या नामस्मरणानें पवित्र होतात त्या प्रभावशाली विष्णूच्या ठायीं सर्वजण विनम्र व्हावेत यांत नवल नाहीं. म्हणूनच श्रीभागवतांतः—

किरातहूणांध्रपुलिंदपुक्कसा आभीरकंका यवनाः खसादयः ।
येऽन्ये च पापा यदपाश्रयाश्रयाः शुद्ध्यन्ति तस्मै प्रभविष्णवे नमः ॥

किंवाः—

ब्रह्महा पितृहा गोघ्नो मातृहाऽऽचार्यहाऽघवान् ।
श्वादः पुल्कशको वापि शुद्ध्येरन् यस्य कीर्तनात् ॥ भा.

तद्वतचः—

श्वपच शवर खल यवन जड, पामर कोल किरात ।
राम कहत पावन परम, होत भुवनविख्यात ॥ तुलशी. रा.

असा उल्लेख केलेला आढळतो. एवढेंच नव्हे तर 'भगवन्नामसंकीर्तनं शुद्धिजनकम्' (भाग०स्कं. ६) या भागवतांच्या उपदेशाप्रमाणें कित्येक थोर पुरुषांनीं परधर्म स्वीकारलेल्या व्यक्तींना पुनश्च स्वधर्मप्रवेश करून दिल्याचीं अनेक उदाहरणें आढळून येतात. सरस्वती देवीच्या आज्ञेनें कण्वऋषि मिश्र (मिसर) देशाला जाऊन तेथें त्यांनीं १०००० दहा हजार म्लेंच्छांना आपली संस्कृति दिली, असें भविष्यपुराणांत म्हटलें आहे.

सरस्वत्याज्ञया कण्वो मिश्रदेशमुपाययौ ॥
म्लेंच्छान् संस्कृत्य चाभाष्य तदा दशसहस्रकान् ॥ भविष्य पु. प्रति. स. प. ४-२१-१६

जेव्हां मुसलमानांनीं भारतवर्षावर आक्रमण करून जगन्नाथ, अयोध्या, कांचीपूरी हरिद्वार, काशी आदिक स्थानांतील पवित्र मंदिरें उध्वस्त केलीं तेव्हां त्या भीषण आपत्तीला तोंड देण्याकरितां श्रीकृष्णचैतन्यांचे शिष्य प्रमुख प्रमुख स्थानीं पाठविले गेले. त्याचप्रमाणें रामानंदांचे शिष्यहि अयोध्येला गेले व तेथें यांनीं महंमदी मताचें खंडण करून बाटविलेल्या लोकांना वैष्णव धर्माची दीक्षा दिली. शुद्धिकर्तांत

त्रिशूलाकार गंध लावण्यांत आलें व गळ्यांत तुळशीच्या माळा चढविल्या. अशाप्रकारें सर्वांच्या मुखांतून निघणाऱ्या रामनामस्वरानें अयोध्या वैष्णवमय करून सोडली. कृष्णचैतन्यांचे दुसरे शिष्य निंबादित्य कांचीपुरीला, विष्णुस्वामी हरद्वाराला, व वाणिभूषणादिक काशीकडे जाऊन त्यांनीं लाखों मुसल्मानांना रामनामाची दीक्षा देऊन स्वधर्मीत घेतलें.

श्रुत्वा ते वैष्णवाः सर्वे कृष्णचैतन्यसेवकाः ।
दिव्यं मंत्रं गुरोश्चैव पठित्वा प्रययुः पुरीम् ॥
रामानंदस्य शिष्यो वै चायोध्यायामुपागतः ।
कृत्वा विलोमं तं मंत्रं वैष्णवांस्तानकारयत् ॥
भाले त्रिशूलचिह्नं च श्वेतरक्तं तदाऽभवत् ।
कंठे च तुलसीमाला जिह्वा राममयी कृता ॥
म्लेच्छास्ते वैष्णवाश्चासन् रामानंदप्रभावतः ।
आर्याश्च वैष्णवा मुख्या अयोध्यायां बभूविरे ॥
निंबादित्यो गतो धीमान् सशिष्यः कांचिकापुरीम् ।
म्लेच्छयंत्रं राजमार्गे स्थितं तत्र ददर्श ह ॥
विष्णुस्वामी हरद्वारे जगाम स्वगणैर्वृतः ।
तत्रास्थितं महामंत्रं विलोमं तं चकार ह ॥ भ. पु. प्र. प्र. ४२१

येथवर श्रुतिस्मृति–पुराणांतरींच्या विचारांचें अल्पसें समालोचन केल्यानंतर प्रत्यक्ष इतिहासकालाकडे दृष्टी टाकली असतां तेथेंहि हिंदूकरणानिमित्त झालेले अनेक प्रयत्न आढळून येतात; त्यांतीलहि कांहीं ठळक ठळक प्रयत्नांचें अल्पसें विवेचन करणें अवश्यक आहे.

भरतखंडांत प्रथम द्राविडी, कोलारी, संथाल, भिल्ल इत्यादि अनार्यजाती रहात होत्या. त्यांमध्यें आर्यलोकांनीं येऊन वसाहती केल्या व त्या प्राचीन जातींना सुसंस्कृति देऊन स्वधर्मांत कसें समाविष्ट केलें हें मागें सांगितलेंच आहे. आर्यलोकांच्या या वसाहती भारतवर्षांतून बाहेरहि होऊं लागण्यास अति दीर्घ कालापासून प्रारंभ होऊं लागला होता. त्याला अनुसरूनच भारतीय महायुद्धानंतर अनेक क्षत्रिय जाती थोडयोडया ब्राह्मणांसह देशत्याग करून परदेशांत वसाहतीस गेल्या व त्यांनीं इराणापासून इंग्लंडपर्यंतच्या पश्चिम भागांत सर्वत्र स्वकीय उज्वल संस्कृतीचीं बीजें पेरून ठेविलीं. पूर्वेकडील वसाहती ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान, जावा, सुमात्रा वगैरे बेटें व अमेरिका यांत झाल्या. उत्तरेकडच्या तुर्कस्थान, सायबेरिया, स्कांदिनेव्हिया, जर्मनी, ब्रिटन, इराण, ग्रीस व रोम, या भागांत आणि पश्चिमेकडील पूर्व आफ्रिका व इजिप्त यांत झाल्या. हें त्या त्या लोकांचें तत्त्वज्ञान, धर्मसमजुती, राज्यसंस्था, चालीरीति गुण, स्वभाव, भाषा, पोषाक, समाजरचना, प्राचीन पौराणिक कथा इत्यादि गोष्टी पाहून व अभ्यसून मोठमोठया पंडितांनीं निश्चित केलें आहे. या वसाहती कसकशा होत गेल्या व संस्कृतीचा प्रसार कशा कशा मार्गानें व पद्धतीनें झाला, हें अडाणी, दुराग्रही व निर्दय अशा विधर्मी राजांच्या हमामखान्यांत

प्राचीन वाङ्मय धर्मांधतेनें जाळून टाकल्यामुळें सांगोपांग पद्धतीनें सांगतां येण्यासारखें नाहीं आणि उपलब्ध असलेली अल्पस्वल्प माहिती विस्तारानें सांगायाचें हें स्थळहि नव्हे. तथापि आतां हें सुनिश्चित झालें आहे, कीं, सर्व पृथ्वीतलावर एकेकाळीं भारतीय संस्कृति पसरविण्यांत आली होती; पण पुढें पुढें तिचा मूळ संस्कृतीशीं संबंध तुटून गेल्यानें त्यांच्या आचारविचारांत फेरफार झाला व संस्कारलोप होऊन त्या सर्व जाती आर्यधर्मास व त्याच्या समाजव्यवस्थेस कायमच्या अंतरल्या. एतद्विषयींच्या मनुस्मृतींतील मागें दिलेल्या उल्लेखाप्रमाणेंच महाभारतांतहि खालीलप्रमाणें उल्लेख आढळतो-

यवनाः किराता गांधाराश्चीना शबरबर्बराः ।
शकास्तुषाराः कंकाश्च पल्हवाश्चांध्रमद्रकाः ॥
पौंड्राः पुलिंदरामठाः कांबोजाश्चैव सर्वशः ।
*ब्रह्मक्षत्रप्रसूताश्च वैश्याः शूद्राश्च मानवाः ॥*

शांतिपर्व० ६५,१,१२

त्याचप्रमाणें विष्णुपुराणांतहि अशी आख्यायिका आली आहे, कीं, सगरानें आपला पिता बाहुक याचेबद्दल सूड उगविण्याकरितां सर्व हैहयवंशाचे लोक ठार मारले. शक, यवन, कांबोज पारद व पल्हव यांवरहि ह्याच प्रसंग येऊन ठेपला. तेव्हां ते सर्व वसिष्ठास शरण गेले ह्मणून वसिष्ठांचे आज्ञेवरून *सगरानें त्यांचें वेदाध्ययन व वषट्कार यांस बंदी केली आणि यवनांनीं शीर मुंडावें, शकांनीं निम्में* डोकें मुंडावें, पारदांनीं डोक्याचे केस सबंध ठेवावे व पल्हवांनीं दाढ्या राखाव्या, अशी आज्ञा करून त्यांस आर्यसमाजांतून हाकलून लावलें—

स तथेति तद्गुरुवचनमऽभिनंद्य तेषां वेषान्यकारयन् ।
यवनान्मुंडितशिरसोऽर्धमुंडा—छकान् ॥
केशान् पल्हवाँश्च श्मश्रुधरान् निःस्वाध्यायवषट्कारान ।
एतानन्याँश्च क्षत्रियाँश्चकार ॥
ते चात्मधर्मपरित्यागात्ब्राह्मणैश्च परित्यक्ताः म्लेच्छतां ययुः ॥ वि. पु.

या वरील उल्लेखावरून हे सिद्ध होतें कीं, सध्या विधर्मी ह्मणून वावरणाऱ्या जाती एककाळीं आर्यवंशीच होत्या, अर्थात् प्राचीनकाळीं त्या तपोधन व धर्मप्रेमळ पूर्वजांनीं स्वपराक्रमानें आपली संस्कृति किती दूरवर पसरविली होती, हें स्पष्टपणें निदर्शनास येतें.

उपरोक्त प्राचीन वसाहती करणाऱ्या पूर्वजाप्रमाणेंच बौद्धधर्मीय लोकांनींहि आपल्या संस्कृतीचा विस्तार सर्व जगभर केला. प्रस्तुतकाळीं ब्रह्मदेश, सयाम, हिंदी आर्चिपेलागोमधील बहुतेक बेटें, सिंहलद्वीप, तिबेट, मंगोलिया, चीन, जपान, नेपाळ, भूतान इत्यादि ठिकाणीं बौद्धधर्माचें अस्तित्व निदर्शनास येत आहे. कौंटजार्नेस्टजर्ना ह्मणतो ' आसाम, पेगू व सीलोन येथें बुद्धास गोदाम ह्मणतात. सयामांत समन, जपानांत अभिधुद्द, चीन कोरियामध्यें फो अथवा फाहि, बंगाल व नेपाळमध्यें शाक्यसिंग, भूतानमध्यें धर्मराय, आणि तिबेटमध्यें शाक्यमुनि अशीं गौतमबुद्धास देशपरत्वें भिन्न भिन्न नांवें आहेत. या एकदोन गोष्टी

वरूनच बौद्धधर्मप्रसाराची किंचित् कल्पना येऊं शकते. शाक्यगौतमानें सत्यान्वेषणाकरितां राज्याचा त्याग करून भिक्षूंचीं पिवळीं वस्त्रें परिधान केलीं, त्या दिवसापासून सम्राट् अशोकाच्या कारकीर्दींत बौद्ध धर्मीयांची भरभराट होऊन तो अभ्युन्नतीच्या शिखरास पोहोंचेपर्यंतचा वैभवशाली इतिहास भारतीयांना अभिमानास्पदच आहे. तथापि जैन व बौद्धधर्म यांच्या प्रसारामुळें वैदिक परंपरा बुडून सर्वत्र पाखंड कसें संचरलें आणि अशा त्या बिकट प्रसंगीं भगवान् आद्य शंकराचार्यांनीं आपल्या दिव्य तपःसामर्थ्यानें व अलौकिक बुद्धिवैभवानें नास्तिक पंथवाल्यांच्या आहारीं पडलेला सर्व हिंदुसमाज पुनश्च वैदिक धर्मांत कसा समाविष्ट केला, एवढेंच नव्हे तर बौद्धधर्माचा अनुयायी त्या धर्माच्या जन्मभूमींतच दुर्मिळ कसा झाला हें गतप्रकरणीं सांगितलेंच आहे. भगवान् शंकराचार्यांनीं घडवून आणलेली ही महनीय धर्मक्रांति त्यांच्या लोकसंग्रहकारक परमन्यायी व उदार अंतःकरणाची उज्ज्वल साक्ष देत आहे.

वरीलप्रमाणें बौद्ध धर्मीयांचें समावेशन सनातन धर्मांत केलें गेल्यानंतर हिंदूंचें सर्वस्वापहरण करणाऱ्या महंमदी धर्मीयांच्या भयंकर स्वाऱ्या सुरू झाल्या. यापूर्वी इराणचा राजा डरायस हिस्टेस्पेस्, शिकंदर, बॅक्ट्रिया देशांतील ग्रीक सत्ताधीश, तुराणी, आरब, तार्तर, हूण शक इत्यादि अनेक परकीय शत्रूंनीं भरत खंडावर स्वाऱ्या केल्या, तथापि हर्षराजाच्या अंतापर्यंत या परस्थांचें पाऊल आर्यावर्तांत रोऊं शकलें नाहीं, व त्यांच्या स्वाऱ्यांचा विशेष अनिष्ट परिणाम भारत वर्षास भोंवला नाहीं; कारण आक्रमण करणारांचें लक्ष बाहेर जाण्याकडेच असे, व युक्तमारून ज्यांची येथें वस्ती होत असे त्यांना हिंदुसमाजांत आत्मसात् करण्यांत येत असे. अशा प्रकारें त्यासमयीं कित्येक व्यक्तींना किंबहुना जातींच्या जातींना स्वधर्मांत प्रविष्ट करून घेतल्याचीं अनेक उदाहरणें उपलब्ध झालीं आहेत व होत आहेत. त्यांपैकीं कांहीं खालीं देत आहोंत.

ग्वाल्हेर प्रांतांतील भिल्सा शहराजवळ बेसनगर या गांवीं 'हेलिओडोरस' नांवाच्या ग्रीक (यवन) माणसानें त्याला हिंदुधर्माची दीक्षा दिल्यानंतर एक गरुडस्तंभ उभारलेला मिळाला आहे.

ह्या गरुडध्वजावर कोरलेल्या शिलालेखांत म्हटलें आहे कीं, "मध्यदेशांत नामी राज्यांत राहणारा महाराज अन्त लिकिताकडून राजात्राता कासीपुत्र भागभद्र याचेकडे आलेला तो यवन जातीचा वकील तक्षशिला येथें मूळचा राहाणारा हियाचा पुत्र असा जो भागवत धर्मीय हलि ओदोर त्यानें देवांचा देव जो वासुदेव त्याचा हा गरुडध्वज येथें (आपल्या) नवीन धर्माच्या उपदेशासाठीं करविला आहे."

या शोधाप्रमाणेंच प्राचीनकाळीं कित्येक ग्रीक व इतर राजांनीं आर्यांच्या वैदिक धर्माचा स्वीकार केला असल्याचीं व त्यांचें समावेशन पूर्वजांनीं मोठ्या आनंदानें केल्याचीं अनेक ऐतिहासिक प्रामाण्यें देऊन डॉ. भांडारकर यांनीं १९०९ च्या सुमारास दिलेल्या आपल्या एका व्याख्यानांत सिद्ध करून दाखविलें आहे.

त्याप्रमाणें सम्राट् अशोकाच्या ज्या एका शिलालेखाच्या आधारें डॉ. भांडारकर यांनीं ग्रीकांनाच यवन म्हणत हें सिद्ध केलें आहे, त्या लेखांतील उल्लेखित 'अंतिओक, तुरमाय, मक, आलिकसुंदर, अतिकिनी ज्यांना इंग्रजी मार्फत Antiochos,s Soter king of syria, Ptolemy, Philadelphos king of Egypt, Antigonos Gonatos king of Macedonia

Alexandar king of ephisus ) असें अनुक्रमें म्हणतात. या राजांना आर्यधर्मांत समाविष्ट करून घेतलें होतें. इ. स. पूर्वी ११० वर्षी पंजाब काबूलवर राज्य करणारा मिनियेंडर Menander नांवाच्या यवन राजालाहि धर्मप्रवेश दिला जाऊन त्याचें नांव मिलिंद असें ठेविलें होतें व त्याच्या शिक्यावर धर्मचक्र असे. पालीभाषेंतील शिलालेखांवरून हें दिसून येतें कीं, यवनांना धर्मदीक्षित केल्यानंतर सिंह, धैर्य, धर्म, या शब्दार्थांचीं नांवें त्यांस ठेवण्यांत येत असत. नाशिक गुंफेतील शिलालेखांत विष्णुदत्ता नांवाच्या शक जातीच्या राणीनें धर्मस्वीकार केल्याचा उल्लेख आहे. जुन्नर येथील शिलालेखांत एका 'इरिला' नांवाच्या यवनस्त्रीनें हिंदुधर्मप्रवेश केल्यानंतर तेथील मंदिरासाठीं २ कुंडें बनविलीं, असें म्हटलें आहे.त्याचप्रमाणें कार्ल्याच्या गुंफेंतील 'धेनुकाकटा' यवनानें ज्याचें हिंदु नांव धम्मा ठेविलें होतें त्यानें ही भेट दिली,असा उल्लेख आहे.

भारत वर्षाच्या उत्तरेकडून आलेल्या तुरुष्क व कुशान जातींतील 'केडफिअस्' राजानें शैव मताचा स्वीकार केला होता. त्याचें हिंदुनांव नहपान ठेविलें होतें. त्याच्या शिक्क्यावर शिवमूर्ति असे. कुशान वंशीय राजानांहि ब्राह्मणधर्मानुयायी बनविलें व त्यानींहि शैवमत व संस्कृतभाषा यांचा बराच प्रसार केला असें सुप्रसिद्ध आंग्ल इतिहासज्ञ स्मिथ साहेब ह्मणतात.

पांचव्या शतकांत हूण जातीचे राजे काश्मिरपासून माळव्यापर्यंत राज्याधिकार चालवीत होते. हर्षवर्धन शिलादित्यानें त्यांचा पुढें पराभव केला. ते पुष्कळ दिवसपर्यंत भारत वर्षांत राहिल्यानें व हिंदुधर्माप्रमाणे वागूं लागल्यानें, त्यांची जात क्षत्रियजातींत समाविष्ट झाली. छत्तीसगढ चेदीच्या कर्णदेव राजानें हूणकन्या अहल्या देवीशीं लग्नसंबंध केला व अद्यापिहि ही हूण जात पवार रजपुतांची एक जात ह्मणून मानली जाते. हुणांबरोबर आलेले मैत्रिक–मिहर मेर तद्वतच क्षत्रप आभीर, आहीर कांबोजी ( कम्बो ) इत्यादि लोक त्या त्यावेळीं आर्यधर्मांत समाविष्ट करून घेतल्याचे दाखले आढळतात. इराणच्या आसमंतात् राहणारे 'मग' नांवाचे कांहीं लोक बंगाल व राजपुताना येथें वसाहतीस आले.त्यांना शांब राजानें चीनाब नदी किनारीं उभारलेल्या आपल्या मंदिरांत पूजावृत्ति दिली. तेव्हांपासून या मगी लोकांनीं आपली इतकी उन्नति करून घेतली, कीं,वराहमिहिराच्या वेळेला सूर्यदेवतेची स्थापना करण्याचा अधिकार फक्त त्यांनाच देण्यांत आला होता. स्कंद पुराणावरून व शिलालेखांवरून हें सिद्ध होत आहे, कीं, प्रस्तुत लोक शाकद्विपांत रहात असत, आणि शांबराजानें भोजवंशीय यादवांच्या कन्यांशीं त्यांचा शरीरसंबंध करून दिला. मगलोक जादुटोण्यात प्रवीण असत. मारवाड प्रांतांत त्यांना सेवक म्हणतात. गुर्जरादिक लोकांविषयीं अशीच हकीकत आहे. कै. पां. दा. गुणे यांनीं मराठीचा उत्पत्तिकाल या संबंधीं विवेचन करतांना म्हटलें आहे कीं, 'अंतस्थ विचारक्रांति व अन्य भाषेंतून विचार घेणें एवढें कारण एक भाषा मरून तिच्या जागीं दुसरी नवी उत्पन्न होण्याला बिल्कुल पुरेसें नाहीं. यथायोग्य कारण ह्मणजे भिन्नसंस्कृतीच्या दोन मानववंशांची टक्कर होऊन त्यांपैकीं एकावर दुसऱ्यांत मिसळून जाण्याची पाळी येणें, हें होय. ८ व्या शतकांतील आरबांनीं स्वारी जलमार्गें सिंध कछ येथें प्रथम झाली. १० व्या शतकांचे दोवर्षी फ्राभूपलीकडे तर त्याची सत्ता कायम झालीच; पण तिच्या अलीकडेहि ते घुसूं लागले यामुळें तेथील आर्य येऊन वसलेल्या क्षत्रियकुळांमध्यें खळबळ उडून आत्मसंरक्षणासाठीं त्या दक्षिणेकडे व पूर्वेकडे जाऊन हिंदूलोकांत मिसळल्या. कांहींनीं राज्येंहि स्थापिलीं. या कुळ्या गुर्जर, परमार, चालुक्य, चव्हाण



"आमच्या लोकांस एवढाच प्रश्न आहे की, तुमच्या डोळ्यांदेखत उघडपणें तुमच्या मुलीबा[illegible] बाटत असतां तुमच्यानें गप्प बसवतें तरी कसें? असल्या फसवून बाटविलेल्या मुलांस अथवा मुलीं[illegible] परत धर्मांत घेण्याचा तुम्हांस कांहीं मार्ग काढतां येत नाही काय? तुमचा धर्म असाच एकलकोंडा रा[illegible] त्यास तो या शतकांत केव्हां तरी लुप्तप्राय होण्याचा प्रसंग येणार नाहीं काय? आणि इतकें असून [illegible] तुम्ही गप्प बसतां तर धन्य आहे तुमच्या अभिमानाची आणि विद्वत्तेची. दुसरें काय? आमच्या म[illegible] या प्रश्नाचा ठिकठिकाणच्या गृहस्थांनीं दूरवर दृष्टि देऊन विचार केला पाहिजे."

—लोकमान्य बाळ गंगाधर टिळक.




" बावीस कोटी लोक, ज्यांची हिंदुस्थान ही कर्मभूमी आहे, पितृभूमी आहे आणि पुण्यभूमी आहे, ला दिव्य इतिहास ज्यांच्या मागें उभा आहे, एक रक्त आणि एक संस्कृति ह्यांच्या सर्वसामान्य बंधनांनी बद्ध आहेत, असले हे बावीस कोटी हिंदु लोक, सर्व जगाला आपलें म्हणणें ऐकावयाला लावतील. असा दिवस उगवणार आहे की, ज्या वेळीं हें सामर्थ्य, जगाच्या प्रत्ययास येणार आहे. "

—बॅ. विनायकराव सावरकर.

इत्यादींच्या होत. गुर्जर चालुक्य यांच्या कांहीं टोळ्या आधीं एकदा हूणांच्या बरोबर आंत घुसल्या होत्या. त्यांनीं गुजराथेंत व महाराष्ट्रांत राज्येंहि केलीं; पण त्यांचें मोठ्याप्रमाणांत प्रयाण ९ शतकानंतर झालें. हें चालुक्य राज्य गुजराथेंत स्थापन झाल्यावरच गुजराथेंत त्यांना 'गुर्जर' हें नांव मिळालें. आधींच्या गुर्जरांच्या वेळीं मिळालें नव्हतें. यावरून व महाराष्ट्रांत 'कल्याणकटक' यासारखीं आपल्या पूर्वींच्या वसतिस्थानांचें स्मरण करून देणारीं स्थळें दुसऱ्या चालुक्यांनीं (रैलपांनीं) स्थापिलीं, त्यांवरूनहि दिसून येतें. हे गुर्जर, परमार, चालुक्य, चव्हाण मुळचे हिंदु नव्हते, हें डॉ. दे. रा. भांडारकर यांनीं चांगलें दाखविलें आहे. यावरून हें सिद्ध होतें कीं, इ. स. ९ शतकाच्या शेवटापासून पुढे परमार चालुक्य चव्हाण इत्यादि क्षत्रिय कुळें हिंदुस्थानभर (कानडा तैलंगण व खालचे प्रांत वगळून) पसरलीं तीं अन्य-धर्मीय, अन्य संस्कृतीचीं व अन्य भाषेचीं होतीं. ते जेथें जेथें गेले तेथील लोकांची व त्यांची सळ-मिसळ होऊन ते कायमचे मिळून जाण्याच्या धामधुमींत नव्या भाषा उत्पन्न होण्यासारखी परिस्थिति प्राप्त झाली होती. (इ. मंजरी) या सर्व गोष्टींवरून पूर्वजांचा इतर लोकांना आपल्या धर्मांत समाविष्ट करून घेण्याचा उदार स्वभाव कसा होता हें समजून येतें. प्रस्तुत कालच्या भिन्न भिन्न जातींची उत्पत्ती पाहिली तरीहि या सिद्धांताला बळकटीच येईल. मस्तिष्क शास्त्रवेत्त्यांनीं नानाविध जातींच्या मेंदूंवरून व डोक्यांच्या कवचावरून असें निश्चित केलें आहे, कीं, बंगाली लोकांत मंगोलियन व द्राविड रक्ताचें मिश्रण आहे; संयुक्तप्रांतांत व ओरिसामध्यें आर्य-द्राविडांचें मिश्र रक्त आहे; मद्रास व मुंबई प्रांतांत शकांचा व द्राविडांचा संगम आहे आणि त्याचप्रमाणें पंजाबमध्येंहि आर्य व कित्येक अनार्य जातींचें संमिश्र रक्त आहे. सर्व भरतखंडावर दृष्टि फेंकल्यास आढळून येतें कीं, भिन्न भिन्न आचारांच्या व चालीरीतींच्या हजारों जाती येथें नांदत आहेत, आणि त्यांपैकीं पुष्कळांचा उगम विजातीय लोकांच्या संसर्गापासूनच आहे; पण त्यांनीं येथील भाषा, आचारविचार व संस्कृति यांचा अंगीकार केल्यानें त्या सध्या हिंदुसमाजाशीं अगदीं समरस किंवा एकजीव होऊन गेल्या आहेत, ही एकच गोष्ट हिंदुधर्माचा थोरपणा व उदारपणा स्पष्टपणें निदर्शनास आणीत आहे.

असो. याप्रमाणें हर्ष राजाच्या कालापर्यंत आर्यांची जयिष्णु मनोवृत्ति स्पष्टपणें प्रतीत होत आहे; परंतु यापुढें धर्मांध व स्वार्थांध मुसल्मान लोकांच्या स्वाऱ्यांत हिंदूंच्या छळणुकीला अत्युग्र स्वरूप आलें; व महंमद कासीम, गझनवीचा महंमद, महंमद घोरी, तैमूरलंग चेंगीझखान इत्यादि मुसल्मान वीरांकडून सर्वत्र जाळपोळ, लुटालूट, बलात्कार, बाटवाबाटवी अशा कृत्यांचा यथेच्छ धिंगाणा घालण्यांत आला. पुढेंहि हाच धडा सर्व मुसल्मान सरदारांनीं गिरवून बाटवाबाटवीच्या युक्तीनें मिळविलेल्या लाखों अनुयायांच्या मदतीनें हिंदू राज्यें रसातळास नेऊन आपलें अधिराज्य भारतवर्षांत प्रस्थापित केलें. तरीसुद्धां या मुसल्मानी राजवटींत शुद्धीकरणाचे अनेक प्रयत्न करण्यांत आले आहेत. धर्मभ्रष्टांना शुद्ध करून घेण्याचा अगदीं पहिला व मोठा प्रयत्न म्हणजे महंमद कासीमच्या स्वारीनंतर अल्पावधींतच देवल ऋषींनीं सिंधप्रांतांत केलेला होय. 'देवलस्मृति' ही त्या प्रयत्नांची जीवंत साक्ष देत आहे. देवलस्मृतींतील 'म्लेंच्छैश्च नीता म्लेंच्छान्म्लेंच्छीकृत' इत्यादि शब्द-प्रयोगांवरून हें उघड होतें कीं, त्या काळीं म्लेंच्छांचा प्रवेश आर्यावर्तांत होऊन त्यांचा जुलूम सुरू झाला होता, या दडपशाहीच्या व बाटवाबाटवीच्या सत्रानें, हिंदुसमाजास लागलेली गळती कशी बंद

करावी याचा विचार, कर्ते व समयज्ञ समाजधुरीण करीत होते, पण पुढें मुसलमानांची धर्मांधता व स्वार्थपरता पराकाष्ठेस पोहोंचून त्यांनीं अशा विचारवंत कर्त्या व्यक्तींची सरसहा कत्तल करण्याचा सपाटा चालविला, व त्यांची अपार ग्रंथसंपत्ति अमानुषपणें अग्नीला समर्पण केली, त्यामुळें पुढील पिढ्यांना पूर्वजांचे मार्ग आक्रमण करणें कठीण होऊन बसलें. तरीसुद्धां कित्येक ठिकाणीं धर्मरक्षणाची ही अचुक दृष्टी कशी जिवंत होती, हें खालीं दिलेल्या अनेक उदाहरणांवरून दृष्टोत्पत्तीस येईल.

कर्नल टॉडनें राजस्थानच्या इतिहासांत लिहिलें आहे, कीं, जैसलमेरच्या 'रावत चेचका' नें सुलतान हैवतखानाच्या सोनलदेवी नांवाच्या मुलीशीं लग्न केलें होतें. हैवतखान हे प्रथम रजपूत होते, व जैसलमेरच्या यादव रजपुतांचे राज्य गझनी, समरकंद येथपासून तों खुरासानपर्यंत पसरलेलें होतें. उदयपूरचा महाराणा बापारावळ यानें मुसलमान राजकुमारीशीं विवाह केला, व त्याची संतति अद्यापिहि सूर्यवंशी मानिली जाते. त्याचप्रमाणें मारवाडचा रावमल्लीनाथ राठोडाचा ज्येष्ठ पुत्र कुंवर जगमल यानें माळवा जिंकून मुसलमान बादशहाची रुपवती मुलगी गिंदोली हिच्या बरोबर विवाह केला. मारवाडचे ' बाठमेरा राठोड जमिनदार हे या गिंदोलीची संतति होत. हे सर्व श्रेष्ठ जहागिरदार राठोड रजपूत मानले जातात, पुढें मारवाडच्या रायपाल राजानें ६०० मुसलमान स्त्रियांबरोबर आपल्या सरदारांचीं लग्नें लावून दिलीं. उदयपूर मेवाडच्या कुंभा महाराण्यानें माळव्यांतून कित्येक मुसलमान स्त्रिया आणून त्यांचीं लग्नें हिंदुसरदारांबरोबर लावून दिलीं.

मुसलमान मुलींशीं लग्न करण्याची ही पद्धत त्या काळीं पूर्णपणें प्रचलित होती, हें वरील अनेक उदाहरणांवरून दिसून येईल; कारण या मुलींवर बहुधा मुसलमानीपणाचा आरोप मात्र असे.

ज्या वेळीं मुसलमानांच्या त्या भीषण टोळधाडी गांवावर येऊन पडत त्या वेळीं घरादारांचें व देव धर्मांचें संरक्षण करण्याकरितां घरांतील कांहीं मंडळी बाहेरून मुसलमानी धर्माचा आचार व पोषाख दाखवीत, व घरांतल्या घरांत आपले पूर्वापार जीवनक्रम चालवीत. बाहेरून मुसलमानी घर आहे असें कळतांच सैनिकांची ती गिधाडी झडप त्या घराला कांहीं हानि न करितां तशीच पुढें निघून जाई. अर्थात् निरुपायानें बाह्यात्कारी पत्करलेली ही मुसलमानी दीक्षा गांवांतील मंडळींना माहीत असल्यामुळें, त्याचे सोयरीकीचे संबंधहि निर्वेधपणें होत असत. याला अनुसरूनच सिंधच्या 'सोढा' रजपुतांत हा मुली देण्याचा व करण्याचा प्रघात प्रचलित होता. तद्वतच जोधपूर महाराण्यांचे पूर्वज 'मंडोर'चे रावजोधाजी यांनीं आपली मुलगी सीताबाई इचा विवाह कायमखानीबरोबर करून दिला; कारण कायमखानी हे नाममात्र मुसलमान आहेत, हें ते सर्वजण समजत होते. त्या वेळीं ते कायमखानी लोक स्वतःला चव्हाण, पवार, राठोड, असें ह्मणवून घेत, व अद्यापिहि त्यांना तसें ह्मणवून घेण्यांत धन्यता व अभिमान वाटतो. इ. स. १९१८ मध्यें जोधपूरच्या सुमेरसिंहजी महाराजांनीं आपल्या लग्नसमयीं एक मोठें जेवण सर्व प्रजेला दिलें, त्या वेळीं कायमखानी रजपूत व आद्य रजपूत यांची एकच पंगत करण्यांत आली होती. अद्यापिहि ते एकमेकांस भाऊबंद मानून तसाच प्रेमाचा व्यवहार आपआपसांत करतात. अर्थात् प्रायश्चित्तविधि वगैरे न होतां परस्पर समजुतीनें आपआपसांत होणाऱ्या व्यवहारांचीं हीं उदाहरणें झालीं; परंतु कांहीं ठिकाणीं प्रत्यक्ष शुद्धिविधि करविण्यांत येत असे.

तरीक-इ-सोरठ नामक मुसल्मानी ग्रंथांत म्हटल्याप्रमाणें 'मारवाडी लोकांनीं कित्येक मुसल्मानी स्त्रियांत आणिलें, व त्यांच्या मस्तकावर जव जाळून, व त्यांना गोमय चारून, शुद्ध केलें आणि हिंदु बनविलें. तद्वतच पूर्वींहि एकदां गिझनीच्या महंमदाच्या वेळीं त्याच्या सैन्यांपैकीं कांहीं लोक अनहिलवाडच्या राजा भीमदेवानें पकडून त्यांस हिंदु बनविलें होतें. या वेळेस हिंदूंनीं सांपडलेल्या तुर्की, मोंगल व अफगाण अविवाहित स्त्रियांशीं खुशाल लग्नें लाविलीं. इतर स्त्रियांस उलटी जुलाब देऊन त्यांना वाटून घेतलें. वाईट बायका वाईट माणसांच्या हवालीं केल्या, व उत्कृष्ट स्त्रिया उत्कृष्ट माणसांच्या वांट्यास आल्या. कुलस्त्रियांस सरदार लोकांनीं घेतलें, व नीच वटकी तसल्याच लोकांच्या हातीं पडल्या. चांगल्या सभ्य लोकांच्या दाढ्या मिशांचें मुंडण करून सुंता न केल्यास शेखावत रजपूत जातींत व सुंता केलेल्यास 'वाढेल' रजपुतांत घेतलें. 'वाढेल' म्हणजे सुंता केलेले असें म्हणतात. हलक्या प्रतीच्या मुसल्मानांस कोळी खॉटमेर आणि बावरिया या जातींत घेण्यांत आलें.

औरंगजेबाचे राजवटींत ६० वर्षांच्या मिरझाअबदुल कादिरला महात्मा विठ्ठलदासांनीं मधुपुरींत शुद्ध करून त्याचें नांव 'चंद्रनयन' असें ठेविलें. हिंदुत्व स्वीकारल्यानंतर या गृहस्थानें रामायणाचा फारसी भाषेंत अनुवाद केला आहे. हिजरी सन ३९८ मध्यें राजा सुखपाल धाकदपटशा दाखविल्यामुळें मुसल्मान झाला होता, तो अवसर सांपडतांच पुनश्च हिंदू झाला. शिकंदराचे वेळेलाहि जे ब्राह्मण छलाबलानें म्लेच्छ बनविले गेले होते, त्यांना पुनश्च हिंदुत्व देण्यांत आल्याचा जफरहसन यांनीं प्रसिद्ध केलेल्या तुलतवारिखमध्यें उल्लेख आला आहे. बादशाहा महंमुदशाहाचे वेळीं दिवाण मनसाराम मोहन मुहपाल याचा नातू जयराम याना बलात्कारानें मुसल्मान बनवून त्याचा बादशहाचे मुलीबरोबर निका लावण्यांत आला. कांहीं दिवसांनंतर जयरामाच्या ज्ञातिवाल्यांनीं त्यास शुद्ध करून घेऊन आपल्या समाजांत समाविष्ट केलें. हिंदुधर्माचा अभ्यास करून त्याचें श्रेष्ठत्व पटल्यामुळें कामरान नांवाच्या हकीमानें हिंदुधर्म स्वीकारला. १०५० हिजरीमध्यें अकबराच्या जवळ फरूकसराइ येथें मृत्युसमयीं त्यानें आपलें द्रव्य, फर्निचर, इत्यादि सर्व चीज, वस्तु, वैष्णव ब्राह्मणांना वांटून टाकल्याचा उल्लेख आढळतो. शहाजानचा मुलगा दारा यानें हिंदुधर्माचा पुष्कळच अभ्यास करून उपनिषदांचें भाषांतरहि केल्याचें प्रसिद्धच आहे. याच समयीं रसुमखा नांवाच्या एका पठाणास हिंदुधर्मीनें दीक्षित करण्यांत आलें असून त्यानें रसखानी नांव धारण करून अनेक सुरस भक्तीपर काव्यें रचलीं आहेत. रसुमखाप्रमाणेंच ताजबेगम नांवाची एक मुसल्मान स्त्री हिंदुधर्मांत प्रवेशिली. कुराणावरचा विश्वास उडाल्यानंतर तिनें श्रीकृष्णावर अत्यंत हृदयस्पर्शी अशीं अनेक कवनें रचलीं आहेत. त्यांतील एक दोन खालीं देत आहोंत यावरून तिच्या श्रद्धायुक्त व प्रेमळ अंतःकरणाची साक्ष सहजीं पटेल.

सुनो विश्व ज्ञानी मेरे दिलकी कहानी तुम
दस्तकी बिकानी बदनामी हि सहुँगी मैं ।
देवपूजा ठानी नमाज हूँ भुलानी
तजे कलमा कुरान सारे गुनन हुँ तजुँगी मैं ॥
शामला सलोना सिरताज सिरकुले दिये

तेरे नेह दाग निदाग हो रहूँगी मैं ।
नंदके कुमार कुरबान तेरी सूरत पै
हौं तो मुसलमानी पर हिंदूआनी हो रहूँगी मैं ॥ १ ॥

कलमा कुरान छोड आइ हूँ तिहारे पास
भावमें भजनमें दिलको लगाऊँगी।
पाऊँगी विनोद भरके सुबह शाम
गाऊँगी तिहारे गीत नेक, न लजाऊँगी ॥
खाऊँगी प्रसाद प्रभुमंदीरमें जाय जाय
माथ पै तिहारे पदरजको चढाऊँगी।
आशिक दिवानी वनपद पूजि पूजि
शामकी तातमे राधिकासी बन जाऊँगी ॥ २ ॥

संवत् १६२५ च्या सुमारास हरदोई येथील, कवी जमाल–उद्दीन शुद्ध झाला व त्यानें श्रीकृष्ण भक्तीवर पुष्कळशीं काव्यें रचलीं. तो जमाल कवि म्हणून श्रीकृष्णभक्तांत प्रवीण आहे. फरूखीअर बादशहाचे मृत्युपश्चात् अबदुल्लाखानानें त्याची बेगम पुनश्च तिच्या हिंदु पित्याकडे जोधपूरला पाठवून दिली. तिला दिल्लीमध्येंच यथाविधि पावन करून घेण्यांत आलें, असें आयर्वीन आपल्या मोंगल इतिहासांत लिहितो. मोंगल साम्राज्यांतच शाहीकाजीला श्रीदादोजीनें उपदेश देऊन शुद्ध केलें व त्याचें नांव गरीबदास ठेविलें. श्रीदादोजींच्या स्वर्गारोहणानंतर या गरीबदासाला त्यांच्याच गादीवर बसविण्यांत आलें, तेव्हां मुसलमान मौल्वींनीं त्याला फारच त्रास दिला, राजदरबारांत बोलावून नेऊन, मुसलमानी धर्म सोडण्याचें कारण विचारण्यांत आलें, तेव्हां त्यानें कुराणांतील तत्वज्ञानाचें यथेच्छ खंडण केलें. बादशहानें त्याची खरी निष्ठा पाहून व कृपायन होऊन त्यास सोडून दिलें. सुप्रसिद्ध भगवद्भक्त कबीर यासहि आचार्य रामानंदानें रामनामाची दीक्षा दिलेली सर्वविश्रुतच आहे. श्रीवल्लभाचार्यांनींहि २ मुसलमान पठाणांना आपल्या संप्रदायाची दीक्षा दिलेली होती. गुरुनानकांचा मर्दान नांवाचा एक मुसलमान शिष्य अत्यंत प्रिय होता. गुरुगोविंदसिंहानीं तर शेकडों मुसलमानांचा समावेश स्वधर्मांत केला. डाकाच्या नवाबाचे मुलगे रूप आणि सनातन यांना तद्वतच कित्येक यवनांना कृष्णचैतन्यानें शुद्ध करून हिंदूधर्मांत घेतलें व त्यांना श्रीकृष्णभक्त बनविलें ह्मणूनच गौरांग देवाचीः—

वंदे स्वैराद्भुतेहं तं चैतन्यं यत्प्रसादत्तः ।
यवना सुमनायन्ते कृष्णनामप्रजंल्पकाः ॥

अशी अन्वर्थक स्तुति त्यांचे भक्तगण गातात.

श्रीकृष्णचैतन्य ( गौरांग ) प्रभूंनीं केलेली शुद्धि अलीकडील सुप्रसिद्ध विद्वान् वक्ते व लेखक प्रो. टी. एल् वासवानी यांनीं आपल्या ("The Ancient Murli") प्राचीन मुरली

पुस्तकाच्या Call of the Flute ( मुरलीची हांक ) ह्या प्रकरणांत खालीं लिहिलेले उद्गार दिले आहेत.*

"घटकाभर बंगालचीच गोष्ट घ्या. श्रीचैतन्यासारख्या महान् विद्वान् व धुरंधर नैयायिकाचें जीवन चरित्र श्रीकृष्णभक्तीनें अगदीं बदलून सोडलें. कृष्णभक्तीनें बंगालला नवजीवन दिलें. कृष्णभक्ति हा हजारों हिंदूंचा प्राणधर्म बनून राहिला आहे. इतकेंच नव्हे तर अनेक मुसलमानहि मुरलीच्या नादानें भारून गेले आहेत. चैतन्य प्रभूंचा एक मुसलमान शिष्य आपल्या कवनांत म्हणतो–' मुरलीचा नाद माझ्या कानीं पडतो तेव्हां मला रडें कोसळतें, व कृष्णदर्शन झालें नाहीं तर जीव कासावीस होतो.' चैतन्यदास म्हणवून घेणाऱ्या एका मुसलमान भक्तानेंहि अत्यंत हृदयस्पर्शी अशीं राधा–कृष्णांवर गाणीं रचिलीं आहेत. मुरलीच्या संदेशाचा प्रसार करण्याचा श्रीचैतन्य प्रभूंचा उत्साह अमर्याद होता. डबीरखान व मलीक हे दोघे मुसलमान विद्वान् मूळचे हिंदू होते. ते उभयताहि संस्कृत व पारशी भाषेंत पारंगत होते. तसेंच अरबी भाषेचा अभ्यास त्यांनीं सय्यद् फकीरुद्दीन याच्या जवळ केला होता. श्रीचैतन्य प्रभूंनीं त्यांना पुन्हां हिंदुधर्मांत घेतलें व सनातन आणि रूप अशीं हिंदुनांवें त्यांना देऊन वैष्णवसंप्रदायाची दीक्षा दिली. हे सनातन ( व रूप गोस्वामी ) हे चैतन्य संप्रदायांतील एक प्रमुख प्रचारक होऊन गेले. रूप

* Think for a moment of Bengal alone Krishna-bhakti transformed the life of the great Scholar and logicion, Chaitanya. Krishna–Bhakti gave a new culture to Bengal. Krishna-bhakti became a life giving religion to thousands of Hindus. And even moslems came under the music's spell. One of the moslem disciples of the lord sang:–"I weep when I hear the flute and woe be to me if I cannot meet Krishna!" Some very moving songs about Krishna and Radha were composed by a molsem disciple who called himself Chaitanyadas. Chaitanya's enthusiasm to spread the message of the murli was boundless. Dabirkhan and Mallik were Hindu converts to Islam. They were welversed in Sanskrit and Persian. They learnt Arabic under Syed-Fakir-ud-din. Shri Chaitanyabrought them back into Hindu society, gave them Hindu names *Sanatan*, Rupe and initiated them into the Vaishnava Faith. This Sanatan became an honoured apostle of Sri Krishna's message. So we read of a moslem named Sherkhan who was brought into the Hindu fold by chaitanya's followers. Many Buddhists treated with contempt as untouchables, by the Hindu society were drawn by Krishna bhakti into the Hindu fold. On one occasion we read as many as 2,500 of them were admitted to the Vaishnava faith. The message of the flute made a New Bengal.

गोस्वामींचा 'स्तवमाला' नामक ग्रंथ राधाकृष्णांच्या भक्तिरहस्यानें भरलेला असून त्यावर जीव गोसावींची विस्तृत टीका आहे. हें पुस्तक निर्णयसागरमध्यें छापलेलें आहे ) याप्रमाणेंच शेरखान नांवाच्या मुसल्मानास श्रीचैतन्य प्रभूंच्या अनुयायांनीं हिंदुधर्मांत घेतल्याचें कळतें. तसेंच हिंदुसमाजाकडून अस्पृश्यासारखे तिरस्कृत मानले जाणारे अनेक बुद्धधर्मीय लोक कृष्णभक्तीनें पुनीत होऊन हिंदुधर्मात प्रविष्ट झाले आहेत. त्यापैकीं २५०० लोकांना वैष्णव संप्रदायांत घेतलें गेलें, असा ग्रंथांतरीं आधार सांपडतो. मुरलीच्या संदेशानेंच जुना बंगाल हा नवीन बंगाल बनला.

त्याप्रमाणेंच श्री आचार्यपीठाधीश बोधेंद्रसरस्वती स्वामी यांची गोष्ट आहे. श्री रामानुजाचार्यांसारख्या थोर संप्रदायप्रवर्तक विभूतीनें तर असंख्य मुसल्मानांना हिंदू करून घेतल्याचा पुरावा आहे.

फिरोजशहा तघलकाचे राजवटींत एका ब्राह्मणानें दिल्लीस मोठ्या धैर्यानें एका मुसल्मानाचें शुद्धिकार्य केलें; परंतु या कृत्यासाठीं त्याला फिरोजशहानें जीवंत जाळून टाकलें. जदुनाथ सरकारनें लिहिलेल्या पुस्तका वरून समजतें, कीं, औरंगजेबाची पाठ फिरतें न फिरते तोंच मारवाडच्या जसवंतसिंह महाराजानें मशिदींच्या ठिकाणीं पुन्हां मंदिरें उभारून तेथें देवांच्या मूर्ति स्थापल्या. भ्रष्ट झालेले व केलेले लोक स्वजातींत समाविष्ट केले. याप्रमाणेंच अजितसिंहाचा मुलगा महाराजा वख्तसिंह यानें पण कित्येक मशिदींच्या ठिकाणीं मंदिरें उभारलीं, असें टॉड साहेबांनीं राजस्थानच्या इतिहासांत लिहिलें आहे. १२ व्या शतकांत अजमरिच्या अरण देवरायानें यवनांना पराजित करून हाकलून लाविलें त्या वेळीं त्यांच्या संसर्गानें अपवित्र झालेली भूमि शुद्ध करण्याकरितां तेथें यज्ञ करून एक विस्तीर्ण मंदिर व त्यापुढें 'अनासागर' नांवाचा एक तलाव बांधिला. या तलावांत स्नान करून परधर्म स्वीकारलेले लोक शुद्ध होत असत. त्याचप्रमाणें १६ व्या शतकांत जेव्हां सिंधचे बाजूनें मुसल्मानांच्या भयंकर स्वाऱ्या होऊं लागून हजारों हिंदु बाटूं लागले त्यावेळीं जयसलमेरच्या भाटी रजपूत अमरसिंह महाराजानें एक मोठा यज्ञ करून 'अमरसागर' बांधविला; जो अद्यापिहि विद्यमान आहे. या यज्ञांत ज्यांनीं भाग घेतला व अमरसागरांत स्नान केलें ते ते सर्व शुद्ध गणले गेले.

वरील अनासागर व अमरसागर यांप्रमाणेंच खिस्ती करविलेल्या मंडळींना वसई नजीकच्या रानांतील तलावांत शुद्ध करून घेण्याचा निर्मळ क्षेत्रस्थ ब्राह्मणांनीं सपाटा चालविला होता. इतिहासकार श्री. सरदेसाई आपल्या ब्रिटीश रियासतींत लिहितात ' बाटून खिस्ती झालेल्या हिंदु लोकांस परत स्वधर्मांत घेण्याचे अनेक प्रयत्न तत्कालीन ब्राह्मणांनीं केलेले आहेत. अशा लोकांस आपल्या पिढीजात धर्मांत परत येण्याबद्दल ते उपदेश करीत. इतकेंच नाहीं, तर गोकुळाष्टमी वगैरे सारख्या मोठ्या मेळ्यांचे दिवशीं बाटलेल्या लोकांस समुद्र स्नान अगर गंगास्नान घालून शुद्ध करून घेत. अशा पवित्र दिवशीं गंगास्नान केल्यानें सर्व पातकांचें जसें क्षालन होतें तसें खिस्तिधर्म स्वीकारून व्हावयाचें नाहीं, असा शास्त्राधार ते सर्व लोकांत पटवीत. ही ब्राह्मणांची युक्ति पाहून पाद्र्यांचें पित्त खवळून जाई व त्यांचा उद्योग बंद पाडण्याकरितां ठाणें, वसई, मुंबई वगैरे ठिकाणच्या खाड्यांच्या व समुद्राच्या काठीं त्यांनीं खांबावर जिकडेतिकडे क्रॉस रोवून ठेविले होते. असें झालें म्हणजे क्रूस रोविलेला नसेल अशा ठिकाणीं जाऊन ब्राह्मण आपला मेळा भरवीत. शेवटीं खिस्त्यांच्या जाचास त्रासून त्यांनीं वसईनजीक रानांत एक तलाव शोधून काढला, तेथें कांहीं दिवस ब्राह्मणांचें शुद्धीकरण गुप्-

पणें चालू होतें. पुढें तें उघडकीस आल्यावर पोर्तुगीज शिपायांनीं ब्राह्मणांवर हल्ला करुन त्यांस हुसकून दिलें; त्यावेळीं एक वैरागी एकदां ख्रिस्ती होऊन पुन्हां हिंदु झालेला निर्भयपणें पाद्र्यांच्या फौजेच्या समोर एकटा उभा राहिला, तेव्हां तर त्या ख्रिस्त्यांचे पित्त जास्तच खवळून त्यांनीं त्या जागेचा विध्वंस केला व गाई मारुन त्यांचें मांस व रक्त तलावांत व बाजूस शिंपडून ती जागा अपवित्र केली.' (पृष्ठ १८३–१८४)

वरील प्रमाणेंच गोमांतकांतहि विद्यारण्य माधवांनीं धर्मभ्रष्टांना पावनतीर्थ करुन घेण्याकरितां माधवतीर्थ निर्माण केल्याचें प्रसिद्ध आहे. या तीर्थालाच 'ब्रह्मकमंडलु' असें म्हणतात. विजयनगरचा राज्यविस्तार व शृंगेरीमठाचा धर्मविस्तार करुन त्यायोगें तुंगभद्रेच्या दक्षिणेला विधर्मी राज्य व विधर्मी संस्कृति यांची लाट थोपवून धरणाऱ्या श्रीविद्यारण्यांच्या महत्त्वपूर्ण कामगिरीची इतिहास साक्ष देत आहे.

गृहीतो ब्राह्मणो म्लेंच्छैः प्रायश्चित्तं चरन् पुनः ।
म्लेंच्छैः संकीर्यते नैव तथा भासः शरीरकैः ॥

पंचदशींतील ही त्यांची उक्ति शुद्धीकरणाविषयींचें त्यांचें अंतरंग दाखविण्यास समर्थच आहे. पण, विद्यारण्यांची गोष्ट कशाला! इतिहासकार थिओडोर प्रिसिंगर असें म्हणत आहे कीं, त्या कालीं स्थानिक ब्राह्मण बाटलेल्यांना पुनश्च स्वधर्मांत मोठ्या आनंदानें घेत असत.*

भक्तिविजय ग्रंथांतहि पैठणच्या ब्राह्मणांनीं केलेलें बहिरंभटाचें शुद्धीकरण वर्णन केलें आहे. तो प्रसंग असाः—

**'कथा ऐका उद्भट। प्रतिष्ठान क्षेत्रीं बहिरंभट। जो षट्शास्त्री निपुण पंडित। वेदांतशास्त्री प्रवीण॥ एके दिवशीं भोजनीं बैसला। तों आपुले स्त्रियेशीं विनोद केला। अलवण शाक वाढलें मजला। हा शब्द ऐकला कांतेनें॥ मग काय उत्तर देतसे त्यासी। साठ वर्षें जाहलीं तुम्हांसी। आतां रसनेस चवी आपणांसी। वृथा कासया पाहिजे॥**

हें कांतेचें भाषण ऐकून मनांत खिन्न झाला व 'आतां जिणें कासया व्यर्थ' असें मनांत आणून—

"मग अविंध पुरोहिताचें घरीं। बहिरंभट गेले ते अवसरीं। काजीस बोले मधुरोत्तरीं। स्वयातींत सारीं आलातें॥" त्या बरोबर बहिरंभटाला काजीनें दीक्षा दिली. हें वृत्त ऐकून पेठणचे ब्राह्मण मनीं उद्विग्न झाले व आतां कांहीं उपाय नाहीं म्हणून निवांत बैसले. कांहीं दिवसांनंतर सर्वजण गोदेतीरीं बसले असतां बहिरंभट तेथें आला, व पश्चात्तापानें रुदन करूं लागला. तेव्हां ब्राह्मणांनीं त्यास विचारलें— "तुम्हीं किमर्थ झालेत यवन। दिधलें टाकून आचारातें॥" बहिरंभट खिन्नतेनें म्हणाला "माझें कर्म बलवत्तर। म्हणोन अविचार घडला कीं॥" तरी आतां मला पावन करुन घ्या. तेव्हां सर्वजण एकमेकांत विचार करूं लागले, " म्हणती हा सर्वज्ञ गुणी। निज कर्में भ्रष्टला आपुले मनीं। तरी आतां विधियुक्त प्रायश्चित्त देऊन। ब्राह्मणपणीं आणावा॥ इतर ग्रामांचे शास्त्ररीतीं। सकल पुसावया आपणांस येती। आणि यांस शुद्ध करावया निश्चितीं। संशय चित्तीं कासया॥ इतर ग्रामींचे भ्रष्टले कोणी। ते शुद्ध होताव

* It so happened that the native priests, the Brahmins, had not the least difficulty in bringing the people back again to the religion, in which they had been born and bred' (p. 91).

प्रतिष्ठानीं। आणि येथील दवडावा सर्वज्ञ गुणी । तरी आपणा शब्द वेद॥ मग शास्त्र पाहोनियां त्वरित । तयासि दिधलें प्रायश्चित्त । द्रव्य वेंचूनि अपारमित । ब्राह्मण त्या केलें ॥" भक्ति वि० अ. ४४

विहित आचारधर्मांचा कोणी उच्छेद केल्यास त्या बाबतींत शास्त्राधारें निर्णय करून त्या पावन करून घेण्याचा अधिकार महाराष्ट्रांत त्या कालीं १ कऱ्हाड, माहुली, वाई, करवीर ठिकाणचे ब्रह्मवृंद, २ ज्ञातीबांधव, ३ छत्रपति व त्यांचे अष्टप्रधानांपैकी पंतप्रधान पेशवे, ४ श्रीशंकराचार्य मठ संकेश्वर व करवीर यांचेकडे असे. छत्रपति शिवाजी महाराजांनीं पूर्वापार चालत ब्रह्मवृंदाचा अधिकार नष्ट न करितां आचार व्यवहार प्रायश्चित्त इत्यादि धर्माधर्म विवक्षा करण्यासाठीं राव प्रधान ही नूतन संस्था निर्माण केली होती. उपरोक्त चार संस्थांकडून आचार व्यवहार इत्यादि गोष्टींसंबंधीं निर्णय करून घेणें व तदनुसार ती गोष्ट करवून घेणें हीं कामें क्षेत्रस्थ व पंडितराय प्रधान यांचे मार्फतीनें होत असत.

क्षेत्रस्थ, पंडितराव, शंकराचार्य व छत्रपति या चार संस्थांतच ' गोत व देशक ' समावेश करून वाईचे इतिहाससंशोधक श्री. शंकरराव जोशी आपल्या ' थोरल्या बाजीराव साहेब कारकीर्दीतील गोताई ' ( भा. इ. सं. त्रैमासिक अंक १-२ शके १८४९ ) या लेखांत लिहि ' पाटील, कुळकर्णी, वतनदार शेटे व महाजन, इत्यादि वतनदार व प्रतिष्ठित ग्रामसंस्थानीं शातीकरणाला व कुटुंबीकरणाला मान्यता दिली आहे, तो खरा व पुरतेपणीं हिंदूंत आला. गोतांत एका ज्ञातींतील शुद्धीकरणास अन्य ज्ञातीकडूनहि संमती हवी असे, व ती मिळे. अशा रहेनें करविणारे जरी एकाद्या गांवचे वतनदार कामगार असले–त्या कालीं बहुधा सर्वच असे असत त्याच्या गोताईस देशकाचीहि संमति घ्यावी लागे. म्हणजे गोताई करविणाऱ्याचा गांव ज्या प्रांतांतील त्या प्रांतांतील देशमुख, देशपांडे, सर मोकदम इत्यादींचीहि अनुमति त्याच्या गोताईस अवश्य जाई, आणि इतकें हें सर्व राजसत्तेच्या मार्फत व पाठिंबा घेऊन केलें जाई. ' या गोताईची पद्धत हासिक कागद पत्रांवरून श्री. जोशी यांनीं अशी वर्णन केली आहे कीं, १ बाटला गेलेला पण स्वधर्मांत येणारा अनुतप्त गृहस्थ, प्रथम आपल्या गांवचा मोकदम व देशमुख, देशपांडे, यांजकडे गो घेण्याविषयीं अर्ज करतो. २ नंतर ही त्याची विनंती हे मोकदम सरकारकडे कळवून सरकारमार्फत तील महालोमहालीं पत्रें पाठवून त्यांचीं सभापत्रें आणवितात. ३ तीं सभापत्रें हुजूर पाहून गोताई

(१) सुप्रसिद्ध वीरशिरोमणी बाजीदेश कुलकर्णी तो. हिरडस मावळ्याचा मुलगा पिलाजी यास 'शामलानें' धरून नेऊन नऊ वर्षे ठेवून बाटविला होता. तो पळून आल्यानंतर त्याच्या शुद्धीकरणाप्रीत्यर्थ समस्त कायस्थ कुलप्रभूंनीं क्षेत्रवासी ब्रह्मवृंदास पत्रद्वारें प्रार्थना केली आहे, कीं, "श्री वेदमूर्ती रा. रा. क्षेत्रवासी ब्राह्मण स्वामींचे सेवेसीं सेवक विद्यार्थी, समस्त कायस्थ कुलप्रभु ( यापुढें ठिकठिकाणच्या २९ प्रमुख कुलप्रभूंच्या सह्या आहेत ) साष्टांग दंडवत विनंति उपरि ऐसाजे—बाजीदेश कुलकर्णी तो. हिरडस मावळ याचा पुत्र पिलाजी यांसी 'शामलांनीं' राजापुरीस धरून ९ वर्षे नेला त्याचेसंबंधीं कोणी सोडवावया येतील ह्मणौनु मार्ग पाहिला परंतु कोणी आला नाहीं ऐसे देखोन— यासी बलात्कार अविधे केला आणि मागती त्यासि अडिसेरी देउनु तीन वरसे ठेविले, त्यासी जे समयीं अनुकूल पडलें ते वेळेसी निघोन आला. या प्रांतासि आलेवर यासी अनुताप बहुतच आला कीं, आपल्या स्वयातीसि शरण जाऊनु कुलामध्यें यावें ऐसियासी तुह्मी हा शास्त्रार्थ मनासि आणून जो शास्त्रयुक्त विधी जैसा असेल तैसा निर्वाहयसासीं आंणून यासी प्रायश्चित्त दिल्हे पाहिजे ये गोष्टीसी आह्मी समस्त मान्य असो. प्रायश्चित्तविध संपादून एक आपलें आज्ञापत्र पाठविलें पाहिजे. त्या पत्रावरून वर्तणूक करून श्रुत झालें पाहिजे. हें पत्र श्रावण शुद्ध ७ मी भौमवासरे युवानाम संवत्सर हे विनंती. ( शके १६१७ ), ( २ ) वरील पत्राप्रमाणेंच दुसरें एक तसेंच विनंतीपत्र समस्त कायस्थकुलप्रभूंनीं ब्रह्मवृंदास रायाजी नरसी देशकुलकर्णी यांचा पुत्र शामजी यास बळजबरीनें 'शामलानी' राजापूरचे स्वारींत बाटविला होता त्याजला पावन करण्यासंबंधी लिहिलें आहे. तिकडून निसटून येऊन शामजी स्वज्ञातीस शरण गेला कीं :'आपणांस एक वेळ मुक्तता केली पाहिजे जरी आपणांस वद्यात मिलोन मुक्तता करीत नाहीं तरी आपण प्राणत्याग करीन' हा त्याचा पश्चात्ताप व निर्धार पाहून 'समस्तांनीं मनावर घेऊन यास स्वयातिमध्यें घ्यावा हा निश्चय झाला' व त्याप्रमाणें प्रायश्चित्त विधान करून आज्ञापत्र देण्याविषयीं समस्तांनीं क्षेत्रस्थ ब्रह्मवृंदास विनंती केली, ( ३ ) वरील पत्राप्रमाणेंच संभाजी आंग्रे सरखेल यांनींहि कऱ्हाड क्षेत्रस्थ प्रमुख धर्माधिकाऱ्यास लिहिलेलें [पत्र मननीय आहे—राजापूर तालुक्यांतील धोपेश्वर येथील यसो पुरुषोत्तम पळसुरा याची बायको सावित्रीबाई ही माहेरास जात असतां मार्गी मलिक आपदला मुसलमान यानें बलात्कार करून अकर्म केलें' हें वृत्त बाईनें स्वमुखानें लोकांत घरीं आल्यावर सांगितलें. त्यावेळीं हुजुरांचा मुक्काम विजयदुर्गास होता त्यांचेकडे ही गोष्ट कळविली गेली त्यांनीं बलात्कार करणाऱ्याची गर्दन उडविली. नंतर बाईनें समक्ष येऊन विनंति केली कीं 'आपणावरी त्यानें बलात्कार केला. पुढें साहेब धर्मस्थापक आहेत, आपणास प्रायश्चित होऊन कुळींत सरती होऊन यथायुक्त वर्तवावयाचा विचार होऊन येई तें करावें' या तिच्या विनंतीला अनुसरून 'शास्त्रसंमते करून : कुळींत अधिकार होऊन यथापूर्व ब्राम्हणांत येऊन पावन होणें तें बाइकोस आज्ञा करून संमतें पत्र दिले पाहिजे' असें संभाजीरावांनीं ब्रह्मवृंदास कळविलें आहे ( शके १६५६ ) आश्विन व. ३. (४) त्याचप्रमाणें रघुनाथभट पंडितराव यांनीं कऱ्हाड क्षेत्रस्थ ब्राह्मणांना छत्रपतींची आज्ञा कळविली होती कीं 'खंडू जाधव याजवरता यवनांनीं जोरावरी करून आपले अन्न याजकडून खावविले त्यास राजेश्री स्वामी छत्रपतींनीं क्षेत्रास पाठविणे सांगितल्यावरून खंडू जाधव पाठविला आहे यापासून २ रुपये घेणें यास निबंध प्रायश्चित देणें, त्यास शुद्धपत्र देऊन हुजूर रवाना करणे

विलंब न लावणें हे नमस्कार इयं विज्ञप्तिः,' (५) श्रीनिवास परशुराम प्रतिनिधि यांनींहि कऱ्हाड ब्रह्मवृंदास लिहिलें होतें कीं 'आप्पाजीराव वस्ती मसूर यांच्या आईवर 'वर आमल' यांचा दोष येऊन ती मोह रास गेली त्यास आप्पाजी गैरमजकूर यांस अनवेवहार जाहला पाहिजे याजकरितां प्रायश्चित्त देऊन शु करविले आहे तर समस्त ब्राम्हण मिळून सुध करणें अनवेवहार करविणे छ. २९ साबान (शके १६६७ आश्विन शु. १ )( ६ ) श्रीमत् शंकराचार्यांनीं कऱ्हाडस्थ ब्रह्मवृंदास आपण दिलेल्या पावनपत्रास मान्य देण्यासंबंधीं लिहिलेले पत्र असें आहे—

श्रीशंकर.

" श्रीमत् परमहंस परिव्राजिकाचार्य श्रीमत् शंकराचार्य, अभिनव विद्याशंकरभारती स्वामीकृत नारायण स्मरणानि—

सकलगुण अलंकरण हरिगुरुभक्ति परायेण राजमान्ये राजेश्री मोरेश्वरभट व त्रिंबकभट हे प्रमु ब्रह्मवृंद प्रांत कऱ्हाड भक्तोत्तमाप्रति विशेषः—

*श्रींचें पुण्येतिथीचे मोहोछाव जाहला. तदनंतर खंडो सोमनाथ येथें आला होता त्यावरी त्यांस* शब्दकोश होता हें तुम्हांस विदित आहेच. ऐसीयांस ब्राह्मण दुर्बल निराणि बहुत लीनपणें शरण आ देखोन स्वामी कृपालु होऊन ब्राह्मणसभा व राजसभा बैसून शास्त्रमतें मनास आणून विधिपूर्व प्रायश्चित्त देऊन ब्राह्मणांस मेळवून सुधपत्र दिल्हे असे तरी तुम्हीं मठीचे मठाभिमानी आहां आ केले ते तुम्ही केले...दरेक विषयीं याची साहेता केली पाहिजे...सुधपत्रीं आवघा यथा न्याय लिही असे त्यावरून कळूं येईल हे आसीरवाद (७) पांच रात्रिक दिव्यानें शुद्ध ठरलेल्या बाईबद्दल कऱ्हा करांचें आज्ञापत्र—

श्रीमत् कृष्णककुप्रतिप्रीति संगमो विजयते।

· स्वस्ति श्रीमत् निखिल वसुधा सुधावतंस, निदानस्थान परिसरवर्ति, आदिस्थान महाक्षेत्र, दक्षि वाराणसी, श्रीउत्तरालक्ष्मीप्रियकर, कमलोपरिधृताष्टादश, शक्तिपीठान्तस्थित, महाशक्तिपीठ, महासंस्थ श्रीमत् करहार क्षेत्रस्थ विद्वद्वैदिक समूह यांनीं मोकदम मौंजे नाणेगांव ताल्के पाटस प्रांत यासी अ केली ऐसीजे. मौजे मजकुरी यमा बिन् तुका माळी याची स्नुषा गंगी शेतांतून घरास आपल्या येत होती त *मार्गी 'शव्या अतार' मौजे मजकूर हा तिजला झोंबला तेव्हां तिनें गलबला केला व महावाघ केलें तत्समयीं माग* वाटसरु जात होता त्यानें गल्बला श्रवण होतांच तोहि तेथें आला आणि अतार पळूं लागला. वाटसर धरून त्याचीं पांघरुणे घेतलीं. गंगी घरास गेली आणि झाले वर्तमान आपल्या घरीं सर्वत्रांस व तुम्हांस सांगितलें तदनंतर माळी यानें तिजला वेगळी ठेविली. सरकारचे वरातदार यांनीं तुम्हांस व माळ व अतार ऐसे चाकशी बद्दल क्षेत्रांस श्रीमंत राजेश्री बळवंतराव सुभेदार याकडेस आणिले त्या झालें वर्तमान लिहून घेतलें. माळीण इनें सांगितलें अतार पदरास झोंबला व चौकशी केली पण व्यभिच कर्म घडले नाहीं ऐसा निश्चय झाला परंतु संशय निवारण जहला पाहिजे एतद्विषयीं गंगी माळीण बोलि कीं श्रीसंगमी दिव्य करीन ऐसे बोलोन दिव्यास राजी जाहली. याजवरुन समस्त ब्राह्मण व हर्क

वें दैवप्रभृती यांनीं दिव्य पंचरात्रीचें नेमिलें क्रियापत्र लिहून घेतले आणि श्रावण शु. ५ मीसांतीत संगमीं स्नान करून त्रिवार उच्चार करून दिव्य केलें तिला सरकारचे वाड्यांत आणून ठेविली. पंचरात्री गेल्यानंतर गंगी माळीण दिव्यांतून खरी जाहली. त्यावरून गंगीचा सन्मान केला आणि शुद्धीपत्र दिल्हे पाहिजे एतद्विषयीं शुद्धपत्र तुह्मास सादर केलें आहे. तुह्मी व त्यांचे ज्ञातीस सांगणें पूर्ववत् प्रमाणें अन्नोदक व्यवहार करणें मिति शके १७०८ पराभव नाम संवत्सरे श्रावण शु. १३ स्वाम्'

वरील सातहि प्रसंगांवरून दिसून येईल कीं, धरिणांच्या आज्ञेनुसार क्षेत्रस्थ ब्रह्मवृंद धर्मभ्रष्टांस योग्य तें प्रायश्चित्त देऊन शुद्ध करीत असत व तदनंतर त्या शुद्धीभूत व्यक्तींशीं त्याचे ज्ञातीबांधव अन्न प्राशन व शरीरसंबंधादि व्यवहार करीत असत. यावरून धर्मभ्रष्टांना शुद्ध करून त्यांच्या पुनरसमावेशनाचा बिकट प्रश्न त्याकाळीं समाजानें किती थोर व उदार अंतःकरणानें सोडीला होता हें स्पष्टपणें निदर्शनास आल्याविना राहणार नाहीं.

वरील उदाहरणाप्रमाणेंच श्रीयुत सरदेसाई यांनीं आपल्या रियासतींत फल्टणचे निंबाळकरांचा सुप्रसिद्ध दाखला दिला आहे. बजाजी निंबाळकर यांस आदिलशहानें पकडून 'मुसलमान हो नाहीं तर जहागिरी व वतनदारी जप्त करितों.' अशी धमकी दिली, निरुपायानें बजाजीनें धर्मांतर केलें, तेव्हां बादशहानें संतुष्ट होऊन त्यास मोठी सरदारी व स्वतःची मुलगी पण दिली. पुढें संधि सांपडतांच तो स्वदेशीं आल्यावर त्यानें घडलेला प्रकार पश्चात्तापपूर्वक मातोश्री जिजाबाईस कळविला. त्यावरोदर तिनें समस्त मराठेमंडळ बोलावून 'आपत् प्रसंगामुळें नाइकांकडे कांहीं दोष नाहीं' असें सर्वांस जाणविलें व महाबळेश्वरासंनिध विद्वान् ब्राह्मणांकरवीं बजाजीस विधिपूर्वक प्रायश्चित्त दिलें. एवढेंच नव्हे तर या शुद्धीकरणाविषयीं कोणाचे मनांतहि किंतु राहूं नये ह्मणून शिवरायांची मुलगी सखूबाई इजला बजाजीचें थोरले मुलास देऊन त्यांच्या घराण्यांत सोयरिक घडवून आणली.

बजाजी प्रमाणेंच नेताजी पालकर यालाहि शुद्ध करून घेतला होता. मिर्झाराजा जयसिंगानें त्याला फितवून मोंगलांकडे नेलें होतें. मोंगलांच्या चाकरींत असतां ता. २७ मार्च १६६७ या दिवशीं तो बळजबरीनें बाटविला गेला व त्याचें नांव मुहंमद कुलीनखान ठेवण्यांत आलें. पुढें सन १६७६ तें तो फरून दक्षिणेंत आला तेव्हां त्यालाहि शिवाजीनें स्वतः पुढाकार घेऊन असेंच शुद्ध करून घेतलें.

छत्रपति संभाजी महाराजांच्या कारकिर्दींतहि मोंगलांच्या तुरुंगांत आठ वर्षे राहून बाटलेला एक ब्राह्मण शास्त्री सभेच्या अनुमतीनें प्रायश्चित्त देऊन ज्ञातींत घेतला. या प्रसंगाला अनुलक्षून त्याकाळीं काढलेलें आज्ञापत्र अत्यंत बोधप्रद मननीय व विचारवंत पूर्वजांच्या उदार मनोवृत्तीची यथार्थ कल्पना करून देणारें आहे. तें आज्ञापत्र जसेंच्या तसेंच खालीं देत आहोंत.

[ खंड ८ लेख ४० ] श्रीमहालक्ष्मीनमः [ १६०८ चैत्र शु. २ ]

"श्रीसकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री देशमुख देशपांडे व ज्योतिषी उपाध्ये व समस्त वेदमूर्ती वस्ती कसबे हरसूळ प्रांत औरंगाबाद समस्त महाराष्ट्र, कोकणस्थ, देशस्थ विद्वद्वैदिक गृहस्थ गोसावी यांसीः–

पौष्य उपाध्ये व मोरेश्वर पंडीतराव आशिर्वाद, अनुक्रमें नमस्कार उपरि गंगाधर रंगनाथ कुलकर्णी कसबे हरसूल हा ब्राह्मण मोंगलांपाशीं सेवेसी होता. कित्येक दिवस चाकरी करीत असतां मोंगलांनी यावरी बलात्कार करून बाटविला, भ्रष्ट करून यास तीन महिने बंदीखानी निर्बंद ठेविला होता तेथें यवनासी अन्नोदक संसर्ग घडला; त्यानंतर यास माग्य अडीच रुद्दी मनसब देऊन चाकर करून ठेविला. पांचवर्षे चाकरी करीत होता. स्नान संध्यादिक कर्मे करितां नये यास्तव राहिली. पांच वर्षेपर्यंत अन्नोदक संसर्ग केला नाहीं. दौलत करीत असतां भाग्याचें सुख टाकून अंतःकरणी अनुताप मानून आपले जातींत यावें यास्तव दौलत संपत्ती सर्व यद्रू अनुतापास्तव राजेश्री छत्रपती स्वामी पाशीं रायगडास येऊन एक वर्ष गंगाधर रंगनाथ दरबारीं आपणांस प्रायश्चित द्या ह्मणवून सरकारकून व न्यायाधिश व उपाध्ये व दानाध्यक्ष व भलेभले ब्राह्मण व समस्त आपले ज्ञातीस शरण येऊन प्रायश्चित्त मागत होता. त्या उपरि राजेश्री समस्त राजकार्य धुरंधर वर्णाश्रम धर्म प्रतिपालक राजेश्री छंदोगामात्यस्वामी ( कवि कुलेश ) यांस सर्व वर्तमान विदित झालें. त्या नंतर त्यांहो ब्राह्मणाचे कष्ट व अनुताप बहुत देखून राजश्री छत्रपती स्वामी यांस वृत्तांत विदित केला छत्रपती कृपाळू होऊन प्रायश्चित्त द्यावयासी आज्ञा दिली. त्या उपरां आह्मीं राजेश्री छंदोगामात्ये याचे समेसी समस्त विद्वद्वैदिक ब्राह्मणांचे संमतीनें मिताक्षरादिहि निबंध पाहून प्रायश्चित्त निर्वाह करून गंगाधर रंगनाथ यासी प्रायश्चित्त संकल्प सांगोन श्रीयानेस पाठविला. तेथें श्रीगिरी प्रदक्षिणा तनिर्दो साठीं व यात्रा दोन्ही इतकें चतुर्विंशत्यब्द प्रायश्चित्त पूर्वोत्तरांगासहित गंगाधरें केले यथाशास्त्र प्रायश्चित्त विध्युक्त प्रकारें केले श्रीक्षेत्रीं समस्त धर्माधिकारी आदिकरून ब्राह्मण संमत्तीनें तीर्थ विधी करून ब्राह्मण भोजन करून अन्न प्रसाद पंक्तीस घेतला. शुद्धी भोजनें व प्रायश्चित्त प्रदक्षिणा यथाविधी केले म्हणून श्रीक्षेत्रींच्या ब्राह्मणांची पत्रें व देशाधिकाऱ्यांची पत्रें घेऊन आम्हापाशी येऊन पत्रें आम्हांसी दिली

उपरी यथाविधी प्रायश्चित्त पूर्वोत्तरांगासहित वर्तमान राजश्री छंदोगामात्य गोसावी यांसी विदित केलें त्याही मतें मनास आणून समस्त कारकून व न्यायाधीश यांच्या अनुमतें आम्हांस आज्ञा केली. गंगाधर रंगनाथ यास आपले पंक्तिस भोजन देऊन यासी शुद्धीपत्र देणें म्हणून यावरून आम्हीं आपले पंक्तिस भोजन देऊन यासी शुद्धी पत्र दिलें. हा ब्राह्मण शुद्ध झाला. संव्यवहार्य झाला. या उपरी यासी तुम्हीं अन्नोदकादि व्यवहार यथापूर्व करीत जाणें जो कोणी याचा ब्राह्मण्याविषयीं संदेह मानील तो देव ब्राह्मणद्रोही महापातकी जाणिये. शके १६०८. क्षयसंवत्सरे चैत्र शुद्ध सोमवार हे विज्ञप्ति."

प्रस्तुत आज्ञापत्रावर मेरेश्वर पंडितराव दानाध्यक्ष कविकुलेश वैदिक प्रल्हाद निराजी, राजेश्री नारो रघुनाथ आमात्य इत्यादि मोठमोठ्या अधिकारी पुरुषांच्या २३।२४ स्वाक्षरी आहेत.

धर्मभ्रष्टांना शुद्ध करून घेतल्याचीं उदाहरणें पेशवाई अमदानींत पण अनेक आहेत. त्यापैकीं कांहीं प्रसंग पेशव्यांच्या रोजनिशींतून खालीं देत आहोंत.

" राजेश्री संताजी आटोळे धुरंधर समशेर बहादूर यांस आज्ञा कीं तुळजोभट जोशी मौजे ळगांव परगणे घाटवरी यांस यवनानीं मोहन घालून बाटविले. कांहीं दिवस त्यांचे वार्सी होता. त्यानंतर देहावरी येऊन पश्चात्ताप होऊन क्षेत्र पैठण येथें ब्राह्मण सभेस उभा राहून पला अपराध क्षमा करून ब्राह्मणांत घेतलें पाहिजे ह्मणून मजीद झाला. यावरून समस्त ब्राह्मणांही. स्वार्थे मनासी आणतां अनुताप झाला त्यास प्रायश्चित्त देऊन ब्राह्मणांत घ्यावा असा निर्णय दिला. त्या. री समस्त ब्राह्मणांनीं तुळजो भटास प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून पंक्तिपावन केला आणि समस्त ब्राह्म- ांस परगणे मजकूरचे शुद्धपत्र करून दिलें आहे. तर तुह्मी परगणे मजकूरच्या देशमुख देशपांडे यांस व मस्त ब्राह्मणांस ताकीद करून तुळजोभटास पंक्तिपावन करणें. पैठणच्या पत्रांस जो कोणी दिगर करील, ांस तो दिगर करावयास प्रयोजक नाहीं. ह्मणून पत्र तीथवार छ, मजकूर"

" पुताजी बिन मुधोजी वाडघर चौगुला कसबा, जिवी तर्फ चांमारगोंदे पेराशीं दावलजी सोमवंशी जकडे चाकर होता. लष्करावरोवर सुरत प्रांती गेला. तेथें मोंगलास हस्तगत झाला. मोंगलानें ास भ्रष्ट केला. वर्ष सव्वा वर्ष मोंगलांचे सेनेत होता राजेश्री वाळाजी पंडित प्रधान दिल्लीहून आले से मर्यी पळोन लष्करांत मिळोन गावांस आला. आपली हकीगत सांगितली. से समस्त गोत बसोन नास आणून सदरी गोतांत घ्यावें असें गोताचें मत झालें आहे–पुताजी मजकूर यावर मोंगलानें लात्कार करून भ्रष्ट केलें हा कांहीं संतोपे भ्रष्ट झाला नाहीं याकरितां त्यास गोतामध्यें घ्यावयास आज्ञा केली आहे. तरी समस्त गोत मिळोन शास्त्राप्रमाणें शुद्ध करून गोतामध्यें घेणें आणि पूर्ववत् वर्तन करणें"

" राणोजी घुमाळ पाटील मौजे सोनके संमत वाघोळी प्रांत वाई यानें बटीक बनाम उदी अंबाजी निकम सांजमळी मौजे पायार प्रांत मजकूर येथें विकत घेतली. चार वर्षे त्याचे घरीं आहे. अंबाजी निकम कोणीकडे गेला याचा थांग न लागे. ती हैबतजी सरक वस्ती मौजे तांव व प्रांत फलटण यांची मातोश्री मुधोजी नाईक निंबाळकर यांच्या घरास गेली. तेथून काढून अंबाजी निकम यानें आणून विकली. ती हैबत सरक यानें आपली उमगली. आणि राणोजी–पाटील पासून नेली. परंतु त्यानें सांगितलें कीं ती बटीक माझी मुसल्मानांचा अन्न व्यवहार केला होता असें सांगितलें यावरून राणोजी पाटील यास प्राय- श्चित घावयाविषयीं पत्रे. "

वरील प्रमाणेंच कै० न्यायमूर्ती माधवरावजी रानडे यांनीं पेशव्यांच्या रोजनिशीवर आपल्या इंग्रजी प्रबंधांत पृ. २७ वर पतित परावर्तनाचीं कांहीं उदाहरणें दिलेलीं आहेत. त्याप्रमाणेंच कै. न्यायमूर्ती तेलंग यांच्या ' Gleanings from the Maratha chronicle.' या निबंधांत अशींच कांहीं उदा- हरणें घेऊन चर्चा केली आहे.

वरीलसारखी वैयक्तिक शुद्धीकरणाची उदाहरणें इतिहासांतून दाखवूं म्हटलें तर अनेक दाखवितां येणें शक्य होईल. तथापि अनेक व्यक्तींचा समूह अथवा जाती यांच्या शुद्धीसंबंधींहि महत्वाचे पुरावे इतिहासांतरीं उपलब्ध आहेत पोर्तुगीजांनीं गोवा, वसई, ठाणें, साष्टी इत्यादि भागांत बाटवाबाटवीचें भयंकर सत्र प्रारंभिल्याचें सर्वविश्रुतच आहे. या बलात्काराच्या सत्रांत लोकांच्या तोंडांत पाव, बिस्कीट व मांस कोंबून, तद्वतच विहीरी तलावांत फेंकून गावेंच्या गावें व समाजच्या समाज ख्रिस्ती करण्यांत आले होते. पोर्तुगीजांच्या या अमानुष कृत्यांचा रोमांचकारी इतिहास पुढें स्वतंत्र प्रकरणांत वर्णन करावयाचा आहे.

अशा प्रकारें बलात्करानें व फसगतीनें बाटविलेल्या लोकांना, नाममात्र खिस्ती झालेल्या या जातींना पुनश्च स्वधर्मांत घेण्याचें महत्कृत्य स्वराज्यकाळीं मोठ्या आस्थेनें करण्यात येत होतें. प्रत्यक्ष श्रीशिवाजी महाराज यांनीं जेव्हां १६६५ ते १६७० चें अवकाशांत. पोर्तुगीज प्रदेश आक्रमण्याचा सपाटा चालविला होता त्यावेळीं त्यांनीं अशा धर्मभ्रष्ट लोकांना ब्राह्मणांकडून शुद्ध करून घेण्याची विशेष व्यवस्था केली होती व त्याला अनुसरून कित्येक लोकांचें स्वधर्मांत समावेशन पूर्णपणें होऊन गेलें. * .

श्रीशिवरायानंतर हें कार्य थोडें थंडावल्यासारखें झाले. तथापि वसईच्या वेढ्यानंतर रणशूर मराठ्यांनीं पोर्तुगीज सत्तेचें उच्चाटण केल्यावर पुनश्च वरील प्रश्नास जोराची चालना मिळाली याचें उत्कृष्ट प्रत्यंतर बाटविलेल्या शातीचे लोकांनीं आपणांस पुन्हा स्वधर्मांत घेण्याविषयीं पेशव्यांकडे केलेल्या विनंतिपत्रावरून स्पष्टपणें मिळतें. रा. ब. पारसनिसांच्या 'पेशवे दप्तरांतील सनदा पत्रांतील माहिती' या खंडांत खिस्ती बनविलेल्या या लोकांस पुनश्च हिंदु धर्मांत घेण्याविषयीं दिलेलीं आज्ञापत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. हीं दोनही पत्रें अत्यंत महत्त्वपूर्ण असल्यामुळें जशीच्या तशींच खालीं उद्धृत केलीं आहेत.

" झडती राजमंडळ स्वारी राजश्री पंत प्रधान प्रांत वसई सुरसन सलास अशर मयातैन व अल्फ (इ. स. १८१२–१३) यांत कमावीस जमेचे पोटांत नजर जमा नजर जमा रुपये १६०५ जमादिलाखर गुजारत हाय मोंगले क्रियापाळ महालानिहाय प्रांत मजकूर यांनीं सुमा वाजीपुरा येऊन अर्ज केला कीं पूर्वीं तालुके मजकुरी फिरंगी यांचा अंमल होता. तेव्हां त्यांचे पाद्री हिंदु जात बोलावून किरिस्तांव करूं लागले त्यावेळेस आमचे जातीचे कांहीं लोक सांपडले ते रमेदींत नेऊन जबरदस्ती करून पाणी सांडून बाटविले, आणखीहि अशी जातीवर जबरी केली. तो बोभाट सरकारांत पुण्यापर्यंत गेला त्याजवरून सरकारच्या फौजा येऊन तालुका सरकारांत घेतला ते समयीं शिंदे भंडारी व आमचे वडील यांनीं जाहीर हकीकत सुमा शकराजी केशव याजकडे समजाविली व धर्माचें मोकळीकेविषयीं बोलणें बोलत आ त्याचा निवाडा विसाजी केशव यांचे कारकिर्दींत होऊन भंडारी मजकूर याजपासन सरकारांत नज घेऊन मराठे धर्मास मोकळीक केली. आमची जात थोडकी आणि नादान, नजर मागितली त्याप्रमाणे द्यावयाची आवक नाहीं यामुळें आमचे धर्माचा बंदोबस्त झाला नाहीं यावरून साष्टी तालुक्यांतील खारपाटील आमचे प्रमाणें बाटविले होते ते इंग्रजांचा अंमल आल्यावर सरकारांत पुण्याचें मुक्कामीं जाऊन आपले वाका समजाविला त्याची हकीकत मनास आणून हुजूरहून त्यास मराठे धर्मास मोकळीक करविली. आमचे वडिलास बाटविल्यापासून पाद्री लग्नें मात्र लावतो वरकड अन्नपाणी याचा व्यवहार किरिस्तांव लोकांशीं करीत नाहीं. सारे धर्म मराठे आमचे जातकरी यांचे प्रमाणें करीत आलों. अलिकडे

* 'Between 1665 and 1670 when he attacked and secured many outlying parts of the Portuguese territory. Shivaji is said to have taken much care, that the people should be purified by Brahmins and brought back to Hinduism. Many of these reverts probably regained their place and are now lost among the masses of Hindus' (Bom Gaz. XIII).

द्री यानें सांगितलें कीं किरिस्तांव यांचे रीतीनें तुह्मी चालावें. ' टोपी, कलसाव घालून किरिस्तांव लोकांचा श करून स्मेदींत आठा दिवशीं मिसास येत जाणें व मुलें बाटवावयासी व माणसें मयत झाल्यास मेदींत पुरावयासी आणीत जाणें याप्रमाणें कित्येक गोष्टींविषयीं छडाछड पाद्री करूं लागले आह्मी तर गाजपर्यंत हिंदुधर्माची वहिवाट करीत आलों आणि धन्याचे राज्यांत असतां हल्लीं किरिस्तांव यांचे धर्म आम्हांस करावयासि सांगतो. त्यास आमचे जातींत सोय न पडे आणि पाद्री तरी आडवून ग्रास मनस्वी पैका मागूं लागले. त्यास आमचा अर्ज सरकारांत पूर्वीपासून आहेच. याजकरितां धनी कृपाळू होऊन जीवन माफक नजर घेऊन पेशाजी शिंदे, भंडारी व साष्टीकर खारपाटील यासी मराठा धर्म लावून दिला त्याप्रमाणें आपणांस हिंदू धर्मास मोकळें केलें पाहिजे. ह्मणोन याजवरून मचे जातीचे मराठे मोंगले व पळसे जोशी यांस आणून वहिवाटीची चौकशी करतां त्यांचें सांगणें कीं फिरंगी अंमलांत जे हुशरजा मेदीनें बाटले, किरिस्तांवाशीं लग्नें मुहूर्त व अन्नव्यवहार करून त्यांचे चालीप्रमाणें वर्तत आहेत. मोंगले मजकूर याजवर जुल्म करून बाटविलें तें किरिस्तावांचे धर्मास (सर्वांस?) राजी नाहींत. मुलें होतात तीं स्मेदींत नेऊन कुजरसार करून बाटवीत नाहींत, व मीस ऐकावयासि जात नाहींत, लग्नसमयीं मात्र पाद्रीकडे जातात. वरकड शुभ अशुभ कर्में करणें करीत आहेत यांचे दाईद शुद्ध मोंगलांत आहेत. त्यास मरतीक झाला यांचें सुतक ते धरतात व जातींत लग्नमुहूर्त झाल्यास मांडवांत शुद्ध मोंगले येऊन विडा विडा वाटितात व यांचें ओटीवर भात करून जेवितात व त्यांचीं लग्नें झाल्यास यांस बोलावून विडा विडा देतात व जेवावयासि निराळे बसवितात. जातींत कोणीही दोषी जाहला त्यास जातींत घेणें त्रणें तरी मराठे यांसि विचारतात. व हे त्यांस विचारतात उभयतांचें संमत झाल्याविना जातींत घेत नाहींत या ग्रनाये सुतकाची व जातीचे व्यवहाराचा संबंध मराठे यासी राखला आहे. त्यांचे जातींत मुलाचें नांव ठेवणें तें जोशी सांगतो तें ठेवितात. लग्नाची मुहूर्तमेढ घालतात व तिथी पर्वणी व पितर अमावास्येस ग्रामजोशी अथवा आला ब्राह्मण यासी शिधा दक्षिणा देतात. लग्नाचें वधूवरांस तेल हळद लावून पुरातन कुलदेवतेचा कुलधर्म करितात भाद्रपदमासीं साकड (संकष्टी चौथ) मराठे याप्रमाणें हें करितात. यात्रे जाऊन तीर्थांत आंघोळ करून दक्षणा देतात व दर्शन घेतात. आणखीही कर्में शुद्ध मोंगलें यांचे रीतीनें करीत आहेत ऐसी माहीतगारी सांगितली व जोशी वृत्यंशी यांनीं जबानी लिहून दिली हें जाणून मोंगलें मजकूर यांनीं मराठे यांचा धर्म सोडला नाहीं याजकरितां पेशाजी शिंदे भंडारी व साष्टी प्रांतांतील खारपाटील यांसी हिंदूधर्म लावून देला याप्रमाणें तुह्मांस क्रियापाल करून हिंदुधर्मास मोकळीक केली त्याजबद्दल जीवन माफक ठराव--

किरिस्तांव, नियापाल, मोंगले महालानिहाय येथें आहेत त्यांचीं लग्नें लावावयाचें काम जोशी पळसे महालानिहायचें यास साल मजकुरापासून सुमाहून नेमून दिल्हे आहे त्यापैकीं उत्पन्न होईल तें निम्मे सरकारचें व निम्मे जोशी यांसी याप्रमाणें ठराव करून दिल्हा इत्यादि.

दुसरें पत्र ' यादी गण गावड नाथगावड मौजे भुइगांव बुद्रुक व गोंडराम हुलराम कसबे आगाशी वगैरे गांव भंडारी तर्फ मजकूर प्रांत वसई सुरसन सीत अशर मया तैन व अलफ (इ. स. १८१५–१६).

भंडारी मजकूर क्रियापाल यांनीं बाजीपुरा येऊन अर्ज केला कीं पूर्वी फिरंगी राज्यांत प्रांतांतील कांहीं रयत नेऊन बाटविली त्याजवर त्यांचें अकेरीस आमचे आजे पणजे किल्ल्यांत वेठीस गेले होते.

त्यास बाट्यूं लागले तेव्हां राजी न होत त्यामुळें किल्ल्यांत सात आठ महिने अडकावून ठेविलें. पुढें स्वराज्य झालें त्यावेळीं फिरंगी लोक निघून जाऊं लागले त्यासमयीं यास पाणी छायेन निघून गेला नंतर आमचे वडील घर्मी आले. स्वराज्य झाल्यावर वर्षं दहा वर्षांनीं तर्फ अगर वसई येथील बाटे भंडारी शंकराजी केशव यांचे कारकीर्दीत सरकारांत उभे राहून अर्ज केला कीं आम्हांस मराठे धर्मांत लावावयाची आज्ञा झाली पाहिजे त्यास त्यासमयीं त्याचा उलगडा झाला नाहीं पुढें विसाजी केशव यांचे कारकीर्दीत समजाविलें त्यांनीं मनांत आणून नजर घेऊन मराठे चालीचें धर्मास लाविलें. त्यावेळेस आमचे वडीलांना सरकारांत उभें रहावें तरी त्यांची नातवांना ( गरिबी ) ऊन खावयास नाहीं यामुळें राहिले ते आजपावेतों तसेंच राहून मराठे चालीचा धर्म करून आहोंत. किरिस्तांव चालीप्रमाणें वहिवाट नाहीं लग्न व पाट मात्र पाद्रीचे देवळांत होतो. पितर वगैरे देवकार्य करणे झाल्यास जोशी वृत्तंशीं आणून शिधा दक्षणा देत असतो. आमचे जातीचीं घरें थोडकीं १०–१२ आहेत तिलक्यांत सोयरीक मिळत नाहीं त्यामुळें मावळ्याची मुलगी व मेहुणी करितो ते पाद्री करूं देत नाहींत यास्तव मुलगे व मुलीं मोठ्या जाहल्या लग्नें राहलीं. तेव्हां आमचा परिणाम लागत नाहीं. यास्तव स्वारी कृपाळू होऊन आमचे नातवानीवर नजर देऊन जीवन मापक सरकारांत नजर घेऊन आम्हांस मराठे धर्माचे चालीस लावून दिलें पाहिजे म्हणून त्याजवरुन मनास आणतां विसाजी केशव यांचे कारकीर्दीत तर्फ अगर वसई येथील भंडारी लोक मराठे धर्मास लाविलें. तुम्ही नातवांना ( गरीब ) सरकारांत नजर यावयास सामर्थ्य नाहीं त्यामुळें तसेंच राहिला आणि लग्न व पाट समयीं मात्र पाद्रीचे देवळांत जाऊन बाकीचे वहिवाट मराठी धर्माची डोकीस पागोटें व धोतरें नेसावीं व पितर देवकार्य करणें तरी जोशी वृत्त्यंशी बोलावून आणून शिधा पाणी व दक्षिणा देत आला. मराठी चाली प्रमाणें वहिवाट करितां व सोईरिक समयीं मामाची मुलगी व मेहुणी पाद्री करूं देत नाहींत. तुमचीं घरें थोडीं. सोईरीक मिळत नाहीं म्हणून लग्नें राहिलीं. पाद्री अडवितो तोंवर तुमचे जातीचा परिणाम कोणताही लागत नाहीं. याजकरितां तुमचे नातवानींवर नजर देऊन केराजी शिंदे भंडारी यांस हिंदु-धर्म लावून दिला त्याप्रमाणें हल्लीं तुमचे जातीस क्रियापाल करून हिंदुधर्मास मोकळी केली असे तरी क्रियापाल भंडारी यांचीं हल्लीं वहिवाट त्याप्रमाणें तुम्ही वर्तणुक करीत जावी. तुम्हांस धर्म लावून वृत्त्यंश नेमून दिला त्यासंबंधीं जीवन मापक नजर रुपये २५ करार केले असे त्याविषयीं गावड भंडारी यांचें नांवें पत्र १ एकून २५ नजरेबद्दल जमा करून सदरहु अन्वयें भंडारी यांचें नांव पत्र देववावें छ, १० माघ इ. स. १८१५–१६"

वरील दोन्ही लेखांचा सारांश असा कीं, भंडारी क्रियापाल, व मोगले या हिंदु जातीचे पूर्वज किल्ल्यांत वेठीस गेले असतां त्यांच्यावर पाणी शिंपडून त्यांस बाटविलें. १७३९ मध्यें वसई सर केल्यानंतर स्वराज्याच्या अमदानींत जे बाटगे श्रीमंत होते त्यांनीं सरकारांत नजराणे भरून स्वधर्मांत प्रवेश मिळविला; परंतु ह्या जाती गरीब होत्या त्या निरुपायानें तशाच खिस्ती धर्मांत पण मराठे धर्माच्या चालीनें वर्तत राहिल्या. अशा अवस्थेंत शेवटल्या बाजीरावानें १८१२ ते १८१६ पर्यंतच्या प्रस्तुत लोकांच्या विनंती पत्रांचा मोठ्या उदार मनानें विचार केला व त्यांचेकडून अवघे २५ रुपये कर घेऊन त्यांना हिंदुधर्मास मोकळीक करून दिली.



" भिक्षा घर करून मर्दुमकीने हिंदुसमाज जिवंत रहावा असें वाटत असेल, तर हिंदुसंघटन करा. गोमीला हजारों पाय असले तरी प्रत्यहीं एकेक पाय तुटून जाऊं लागला तर ती जिवंत राहील काय? हिंदु समाजाचीहि हीच स्थिति होईल. म्हणून आपण शुद्धि व संघटन करा."

धर्मवीर डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे.



देईल शांति जगता अमूप ।
लावील पृथ्वीवरि बोधदीप ॥
सांधील जो मानवजाति–शर्म ।
देवा जगीं वाढवि हिंदु धर्म ॥

—कै. गजानन भास्कर वैद्य.



"प्रागतिक म्हणून समजल्या जाणाऱ्या राष्ट्रांच्या थाटामाटानें आणि दिखाऊ अवडंबरानें मोहून जाऊं नका. या विसाव्या शतकांत असा काल लवकरच येणार आहे की, ज्या वेळीं आजच्या प्रागतिक राष्ट्रांना आपली राज्यव्यवस्था आणि लोकांची रहाणी बदलून तिला वेदान्ताच्या तत्त्वांप्रमाणें नवीन आकार आणि नवीन [illegible]"

—स्वामी रामतीर्थ



" शिवरायाचे वंशज व शिवरायांचे आप्तगोत व प्रजाजनांचे वंशज यापुढे पुटानें स्वधर्माचा विजय करणार किंवा आतांप्रमाणें फुटीनें म गें हटून स्वधर्माचा विलय करणार ? हा प्रश्न सोडविण्याची निकराची वेळ हीच आहे. तरी सर्व प्रकारचा आत्मघातकी प्रयत्न सोडून महाराष्ट्रानें स्वधर्माच्या संरक्षणार्थ हिंदुसंघटन व शुद्धिकार्य यांकडे पूर्ण लक्ष पुरविलें पाहिजे."

—श्रीमच्छंकराचार्य (डॉ. कुर्तकोटी).

उपरोक्त दोन्ही लेख अर्थातच पेशवाईच्या शेवटच्या काळांतील आहेत. या लेखांतील मोगले ज्ञातीस 'शिंदे, भंडारी व साष्टी प्रांतांतील खारपाटील' यांस पूर्वी ज्याप्रमाणें हिंदुधर्म लावून दिल्हा त्याप्रमाणें तुम्हांस क्रियापाल करून हिंदुधर्मांत मोकळिक केली आहे. हा उल्लेख किंवा तसाच गावडे भंडारी ज्ञातीविषयीं केलेला उल्लेख, पेशवाईंत जातींच्या जाती शुद्ध करून हिंदुधर्मांत कशा समाविष्ट केल्या गेल्या, याची उत्कृष्टपणें साक्ष देत आहे. एवढेंच नव्हे तर वसईच्या डॉ० डकुन्हाजच्या माहिती प्रमाणें 'बाटलेल्या या लोकांना शुद्ध करून जातींत समाविष्ट करण्याचें जें कार्य ब्राह्मणांनीं चालविलें होतें त्यांच्या चरितार्थासाठीं स्वराज्यकालांत मराठ्यांनीं एक करहि बसविला होता.' ही एकच गोष्ट तत्कालीन लोकांना हिंदुकरणाचें महत्त्व किती पटलें होतें हें दाखविण्यास पुरेशी आहे.

पेशवाईचे समाप्तीनंतर ब्रिटिश राज्यांत १८२८ चे सुमारास कॉलऱ्याचा भयंकर कहर उसळला, त्यावेळीं दैवी क्षोभानें भिऊन जाऊन ओरप, आगरी, भंडारी आदिक पुष्कळ बाटलेल्या लोकांनीं हिंदुधर्माकडे धांव घेतली. त्यांना श्रीयुत रामचंद्र बाळा जोशी, श्री. भाई मुकुंद जोशी, श्री. विठ्ठल हरी नाईक वैद्य इत्यादि पळसे ब्राह्मणांनीं शुद्ध करून हिंदुधर्मांत समाविष्ट केलें. ब्रिटिश राज्यांतहि शुद्धीकरण चालू होतें. एतद्विषयींचा उल्लेख श्रीशंकराचार्यांच्या एका आज्ञापत्रांत उपलब्ध झालेला आहे. तें पत्र असें:—

"श्रीमत् परमहंस...श्री कैलासक्षेत्रस्थित...सिंहासनाधिरूढ श्रीविष्णुप्रयाग तीरनिवास...ज्योतिर्मठाधीश्वर नित्यानंद सरस्वती मुक्काम कसबे आगाशी तालुके वसई येथें कसबे मजकुरीं श्रीभवानीशंकराचे देवालयांत.

परम शिष्यवर्ग शिरोमणी वेदमूर्ति ब्रह्मशास्त्रज्ञ षट्कर्माधिकारी चतुर्वर्णस्य ज्योतिष्युपाध्यायाधिकारी ब्रह्मवृंदस्थ रा. रा. पांडुरंग हरी जोशी, पुरंदरे आदिकरून वृत्तिशीं वास्तव्य तालुके वसई येथील यांसी आज्ञा की मागें फिरंगी राज्यांत महाराष्ट्र लोकांपैकीं कित्येक शुद्ध जातीचे लोकांस बलात्कारें बाटविलें याजवर श्रीमंत पेशव्यांचे राज्यांत त्या बाटविलेल्यापैकीं पेशवे सरकारास शरण गेल्यावरून श्रीमंतांनीं धर्मशास्त्राप्रमाणें प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून महाराष्ट्रधर्मांत आणलें आणि त्यांजकडे शुभाशुभ करणेची आज्ञा तुह्मांकडे केली त्याप्रमाणें तुम्ही अविच्छिन्न चालवितां पुढें मेहेरबान इंग्रज सरकार बहादरचे राज्यांत राजहुकमतीनें महाराष्ट्रधर्मांत लोक आले. त्यांजकडे शुभाशुभकर्मे तुह्मी चालवित नाहीं असें कळलें त्याजवरून चौकशी करून तुमचे चतुर्वर्णाचे यजमानांची आम्ही समजूत करून तुम्हांस कोणी हरकत न करावी अशी आज्ञा केली आहे आणि साहेबांचे राज्यांत महाराष्ट्रधर्मांत आलेल्यापैकीं तालुके वसई येथील राहणार व तालुके साष्टी येथील रायमुरदे व खारी येथील लोकांपासून आम्ही भिक्षा घेतली आहे आणि त्यांस आजपासून तुम्ही श्रीमंत सरकारनें शुद्ध केलेले लोकांकडे जशीं शुभाशुभ कर्में करितां तशीं या लोकांकडे चालवावीं अशी आज्ञा आहे, कळावें, मिती चैत्र कृ. १३ भृगु वासरे शके १७९१ शुक्लनाम संवत्सरे.

नित्यानंद सरस्वती, दस्तुर खुद.

ब्रिटिश अमदानींतील उपरोक्त प्रयत्नानंतर हिंदुकरणाचा मोठा प्रयत्न श्रीमत् स्वामी विवेकानंद व श्री स्वामी रामतीर्थ यांनीं केलेला होय. पुष्कळांना हिंदुकरणाचा अर्थ पूर्वकालीन हिंदूंनाच परत हिंदुधर्मांत घेणें

असा वाटतो तथापि ह्या शब्दाचा अर्थ इतका मर्यादित अगर संकुचित नाहीं. जे पूर्वी हिंदु नव्हते त्यांनाहि हिंदुधर्मप्रवीण करणें, थोडक्यांत त्यांचें अनार्यत्व घालविणें, असा अर्थहि 'हिंदुकरणांत' अभिप्रेत आहे. एवढेंच नव्हे तर कोत्या विचारांच्या व असंस्कृत कल्पनांच्या सुधारल्या म्हटल्या जाणाऱ्या समाजांनाच प्रथम हिंदुसंस्कृति देऊन ताळ्यावर कसें आणलें पाहिजे, एरव्हीं अखिल विश्व शांतिसौख्य कसें उपभोगूं शकणार नाहीं हें गतप्रकरणीं दाखविलेंच आहे आणि या दृष्टीनेंच उभय स्वामींचे प्रयत्न अभिनंदनीय व कौतुकास्पद नाहींत असें कोण म्हणेल ?

पुत्रेषणा, वित्तेषणा, लोकेषणा, इत्यादि ऐहिक विषयवासनांच्या अभेद्य शृंखलांतून मुक्त होऊन ज्यांनीं विश्वरहस्याचा ठाव घेतला, व अशा रीतीनें प्राप्त झालेलीं गूढ आध्यात्मिक तत्त्वें, मोहमयी प्रमादमदिरा पीऊन उन्मत्त झालेल्या समाजांस पटवून देऊन त्यांस शुद्ध पवित्र व सात्विक बनविण्याचाच स्पृहणीय उपक्रम केला; एवढेंच नव्हे तर हिंदुमानवजातीनें श्रेष्ठ विद्येचा जो साठा वंशपरंपरेनें आजपर्यंत रक्षण केला आहे–आज कित्येक शतकें ती अवनत अवस्थेंत कुजत पडली असतांहि जो आपला वडिलार्जित ठेवा तिनें आजपर्यंत हृदयाशीं घट्ट बाळगून ठेविला आहे, त्या अमृतसंचयांतील बिंदुमात्र प्राप्त व्हावा म्हणून त्या समाजास सोत्कंठित आशापूर्ण व बद्धांजलि केलें, त्या भारतवर्षीय आर्यवंशललामभूत श्री. स्वामी विवेकानंदांच्या सर्व विश्व आर्यमय करून सोडण्याच्या थोर प्रयत्नांची ओळख येथें नव्यानें करून धावयास पाहिजे असें नाहीं. त्यांचे विचार लोकविश्रुतच आहेत. † तथापि प्रस्तुत विषयावर विशेष प्रकाश पाडणारी यांची एक मुलाखत उद्धृत केल्यास अनाठायीं होणार नाहीं. ती मुलाखत अशी:—

प्रः—स्वामीजी, एकवार हिंदुधर्माचा त्याग करून ज्यांनीं दुसरा धर्म स्वीकारला आहे, त्यांना हिंदु धर्मांत परत घेण्याबद्दल आपलें मत काय आहे, हे आपणांस मला विचारावयाचें आहे. त्यांस परत घ्यावें असें आपलें मत आहे काय ?

उः— होय, त्यांस अवश्य परत घ्यावें, आणि त्यांस परत घेण्यास कांहीं हरकत नाहीं, असें मला वाटतें. याशिवाय अशा लोकांस हिंदुधर्मांत परत न घेतलें तर हिंदूंची संख्या कमी होते, हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. मुसल्मान लोक हिंदुस्थानांत प्रथम आले, त्यावेळीं हिंदूंची संख्या साठ कोटी होती, असें फेरिस्तानें कोठेंसें म्हटल्याचें मला आठवतें. फेरिस्त हा अत्यंत जुना मुसल्मान इतिहासकार आहे. सांप्रत हिंदूंची संख्या सुमारें वीस कोटी आहे. आणि आपल्या धर्मांतून बाहेर जाणारा प्रत्येक मनुष्य आपणास मुकतो, एवढेंच नव्हे तर उलट आपल्या शत्रूंच्या संख्येंत भर घालतो. याशिवाय सांप्रत मुसल्मानी किंवा खिस्ती धर्माचा स्वीकार केलेले लोक हे पूर्वीच्या मुसल्मान, किंवा खिस्ती

† "My ideal is the conquest of the world by the Hindu race. We must go out, we must conquer the world through our spirituality and philosophy. There is no other alternative, we must do it or die, the only condition of national life, of awakened vigourous national life, is the conquest of the world by Indian thought. vol. III p. 276-77.

झालेल्या हिंदुलोकांचेच वंशज आहेत. या पूर्वीच्या लोकांनीं केवळ तरवारीच्या भयामुळें परधर्माचा स्वीकार केला होता, हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. यामुळें सांप्रतच्या मुसल्मानी अथवा खिस्ती लोकांवर कोणत्याहि प्रकारच्या अडचणी लादणें न्यायाचें होणार नाहीं. आतां जे जन्मादारभ्यच परधर्मी असतील, त्यांजविषयीं विचार केला तर पूर्वकाळीं हजारों परधर्मी लोकांना हिंदुधर्मांत घेतलें जात असे आणि ही परंपरा अद्यापिहि चालू आहे, असें आपणास आढळून येईल. हिंदुस्थानांतील मूळच्या परधर्मी लोकांचा प्रवेश आर्यवर्णांत झाला. एवढेंच नव्हे तर पुष्कळशा बाह्य देशियांचा प्रवेश आपल्या धर्मांत झाला आहे. मुसलमानांची स्वारी होण्यापूर्वीं अनेक परदेशी यांचा प्रवेश आमच्या धर्मांत झाला. पुराणांत अनेक जातींच्या उत्पत्तीसंबंधीं जीं विदेश वर्णनें आढळतात, तीं यामुळेंच होत, असें माझें मत आहे. निरनिराळ्या परकीयांचा प्रवेश हिंदुधर्मांत होऊन त्यांच्या निरनिराळ्या जाती बनल्या असाव्या, असें माझें मत आहे. पूर्वींचे हिंदु असून परधर्माचा स्वीकार केलेले, जे लोक हिंदुधर्मांत परत येऊं इच्छित असतील, त्यांच्यासाठीं कांहीं विशेष विधींची योजना असली तर बरें, असें मला वाटतें; पण जे लोक केवळ तरवारीमुळें आपणांस पारखे झाले आहेत अथवा जे अगोदरच परकीय आहेत, त्यांजसाठीं कांहीं प्रायश्चित्त विधीहि नसावा असें मला वाटतें.

प्र०—स्वामिजी, पण या लोकांची जात कोणती म्हणावी? यांना कोणती तरी एक जात दिली पाहिजे; कारण, तसें न केल्यास आम्हां हिंदूंशीं ते एकरूप होणार नाहींत. आमच्या विशिष्ट समाजरचनेंत त्यांची पायरी तरी कोणती लावावी?

उ०:—पूर्वी हिंदु असून परधर्मी बनलेले जे कोणी असतील ते अर्थातच आपल्या पूर्वींच्या जातीचे समजले जातील; आणि नवीन येणारे लोक आपली नवीनच जात बनवतील. वैष्णवधर्मांत असा प्रकार पूर्वीं घडून आला असल्याचें तुम्हांस ठाऊक असेलच. निरनिराळ्या जातीचे व धर्मांचे लोक वैष्णवधर्मांत आले, तेव्हां त्यांनीं आपली एक स्वतंत्र जातच बनविली. श्रीरामानुजांच्या कालापासून तों थेट श्रीचैतन्यांपर्यंत सर्व वैष्णव महापुरुषांनीं हाच मार्ग स्वीकारला होता.

प्रः—आणि त्यांच्या विवाहाची योजना काय करावयाची?

उः—त्यांचीं लग्नें आतां प्रमाणेंच पुढेंहि परस्परांत होतील.

प्रः—तसेंच नांवांसंबंधींहि एक अडचण आहे. हिंदूंतून परधर्मांत गेलेल्या ज्या लोकांनीं परकी नांवें घेतलीं आहेत त्यांचा नामकरण विधि पुन्हां करावा लागेल, असें मला वाटतें. त्यांना त्यांच्या जातीस शोभेशीं नांवें ठेवावीं असें आपणास वाटत नाहीं काय?

उः—अर्थात्; नुसत्या नांवांत सुद्धां पुष्कळ महत्त्व आहे.

प्रः—स्वामी महाराज, आपल्या हिंदुधर्मांत अनेक पंथ आहेत, त्यां पैकींच त्यांनीं एकादा पंथ स्वीकारावा कीं, एकादा नवाच पंथ काढावा, याबद्दल आपलें मत काय आहे?

उः—असा प्रश्न तुम्ही विचारतां तरी कसा? प्रत्येकाला आपापल्या मार्गानें जाण्याची पूर्ण मुभा असली पाहिजे. कारण तसें न झालें तर हिंदुधर्माच्या मूळ हेतूवरच पाणी पडल्यासारखें होतें. प्रत्येकाला आपला 'इष्ट मार्ग स्वीकारण्याची पूर्ण-मोकळीक' हा आमच्या धर्माचा मुख्य पाया आहे.

'प्रबुद्ध भारत' एप्रिल १८९९



" देवाच्या करितां आम्हांस जगतीं साधुत्व संपादणें ।
धर्माच्या करितां आम्हांसचि इथें देहत्व हें त्यागणें ॥
ऐशा त्या अति दिव्य पुण्य पुरुषां धन्यत्व माझें असो ॥
त्यांचाची उपदेश सर्व तरण्या बांडांत जोरे ठसो ॥ "

—धर्मभास्कर श्री विनायक महाराज मसूरकर.

राहणार नाहीं' अशी धास्ती वाटून अब्दुल रशीद नांवाच्या एका मुसलमानास स्वामींचा हा काटा उप काढण्याची प्रेरणा केली गेली आणि त्या नराधमानें (मुसल्मानांच्या गाझीनें–धर्मवीरानें) त्या वृद्ध तपोधन तारीख २३–१२–२६ रोजीं गोळ्या झाडून ठार केलें!

तथापि स्वामी श्रद्धानंदांच्या मृत्यूनें शुद्धीकरणाची लाट थांबेल अशी कल्पना केलेल्या मुसल नांच्या समाजाचा मोपळा फुटला व स्वामीजींच्या वीरमृत्यूनें हिंदुमात्र धर्मरक्षणाविषयीं बद्धपरि झाला. हा नवनवीन इतिहास सर्वांच्या परिचयाचाच आहे. तो विस्तारानें कथन करण्याचें का नाहीं किंवा त्याचें हें स्थलहि नव्हे. स्वामीजींच्या मृत्यूनंतर वर्ष सवावर्षांतच आणि मल्काना रजपुतां शुद्धीकरणानंतर बरोबर ५ वर्षांनीं ( २५–२–२३, व २६–२–२८ ) गोमांतकांतहि हिंदुकरणा मंगलमूहर्तमेढ मसुराश्रमाकडून रोंवली गेली ! तो हृदयंगम इतिहास पुढील प्रकरणांत समग्रतेनें वर्ण करावयाचाच आहे. असो.

येथवर श्रुति, स्मृति, पुराण, इतिहास व लोकव्यवहार यांच्या आधारें हिंदुकरणाचें तत्त्व किती चर्पे सारखें कसें अबाधितपणें मानलें जात आहे याचें अल्पसें दिग्दर्शन केलें. त्यावरून हिंदुकरणाचें तत्त्व कसें सनातन आहे हें दिसून येईल. पण सनातन ह्मणजे केवळ 'पुरातन कालापासून चालत आलेलें असाच अर्थ घ्यावयाचा नाहीं तर जें पुरातन कालापासून चालत आलेलें असूनहि त्रिकालाबाधित असते म्हणजेच प्राचीनत्वाबरोबर परिस्थितिगुणग्राहकत्वंहि ज्याच्या ठायीं असतें तेंच 'सनातन' होय, अशी व्याख्या श्रीमान् तात्याराव केळकर ह्यांनीं जबलपूर हिंदुमहासभेच्या अध्यक्षपदावरून केली आहे. ह्या व्याख्येला अनुसरून हिंदुधर्माचें सनातनत्व प्रस्थापित करतांना ते ह्मणाले, "पुष्कळ परकीय संस्कृतींशी हिंदुलोकांचा संबंध घडला आणि या संबंधाचा परिणामहि अर्थातच झाला. पण हा परिणाम सामाजि किंवा नैतिक ध्येयपरिवर्तनाच्या रुपानें दृष्टिगोचर झाला नाहीं. हिंदुधर्म हा नेहमीं व्यापक व संग्राहक स्वरुपाचा आहे, आणि त्याच्या अंगीं निरनिराळ्या व परस्पर विसंगत वाटणाऱ्या कल्पना व आचार विचार पचवून टाकण्याची एक अजब शक्ति आहे. हिंदुधर्म हा जुन्या व पक्क्या इमल्यासारखा आहे त्या जुन्या इमल्यांत अधिकाधिक दुरुस्ती आजपर्यंत झालेली आहे, व पुढेंहि पुष्कळ काळपर्यंत दुरुस्ती होत राहील, पण दुरुस्ती किंवा जोडणी कितीहि केली तरी त्याचा मूळ गाभा किंवा सांगाडा कायम आहे आणि त्याच्या पायाला तर कशानेंच धक्का लागलेला नाहीं." अर्थात् हिंदुधर्म जर असा सनातन स्वरुपाचा आहे, तर हिंदुकरणाचें तत्त्वहि तसेंच 'सनातन' ह्मणजे त्रिकालाबाधित राहणार हें उघड आहे. असो. हिंदुकरणाचें सनातनत्व प्रस्थापित करणाऱ्या या अल्पशा विवेचनावरुन ही गोष्ट स्पष्टपणें सिद्ध होते कीं, हिंदुसमाजांतील जातिबंधनें मोठीं कठोर असतात. तीं सहसा मोडून निघत नाहींत या शिथिलहि होत नाहींत. शक्य तोंवर प्रत्येकजणाचा दुसऱ्यापासून पृथक् पृथक् राहण्याचा देहस्वभाव आहे. या सर्व गोष्टी खऱ्या, तथापि ही प्रवृत्ति जेव्हां जेव्हां अनिष्टपणें परमावधीस जाऊन समाजसंस्था धोक्यांत येऊं लागते तेव्हां समाजांत त्तत्संबंधीं प्रतिक्रियेल्याहि जोरानें चालना मिळत जाते, अशी इतिहास मुक्तकंठानें साक्ष देत आहे. समाजाच्या आचार–विचारांत अव्याप्ति व अतिव्याप्ति हे दोष नित्यशः घडत असतातच; परंतु मधून मधून पुढें येऊन युक्ति व आचार यांच्या

योगें समव्याप्ति सिद्ध करण्याचा प्रयत्न भरतखंडांतील विचारवंतांनीं अनेकदां केला आहे आणि या दृष्टीनें शास्त्राधाराविना एक रेसभरहि इकडेतिकडे न चालं. इच्छिणाऱ्या पूर्वजांनीं 'नुसत्या शास्त्राधारानें निर्णय करून चालावयाचें नाहीं; युक्तिहीन विचारानें धर्महानि प्राप्त होईल.'

केवलं शास्त्रमाश्रित्य न कर्तव्यो विनिर्णयः ।

युक्तिहीनविचारे तु धर्महानिः प्रजायते ॥

असा रोखठोक सिद्धांत करून ठेविला आहे. या दृष्टीनें विचार करावयाचा तर व्यक्ति, कुटुंब व समाज यांच्या सर्वांगीण विकासानें विश्वोद्धार करण्याकरितां हिंदूंच्या सनातन धर्मामध्यें जरी आचार-विचारांच्या कडकबंधनांची जाळीं बाह्यतः विणून ठेविलेलीं दिसत असलीं, तरी धर्माचा मूलभूत हेतु किंवा श्रेष्ठकार्य जें समाजाची यथायोग्य धारण-पोषणा करून समाज जिवंत ठेवणें, त्या गोष्टीकडे यत्किंचितहि दुर्लक्ष होऊं न देतां त्या न्यायनीति-बंधनांतहि उदार, परमन्यायी व लोकसंग्रहकारक थोर पूर्वजांनीं किती लवचिकपणा, किती सर्वसंग्राहकपणा व किती सुटसुटितपणा राखिला आहे, हें पाहिलें म्हणजे त्या वंदनीय श्रेष्ठ पूर्वजांच्या अगाध बुद्धिमत्तेविषयीं कृतज्ञतापूर्वक अभिमान वाटूं लागतो व मन सानंदाश्चर्यानें स्तिमित होऊन त्यांच्या चरणीं विनम्र झाल्याविना रहात नाहीं.

प्रस्तुत कालींहि हिंदुसमाज व्यापक दृष्टीच्या अभावीं प्रत्यहीं दुर्गतीच्या घोर अंधारांत चाचपडूं लागला आहे. '*चहूंकडून होणाऱ्या तीव्र आघातांनीं हिंदुधर्म जगणार कीं मरणार!*' *असा विकट प्रश्न* विचारवंत सज्जनांपुढें उभा आहे. अशा वेळीं अनेकानेक शास्त्रांचा व्यर्थ काथ्याकुट करीत न बसतां ज्या योगें समाज सुसंबद्ध व सुसंघटित होईल ती गोष्ट अगत्यपूर्वक सर्वांनीं अवलंबिली पाहिजे. शास्त्राधार असो वा नसो. शास्त्र असें तर सांगत नाहीं ना कीं, हिंदुसमाज ठार झाला पाहिजे! जें शास्त्र तसा निर्णय देत असेल तें शास्त्रच नव्हे व त्याचा कोणी विचार करीत बसण्यांत अर्थहि नाहीं. पण सुदैवानें भरतखंडाची गोष्ट तशी नाहीं. येथील विचारवंत समाजधुरीण कदापि एकच दुराग्रह धरून बसणारे कसे झाले नाहीत हें अनेक दृष्टांतावरून नुकतेंच मार्गे दाखविलें आहे, म्हणून 'युक्तिविवर्जित आचारविचार शास्त्रप्रतिपादित असला तरी अवलंबूं नका.' अशी उदारमनानें स्पष्ट अनुज्ञा देणाऱ्या त्या थोर पूर्वजांच्या इच्छेप्रमाणें नसत्याच गोष्टींचा वाद न घालतां, आपणांस शब्दरक्षण करावयाचें नसून तत्त्वरक्षण करावयाचें आहे, हें ध्यानांत ठेवून 'हिंदु तेवढा एक' या एकच एक जाज्वल्यभावनेनें अखिल विश्व आर्यमय करून सोडण्याकरितां —'कृण्वन्तो-विश्वमार्यम्' भारतीयांनीं बद्धपरिकर व्हावयास पाहिजे. नाहींतर लौकरच पश्चात्ताप करण्याची पाळी येईल.

'देव मात्र उच्छेदिला। जित्या परीस मृत्यु भला।
आपुला स्वधर्म बुडविला। ऐसें समजावें ॥ १ ॥
मराठा तितुका मिळवावा। आपुला महाराष्ट्र धर्म वाढवावा।'
ये विषयीं न करतां तकवा। पूर्वज हांसती ॥ २ ॥
मरणहांक तो चुकेना। देह वाचवितां वाचेना।
विवेकी होऊनी समजाना। काय करावें ॥ ३ ॥

भले कुळवंत ह्मणावे । तेहीं वेगीं हजीर व्हावे ।।
हजीर न होतां कष्टावें । लागेल पुढें ।। ४ ।।

देवद्रोही तितुके कुत्ते । मारोनी घालावे परते ।
देवदास पावती फत्ते । यदर्थी संशय नाहीं ।। ५ ।।

देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा ।
मुलुख बडवा कां बुडवावा । धर्म संस्थापनेसाठीं ।। ६ ।।

श्रीसमर्थ—

सद्यःपरिस्थिति व सद्यःकर्तव्य ह्या उभयतांची यथायोग्य पद्धतीनें जाणीव करून देऊन प्रत्येकाच्या अंतःकरणाला पीळ पाडणारी श्रीसमर्थांची ही दिव्य घोषणा हिंदुसमाज दृष्टीआड करणार नाहीं, अशी आशा आहे.

'कृण्वन्तो विश्वमार्यम्' ह्या पुण्यश्लोक पूर्वजांच्या वैदिक श्रेष्ठ आदेशानुसारच गोमांतकांतहि हिंदुकरणाची मंगलध्वजा फा. शुद्ध ६ शके १८४९ ला रोंवण्यांत आली. आतां ४०० वर्षांच्या प्रदीर्घ कालानंतरच्या ह्या महत्त्वपूर्ण घटनेची यथार्थ कल्पना येण्यास प्रथम गोमांतक प्रदेशाचा भौगोलिक व ऐतिहासिक परिचय करून देणें इष्ट असल्यावरून तो पुढील दोन प्रकरणांतून करून द्यावयाचा आहे.



# श्रेष्ठांचे मननीय विचार.



" जो तो आपल्या धर्माची संख्या वाढवितो आहे आणि आमचे शास्त्री पंडित पहावें तर **पतित परावर्तन** योग्य कीं अयोग्य याचा वादविवादच करीत बसले आहेत. आमची सर्व बाजूंनीं सांखळी सुटली आहे. मला अशी खात्री आहे कीं, खिस्ती, मुसलमान, यां पेक्षांहि वैदिक धर्म प्रसाराचें काम आपल्या पूर्वजांनीं फार सुव्यवस्थित आणि नेटानें केलें आहे. "

लो. टिळक.

" खरें म्हटलें तर गोमांतकासारख्या प्रांतांत जे केवळ ह्या "विटाळा"च्या भोळसट समजुतीपायीं आम्हीं आमच्यांतून हाकलून दिले, त्यांच्यासारख्या स्वजनांस परत पितृगेहीं घेतांना त्यांस शुद्ध करण्याची इतकी आवश्यकता नाहीं कीं, जितकी, ज्या आम्हीं त्यांस बळें बळें पितृगेहा बाहेर बहिष्कृत करून आंत येऊं दिलें नाहीं त्या आह्मांस आमच्या या ज्ञातिविघातक अरेरावी क्रौर्यासाठीं प्रायश्चित्त घेण्याची आहे ! शुद्धी बहिष्कृतांची नाहीं, तर अशा निरपराधी स्वजनांस बहिष्कृत करणाऱ्या आम्हां बहिष्कर्त्यांचीच केली पाहिजे ! "

बॅ. सावरकर.


गोमांतकाचा नकाशा
चंद्रवाडी
काणकोण
कारवार



सेंट आगुस्तानचा मठ (जुने गोवें).



सन १५१२ मध्यें बांधलेलें खिस्ती प्रार्थना मंदिर (जुनें गोवें).



दूधसागरचा धबधबा (गोवें)



व्हॉइसरॉयांची कमान (जुनें गोवें).



सेंट आगुस्तानचा मठ (जुनें गोवें).



सन १५१२ मध्यें बांधलेलें खिस्ती प्रार्थना मंदिर (जुनें गोवें).

# प्रकरण ३ रें.

# गोमांतकाचा अल्पसा परिचय.

[ भौगोलिक दृष्ट्या ]

धीर गंभीर व प्रशांत मुद्रा धारण करुन सर्व इतिहासाला आरंभापासून साक्षीभूत राहिलेल्या नगराज सह्याद्रीमुळें महाराष्ट्राचे निसर्गतःच दोन विभाग झालेले आहेत. त्यांपैकीं पश्चिम विभागास कोंकण असें म्हणण्यांत येतें. ह्याच कोंकणाच्या दक्षिण भागांत गोमांतकाचा समावेश झालेला आहे.. उत्तरेस सावंतवाडी संस्थानांतील तेरेखोलच्या नदीपासून ते दक्षिणेस कारवार जिल्ह्यापर्यंत, आणि पूर्वेस सह्याद्रीपलीकडील बेळगांव व उत्तर कानडा जिल्ह्यांतील सरहद्दीपासून ते पश्चिमेस हिंदी महासागरापर्यंत म्हणजे जवळ जवळ ६२ मैल लांब व ४० मैल रुंद आणि १३०१ चौरस मैल क्षेत्रफळाचा असा हा गोमांतक प्रांत पसरलेला आहे. गोमांतकाचे उत्तर टोंकास पठारदेव व दक्षिण टोंकास पोळें हें गांव असून पूर्व टोंक तिनई घांट व पश्चिम टोंक मुरगांवचें भूशिर आहे.

गोमांतकाचा सर्व प्रदेश विशेषतः नवीन काबिजादि डोंगराळ आहे. सह्याद्रि व त्याच्या शाखा यांतून पसरल्या असून त्यांची उंची कांहीं टिकाणीं ३५०० ते ४००० फूट आहे. इकडे मोटमोठीं अरण्येंहि आहेत. या प्रदेशांत नद्याहि बऱ्याच आहेत, व बहुतेक नद्यांतून होड्या व किल्येकांतून बोटीहि चालतात. येथील हवामान उष्ण आहे. पावसाचें सरासरी मान ९० इंच आहे. मुख्य पीक तांदुळाचें आहे. तें दोनदां काढतात. मद्रास प्रांतांत ज्याप्रमाणें तलाव बांधून त्यांचें पाणी शेताला देण्याचा प्रघात आहे तद्वतच येथेंहि डोंगराच्या खिंडींत किंवा उंच असलेल्या शेताला बांध घालून तेथें तळें करावयाचें व त्याचें पाणी देऊन खालच्या बाजूच्या शेतांतून उन्हाळ्यांत दुसरें एक भाताचें पीक काढावयाचें अशी पद्धत आहे. या पिकाला 'वायंगण' असें म्हणतात. येथें नारळ व सुपारी बरीच होते; शिवाय नाचणी, उडीद, कुळीत, मूग, तूर, इत्यादि धान्यें होतात. भाजीपालाहि बराच होतो; फळझाडांत आंबा, काजू, अननस व फणस हीं प्रामुख्यानें विपुल होतात. इकडे लोखण्डाच्या खाणी आहेत. लॅटेराइट नांवाचा दगड सर्वत्र मुबलक आहे. येथें मीठहि भरपूर पिकतें.

गोव्यांत आगगाडीचा रस्ता एकच असून तो गोव्याच्या मध्यभागांतून पूर्वपश्चिम दिशेनें कॅसलरॉकपासून मूरगांवपर्यंत ५२ मैल गेला आहे. पश्चिम हिंदुस्थान पोर्तुगीज रेल्वेचा हा फाटा पुणें, बेंगलूर मार्गावरील लोंड्यापासून फुटतो. मुंबईहून जलमार्गानें गोव्यास जातां येतें. मुंबईपासून हें अंतर अंदाजें २५० मैलांवर आहे.

गोमांतकाचे राज्य व्यवस्थेसाठीं ११ महाल किंवा विभाग कल्पिलेले आहेत. त्यांपैकीं १ जंजिरे गोवा ( इल्यस ) किंवा तिसवाडी, २ सासष्टी, ३ बारदेश, ४ मूरगांव, या विभागांना किंवा तालुक्यांना, 'व्हेल्यस कोंकिस्त'—प्रथम जिंकून घेतलेला मुलुख किंवा जुन्या काबिजादि व ५ भतग्राम, ६ फोंडें, ७ पेडणें,

८ सांगे, ९ केपे, १० काणकोण, व ११ सत्तरी. या विभागांना 'नोव्हस कोंकिस्त'—नव्या काबिजादि म्हणजे १७६० सालानंतर सोंदेकर व सावंतवाडीकरांकडून घेतलेला मुलूख असें म्हणण्याचा प्रघात आहे. गोमांतक भूप्रदेशाची यथार्थ कल्पना येण्यास या ११ विभागांतील प्रमुख प्रमुख स्थळांचा व तदनुषंगिक गोष्टींचा परिचय करून घेणें आवश्यक असल्यानें ती माहिती संक्षेपतः खालीं दिली आहेः—

१ पहिला विभाग इल्यस किंवा तिसवाडी महालः—या विभागांत गोवा, दिवाडी, ( दीपवती ) चोडण ( चूडामणी ), कुंभारजुवें, डोंगरी, वासी जुवें इत्यादि १० बेटांचा अंतर्भाव होतो; यांपैकीं गोवाबेट प्रमुख असून त्यांत ३० गांव असल्यानें या सर्व विभागाला तिसवाडी महाल असें म्हणण्यांत येतें. तिसवाडीचें मुख्य शहर पणजी ( नवीन गोवें ) हें गोमांतकांतील प्रसिद्ध मांडवी नदीच्या तीरावर वसलें असून तेंच सर्व गोमांतकाची राजधानी आहे. मूळचें हें अगदीं खेडेगांव होतें; परंतु १७५९ सालीं फिरंग्यांनीं त्याला राजधानी केल्यापासून त्याचा भाग्योदय झाला. हें उत्तम बंदर असल्यानें व्यापाराचें एक मोठें केंद्र आहे. गोमांतकाचा पहिला पोर्तुगीज सरसुभेदार आल्फांसो आल्बुकर्क याचा पुतळा या शहरांत आहे.

*या विभागांतील जुनें गोवें हें उध्वस्त झालेलें प्राचीन नगर, ऐतिहासिकदृष्ट्या पाहाण्यासारखें आहे.* वास्को द गामापासून जवळ जवळ १५० वर्षेपर्यंत हें शहर उत्तमावस्थेंत होतें. पोर्तुगीज हे त्या काळीं व्यापारांत पुढारलेले असल्यामुळें साहजिकपणेंच त्यांचा सर्व व्यापार या बंदरांतून होई, त्यामुळें जुनें गोवें त्या काळीं जगांतील आयात निर्गत व्यापारांचें मोठें केंद्रस्थान बनलें होतें. असें सांगतात कीं, त्यासमयीं या शहराएवढें व्यापारदृष्ट्या महत्त्वाचें अन्यस्थान कोणतेंच नव्हतें. या बंदरांत एकेके वेळीं ५००—६०० गलबतें नांगरलेलीं दिसून येत. या व्यापाराच्या भरभराटीमुळेंच युरोपांत या शहराची 'सुवर्णाचें गोवें' अशी ख्याति पसरली होती; परंतु पुढें धर्मसमीक्षणसभेच्या 'Inquisition' जाचामुळें व तदनंतरच्या महामारीनें येथून राजधानी हालविली गेली; अर्थात्च येथील सर्व वैभव व ऐश्वर्य नष्ट झालें. ख्रिस्ती मंदिरांच्या व मठांच्या भव्य विस्तीर्ण व सुंदर इमारतींचे अवशेष त्यांचे गतेतिहासाची साक्ष अद्यापि देत आहेत. येथें एक उंच मोठी कमान आहे, त्यावर सेंट कॅथराइन् व गामासाहेब यांचे पुतळे आहेत. व्हॉइसरायांना राज्यकारभाराची धुरा स्वीकारण्यासाठीं जावयाचें तें या कमानींतून जावें लागतें. ही कमान पोर्तुगीजांच्या हिंदुस्थानांतील राजसत्तेचें चिन्ह असून तिजबद्दल पोर्तुगीजांना मोठा अभिमान वाटतो. ही कमान हिंदुस्थानचा जलमार्ग शोधून काढणारा सुप्रसिद्ध वास्को द गामा याचा नातू दों फ्रांसिस्क द गाम यानें १५९९ मध्यें बांधली. सेंट फ्रान्सिस झेव्हिअरचें मृत शरीर ज्या बॉम झिजसचे मठांत अद्यापि जसेंच्या तसेंच आहे असें मानण्यांत येतें, तो मठ येथेंच आहे. तद्वतच १५१७ मध्यें उभारलेली सांत फ्रान्सिस्कद आसिज याची इमारतहि येथेंच आहे. हिच्या एका दालनांत हिंदु पद्धतीच्या पुष्कळ पाषाणी मूर्ति असून त्यावरून इतिहाससंशोधकांस चांगला उपयोग होण्यासारखा आहे. निरनिराळ्या सर्व ख्रिस्ती पंथांचीं चर्चेस व मठ येथें असल्याकारणानें हें शहर ख्रिस्ती लोकांना पवित्र क्षेत्राप्रमाणें वाटतें. या ख्रिस्तीमंदिरांपैकीं बहुतेक पुष्कळशीं मंदिरें त्यावेळीं हिंदु *देवाल्यांचींच बनविलेलीं होतीं, याची साक्ष उत्कृष्टपणें अद्यापि येथील एक चर्च देत आहे. या चर्चवर*

ख्रिस्ताचा क्रॉस चढत नाहीं, क्रॉस चढवावयास जाणारा मनुष्य तत्काळ मरतो, असें सांगतात. हें पूर्वी शंकराचें देउळ होतें. हिंदुलोकांचें ब्रह्मकमंडलू व ब्रह्मपुरी हीं तीर्थें येथे जवळपासच आहेत.

या प्राचीन गोव्याची थोडीशी कल्पना, येण्याकरितां फ्रान्सिस पिरार्द नांवाच्या एका फ्रेंच प्रवाशानें त्याचें वर्णन करुन ठेविलेलें आहे, तें येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं. कारण या वैभवसंपन्नतेच्या काळीं गोवें शहर पाहातांच प्रवासी इतका संतुष्ट होत असे कीं, त्याला अन्यत्र हिंडण्याची हौसच होत नसे. यावरुन ज्यानें गोवें पाहिलें त्यानें लिस्बन पाहाण्याची आवश्यकता नाहीं अशी म्हण पोर्तुगीज मार्फेत अन्वर्थक पडली होती.*

पिरार्द म्हणतो, 'गोवा शहराची क्षेत्रमर्यादा एकक्रोशी असून त्यांत विस्तीर्ण व फरसबंदी केलेले रस्ते होते, त्यांतला 'Rua-Direita' या नांवाचा १५०० फूट कांबीचा रस्ता मुख्य असून त्याच्या दोहों बाजूस युरोपांतील पोर्तुगीज, इटालियन जर्मन इत्यादि निरनिराळ्या जातीचे कुशल कारागीर, सुवर्णकार व मोठमोठी सावकार मंडळी यांची वस्ती होती. शहराचे निरनिराळे भाग करुन त्या प्रत्येकांत त्या त्या धंद्यांच्या लोकांची एकत्रवस्ती वसविली होती. जिन्हा इकांची विशिष्ट गरज विशिष्ट आळींतच मागविली जावी हा यांत हेतू होता. व्हॉइसरॉय, धर्मसमीक्षण सभा, व आर्चबिशप यांचे वाडे अत्यंत विशाल व भव्य असून इस्पितळें, ख्रिस्ती मठ व मंदिरें इत्यादि बऱ्याच मोठमोठ्या इमारती होत्या. त्या सर्व अत्यंत प्रेक्षणीय असून कांहींचें काम तर युरोपांत देखील दिसेस न पडणारें व दुर्मिळ अशाप्रकारचें होतें; जेजुइत लोकांनीं काढलेलें एक विद्यालय तेथें असून त्यांत हिंदी व युरोपियन मिळून २००० वर मुलें होतीं. जवळच दारु गोळा करण्याचा कारखाना होता. त्यांत तोफा ओतवीत व पुढें जहाजें बांधवीत असत. शहरांतील निरनिराळ्या जागीं रोज बाजार भरत असे. बाजारांत आरबी व इराणी घोडे विकावयास येत असून त्यांची किंमत सरासरी ५०० परदा ( एक पोर्तुगीज नाणें किं.०—६—८ ) होती. त्यांचप्रमाणें येथें गुलामांचाहि व्यापार चाले. तळव्या हिंदुस्थानांतून आणलेल्या चांगल्या देखण्या मुली, बायका व सशक्त माणसें यांना या बाजारांत चांगली किंमत येत असल्यानें त्यांचे व्यापारी पहिल्यानें इकडे येत. हे गुलाम म्हणजे मनुष्यदेहधारी बोलकीं जनावरें गायी बकऱ्यांप्रमाणें दावणीला अडकवून ठेविलेलीं असत. इ. स. १५९२ त यांचा भाव प्रत्येकीं ७५ परदा होता. तो १६०८—१० मध्यें उतरला व ३० परदावरुन २० परदापर्यंत आला. कारण मागणीपेक्षां पुरवठा अधिक झाला हें होय !" इत्यादि इत्यादि.

याच विभागांतील रायबंदर हें विजापुरकरांची व थोरलें गोवें ( गोवापट्टण ) हे कदंबराजाची राजधानी होती. ख्रिस्ती धर्माचा जुलूम जबरदस्तीचा वरवंटा यथेच्छपणें प्रथम याच महालावर फिरला व अपूर्व देवी सुदैवानें याच महालांतील चिंवल, नाजगर, कालापूर, ताळगांव, करमाळी, पाळें इत्यादि ठिकाणीं प्रथमच हिंदुधर्माच्या शुद्धिसंजीवनीचे होम धडाडून चेतविले गेले. या अपूर्व विजयोत्सवानिमित्त उपरोक्त चिंवलग्रामींच श्रीभगवती देवीच्या जागेवरच—ही देवी बाटवाबाटीच्या वेळीं माशेल येथें नेली गेली ती अद्यापि तिकडेच आहे—एक मोठा 'हनुमान जयस्तंभ' अखिल भारतीय—हिंदुमहासभा शिष्टमंडळाच्या अनुज्ञेवरुन उभारावयाचा ठरलें आहे.

* "Quem viu Goa nao precisa ver Lisboa"

२ सासष्टी महालः—यांत ६० गांव व ४ बेटें आहेत. मडगांव ( मठग्राम ) हें या महालाचें मुख्य ठिकाण आहे. मडगांवास युरोपस्थ लोक ' कोकणांतील आथेन्स ' असें ह्मणतात. येथील व्यापार मोठा आहे. येथें लष्करी छावणी आहे, वेस्ट इंडिया पोर्तुगीज रेल्वेवरील हें एक महत्त्वाचें रेल्वे स्टेशन आहे. या ठिकाणीं श्रीपरशुरामानें स्थापन केलेला मठ होता त्यावरून यास मठग्राम ह्मणतात. श्रीपरशुरामानें त्रिहोत्रपुराहून प्राचीन काळीं इकडे आणलेल्या ब्राह्मणांची मठग्राम ही राजधानी होती. या नंतरच्या ऐतिहासिक उलाढालींतहि या शहराचा बराच संबंध आला आहे. या महालांतील कुंकळ्ळीलाच हिंदुलोकांनीं धर्मच्छळानें त्रासून जाऊन सहा पाद्रयांना ठार मारलें होतें. त्यांनाच कुंकळ्ळीचे हुतात्मे ( Martires de Cuncolim) असें ह्मणतात.

३ बार्देश महालः—याचें मुख्य ठिकाण ह्मापसें हें होय. हें शहर कलाकौशल्य, व्यापार, व सार्वजनिक चळवळी यांत बरेंच पुढारलेलें आहे. बार्देश प्रांताच्या दक्षिण सीमेवर सुप्रसिद्ध आगवादचा किल्ला आहे. १६१२ सालीं हा बांधला गेला. त्याचे तट उंच व मक्कम आहेत. त्यावर एक उंच दीपस्तंभ आहे. रैजमाग येथेंहि असाच एक किल्ला आहे.

४ मूरगांवः—हें उत्तम बंदर, गोव्यांतील रेल्वेचें शेवटचें आणि महत्त्वाचें स्टेशन आहे. ब्रिटिश कौन्सल येथेंच असतो. वास्को—दि—गाम हे या भागाचें मुख्य शहर आहे. येथे चांगला किल्ला असून लष्करी छावणीहि आहे. १६८३ सालापर्यंत मूरगांवास गोमांतकाची राजधानी करण्याचा मानस होता. या भागांत कुशस्थळी, केळोसी, शंखावली, वेरणें, इत्यादि पवित्र स्थानें आहेत.

५ बत्ग्रामः—या महालाचें मुख्य ठिकाण डिचोली हें आहे. येथें लष्करी छावणी व जुना किल्ला आहे. श्रीशिवाजी महाराज व वाडीकर सांवत यांच्यामधील लढाया येथील समरभूमीवर झाल्या. या महालांतलि सांखळी हे एक मोठें गांव असून तेथें सारस्वत स्वामींचा मठ आहे. गांवाला गोव्यांतलि नरसिंहवाडी असें म्हणतात. या महालांतील नार्वे गांवीं हाटकेश्वर, सप्तकोटीश्वर यांचीं पवित्रस्थानें व पंचगंगातीर्थ आहे.

६ फोंडेंः—किंवा अंत्रूज महाल याचें मुख्य ठिकाण फोंडा हें आहे. येथें लष्करी छावणी आहे. हें आदिलशाहीची राजधानी होते. त्या काळची सफ्का मशीद, कीं जिच्यापुढें काफर हिंदूंना भर उन्हांत तासचे तास नमाज ऐकण्यास उभें रहावें लागत असे ती येथेंच आहे. येथील मर्दनगडावरच श्री संभाजी महाराजांनीं पोर्तुगीजांस मराठ्यांच्या क्षात्र तेजाची पुरेपूर ओळख करून दिली. येथील झिंगडीच्या माळावरच व्यंकटराव घोरपडयांनीं पोर्तुगीजांना ' त्राहि भगवान् ' करून सोडलें.

तिसवाडी, सासष्टी इत्यादि ठिकाणचा अमानुष छळ असह्य होऊन कित्येक लोक आपल्या देवदेवतांसह याच महालांत आश्रयास येऊन राहिले; यामुळें गोमांतकांतील बहुतेक सर्व प्रसिद्ध देवस्थानें येथें आहेत. मंगेशी येथील श्रीमंगेश ( मांगीरीश ), कवळ्याची श्री शांतादुर्गा, ह्मार्दोळ येथील महालसा देवी, बांदिवडें येथील श्रीनागेश, श्रीरामनाथ व श्रीमहालक्ष्मी, शिरोडयाची श्रीकामाक्षी, वेलिंगचा श्रीनरसिंह

मंदिरें अत्यंत प्रेक्षणीय आहेत. या प्रमुख देवस्थानांतील उत्तमोत्तम असा जो कांहीं भाग निवडला गेला आहे, त्यांत श्रीशांतादुर्गेच्या देवालयाचा घुड, श्रीमंगेश देवालयाचा खांब, श्रीमहालक्ष्मी देवालयाचा चौक, श्रीमहालसा देवीचें स्थळ, श्रीनागेश देवाची तळी अशीं प्रसिद्ध आहेत. या महालांतील वोरी गांवा नजीक सिद्नाथ पर्वतावर श्रीसिद्धेश्वराचें एक रम्य मंदिर आहे. सिद्नाथाची उंची १२०० फूट अंदाजें असून वर गोड पाण्याचे झरे आणि औषधी वनस्पति विपुल आहेत.

७. पेडणें:—या महालाचें मुख्य शहर पेडणें आहे. या गांवांतील केरी हें गांव इतिहासप्रसिद्ध कै. जिवबादादा बक्षी यांची जन्मभूमि आहे. येथील हळर्ण गांवीं मराठे पोर्तुगीजांच्या बऱ्याच लढाया झाल्या. हळर्ण व तेरेखोल येथें जुने किल्ले आहेत.

८. सांगें:—या महालाचें सांगें हें मुख्य ठिकाण आहे. रिवण ही चावडीची जागा असून तेथें वैष्णव स्वामींचा एक मठ आहे. या महालांतील जांबावली येथें मठग्रामच्या श्रीदामोदराचें देवस्थान आहे. या महालांतील कुळें ( Collem ) रेल्वे स्टेशन हें जकातीचें नाकें आहे. येथेंच मालाची तपासणी व प्रवाशांची नाडीपरीक्षा होते. सावर्डें हेंहि मोठें प्रसिद्ध बंदर व रेल्वे स्टेशन आहे. सर्व गोमांतकांत अत्यंत चित्ताकर्षक असलेला व त्याला भूषणावह होऊन राहिलेला दूधसागरचा सुप्रसिद्ध धबधबा याच महालांत आहे. ३९० फुटांवरुन दुधासारखें अगदीं शुभ्र पाणी पर्वतावरुन उड्या मारीत मारीत खालीं पडतांना जो नयनमनोहारी व आल्हादकारक देखावा दृष्टीस पडतो तो खरोखर अवर्णनीय आहे. धबधब्याची ती अप्रतिम शोभा प्रवाशाला दाखविण्याकरितांच कीं काय आगगाडी दूधसागरच्या स्टेशनापासून सारखी १५–२० मिनिटें पर्यंत अर्ध वर्तुलाकार खालीं खालीं उतरत जात असते. पोटभर पाहून पाहूनहि अतृप्त राहिलेल्या प्रवाशानें निसर्ग सुंदरीचें हें अतीव मोहक स्वरुप जन्मांतहि विसरणें शक्य नाहीं.

९ केंपें:—हें या महालाचें मुख्य ठिकाण असून कुशावती नदीचे तीरावर वसलें आहे. या महालांतील चंद्रनाथाचा पर्वत व त्यावरील चंद्रेश्वराचें पवित्र देवस्थान सुप्रसिद्धच आहेत. चंद्रनाथाची उंची सुमारें १७०० फूट असून त्याच्यावर १०८ तीर्थें असल्याचें सांगतात. अनेक दिव्य औषधी वनस्पतींचें हें स्थान आहे.

१०. काणकोण:—या तालुक्याचें मुख्य ठिकाण चावडी हें आहे. काणकोण येथें मल्लिकार्जुनाचें मंदिर असून त्याचे वायव्येस प्रसिद्ध रामाचें मंदिर आहे. यांतील पर्तगाळ येथें वैष्णव स्वामींचा मठ आहे.

११. सत्तरी:—हा बहुतेक डोंगराळ मुलुख आहे. वाळपें, हें या भागाचें मुख्य ठिकाण आहे. येथें निग्रो लोकांची छावणी आहे. वाळपैला व नाणसला जुने गड आहेत. येथील सोंठरची खिंड प्रसिद्ध आहे. या विभागांत, सोसोगड, मार्लेगड, वागेरी असे उंच उंच पर्वत आहेत. त्यांची उंची ३४००, ३८०० फूट अशासारखी आहे. या महालाच्या ईशान्य भागांत क्षत्रियांची माउली या अर्थाच्या नांवाचा ३६०० फूट उंचीचा पर्वत आहे. येथील अरण्यें निबिड असून तेथें चंदन, खर, वेत

इत्यादि विपुल होतात. १९ व्या शतकांत गोमांतकभर बंडाची धामधूम उठवून पोर्तुगीजांच्या छातींत धडकी भरविणारे राणे लोक याच महालांतील होत.

उपरोक्त ११ महालांची म्हणजेच अर्थात् गोमांतकाची १९११ सालच्या खानेसुमारीप्रमाणें लोकसंख्या ४८६७५२ इतकी आहे. या लोकवस्तीपैकीं २६६२४१ इतके लोक कॅथॉलिक ख्रिस्ती आहेत व २१५०८३ इतके लोक हिंदु आहेत. ४९६१ मुसल्मान आहेत. १०८ इतर धर्मीय व ५९ धर्मविहीन आहेत.

ख्रिस्ती धर्मांत जाती मानण्याची पद्धत नसली तरी गोमांतकापुरतें बोलावयाचें तर त्यांच्यांत प्रामुख्यानें ठळक ठळक जाती दृष्टिगोचर झाल्याविना राहात नाहींत. त्यांचें वर्गीकरण सामान्यतः असें करतां येईल. १ पोर्तुगीज, यांत पोर्तुगालहून आलेले वरिष्ठ अधिकारी प्रभृतींचा समावेश होतो; २ मिस्तीस (Mesticios) किंवा युरेशियन् जे युरोप व आशिया येथील मिश्र रक्तापासून झालेले आहेत; ३ किरिस्तॉंव ब्राह्मण, हिंदुमधून बाटविलेले ब्राह्मण; ४ चारडे–क्षत्रिय कुलांतील बाटविलेले; ५ शूद्र, व ६ अतिशूद्र वरील सोडून हिंदूंतून राहिल्यापैकीं बाट-लेले. गोमांतकांतील ख्रिस्तिधर्म प्रचारकांचे फ्रान्सिस्कन, जेजुईत, दोमिनिक ऑगास्तिन, कार्मोलिन, सानकायतान, फिलिपनेरी, इत्यादि अनेक धर्मपंथ येथे होते, परंतु पूर्वीप्रमाणें आतां त्यांचें सत्तावर्चस्व कांहीं नाहीं.

येथील हिंदुलोकांतहि सारस्वत, किरवंत, पद्ये, चित्तपावन, कऱ्हाडे, वैश्य, सोनार, सुतार, कुंभार, गावडे, सुदीर, वन्दे, देवळी, इत्यादि कित्येक जाती दृष्टीस पडतात. इकडे सारस्वत ब्राह्मणांची वस्ती प्रामुख्यानें आहे. इतर जाती यांना 'बामण' ( ब्राह्मण ) म्हणतात व कोंकणस्थ, कऱ्हाडे यांना 'भट' म्हणतात.

गोमांतकांत सर्वत्र प्रामुख्यानें कोंकणी भाषा चालते. सुशिक्षित ख्रिस्ति लोक पोर्तुगीज मधून आपले सर्व व्यवहार करतात. राजभाषा पोर्तुगीज आहे. येथील लोकांचें मुख्य अन्न तांदूळ हें आहे. ख्रिस्ती लोक मांसाहारहि करितात. गोमांतकांतील लोक संतोषी, दयाळु, देवभोळे, आदरातिथ्यप्रिय व अत्यंत भावनाप्रधान आहेत.



# प्रकरण ४ थें.

## गोमांतकाचा संक्षिप्त इतिहास

### ( विशेषत्वानें हिंदूंच्या अमानुष छळाची करुण कहाणी ).

" गोमांतकीं अविंधानें हिंदुता छळिली कशी । जाहलीं धर्म कर्मेंहि दंडनीय अधर्मशीं !
अहो परशुरामाचें देवस्थानचि ना जनीं । पूजा उध्वस्त देवांची देव देव घरांतुनी !!
मौंजी विना मुलें, लग्नाविना ह्या युवती अहा । संस्कारहीन ही सारी प्रजा पौरुषहीन हा !!
देश गेला ध्वजा गेली गेला धर्महि दुर्दशें । गेलें राज्य तया राष्ट्रीं गेले काय वदा नसे !!"

गोमांतक—काव्य

गोमांतकाचा प्रदेश अत्यंत निसर्गरमणीय असल्याकारणानें त्याला भारतवर्षीय लोक कोंकणचें काश्मीर अशी उपमा देतात, तर युरोपस्थ लोकांना त्याला पूर्वेकडील रोम ( Rome of the East ) अशा नांवानें संबोधण्यांत आनंद वाटतो.

अशा या निसर्गरमणीय ईश्वरी देणगीमुळेंच गोमांतक हा प्रदेश प्राचीन काळीं तीर्थ किंवा पवित्र क्षेत्रांत गणला जात असे; व त्यालाच अनुलक्षून परशुरामानें येथें पापविमोचनार्थ केलेल्या यज्ञाचा तद्वतच गोमांचल पर्वतारील श्रीकृष्ण व गौतमादिक ऋषींच्या वास्तव्याचा उल्लेख सांपडतो. साहजिकच पापमय घोर अंधकार संपविण्यास गोमांतक प्रदेशाचें केवळ दर्शनमात्रच कसें कारणीभूत होतें, हेंहि मुक्तकंठानें वर्णिलेलें आढळतें:—

" गोकर्णादुत्तरे भागे सप्तयोजनविस्तृतम् ।
तत्र गोवापुरीनाम नगरी पापनाशिनी ॥
गोवापुर्या दर्शनेन पापं हन्ति पुरार्जितम् ।
गोवापुर्यास्समानं च नास्ति क्षेत्र न संशयः स. खं.

अशा या गोमांतकाची उत्पत्ति दोन चार प्रकारांनीं लावलेली आढळते. शिलालेख व ताम्रपटांचा विचार करितां गोपकपुरी अथवा गोपत्तन ( गोपकपट्टन ) यावरून गोपराष्ट्र ( महाभारतांत उल्लेखिलेलें )—गोवा असें नांव पडलें असावें. पोर्तुगीज लोक गोअमोट—रमणीय सृष्टिप्रदेश—' गोवात, अशा कांहीं पद्धतीनें उत्पत्ति लावण्याचा प्रयत्न करीतात; पण तें सयुक्तिक दिसत नाहीं. गोमंत पर्वतावरुन किंवा गोमांचलावरूनहि ह्या प्रदेशाला प्रस्तुतचें नांव पडलें असावें. तद्वतच " गौ "—बाण त्याचा " मा "—

क्षेप, फेंक, किंवा मार याचा अंत जेथें होतो तें "गोमांत" शब्दवाच्य मानावें. 'क' हा नाम मात्रा पुढें येणारा प्रत्यय म्हणून गोमांतक म्हणजे परशुरामानें समुद्रांत बाण मारून समुद्रापासून मिळविलेली भूमि अशी ही उपपत्ति कांहींजण लावतात. परशुरामानें स्वप्रतिज्ञेनुरूप पृथ्वी निःक्षत्रिय केल्यावर ब्राह्मणांस दान दिली व पुढें दान दिलेल्या भूमींत राहणे योग्य नाहीं, असें वाटल्यावरून आर्यावर्तापासून थेट सह्याद्रीच्या पश्चिमेस येऊन त्यानें समुद्रापासून शूर्पारक ( सुपाच्या आकाराचें ) नवीन क्षेत्र निर्माण करून तो तेथें राहूं लागला. तेंच सध्यांचें गोमांतक असा सह्याद्रि खंडाच्या उत्तरार्धांत उल्लेख आहे.

गोमांतकाचा प्राचीन असा इतिहास उपलब्ध नाहीं. पुराणांतरीं या देशाविषयीं विविध गोष्टी लिहिलेल्या आहेत. वर उल्लेखिलेल्या स्कंद पुराणांतर्गत सह्याद्रि खंडांत असें लिहिलें आहे, कीं, क्षत्रिय-पाप-विमोचनार्थ आरंभिलेल्या यज्ञाच्या सिद्धयर्थ परशुरामानें गौड देशांतील त्रिहोत्रपुराहून ( सध्यांचें तिरहूत ) येथें ब्राह्मणांचीं दहा कुळें वस्तीस आणिलीं. या ब्राह्मणांना परशुरामानें स्वकार्यसिद्धीनंतर सासष्टींतलें सासष्ट गांव व तिसवाडींतले तीस गांव मिळून एकंदर ९६ गांव दान दिले. या ९६ गांवांचे अधिकारी म्हणूनच त्या ब्राह्मणांना शाणवी, शेणवी असें म्हणूं लागले. ह्यावेळीं कोंकणचा पूर्व व उत्तर प्रदेश भयंकर अरण्यांनीं व्याप्त असल्यामुळें ह्या ब्राह्मणांचें स्वातंत्र्यपूर्ण जीवन अबाधितपणें चाललें होतें. ह्याच अवस्थेंत गोमांतक म्हणजे लहान लहान ग्रामसंस्थांचें एक संयुक्त पण स्वतंत्र असें राष्ट्र बनलेलें होतें व त्यांच्या केंद्रस्थानीं त्या त्या संस्थेची निरनिराळीं कुलदैवतें असून त्यांचा कारभार त्या त्या देवतांस अनुलक्षून करण्यांत येत असे. येथील ह्या ग्रामसंस्थांची सुंदर रचना पाहून पुढें गोंवें जिंकणारा पोर्तुगीज सरदार आल्बुकर्क यास मोठें आश्चर्य वाटलें.

ह्या ग्रामसंस्थांस एका पोर्तुगीज ग्रंथकारानें 'पिकेनस् रेपुब्लिकस्' म्हणजे लहान लहान प्रजासत्ताक राज्यें असें म्हटलें आहे; परंतु अलोट संपत्ति व अमर्याद स्वातंत्र्य यामुळें या संस्थांत अविवेक शत्रु लौकरच जागा झाला व त्यानें आपल्या हक्क, अधिकार, व तज्जन्य मानापमान, द्वेष, मत्सर, कलह इत्यादि सवंगड्यासह येथें कायमचें ठाणें दिलें; त्यामुळें अन्योन्य प्रेम, परस्पर सहानुभूति व एकमेकांवि यींचा अभिमान हा लुप्तप्राय झाला आणि बाहेरच्या लोकांस बोट शिरकावण्यास तेथे जागा झाल यापूर्वीच आर्यलोकांच्या दक्षिणेकडे वसाहती होऊं लागल्या होत्या व लौकरच वरील ब्राह्मणांकडून गोमां-तक प्रदेशाची सत्ता निघून ती नवीन राजवंशांच्या स्वाधीन झाली.

अशाच एका कदंब नांवाच्या राजवंशाच्या सत्तेखालीं इ. स. ११० वर्षांपूर्वी गोमांतक नांदत अस त्याची माहिती ताम्रपटादिकांच्या योगें संक्षेपतः मिळते. पुढच्या कालांत कांहीं वर्षे कदंबांकडून शा वाहनाकडे, शालिवाहनांकडून चालुक्यांकडे, चालुक्यांकडून कलमूर्यवंशी महामंडलेश्वराकडे, महामंड श्वरांकडून कानडी वसवा ब्राह्मणांकडे, ह्या ब्राह्मणांकडून राष्ट्रकूट घराण्याकडे, त्याजकडून पुनश्च चालुक्यांकडे अ गोमांतकाची राज्यसूत्रें फिरती राहीलीं. चालुक्यांशीं सख्य संपादून कदंब वंशीय जयकेशी राजानें आपलें स्वातं व राज्य परत मिळविलें व गोपक पट्टण येथें आपली राजधानी करून तो स्वतंत्रपणें कारभार करूं लागल गोपकपट्टणालाच सध्यां थोरलें गोंवें अशी संज्ञा असून जुन्या गोव्या जवळच तें आहे. जयकेशी नं

त्याचा पुत्र विजयादित्य, विजयादित्याचा पुत्र जयकेशी, जयकेशीचा वडिल मुलगा शिवचित्त व त्याचा पुतण्या वीरजयकेशी, ह्या कदंबवंशीय राजपुरुषांनीं पुष्कळ वर्षेपर्यंत राज्योपभोग घेतला. हे कदंबवंशीय पुरुष सर्व विद्वान्, पराक्रमी देवभक्तिपरायण व प्रजाहिततत्पर असे होते. वीरजयकेशीच्या अमदानींत श्रीसप्तकोटीश देवस्थान भरभराटीस आलें. ११९३ या वर्षी कदंबांवर यादव वंशीय बल्लाळांनीं स्वारी करुन त्यापासून ते खंडणी घेऊं लागले. पुढें देवगिरीच्या राजांचें प्राबल्य होऊन १३१४ पर्यंत कदंब राजांना त्यांच्या पुढेंहि मान वाकवावी लागली. यानंतर १४ व्या शतकाच्या प्रारंभास अल्लाउद्दीन खिलजीचे सेनेनें देवगिरीच्या यादव राजांचा समूळ नीमोड केला व त्याचे विजयी सेनानी गोमांतकांत घुसले. कदंबांनीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली; परंतु भवितव्य कांहीं वेगळेंच ठरलें होतें. गोमांतकीयांना साहाय्याची अपेक्षा असलेल्या तैलंगण राजाचाहि दिल्लीच्या तघल्कांनीं पराभव केला व दक्षिणेत मुसलमानी अमलाचा पंचे भीषण साम्राज्य सुरु झालें. अत्यंत विजातीय अशा त्या परकीय संस्कृतीच्या घनघोर मान्यानें हिंदु समाजांत तीव्र असंतोष व भयंकर अस्वस्थता माजून राहिली. ही अत्याचारी संस्कृति नष्ट होऊन हिंदु धर्मध्वजा पुनरपि स्वस्थानीं डोलूं लागावी, या हिंदुसमाजाच्या अंतस्थ आकांक्षाना विजयनगराच्या राज्य स्थापनेनें मूर्त स्वरुप आलें. १३६७ त हरीहरराय विजयनगराच्या गादीवर अधिष्ठीत झाल्यानंतर त्यानें विद्यारण्य माधवास गोमांतकाची मुसल्मानांच्या पाशवी पाशांतून सुटका करण्याकरितां पाठविलें. हिंदु आणि तुर्क जिवावर उदार होऊं लागले; पण परमेश्वरी कृपेनें अंतीं माधवाला विजय लक्ष्मीनें माळ घातली. माधवानें अत्याचारी तुर्क राक्षसांना यथेच्छ झोडपून काढून हाकलून लावलें आणि गोमांतकाची मंगल सुप्रभात उदित झाली. सप्तकोटीश्वराची पुनरपि स्वस्थानीं स्थापना करण्यांत आली. मोडलेल्या देवालयांचे शोभिवंत कळस पुनश्च गगनांत निर्भयपणें चमकूं लागले. माधवतीर्थाची—ज्याला पुढें ब्रह्मपुरी म्हणत—स्थापना झाली. ह्या तीर्थावर अट्टाहासानें व फसगतीनें बाटलेल्या हिंदूंना यथाविधि प्रायश्चित्त देऊन शुद्ध करुन घेण्यांत येत असे असें सांगतात. ह्याप्रमाणें माधवानें गोमांतकाला पुनश्च राम राज्याचे पहिले दिवस दाखविले.

परन्तु विजयानगरचा हा चढता वाढता भाग्यरवि असमंतातिल मुसलमानी सत्तांना सुखासमाधानें पाहाणें शक्य नव्हतें. गुल्बर्ग्याच्या महंमदशाहाच्या डोळ्यांत तर विजयनगरचें वैभव विशेष खुपावयास लागून तो विजयनगरला धुळीस मिळविण्याची सारखी संधि पहात बसला होता. परस्त्रीचा अभिलाष हा इतिहासामध्यें मोठमोठया राष्ट्रीय घडामोडीस अनेकवेळां कारणीभूत झालेला आढळतो, तोच प्रकार येथेंहि झाला.

ब्राह्मनी राज्याचा फिरोजशहा विजयनगरांतील मुद्गल गांवच्या एका सोनार कन्येच्या सौंदर्यानें वेडावून गेला व त्यानें कांहीं सैनिक तिला पकडून आणावयास पाठविले; परंतु तो सोनार मुलीसहित अन्यत्र कोठें तरी पळून गेल्यामुळें त्यांचे हातीं लागला नाहीं; त्याबरोबर विजयनगरचा सूड घेण्यासाठीं फिरोज शहानें तीस हजार घोडेस्वार व मोठें पायदळ पाठविलें. अर्थात कृष्णरायाचा एवढया मोठया सैन्यापुढें टिकाव लागला नाहीं, व तो अरण्यांत पळून गेला. इकडे फिरोजशहानें त्याच्या मुलीशीं बलात्कारानें लग्न लावून अपार संपत्तीचा उपभोग घेतला. कृष्णराय अरण्यांत कंटाळून एकटाच परत आला.

त्याजपाशीं फिरोजशहा तह करून निघून गेला. १४६८ पर्यंत वरील संधी-प्रमाणें उभय राज्यें सख्य-त्वानें नांदत होतीं इतक्यांत एकाएकीं कांहीं तरी कुरापत काढून गुलबर्ग्यांच्या महमंदशाहानें आपला प्रधान महंमदगावन यास १४६९ त गोव्यांवर स्वारी करण्यास पाठविलें. गोव्यांतील राजप्रतिनिधि अमराजी याचे आधिपत्याखालीं हिंदुलोक निकरानें लढले; पण दुर्दैवानें विजयी झाले नाहींत. व पुनश्च गोमांतक मुसल्मानांच्या विषारी राजपाशांत अडकला गेला. या नंतर अमराजीनें गोमांतक सोडविण्याचे अनेक स्थलांहून अविश्रांत परिश्रम केले; पण त्या दिव्यान्यास कोठेंच यश आलें नाहीं. साहजिकच हिंदूंचीं पवित्र देवस्थानें धुळीस मिळालीं, मूर्ति रडातड फोडल्या गेल्या; सर्व पीर, पंजे व मशिदी उभारल्या गेल्या, हिंदु स्त्रियांच्या पातिव्रत्याची रावरांगोळी करण्यांत आली व बाटवाबाटवी करण्याकरितां काफरांचे हालहाल करण्याचा हैदोस सर्वत्र स्वैरपणें शेफाळला. याप्रमाणें इस्लामी धर्माचा शीतल (!) चांद गगनांत अभिमानानें फडकत राहिला. मध्यंतरीं बाहामनी राजाच्या गोमांतकातील सुभे दारानें १४९७ मध्यें गोमांतक प्रांत विजापुरच्या आदिलशाहींत समाविष्ट केला.

याच सुमारास धनकनकसंपन्न भारतवर्षांच्या विमलकीर्तिसुगंधानें हर्षोन्मत्त होउन त्या सुवर्ण भूमीचा शोध घेण्याच्या प्रयत्नांत पाश्चात्य राष्ट्रें गुंग झालीं होतीं. अखेरीस ज्याच्या शोधाकरितां हजारों धाडशी पाश्चात्य वीर वाटेल तें साहस एकमेकांच्या ईर्षेनें सतत कित्येक वर्षे करीत आले होते, तो त्या क्षणा पर्यंत पुष्कळांस स्वप्नसृष्टिवत् वाटणारा भरतखंडाचा स्वर्गतुल्य किनारा पोर्तुगीजांच्या सुदैवानें त्यांच्या वास्को द-गामा या शूर नाविकाच्या दृष्टिपथांत १५ व्या शतकाच्या अंतीं—महत् प्रयासानें आला व भारतवर्षांच्या महद्दशेला या क्षणापासून प्रारंभ झाला.

त्यावेळीं कालिकोट येथें झामोरिन हा हिंदु राजा राज्य करीत होता. त्याच्या राज्यांत सर्वांस व्यापार करण्याची मुभा होती. गामानें झामोरिनची ओळख करून घेऊन त्यास आपला व्यापाराचा उद्देश कळविला; परन्तु त्याची डाळ तितकीशी शिजली नाहीं.

इतकेंच नव्हे तर आपला नाश करण्याची अंतःस्थ सिद्धता चालू असल्याचा सुगावा लागून तो परत पोर्तुगालकडे गेला. निघाल्यापासून २-२॥ वर्षांनीं (१४९९) गामा लिस्बन येथें सुखरूप पोहोंचला. गामाचे विजयानें पोर्तुगीजांना साहजिकपणेंच ब्रह्मांड ठेंगणें झालें व लगेच १५०० सालीं त्यांनीं काब्राल यास १३ तारवें व १२०० लोक देऊन हिंदुस्थानांत आपलें वर्चस्व प्रस्थापित करण्याकरितां पाठवून दिलें. वाटेंत त्याला ब्राझील किनाऱ्याची आकस्मिकपणें शोध लागला. या मार्गामुळें हर्षनिर्भर होऊन काब्राल हिंदुस्थानाकडे सपाट्यानें निघून आला. हिंदुस्थानांत उतरल्यावर त्यानें कालिकत येथें वखार घातली. युरोपस्थांच्या व्यापाराचा जम बसत चालला, हें पाहून इकडील व्यापारीवर्ग खवळला व झामो-रिनचे कानावर सारखीं गाऱ्हाणीं जाऊं लागलीं. झामोरिनलाहि युरोपस्थांचा अंतर्हेतु कळून चुकल्यासारखें झालें व धुसपुस आणि बेबनावाला सुरवात झाली. व्यापाऱ्यांनीं काब्रालच्या वखारीस आग लावून गोरी माणसें बरींच कापून काढिलीं. त्यामुळें क्रोधसंतप्त होउन काब्रालनें कालिकतवर तोफांचा भडिमार केला, व तो कोचीकडे निघून गेला. सुदैवानें काब्रालला याचवेळीं झामोरिनच्या द्वेषामुळें—कोचीच्या राजानें जवळ केलें. पुढें दोघांचे व्यापारी तह होऊन काब्राल स्वदेशीं निघून गेला, व याप्रमाणें दुर्दैवानें

आपआपसांतील वैमनस्यामुळें या व्यवस्थांत इकडे स्वच्छंदपणें धिंगाणा घालण्यास कोचीच्या राजानें दरवाजा मोकळा केला !

इतक्यांत झामोरीननें कोचीवर मोठी स्वारी केली, व कोचीच्या राजास पळावयास लाविलें; परंतु याच सुमारास पोर्तुगालहून फ्रान्सिस व आल्फोन्स आल्बुकर्क हे दोन शूर सरदार बलाढ्य आरमारानिशीं आले, व त्यांनीं कोचीचे राजाला पुनरपि राज्यावर बसविलें. यानंतर उघडपणेंच परस्परांत वैर माजून अशा अनेक झटापटी झाल्या; परंतु प्रत्येकांत झामोरिन यासच पराभूत व्हावें लागलें. या झटापटींनीं असें दिसून आलें कीं, युरोपस्थांना शिस्तीच्या थोड्या लोकांनिशीं अफाट हिंदी सैन्याचा सहज धुराडा उडवितां येतो, तद्वतच दोन सत्तेंत 'येन केन प्रकारेण' फाटाफूट पाडून आपला ईप्सितार्थ सहज व लौकर साधून घेतां येतो.

वरील घटनेनंतर १५०२ मध्यें पोर्तुगाल बादशहानें फ्रान्सिस्कद-आल्मेद यांस हिंदुस्तानांत पहिले मुख्य अधिकारी ( व्हाइसराय ) म्हणून नेमलें. फिरंग्यांची उचलबांगडी करण्याकरितां मिसरच्या सुलतानाकडून व गुजराथच्या राजाकडून जारीनें प्रयत्न चालले होते. संवायतचे आखातांत उभयतांचें तुंबळ युद्ध होऊन आल्मेद विजयी झाला. उभयपक्षांत तह होऊन फिरंगी कैद्यांना सुलतानानें सोडून दिलें; परंतु आल्मेदनें विरुद्धपक्षाच्या सर्व कैद्यांची कानानुरा येथें निर्दयपणें कत्तल केली व १५०६ मध्यें कारवारपासून २॥ कोसांवर अंजदीव येथें किल्ला व चर्च बांधलें.

अल्मेदाचें नंतर १५०९ मध्यें राजप्रतिनिधित्व आल्बुकर्क याजकडे आलें, आल्बुकर्क हा अत्यंत महत्त्वाकांक्षी होता, व हिंदुस्तानांत राज्यस्थापना करण्याची त्याला तीव्र इच्छा होती. त्याचप्रमाणें प्रथमच त्यानें कालिकत शहरावर रात्रौ सर्व लोक बेसावध असतां अचानकपणें हल्ला चढविला; परंतु दुसऱ्याच दिवशीं झामोरिनचें सैन्य खवळून जाऊन फिरंग्यांवर तुटून पडलें व अल्बुकर्कला कसेंबसें लपत छपत पूर्वीच आश्रय मिळविलेल्या कोचीचे किनाऱ्यावर धडपडत येऊन पडावें लागलें. हा अत्यंत महत्त्वाचा क्षण होता, व यावेळीं जर घरबुड्या कोचीराजाकडून त्याला थारा मिळाला नसता, तर पुढील इतिहास निराळाच लिहावा लागला असता. याच सुमारास पोर्तुगालहून आरमारी मदत आली, व समुद्रांत चांचेगिरी करणारा तिमोजी हाहि आदिलशाहीविरुद्ध आल्बुकर्क यांस साह्य करण्यास सिद्ध झाला. स्वतःच्या अंतरंगांतील हेतूंची सफलता, तिमोजीच्या गोवा शहर प्रथम स्वाधीन करून देण्याच्या मसलतीनें सिद्धीस जाईल, हें जाणून अल्बुकर्कनें आपला मोर्चा गोव्यावर वळविला. बाहेरून शत्रूला तोंड देण्याकरितां जरी त्यानें जय्यत तयारी केली होती, तद्वतच गोव्यांतील लोकांना तिमोजी करवी, 'तुम्हांला पूर्ण धर्मस्वातंत्र्य मिळेल, तुमचे हिंदुत्वाचे सर्व हक्क रक्षण केले जातील' अशासारखीं सुंदर प्रलोभनीय आश्वासनें देऊन त्यांचें साहाय्य मिळविण्यास आल्बुकर्क विसरला नाहीं. इतक्या गोष्टी झाल्यानंतर आदिलशाही सैन्य अन्यत्र लढाईंत गुंतलेलें पाहून १५१० चे फेब्रुआरींत आल्बुकर्कनें अचानक छापा घालून गोवा शहर हस्तगत केलें. मुसलमानी छळानें गांजलेल्या प्रजेनें त्याचा जयजयकार केला. विजापूरकरांना ही गोष्ट समजतांच त्यांनीं महान् सैन्यानिशीं स्वारी करून पोर्तुगीजांस पिटाळून लाविलें, परंतु आल्बुकर्कचें नशीब सिकंदर असल्यानें

पुनश्च नोव्हेंबरांत उचल खाऊन त्यानें गोवा सर केले, व पोर्तुगीज राज्याचा पाया हिंदुस्थानांत कायमचा घातला. नोव्हेंबर २५ हा दिवस 'सांतकाथरिन' हिचा असल्यामुळें ज्या ठिकाणीं उभयपक्षांचें रणकंदन होऊन गोवा पुनरपि पोर्तुगीजांचे हस्तगत झालें, त्या ठिकाणीं त्या शुभदिवसाच्या स्मरणार्थ १५५० सालीं गव्हर्नर जॉर्ज काब्राल यानें सरकारी खर्चानें एक लहानसें देऊळ ( चॅपेल ) बांधविलें, पोर्तुगीजांच्या विजयाचें हें स्मरणचिन्ह अद्यापिहि पहावयास सांपडतें.

आल्फोन्स-द-आल्बुकर्क हा गोवा शहर घेऊन स्वस्थ बसला नाहीं. पोर्तुगीज लोक सबंध हिंदुस्थानचे राज्यकर्ते व्हावेत, अशी त्याची जबरदस्त महत्त्वाकांक्षा होती. तो मोठा धोरणी व मुत्सद्दी होता. आपल्या राज्यांतील लोकांना पोर्तुगीज सत्तेविषयीं आपलेपणा वाटावा म्हणून हिंदी युरोपियनांचीं मिश्र लग्नें लावण्याचा सपाटा त्यानें चालविला. कारण याप्रमाणें रक्तांत भेसळ निर्माण केली म्हणजे एतद्देशीय स्वाभिमान आपोआपच नष्ट होईल, हें त्याला पूर्णपणें अवगत होतें. या मिश्र विवाहापासून झालेली युरेशियन प्रजा अर्थातच राज्याची कायमची आधारस्तंभ बनली. गोव्याप्रमाणेंच आल्बुकर्कनें मलबार द्वीपकल्पांतील मलाक्का, इराणी आखातांत ओरमुज, बंगाल्यांत हुगळी व चित्तगांग, गुजराथेंत दीव व दमण आणि इतर अशींच पुष्कळ स्थळें जिंकून घेतलीं, व पोर्तुगीज सत्ता कळसास नेली. याप्रमाणें आल्बुकर्कनें सर्व बाजूंनीं पोर्तुगीज राज्याला सुदृढता व स्थिरता आणण्याकरितां अविश्रांत परिश्रम घेतले; परंतु दुर्दैवानें हलक्या कानाच्या पोर्तुगीज राजाकडून त्याचा मोठा अपमान करण्यांत आला. त्याचे देशबंधूहि त्याला पाण्यांत पाहूं लागले. राजाचे इतराजीमुळें आलेली पदच्युतता, त्याचप्रमाणें स्वजनाकडून छळ व आतेष्टांकडून उपहास ह्या गोष्टी आल्बुकर्कला असह्य झाल्या, व आपणा पाठीमागून येणाऱ्या पोर्तुगीजांविषयीं, 'आम्हीं ज्या देशाविषयीं खटपट केली, त्याच्या पैशावर आमचे मागून येणारे लोक नुसते गबर होतील' असें भविष्य करून त्यानें प्राण सोडले.

आल्बुकर्कनें गोवा हस्तगत करतांना हिंदूंच्या पंचायती मुसल्मानी पादशाहीस जी खंडणी देत,तेवढीच खंडणी त्यांनीं पोर्तुगीजांस द्यावी व पोर्तुगीजांनीं आपल्या अमलाखालीं आलेल्या प्रदेशांतील सर्व प्रजेला आपल्या धर्माप्रमाणें आणि आपल्या वाडवडिलार्जित चालीरीतींप्रमाणें वागण्यास पूर्ण मोकळीक द्यावी व त्यांनीं धर्माच्या व न्याय निवाडयाच्या पद्धतींत कांहीं ढवळाढवळ करूं नये असें आश्वासन दिलें होतें. या दिलेल्या आश्वासनाप्रमाणें आल्बुकर्कनें राज्यांत दवंडी पिटविली होती, व त्यानंतरहि १५१५ १५२३, व १५२६सालीं हींच अभिवचनें कायम म्हणून प्रतिपादण्यांत आलीं होतीं. तथापि लौकरच हीं आश्वासनें स्वार्थांधतेनें व धर्मांधतेनें विसरलीं गेलीं. यापुढील सर्व इतिहास म्हणजे पशूंनाहि लाजेनें खालीं मान घालावयास लावणारा-पोर्तुगीज राष्ट्राच्या ब्रीदाला कायमचा कलंक फांसणारा-खिस्ती धर्माच्या संस्थापकाला त्याच्या शांतिप्रद खिस्तवासांतहि आपल्या नांवावर येथें उडविलेल्या हाहाकारानें अंगावर शाहारे आणणारा-आणि हिंदूंची तर कधींहि नुकसान भरपायी न करणारा-असा आहे. त्या अनन्वित छळाची हृदय विदारक करुण कहाणी शांतचित्तानें सांगणेंहि अशक्य आहे. असो.

गोवा शहरावर पोर्तुगीज ध्वजा फडकूं लागल्यावर हें शहर पुष्कळ भरभराटीस आलें; कारण त्या कालीं पोर्तुगीज लोक हे जगांत नाणावलेले असे प्रमुख धाडसी व्यापारी होते. गोवा हें विशेष सोईचें

बंदर असल्यामुळें युरोपहिंदुस्थानचा आयात निर्गत व्यापार त्यांच्याकडून येथूनच होवूं लागला, व त्यामुळें इतरांनीं हेवा करण्याइतकी वैभवसंपन्नता प्राप्त होऊन गोव्याला 'सुवर्णरचित गोवें' अशी संज्ञा मिळाली.

याप्रमाणें हिंदुस्थानांतील सर्वस्वी सुंदर श्रीमान् व वैभवसंपन्न ठिकाण पोर्तुगीजांना लाभल्याची सुवार्ता येमला कळल्यानंतर पोप महाराजांना अत्यानंद झाला व आकाशस्थ पित्याचें शुभवर्तमान इकडील रानटी लोकांना ( Heathens ) उपदेशून त्यांचा उद्धार करण्याची प्रबल इच्छा त्यांच्या मनांत स्फुरण पावूं लागली. पुढें त्याला अनुसरूनच पौर्वात्य प्रांतांत पवित्र धर्मप्रसारार्थ 'आर्चप्रायमेटची' योजना करण्यांत आली. तेव्हां 'आर्चप्रायमेट' आपल्या पाद्री मंडळासह हिंदुस्थानांत येऊन दाखल झाले. १५३४ त त्यांनीं येथें ख्रिस्तीमठाची स्थापना केली; परंतु लौकरच धर्मप्रसारकांच्या लक्षांत येऊन चुकलें, कीं, लष्करी सेनेच्या मदतीवांचून मुलुखगीऱ्या येशूचा संदेश सर्वत्र पोहोंचवितां यावयाचा नाहीं, म्हणून प्रत्यक्ष राजेसाहेबांना भेटून पुढील विनंति करण्यांत आली :—

" मूर्तिपूजा हा आकाशस्थ पित्याचा घोर व अक्षम्य अपराध आहे, म्हणून आपल्या राज्यांत सैतानाची भक्ति करण्यास मुभा नसावी; अर्थातच मूर्तिपूजेस साधनभूत होणाऱ्या सर्व गोष्टी म्हणजे हिंदूंचीं देवालयें ( Pagodes ) त्यांचे जादूटोण्यानें लिहिलेले शास्त्रग्रंथ इत्यादींचा संहार करण्यांत यावा व उत्सव, लग्न, मुंज, प्रेतदहन, इत्यादि धार्मिक गणल्या गेलेल्या त्यांच्या आचारास प्रतिबंध व्हावा. "

धर्मोपदेशकांचा हा विनंतीअर्ज ऐकून पोप सत्तेची थुंकी झेलण्यास तत्पर असलेल्या पोर्तुगालच्या राजानें १५४१ तील जूनचे ३० वे तारखेस असें फर्मान काढिलें कीं, 'इतका काळ सैतानाच्या जबड्यांत असलेल्या या हिंददेशाची व येथील लोकांची आमचे मायबाप देवाला आठवण झाली असून, त्यानें आम्हांस या प्रांतांतील अधर्मालयें एकहि शिल्लक न ठेवितां, जमीनदोस्त करण्याची आज्ञा केली आहे. अर्थातच आमचे राज्यांत मूर्तिपूजेला किंवा मूर्तिपूजकांना यथेच्छ धर्माचार करण्याची मुभा देणें अप्रशस्त आहे. ह्मणून (१) सर्व देवतांच्या मूर्ति फोडून टाकाव्यात, व शिल्पकारांना कडक शासन करावें. (२) ख्रिस्ती धर्म स्वीकारलेल्या लोकांत विशेष हक्क द्यावे; व त्यांजपासून वेठ, बेगार, हमाली असलीं हलकीं कामें करून घेऊं नयेत. ( ३ ) जकातीचे उत्पन्नापैकीं कांहीं भाग बाटलेल्या लोकांस अन्नदान करण्याकडे खर्च करावा. ( ४ ) परधर्मीय लोक ख्रिस्ताच्या मूर्ति करतील, तर त्यांस कडक शासन करावें. ( ५ ) बाटलेल्या लोकांस ख्रिस्ती धर्माचें व इतर शिक्षण देण्यासाठीं नवीन विद्यापीठें स्थापन करावीं. ( ६ ) बाटलेल्या लोकांची भक्ति आपणांवर बसावी, म्हणून त्यांना ममतेनें वागवावें, व त्यांच्या उपजीविकेकरितां हिंदुलोकांच्या व हिंदुदेवतांच्या वतनवाड्या देण्यांत याव्या. ( ७ ) धर्मपालाकडून जे जे हुकूम सुटतील, त्यांची त्यांची बरोबर बजावणी न होतां ज्याच्याकडून ते पाळण्यास दिरंगाई किंवा अवमान होईल, त्याला धर्मगुरु बिशपसाहेब यांचे इच्छेप्रमाणें कडक शासन करण्यांत यावें. ( ८ ) खऱ्या देवाची ओळख असलेल्या भक्तिमान् ख्रिस्ती मुलखांत देवाचे ऐवजीं सैतानाची उपासना करण्याची मोकळिक देणें, हें आम्हांस अहितकारक असून खऱ्या देवाचा उपमर्द, ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतलेल्या लोकांस लांछनास्पद, व पुढें दीक्षा घेण्यास सता-

वणाऱ्यांना प्रतिबंध करणारें आहे. मूर्तिपूजा, वेडे धर्माचार अशांना खिस्ती उपासकांनीं मोकळिक देणें म्हणजे आपलीच मानहानि व अप्रतिष्ठा करुन घेतल्याप्रमाणें आहे. तसेच उपरिनिर्दिष्ट आशयाचें फर्मान सोडून तें अमलांत आणण्याची धर्मप्रसारकांना आज्ञा देण्यांत यावी व आपण त्यांस शक्य ती मदत करावी. ”

असें हें ‘ दों जुवांव ’ राजाचें फर्मान इकडे प्रसिद्ध होतांच पाद्री पिशाचांना तें कोलितच मिळाल्याप्रमाणें होऊन त्यांनीं सर्व हिंदूंच्या संसाराची राखरांगोळी उघडपणें व कायद्यानें करण्यास सुरवात केली. अर्थातच पाद्री मंडळानें कसलाहि विचार न करितां ‘येनकेन प्रकारेण’ आपआपले कळप वाढविण्याचा सारखा सपाटा चालविला. धर्मप्रसाराचें आपलें हें उद्दिष्ट कार्य सिद्धीस नेण्याकरितां १५४१सालीं ‘दीयो द बोर्बा ( Diogo-de-Borba ) यांनीं एका जुन्या मशिदीच्या पायावर सेंटपॉलचे नांवानें एक कॉलेज स्थापन केलें. प्रथम प्रथम त्यांत ५०–६० विद्यार्थीच असत; परंतु आस्ते आस्ते जेजुइटांच्या नेतृत्वा खालीं विद्यार्थ्यांची संख्या वाढतां वाढतां ३००० हजारांवर गेली. या कॉलेजांत इतर विषयांबरोबरच पौर्वात्य सर्व भाषाहि शिकविण्याची धर्मार्थ सोय केली असल्यामुळें, हें कॉलेज पौर्वात्य विश्वविद्यालय ( University of the East ) या उच्च सन्मानास पात्र झालें. प्रत्येक रविवारीं हें विश्वविद्यालयीन तीन सहस्र विद्यार्थी बॉमजिझसच्या चर्चकडे हातांत खिस्ती क्रॉसेस व निशाणें घेऊन तोंडानें ख्रिस्तस्तुत्या गात गात मोठ्या थाटानें मिरवत जात असत. केव्हां केव्हां या मिरवणुकींत व्हाइसरॉयसुद्धां घोड्यावर बसून अनेक धनाढ्य व्यक्तींसह ( Fidalgos ) भाग घेत असत. हें कॉलेज लोकांना केवळ ख्रिस्तीधर्मदीक्षित करण्याचें शिक्षण यथासांग पद्धतीनें देण्याकरितां स्थापन केलें गेलें होतें, व त्याचा हा स्थापनेचा हेतू प्रतिदिनीं हजारों लोकांना बाटवून व याप्रमाणें एक लाखांवर लोक खिस्ती कळपांत ओढून त्यानें सिद्धीस नेला होता, असें ह्मणतात. केवळ १५७८ मध्यें या कॉलेजांतील प्रचारकांनीं २५० वर हिंदुमंदिरें जाळून पोळून उध्वस्त केलीं, ह्या एकाच गोष्टीवरुन त्या कॉलेजाची श्रेष्ठ खिस्तसेवा लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

सेंटपॉल कॉलेजप्रमाणेंच ठिकठिकाणीं शाळाहि उघडण्यांत आल्या होत्या. पाद्र्यांनीं हिंदुमंदिरांचा विध्वंस करुन त्यावर ख्रिस्तमंदिरें उभारावीं व त्याच्याच संनिध बांबूच्या व झावळ्यांच्या लहान लहान झोंपड्यांतून शाळा काढण्यांत याव्या; असा प्रघात असे.

या शाळांतून मुलांना खिस्ती तत्वज्ञानाची ओळख करुन देण्यांत येत असे. या शाळांतून सर्वांकडून सक्तीनें ख्रिस्ताच्या प्रार्थना म्हणवून घेतल्या जात, व त्यांचा अर्थ समजावून सांगण्यांत येत असे. खिस्ती तत्त्वज्ञान मान्य असल्याचें प्रतिज्ञेवर वजावून घेत. जीं मुले खिस्त प्रार्थना आदरयुक्त अंतःकरणानें व सुंदर म्हणत, त्यांच्यावर ते अगदीं निःसंशयः निःसीम प्रेम करीत, व त्याचप्रमाणें अनाथ मुलींकरितां व बायकां करितां ठिकठिकाणीं अनाथालयें उघडण्यांत येत असत. या अनाथालयांनाच ‘ Serra ’ किंवा ‘ Casas de-Misericordias ’ असें म्हणत असत. तेथें त्यांना कशिदाची वगैरे कामें शिकविलीं जात. बायकांच्याकरितां कांहीं ठिकाणीं स्वतंत्र मठहि असत. त्यांच्यांतूनहि त्यांना फ्रेंच, लॅटिन, इंग्रजी, पोर्तुगीज, इत्यादि भाषांच्या ज्ञानाबरोबर कलाबतूचें, जीगचें, कशिदाचें, माळा करण्याचें आणि तद्वतच

मिठाई, लोणचीं, इत्यादि कामें करण्यास शिकवीत. अशा प्रकारचींच निरनिराळीं वसतिगृहें, धर्ममंडळें अनाथगृहें इत्यादि अनेक संस्था ख्रिस्तधर्म प्रसाराकरितां अस्तित्वांत आणिल्या गेल्या. त्या सर्वांनीं एकजुटीनें एकच साध्य साधण्याकरितां अनेक साधनांच्या साहाय्यानें प्रयत्नाची पराकाष्ठा केली. उदाहरणार्थ, या धर्मप्रसाराच्या पवित्र कार्यार्थ पाद्रयांनीं वेश्यांशींहि संधानें बांधण्यास कमी केलें नाहीं. ते त्या बायकांना शिकवीत "तुम्हांस ख्रिश्चन् होण्यास कोणत्याहि प्रकारची आडकाठी नाहीं. हा धर्म स्वीकारून सुद्धां तुमचा व्यवसाय तुम्हांस उजळ माथ्यानें करितां येईल. तुम्ही आपल्या पापक्षालनार्थ फक्त एकटीच गोष्ट करा, कीं, आपल्या प्राप्तींतील मोठा भाग धर्मप्रसारार्थ उपयोगास द्या, व तुमच्या मोहपाशांत येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीजवळ तुम्ही ख्रिस्ती धर्माची महती वर्णन करून त्याला ख्रिस्ती समाजांत ओढण्याचे प्रयत्न करा म्हणजे झालें." या एकाच गोष्टीवरून जेजुइट पाद्रयांच्या धर्मप्रसार प्रयत्नांची कल्पना आल्यावांचून राहणार नाहीं. अशा प्रकारें अनेकविध सुक्तासुक्त मार्गांनीं त्यांनीं धर्म प्रसारार्थ अविरत प्रयत्न केले, व त्याचेंच दृश्य फळ म्हणजे शेंकडों हजारों लोक सर्वत्र ख्रिस्तीधर्मदीक्षित बनविले गेले.

१५४१ मधील जाहीरनाम्यानंतर १५४२ मध्यें ३ मेच्या सुमारास 'फ्रान्सिस झेविअर' हा धर्म प्रसारार्थ हिंदुस्थानांत पाठविण्यांत आला. झेविअरचें गोव्यास बादशाही थाटानें स्वागत करण्यांत आलें; पण ख्रिस्तिधर्मप्रसारार्थ तळमळणारा तो जीव ऐषआरामांत दंग होऊन राहणारा नव्हता. तो महाधोरणी, हुशार, स्वकार्यतत्पर व मोठा कार्यसाधु होता. त्यानें रोगी रुग्णांची सेवाशुश्रूषा करून लोकांस उपकारबद्ध करून टाकण्यास प्रारंभ केला. इकडील भाषा त्यानें शिकून घेतल्या, व लोकांस ख्रिस्तोपदेश देण्याचा सपाटा चालविला. धर्मप्रसार करण्याची त्याची पद्धत मोठी मजेदार असे. तो आपल्या दोन्यांत बरोबर एक घंटा घेत असे, व ती वाजवीत वाजवीत तो भर दुपारीं गांवांतील रस्त्यांतून फिरे. जिज्ञासेनें साहजिक त्याच्याभोंवती मुलांबाळांचा व लोकांचा जमाव बने. मंडळी भरपूर जमली, म्हणजे तो एखाद्या उंच ठिकाणावर उभा राहून धार्मिक प्रवचन करी. प्रथम प्रथम त्यास इकडील भाषांचें ज्ञान नसल्यामुळें तो आपला आशय लोकांस हातवारे, अंगविक्षेप, खाणाखुणा व अनेक भाषांमधील शब्दांनीं बनविलेलीं मोडकींतोडकीं वाक्यें यासारख्या गोष्टींनीं व्यक्त करीत असे. असें प्रवचन संपलें, म्हणजे तो आपल्याजवळचा ख्रिस्ताचा मोठा क्रॉस काढीत असे, व त्याचें मोठ्या प्रेमादरानें चुंबन घेऊन तसें लोकांस करावयास तो सांगे. जो कोणी त्याचे म्हणण्याप्रमाणें वागे त्याला तो एक सुंदर जपमाळा व एक ख्रिस्ताचा क्रॉस बक्षीस देई. जपमाळा व क्रॉस यांचा त्याच्याबरोबर मोठा सांठा असे.

तथापि यांसारख्या सौम्य उपायांनींच त्याचा प्रसार नित्यशः पुढें चालला, असें नाहीं. पोर्तुगीज सैन्याचें साहाय्य घेण्यास त्यानें कमी केलें नाहीं. अशा प्रकारें कधीं सौम्य तर कधीं उग्र होऊन त्यानें असंख्य लोकांना ख्रिस्तिधर्मदीक्षित बनविलें. गोमांतकांतील सासष्ट प्रांतांत त्यानें एकाच दिवशीं १०००० दहा हजार हिंदु बाटविले, व सबंध हिंदुस्तानांत त्यानें १०००००० दहा लक्ष हिंदूंना ख्रिस्तकळपांत ओढून नेलें, असें इतिहासकार सांगतात. झेविअर हा अनवाणी चालत असे व हिंदु साधुसंतांप्रमाणें त्याची राहणी अगदीं साधी असे. तद्वतच त्यास शाबरी विद्या अवगत होती, व तो अनेक चमत्कार करी, म्हणून त्याच्यावर लोकांचा तात्काल विश्वास बसत असे. हा चीनचे बाटेवर १५५२ मध्यें

मरण पावला. तेथून त्याचें निर्जीव शरीर गोव्यांत आणून 'बोजेजू' च्या मठांत ठेविलें, तें अद्यापि जसेंच्या तसेंच पूर्वावस्थेंत आहे, असें ख्रिस्तीलोक मानतात व प्रतिवर्षी त्याची मोठी जत्रा भरत असते. झेविअरला मरणानंतर साधु 'Saint' अशी पदवी प्रदान करण्यांत आली. झेविअर सारखेच अनेक संत त्यावेळीं निर्माण केले गेले. त्याच्या मृत्युसमयीं हिंदुस्तानच्या पूर्व पश्चिम किनाऱ्यांवर धर्ममंडळांतून २०० पेक्षां अधिक जेजूइट लोक स्वधर्मप्रसाराचें कार्य करीत होते व त्यांनीं ख्रिस्तीधर्म जोरानें वाढीस लाविला.

जुल्म जबरदस्तीच्या बाटवाबाटवीची ही धरपकड भरांत आहे, तोंच पोर्तुगीज राजाचे १५४६ पासून पुनश्च हुकूम सुटूं लागले, कीं, 'मूर्तिपूजेचा नाश करावा; देवळ पाडून टाकावीं; हिंदूंचे उत्सव बंद करावे; गोवा बेटांत किंवा इतर जोडलेल्या भागांतील कोणत्याहि घरांत किंवा घराबाहेर जर एकादी मूर्ति अगर देवघर सांपडेल, तर तें जाळून टाकावें, व मालकाला दंड करावा. तसेंच कोणत्याहि प्रकारच्या मूर्ति किंवा हिंदूंचे सार्वजनिक अथवा खासगी उत्सव बेकायदेशीर मानावे. जर एकाद्या हिंदूच्या घरांत देवघर अथवा मूर्ती असल्याचा संशय आला, तर ती गोष्ट नियोजित मनुष्याच्या दृष्टीस आणावी आणि जर हा गुन्हा सिद्ध झाला तर त्या गृहस्थाची अर्धी मालमत्ता चर्च खात्यांत जमा व्हावी. खेरीज गुन्हेगाराला पकडून कोणतीहि दया न दाखवितां तारवांत कोंडावें. ब्राह्मणांना हद्दपार करावें, व त्यांची मालमत्ता जप्त करावी. अधिकाराच्या जागा नूतन क्रिरिस्तावांस देण्यांत याव्या.' इत्यादि प्रकारचे हुकमावर हुकुम राजेसाहेबांकडून सुटतांच अवघ्या तीसवाडींत एकहि हिंदुदेवालय राहिलें नाहीं. गोव्यांत हिंदुदेवालयें मोठीं असत, व त्यांस उत्पन्नेंहि मोठमोठीं लावून दिलेलीं असत. तीं मंदिरें उध्वस्त केल्यानंतर त्यांच्या पंचांना बोलावून आणून त्यांना सांगण्यांत येत असे, कीं, 'तुमचीं मंदिरें आतां नाहींशीं झालींच आहेत. तेव्हां त्यांचें उत्पन्न आतां तुमच्याकडे कशाकरितां ठेवावयाचें ? अर्थात् त्यांचें उत्पन्न आतां ख्रिस्ती धर्माकडे स्वखुशीनें सोपवून द्या.' या मागणीवर गत्यंतरच नसल्यामुळें लोकांनीं स्वखुशीनें (!) दरखास्त लिहून दिलीं. ब्राह्मण हद्दपार होऊन त्यांची मालमत्ता जप्त करण्यांत आली; कारण हे ब्राह्मण बाटलेल्या लोकांना पुनश्च स्वधर्मांत प्रविष्ट करून घेत असल्यामुळें पाद्रयांच्या तळपायांची आग मस्तकास जाई. झेविअरचा स्नेही कामोरिनचा पाद्री 'ऑटन क्रीमीनल' हा तर संतापानें इतका भडकून गेला कीं, त्यानें ब्राह्मणांचे अनन्वित हाल केले, त्याचें शब्दांनीं वर्णन करणें शक्य नाहीं. असें 'प्रिसिंगर' इतिहासकार म्हणतो. १५४८ मध्ये 'दो आल्बुकर्क' हा पोर्तुगीज बिशप गोव्याच्या कोनाकोपऱ्यांतील देशी भागांतील ग्रंथ कागदपत्रें व लिखाणें मोठ्या दमोदीनें गोळा करीत होता. अर्थात हें कृत्य संग्रहाच्या हेतूनें चाललेलें नव्हतें, तर मूर्तिपूजेचा मागमूसहि राहूं नये म्हणून त्यांस अग्निमर्पण करण्याकरितांच होय!

ख्रिस्तिधर्माचा धाकदपटशा, जुल्म जबरदस्ती, कैद, तुरुंगवास इत्यादि मार्गानींहि अंगीकार न करणारांस देशांत शिक्षा होऊं लागल्या. त्यांच्या स्त्रियांची अब्रू, त्यांच्या डोळ्यांदेखत घेण्यांत येऊं लागली. अशा या राक्षसी लीलांचा प्रतिकार करण्यास सर्वथैव असमर्थ असलेले ते हिंदुलोक हजारोंनीं परमुलखांत पळून जाऊं लागले. असा हा जलोघ सारखा बाहेर सुरू झाल्यामुळें व्यापार अगदीं मंदावला,

वें निर्जन बनलीं. मजुर व कला कुसरीचे लोक नष्ट झाले, जमिनी ओस पडल्या, सरकारी तिजोरी रिती
ली, सर्वत्र हाहाकार माजून वसुंधरा उदास वाटूं लागली.

परंतु ह्या धर्माच्या नांवाखालीं चाललेला भयंकर अनर्थ कांहीं समंजस व न्यायी अधिकाऱ्यांस रुचला
नाहीं, व त्यांनीं राजाला स्पष्ट विचारलें कीं, ' हिंदुस्थान हें धर्म प्रसाराच्या नांवावर दरोडे व दंगेखोऱ्यांनीं
ध्यास करून सर्वत्र प्रेतांचे ढीग पाडण्याकरितां आमची नेमणूक झाली आहे कीं काय ? पण या सत्यप्रिय
अधिकाऱ्यांच्या दूरदृष्टीला व शहाणपणाला त्या वेळीं कोण विचारणार ? उलट ' महाराज ! परमेश्वराच्या
जयश्रीचे आपण मोठे अभिमानी आहांत, आणि ती अखंड राहावी याबद्दल आपण सदोदित दक्ष असतां.
यास्तव राज्याच्या आर्थिक फायद्या पलीकडे त्यांची दृष्टी जात नाहीं, अशा आपल्या वसूल खात्यांतील
नौकरांच्या तंत्रानें न वागणारे व केवळ पापात्म्यांच्या उद्धाराचें कार्य आपल्या शिरावर घेणारे असे कर्तव्य-
दक्ष व धैर्यवान् राजप्रतिनिधि इकडे पाठवून द्यावे,' अशी विनंती धर्मांध व कुचलीखोर पाद्र्यांकडून केली
गेली; व साहजिकच त्यांच्या मताला मान मिळून " ख्रिस्ती धर्मप्रसारार्थ जें जें करणें असेल, तें तें अगदीं
क्रूर न करितां करा ,' अशीच राजाज्ञा झाली. त्याला अनुसरून १५६३ त ' पोर्तुगीज मुलखांतील
सर्व हिंदूंनीं आपापल्या जमिनी एक महिन्याच्या आंत सोडून चालतें व्हावें. नाहीं पेक्षां मालमत्ता जप्त केली
जाऊन जन्मभर त्यांना सरकारचे गुलाम समजलें जाईल.' असा जाहीरनामा प्रसिद्ध झाला. यावेळीं
मांतकांत ' गुलामांचा व्यापार ' जोरानें चालत असे. स्त्रीपुरुषांच्या गळ्यांत दावीं बांधून स्त्रीस ३० रुप-
ांला व पुरुषास १६ रुपयांला विकण्यांत येत असे. तथापि एवढ्यानेंहि समाधान न होऊन राजानें आर्च-
बिशपांच्या नित्य लागलेल्या 'शुक्काष्ठाला अनुसरून असें फर्माविलें, कीं, ' जेव्हां आर्च बिशप एक किंवा
अधिक अधार्मिक व्यक्ति तुम्हांस दाखवून देतील, तेव्हां तिची आर्च बिशपांच्या इच्छेप्रमाणें व्यवस्था
करावी. त्याचप्रमाणें ग्रामसंस्थांचे चिटणीस हिंदु लोकांना होऊं देऊं नये. धंदेवाल्या
हिंदूंना आपलीं आउतें ख्रिस्तावांस विकण्यास भाग पाडावें. ज्या गांवांत ख्रिस्तांव गांवकऱ्यांची संख्या हिंदु
गांवकऱ्यांपेक्षां अधिक असेल, त्या गांवच्या ग्रामसंस्थेच्या कारभारांत हिंदूंना भाग घेण्याची मनाई करण्यांत
यावी. कारण, त्यांचा तो हक्क काढून घेतल्यास विशेष सुलभतेनें ते आमच्या पवित्र धर्माचा स्वीकार
करतील.' इतक्यांत १५५७ मध्यें, पापात्म्यांच्या मुक्ततेबद्दल अधीर झालेल्या सर्व ख्रिस्तीधर्मपंडितांच्या
प्रान्तिक धर्मपरिषदेच्या शिफारसीला मान देऊन राजाज्ञेनें आणखी नवीन कायदा करण्यांत आला. त्यांत
हिंदूंना धर्मग्रंथ जवळ बाळगण्याची मनाई केली होती-जे धर्मप्रवचनाला ( मीसाला ) हजर न राहातील,
त्यांजकडून दंडादाखल पैसे घेण्याचा, नाहींतर चाबकांनीं झोडपण्याचा अधिकार ' कुर व प्रियोद ' यांस देण्यांत
आला होता.

याप्रमाणें पाद्र्यांच्या कारवाईमुळें व चिथावणीमुळें हिंदुजनतेच्या छळाचा पारा दिवसानुदिवस वर चढत
होता ; परंतु या ख्रिस्तीधर्म प्रसारकांनाहि हेवा वाटावयास लावील अशी उत्कृष्ट (!) कामगिरी 'कॅपितॉव
रुद्रिगीश ' यांनीं केली. गांवकार भेटावयास बोलाविले असतां ते आले नाहींत, या रागानें बेफाम होऊन त्यांनीं
कोटली येथील रामनाथाचें देवालय उभें जाळलें. सरकारी न्यायखात्याकडे लोकांनीं धांव घेतली, व
'कॅपितॉव'नें स्वखर्चानें पुन्हा मंदिर बांधून द्यावें, असा निकाल सुदैवानें देण्यांत आला. त्याबरोबर

' रुद्रिगीश ' यांनीं पाद्र्यांच्या साहाय्यानें गव्हर्नराजवळ सूत बांधलें व निकाल रद्द करविला. एवढेंच नव्हे तर ' साष्टीला जें जें देऊळ हाताला लागेल, तें तें जाळून त्याच्या मालकीची एकंदर चीजवस्त आपल्या ताब्यांत घेण्यांत यावी ' असें फर्मविण्यांत आलें. झालें ! या अपूर्व विजयानें धुंद होऊन ' कॅपितॅव रुद्रिगीश ' यांनीं पाद्र्यांच्या साह्यानें ' सदयतेचें व ईश्वराच्या कीर्तिप्रसाराचें महत्कार्य–सैतानांचीं देवळें जाळून पाडून टाकून–सपाट्यानें चालविलें. या तडाख्यांत साष्टीच्या आसमंतात् एकहि देऊळ दृष्टिपथांत येईनासें झालें. अशा प्रकारें नष्ट झालेल्या या देवमंदिरांचें उत्पन्न ख्रिस्तालयें, धर्मविद्यालयें, धर्मांतर करण्यास आणले-ल्यांच्या पूर्वतयारीकरितां बांधलेलीं घरें, व पाद्री आदिकरून धर्मप्रसारकांच्या पोषणाकडे ' हिंदुजनतेच्या खुशीनें ( ! ) लावण्यांत आलें. याप्रमाणें साष्टी महालांतील हिंदुमंदिरांचा विध्वंस करण्याचें महत् कृत्य रुद्रीगीश यांनें संपादन केल्यामुळें "या त्यांच्या अति महत्तम कामगिरीचें भावी संततीस विस्मरण पडूं नये, म्हणून त्यांच्या थडग्यावर "या भूमींतील हिंदुदेवालयांचा विध्वंस करणारे कॅपितॅव रुद्रीगीश हे तारीख २१ एप्रिल १५५७ पासून येथें चिरशांति घेत आहेत" असे शब्द कोरून ठेविलेले आहेत. •

परंतु जुलुमाचा कडेलोट अद्यापि व्हावयाचा होता. ल्यूथर व कालव्हिन यांनीं पसरविलेल्या नास्तिक मतांचा गुप्तपणें शोध घेऊन त्यांस ताळ्यावर आणण्याच्या हेतूनें 'दोमिनिक' पंथवाल्यांनीं १२ व्या शतकांत धर्मसमीक्षण सभा 'Inquisition' स्थापन केली, तिचा प्रवेश पोर्तुगालमध्यें १५५८ त झाला, व पोप साहेबांच्या इच्छेनुरूप १५६० मध्यें ' ब्रांगास ' यांच्या कारकीर्दीत तिची गोमांतकांत स्थापना झाली. या सभेंत मुख्य सभाध्यक्ष, शिक्षा देणारा पारिपत्यदार, न्यायाधीश, धर्मपंडित, आरोपीचा वकील, चिटणीस, खजिनदार, दंडनायक व कारागृहाध्यक्ष असे दहा प्रकारचे कामगार असत. ही धर्म-समीक्षणसभा तिच्या उद्देशाप्रमाणें नुसत्या दुर्वर्तनी ठरलेल्या किरिस्तांवांनाच तेवढी शिक्षा देत नसे, तर मूर्तिपूजा बंद केल्यामुळे आपआपल्या घरीं, कागदावर किंवा पानावर मूर्ति रेखाटून पूजाअर्चा करणारांचा शोध घेऊन त्यांना; व लग्न, व्रतबंध, उत्सव करणारांना; गंध, मुद्रा, विभूति धारण करणारे जादूटोणे करणारे होत म्हणून त्यांना, चेटुक, अवसर (अंगांत येणें) शकुन इत्यादि गोष्टी करणारांसहि, थोडक्यांत लहानसहान धर्मविधींचें आचरण करणाऱ्यावर करडी नजर ठेवून अशा सर्वांना कडक शासन करण्यांत येई. या सभेच्या कारागारास ' सांतकाझ ' म्हणजे पवित्र गृह (!) असें म्हणत. या पवित्र गृहाचा तुरुंग मोठा असून त्याची रचनाहि विलक्षणच होती. तुरुंगाला हवा प्रकाश विरहित कित्येक खोल्या असत. अशा खोल्यांच्या खालीं सूर्यदर्शनाला कायमचीच आंचविलेलीं भुयारें असत. या भुयारांत वरीलसारख्या अपराध्यांना किंवा संशयितांना पकडून कोंडण्यांत येत असे, व तेथें त्यास दुःसह यमयातना सहन कराव्या लागत. कैदी वृद्ध, तरुण, पुरुष, स्त्री, गरीब, श्रीमंत, रोगी, निरोगी कसाहि असो, सर्वांस एका मापानें शिक्षा देण्यात येई. कैद्याच्या अंगावर खरखरीत तागाचें कापड करकचून रपेटून त्याचे हात मागील बाजूस घट्ट बांधीत, नंतर त्यास उंच टांगून पायांला अत्यंत अवजड वजन अडकावीत व त्यास जोराचा हिसका देऊन खालीं पाडीत, किंवा धांवत्या रथाच्या चकांना बांधून दगडावरून आंग ठेंचकाळत ठेंचकाळत शहरभर फरफटावीत किंवा कित्येकांना हालहाल करून जिवंत जाळीत. नोव्हेंबर व डिसेंबर महिन्यांत या सर्व कैद्यांचा शेवटचा निर्णय लागत असे. या निर्णयाचे दिवशींचा ( आक्त दे फे ) विधि असा असे, कीं, सर्व कैद्यांना ' सांत काझ ' च्या

सज्ज्यावर बाहेर उभें करण्यांत येई. तेथें या जगांत जिवंत ठेवण्यास योग्य वाटणाऱ्या इसमांना, एका अंगाला काढीत व बाकीच्यांना हालहाल करून ठार मारण्याची आज्ञा केली जाई. अशा लोकांना, पिवळा पोषाक चढवीत व त्यांच्या डाव्या हातांत मेणबत्ती आणि उजव्या हातांत 'सांत अद्रू'चा क्रूस देऊन त्यास ओढीत ओढीत 'सानफ्रान्सिस्क' ह्या मठांत नेत. तेथें त्यांचीं वेडींवांकडीं चित्रें काढून तीं जळत्या मशालीवर जाळण्यांत येत. हें कृत्य कैद्याला समजावून सांगितलें जाई, कीं, 'भूतपिशाच व झाडापेडास भजणारे असेच जाळले जातील, या विधीनंतर दुसऱ्या दिवशीं मोठ्या चर्चेची घंटा वाजे व हजारों ख्रिस्तभक्त हिंदू जेतीवाचें (जनावराचें) प्राणहरण पाहण्यास औत्सुक्यानें जमत असत. या प्रसंगीं कैद्यास अध्यक्षां कडून निर्वाणिचें म्हणून विचारण्यांत येत असे, कीं, 'आतां तरी तूं ख्रिस्तीधर्म दीक्षा घेण्यास सिद्ध आहेस कीं नाहीं?' या वेळीं दंडाज्ञा मोठमोठ्यानें वाचून दाखविण्यांत येत; परंतु या सर्व प्रकारांनाहि न भिऊन जे वीर 'स्वधर्मे निधनं श्रेयः' या उज्ज्वल मंत्रानें अभिमंत्रित केलेले आपले पवित्र देह, देवधर्म रक्षणासाठीं होमकुंडांत फेंकून देण्यास सिद्ध होत, त्यांस क्रूर व पाषाणहृदयी पाद्र्यांच्या स्वाधीन केलें जात असे. यानंतर त्या धर्मवीरास मग ती स्त्री, पुरुष, बाल वृद्ध कोणीहि असो, चाबकांनीं तडातड फटकावीत तापलेल्या लाल सांडसांनीं अंग भाजून काढीत, मुष्टिप्रहारानें रक्त ओकावयास लावीत, कपडे धुण्याप्रमाणें त्यास दगडावर आपटून धूत किंवा दुरडयाप्रमाणें बडवून काढीत. याप्रमाणें हालहाल केल्यानंतर त्यांना जिवंत जाळण्यांत येत असे. जाळल्यानंतर त्यांचे विकट फोटो घेऊन त्यांसभोंवतीं भूत पिशाच ज्वाळा इत्यादि भेसूर गोष्टी रंगवीत, व तीं चित्रें ख्रिस्तमंदिरांत नेण्यांत येत असत.

अशा प्रकारच्या या निरपराधी प्राण्यांच्या अमानुष व अतिभयंकर छळांच्या बुडाशीं नुसती धर्मांधताच होती असें नव्हे, तर अनावर द्रव्यमोह व पशुतुल्य विषयसुखेच्छाहि वसत असे. द्रव्यमोहाच्या दृष्टीनें विचार करितां सर्व समीक्षक सभासदांना मोठमोठे पगार, कल्पनातीत अधिकार व मानमरातबहि मिळत असत. वस्तुतः ज्या अपराध्याची शक्ति नसे, त्याच्या निवाड्याचा खर्च राजाकडून घ्यावा असा कायदा होता; परंतु सभाप्रतिनिधि कंगाल लोकांना सभेपुढें खेंचण्याइतके मूर्ख नव्हते, तर ज्याच्या जवळ पुंजी असेल त्याचा शोध घेऊन क्षुल्लक संशयावरून अथवा त्याच्या वाईटावर असणाऱ्या एकाद्या व्यक्तीच्या अस्पष्ट शब्दावरूनहि मोठ्यांतील मोठी शिक्षा त्यास फरमावण्यांत येत असे. अपराध्यांचें उत्पन्न सरकारजमा करण्यांत येई व या उत्पन्नापैकीं पाहिजे तेवढी रक्कम समीक्षक सभासदांस पाहिजे त्या वेळीं स्वतःच्या 'गुप्तगरजां' करितां मागून घेण्यांत येत असे. तद्वतच मौल्यवान् वस्तूंचा लिलांव आपआपसांत करून घेण्यास ते विसरत नसत. थोडक्यांत सांगावयाचें तर या जप्त्यांचें उत्पन्न सरकार खजिन्या ऐवजीं बहुतेक या समीक्षण सभासदांच्या घरांतच उतरत असे. याप्रमाणें अगणित द्रव्य पदरीं बांधून, शिवाय या समीक्षकांना सहजीं वश न होणाऱ्या स्त्रियांना तुरुंगांत डांबून ठेवून तेथें बलात्कारानें आपल्या पशुवासना तृप्त करितां येत व अखेरीस त्यांना 'ख्रिस्तधर्म विरोधक' म्हणून जीवंत जाळून नामा निराळेंहि होतां येई!

हिंदूंच्या या गुलामगिरीचा व धर्मच्छळाचा सर्वच इतिहास अत्यंत करुणास्पद आहे. अशा या अघोर राक्षसी जुलुमापुढें हिंदूंनीं शक्यतेची सीमा गांठून आपली मान

मोडेपर्यंत वांकविली; पण करतात काय विचारे ? केवळ हिंदुत्वाचें संरक्षण या महाघोर अपराधामुळें (!) त्यांच्यावर जुल्माचा निर्दय वरवंटा अखंडपणें फिरत राहिला. त्यांच्या स्त्रियांवरील बलात्कार परमावधीस पोहोंचला, त्यांचीं देवमंदिरें जाळून उध्वस्त झालीं, त्यांच्या वतनवाडया नष्ट झाल्या, अशा या भयंकर प्रलयांत आतां टिकाव धरणें सर्वथैव अशक्य वाटून ' आपल्या हांकेला कोठूनहि ओ येत नाहीं. दीनदयाळू परमेश्वराहि झोंपी गेला कीं काय ? ' अशा तीव्र निराशेनें हिंदु जनता हजारों हजारोंनीं आपल्या प्राणप्रिय सर्वस्वावर पाणी सोडून देशांतरास निघाली. देशांतरास निघणाऱ्यांत म्हातारे व रोगजर्जर लोकहि असत. त्यांतील पुरुष पुढें चालत, त्यांच्या पाठीमागून स्त्रिया व स्त्रियांच्या पदराला धरुन लहानसहान अर्भकें अशी ही रांग चाले. ज्या भूमीनें आपणांला जन्म दिला, जेथें आपण लहानाचे थोर झालों, त्या आपल्या प्रियतम मातृभूमीचा शेवटचा निरोप घेतांना त्यांची झालेली कावरी बावरी करुणमुद्रा कोणाच्या हृदयाला पाझर फोडणार नाहीं ? त्यांचीं अंतःकरणे गहिंवरलीं ! डोळ्यांतील अश्रूंना पूर लोटून त्यांचीं सर्व अंगें ओलीं चींब झालीं. थरथर कांपत रडक्या तोंडांनीं घरादारांकडे पहावें, व आपल्या प्राणप्रिय जन्मभूमींतील प्रत्येक गोष्टीची आठवण करकरुन मोठ्यानें हंबरडा फोडावा—" हायरे देवा ! कायरे हा प्रसंग ! ! " आणि हे सारे विचाऱ्यांचा 'हिंदुत्व' व्यतिरिक्त कोणताहि अपराध नसतांना ! ! !

धर्माधिकाऱ्यांच्या असह्य छळानें लाखों हिंदुप्रजा परदेशाचा आश्रय करूं लागल्यामुळें गांवें व शहरें ओस पडलीं; व्यापार मंदावला; सर्वत्र उदासीनता व भयाणता भासूं लागली. याचवेळीं वरील उग्र अत्याचारांमुळें खवळून जाऊन कीं काय दैवी क्षोभ झाला व कर्मेळीच्या तळ्यांतील सडलेल्या हत्तीच्या निमित्तानें सर्वत्र पटकीची जोराची साथ पसरली. त्यामुळें लोक सर्वत्र हवालदील झाले, व सगळीकडे पळापळ सुरु होऊन जुनें गोवें जवळजवळ ओस पडल्यासारखें झालें, आणि राजधानी पणजीस हालविणें भाग पडलें. व्यापार व शेती बुडाल्याने सरकारी तिजोरी रिकामी झाली, तेव्हां पोर्तुगाल दरबारनें विचार करुन हुकुमनामा काढला कीं, " कोणावरहि जुल्म होणार नाहीं, कोणाचेंहि मन दुखेल असें वर्तन केलें जाणार नाहीं, सामाजिक व धार्मिक बाबतींत सर्व धर्मीयांना समानतेनें वागविलें जाईल. धर्मभेद लक्षांत न घेतां सर्वांस सारखा न्याय निवाडा देण्यांत येईल ! " वरील जाहीरनाम्यानें हिंदूंना आशाकिरण उत्पन्न झाला, व पुष्कळसे लोक स्वदेशीं परत आले, आणि आनंदभरित होऊन आपआपल्या धर्मा देवधर्म आचरूं लागले; परंतु धर्मांध व स्वार्थलोलुप पाद्र्यांना ते सुखासमाधानानें कसें पहावेल ? पाद्र्यांचा तीव्र पंथाभिमान, त्यांची फाजील धर्मांधता क्रूर असहिष्णुता, व अमर्याद महत्त्वाकांक्षा यामुळें उत्पन्न होणाऱ्या भयंकर गोष्टींना आळा घालण्याचे प्रयत्न कांहीं समंजस सज्जन अधिकाऱ्यांकडून झाले, तथापि या चुगलीखोरांनीं त्यांच्या हेतूंचा विपर्यास करुन राजेसाहेबांचे कान भरण्याचा सपाटा चालवावा, व त्यांच्या सूचना भोंवतीं संशयाचें मळतेंच जाळें निर्माण करावें, असा उपक्रम अव्याहतपणे चालला होता. खेरीज दमण, दीव इत्यादि ठिकाणच्या जीवनोपयोगी, व युद्धोपयोगी सामीनाच्या कोठारांची व्यवस्था धर्मविद्यालयाकडील पाद्रीमंडळांच्या ताब्यांत असल्यामुळे, त्यांच्या मर्जी विरुद्ध जाणें, राजप्रतिनिधींनाहि व राजालाहि अशक्य होऊन बसलें होतें. त्यांना दूर करावें, तर त्यांच्या इतकीं विश्वासू माणसें एकाएकीं राज्यास लाभणें शक्य नव्हतें. पोर्तुगालालाहि इकडील इत्थंभूत

माहिती पुरविणारे दुसरे कोणीहि नव्हते. अशा सर्व गोष्टींमुळें धर्माधिकाऱ्यांचें वजन नष्ट करणें शक्य नव्हतें, म्हणून निरुपायानें त्यांच्या प्रत्येक सुष्ट वा दुष्ट कृत्याकडे कानाडोळा करणें भाग पडत असे.

साहजिकपणेंच पिळून जुलमी कायद्यांना प्रारंभ झाला, व सतराव्या शतकापर्यंत त्यानें सारखा कहर उसळून दिला. 'ग्रामसंस्थांत हिंदूंनीं भाग घेऊं नये, सरकारी जमिनी त्यांस खंडानें वा विकत देऊं नयेत, ब्राह्मणांची मालमत्ता जप्त करावी, कोणाहि हिंदु पंडितानें ( वैद्यानें ) घोड्या वरून मेण्यांतून वा पालखींत बसून जाऊं नये. डोक्यास फेटा गुंडाळूं नये, डोक्यावर छत्री घेऊं नये. यज्ञोपवीत, टिळेमाळा करूं नये. तुळशीवृंदावनें, गणपती इत्यादींची पूजा अर्चा व उत्सव करूं नये, हिंदु हजामाकडून हजामत करून घेऊं नये, त्यास नोकरीस ठेवूं नये, त्यांच्याकडे कोणी नोकरीस राहूं नये. लग्न व मौंजी-बंधन संस्कार बंद करावे. ज्या असद्धर्मी मुलाचा बाप वारला असेल, मग त्याचीं कोणीहि वडील माणसें जीवंत असोत वा नसोत, तो पोरका असें समजून त्याला बाप्तिस्मा द्यावा, व एखाद्या किरिस्तांवाला त्याचें पालक नेमावें. देशी भाषांचा निःपात करावा. धर्मवचनास सर्वांनीं सक्तीनें हजर राहिलेंच पाहिजे, धर्माच्या कल्याणाकरितां व परमेश्वराच्या सन्मानाकरितां या घातक लोकांना बिनशर्त हद्दपार करावें, व ते परवानगी वाचून परत स्वदेशीं आले तर त्यांची स्थावर जंगम मालमत्ता जप्त करून त्यांस देहांत शिक्षा द्यावी, अशा अर्थाचे एक ना दोन शेकडोंशें कायदे भराभर करण्यांत आले व त्यांची अंमल बजावणी करण्याकरितां पाद्रीमंडळानें आपले धर्मदंड फेंकून देऊन खांद्यावर बंदुका चढविल्या व कमरेस संगिना अडकविल्या. पाद्र्यांची ही पवित्र पलटण यज्ञविध्वंसक क्रूरकर्म्या राक्षसांप्रमाणें कोणत्याहि गांवांवर एका-एकीं धाड घालीत व हिंदुलोकांची अरण्यश्वापदाप्रमाणें शिकार करीत. याप्रमाणें नरमेध, लूटमार, भयंकर रक्तपात, बाटवाबाटवी, स्त्रियांच्या अब्रूची राखरांगोळी इत्यादि अनन्वित गोष्टी उघड पणें व कायद्याच्या आधारानें, एवढेंच नव्हे तर येशुख्रिस्ताच्या पवित्र ग्रंथाला ( बायबल ) प्रमाणभूत ठेवून केल्या जात ! महाराष्ट्र भाटाच्या गोमांतक काव्यांतील पंतोजीनें म्हटल्याप्रमाणें—
' Kill not, commit not adultry ' steal not covet not, thy neighbours house nor his ox or his ass nor anything,

या बायबलांतील धर्मांश अक्षरशः पाळण्यांत पाद्रीपलटणीकडून कधींच कसूर झाली नाहीं. पंतोजी म्हणतातः—

' वधः कार्यो न जावीनां ' येशूक्ती प्रथमा अशी।
एतदर्थेंचि तूं जीवा वधितां न चि—ळाळिशी ! ॥
' पारदार्यमकर्तव्यं ' येशूक्ती म्हणुनि भयें ।
बलात्कारकरा अन्या कुमारीच वरी स्वयें ! ॥
' निषिद्धमपि चौर्यं च ' येशूक्ती करण्या पुरी ।
लूटमारीमधें तुम्ही चोरी सोडूनियां दिली ! ॥
' मा गृधो गर्दभं कस्य ' उक्ती ही करण्या खरी ।
गर्दभा सांडुनि पागा घोडयांची बळकाविली ! ॥

'मा गृधः कस्यचित् किंचित्' या आज्ञेस्तव आपली ।
किंचित् सोडून सर्वस्वी राज्येंचि गिळिलींत कीं ! ॥
आज्ञा अक्षरशः ऐशा पूज्य बायबलांतल्या.
पाळूनि त्यावरी सर्वां कळसा चढवावया ॥
'दोषचर्चा कराची ना' न्यायदंड धरा नवा'

( Judge not ) इत्यादि इत्यादि. असो.

हिंदूंचें व त्यांच्या हिंदुत्वाचें उच्छेदन आणि उच्चाटण करण्याकरितां बद्धपरिकर झालेली ही सशस्त्र "पवित्र पलटण" ज्यावेळीं एखाद्या गांवावर धाड घाली त्यावेळीं नवरा बायकोस, बाप मुलास, माऊ बहिणीस किंवा आई तान्ह्या अर्भकांस सोडून देऊन ज्याला जिकडे वाट सांपडेल तिकडे सर्व पळ काढीत. या नित्याच्या छळाला कंटाळून कित्येक जणांनीं कुंकळ्ळी, असोळणें, वेळ्ळी, आंबेली इकडे धांव ठोकली. तथापि वारंवार होणाऱ्या या संतापजनक व लांछनास्पद जाचामुळें, त्यांच्या मनांत जोराची प्रतिक्रिया होऊन, या अतिपीडित लोकांकडून रागाच्या संपाटयांत वसुलाचा कामगार 'इस्तेव्हांव' हा ठार मारला गेला. मग काय विचारतां! या बंडखोर व मग्रूर लोकांना यथेच्छ प्रायश्चित्त देण्याकरितां मलबार किनाऱ्याचें मुख्य कॅपिटॉव 'दोमास्केरेंज' व रायतूरचे किल्लेदार यांनीं सैन्याचें साहाय्यानें कुंकळ्ळी व आसपासचीं गांवें उध्वस्त केलीं व हिंदूंचीं देवमंदिरें जाळून पोळून जमीनदोस्त करून टाकलीं. हिंदू शरण गेल्यावर १५८३ मध्यें 'रो दोल्फु अकाव्हिव्ह' या मिशनरीस प्रस्तुत प्रांतांत खिस्ती मठ व खिस्ती मंदिरें स्थापण्यास पाठविण्यांत आलें. पुनश्च हिंदूंनीं उचल खाल्ली व आलेल्या पाद्यास त्याच्या व्यवसाय बंधूंसह ठार मारून सूड घेण्यांत आला. अर्थात् हिंदूंच्या या अक्षम्य अपराधाला शासनहि तसेंच कडक झालें. त्यांनीं फिरून बांधलेलीं देवमंदिरें विध्वंसिलीं गेलीं; नारळांच्या बागा व शेंतें उपटून टाकिलीं; गांवचे गांव बेचिराख केले व पूज्य गायींचा वध करून त्यांच्या रक्तांनीं धर्मक्षेत्रें मारवून काढलीं गेलीं. सर्व हिंदूंचे हक्क वगैरे काढून घेण्यांत आले. या प्रसंगीं मारल्या गेलेल्या पाद्यांना 'कुंकळ्ळीचे हुतात्मे-Martyrs of Cuncolim' म्हणून ओळखण्यांत येतें. त्यांनीं केलेल्या अनेक चमत्कारांवरून त्यांना संताच्या पंक्तींत १८९३ सालीं बसविण्यांत आलें, व त्यांच्या अस्थि सुंदर भांडयांत घालून गोव्याच्या 'इगर्जेंत' ( खिस्तालयांत ) राखून ठेवल्या गेल्या. आणि हिंदु हुतात्मे ! ते काळाच्या विशाल दरींत केव्हांच गडप झाले !

कुंकळ्ळीच्या या प्रसंगानें हिंदूंना फिरून डोकें वर काढण्याची आशा खुंटली, अर्थात् कित्येकांनीं शारीरिक कष्टाच्या भयानें, कित्येकांनीं मनोदौर्बल्यानें, कित्येकांनीं मायभूमीचे पाश तोडवेनासे झाल्यामुळें, कित्येकांनीं स्वतःची मालमत्ता नष्ट झालेली पाहवेना म्हणून तर कित्येकांनीं भावी वैभवपद-प्राप्तीच्या आशेनें खिस्ती धर्माची दीक्षा घेतली व आपल्या पाठीमागील नित्य नव्या जाचाचें शुक्लकाष्ठ सोडून टाकलें. त्यामुळें १५६० पर्यंत ज्या समंध साष्टींत रायतूरचें एक खिस्त मंदिर व एक धर्मप्रसारकगृह मात्र होतें, त्याच ठिकाणीं अवघ्या ५०-६० वर्षांचे अवधींत २८ खिस्त मंदिरें होऊन बहुतेक लोक खिस्ती दिसूं लागले. त्यांतूनहि धीर धरून व संकटांना तोंड देऊन अवशिष्ट राहिलेल्या हिंदूंची अत्यंत शोचनीय अवस्था झाली होती. अगदीं

प्रारंभींच्या अवतरणांत म्हटल्याप्रमाणें ' लग्नाविण मुली, व मुंजीविण मुलें, देव देवतार्चन कांहीं नाहीं.' अशा संस्कारहीन अवस्थेंत मुठींत जीव धरून हिंदु लोक आपलें जीवित कसें बसें नेत होते. अशा घोर आपत्तींत तोंडावर भीषण प्रेतकळा पसरलेली हिन्दुजनता परमेश्वराचा सारखा धांवा करीत होती.

कोण हा भयंकर जुलुम ! काय हा घोर अनर्थ ! हिंदूंची मालमत्ता लुटून पुरलें नाहीं, त्यांचे हक्क हुवाडून भागलें नाहीं, त्यांच्या चालीरीतींना मनाई करून, त्यांचे धर्मग्रंथ जाळून, त्यांचीं देवळें रावळें उध्वस्त करून व त्यांतील अपार संपत्तिहि हरण करून जेव्हां संतोष झाला नाहीं, तेव्हां त्यांचीं घरेंदारें, वतनवाडया, देवमंदिरें व बायकामुलें यांच्या भ्रष्टीकरणाबरोबरच त्यांना धर्मप्रवचनें ऐकण्याकरितां ठराविक स्थळीं नेण्यांत येत होतें. नाहींतर चाबकांचे कोरडे पाठीवर तडातड सहन करणें भाग पडे. तात्पर्यार्थ इत-काच, कीं, हिंदूंच्या जीवनक्रमांत शक्य होईल त्या वाटेनें काटे पसरावे व आपण तो अघोरी व आसुरी आनंद उपभोगावा, हाच पाद्रीशाहीचा हेतू होता. या भीषण व संतापजनक बलात्काराच्या सत्रानें झालेली गोमांतकीयांची त्या वेळची दुःखद मनःस्थिति थोडक्याच शब्दांत कवि अरुणोदय यांनीं अत्यंत हृदय भेदक शब्दांनीं अशी वर्णिली आहे.

' गोमांतक सुवर्ण भूमी । कन्यका सुभारतभूची ।
संपदा शौर्य यशवंती । नृपनगरी या कोंकणची ।
होती पारे आतां कसची । जाहली वाटिक परक्यांची ।
जणुं जनकनंदिनी सीता ।
लंकेंत झुरे दुःखार्ता ।
ही सती तशी निजकांता ।
आठवी महाराष्ट्राला । गुंफिते अश्रूंची माला ! ॥'

आणि महदाश्चर्याची व अभिमानाची गोष्ट ही, कीं, या दुःखाश्रूंच्या प्रत्येक थेंबाचा जाब विचार ण्याकरितां महाराष्ट्र धांवूनाहि गेला.

सतत २०० वर्षें पर्यंत चाललेली अक्षम्य अत्याचारांची ही घोर मालिका त्या भक्तवत्सल दयामय परमेश्वरास कशी रुचणार ? परंतु चढण्याची क्रिया पूर्ण झाल्याशिवाय उतार लागत नाहीं. अर्थात् कडेलोट करावयाचा झाला तरीहि त्या व्यक्तीला प्रथम पर्वतशिखरावर चढवून न्यावें लागतें, त्याप्रमाणेंच पाद्रीसत्तेचा जुलूम कळसास पोहोंचण्याची परमेश्वर जणूं वाट पहात होता. त्यांच्या पापाचे घडे पूर्ण भरण्याची क्रिया चालली होती. अशाच या समयीं हिंदुजनतेच्या अंतःस्थ क्षोभानें, तीव्र जळफळाटानें व मूकसंतापानें समस्त भारत वर्षीय हिंदूंच्या छळाला प्रत्युत्तर देण्याकरतां व देवधर्मगोब्राह्मणांचें संरक्षण करण्याकरतां, एक प्रचंड दैवी शक्ति श्रीशिवरायांच्या स्वरूपांत महाराष्ट्रांत अवतीर्ण झाली होती. त्यांना पोर्तुगीज राज्यांत चाललेल्या या भयंकर छळानें अत्यंत संताप चढून त्यांनीं आपला मोर्चा गोव्याकडे वळविला. त्यांनीं १६६८ मध्यें प्रथम गोव्याच्या तोंडावरील बाडीकर भोंसल्यावर स्वारी केली व त्यांस



श्री शेष दिग्गज दिक्पाळ तैसा दिनस्वामि पृथ्वीस संरक्षितो । पापी विमार्गी, सुमार्गी रवी तो जगज्जीवनालाच कीं तापतो ।
भूपोत्तमा! भोसले-भूषणा! तूं यश स्थापिलें म्लेंच्छ संहारुनी । केलें जगत्कार्य, शोभे तयानें तुझ्या बाहुला धन्यता-कामिनी ।

द्वेष व तिरस्कारच उत्पन्न झाला. साहजिकच या सर्व गोष्टींचें पर्यवसान पोर्तुगीजांची सत्ता संपुष्टांत आणण्यांत झालें. १६ व्या शतकाच्या आरंभीं पाहूं गेल्यास पोर्तुगीजांच्या वैभवाला सीमा उरली नव्हती.

डॉ. व्हास्को सेलस हा पोर्तुगीज लेखक म्हणतो 'त्या वेळचे पोर्तुगीजांचें वैभव काय सांगावें ! वास्को डि गामाने रत्नांची खाण असें हिंदुस्थान शोधून काढिलें. दुवार्ते पाचेक, फ्रान्सिस्क दि आल्मेद आणि आल्बुकर्क या धीरोदात्त व साहसी वीरांनीं पोर्तुगीज निशाण आफ्रिकेंतून नेऊन आशियांत फडकावयास लाविलें. ओर्मुज्, मलाका इत्यादि शहरें पोर्तुगीजांचीं झालीं व बहुतेक सर्व व्यापाराचीं बंदरें पोर्तुगीजांच्या ताब्यांत आलीं. दुसऱ्या बाजूस पेद्रू आल्वरीस काब्राल यानें ब्राझिल देश शोधून काढिला व सर्व जगांत पोर्तुगीजांचें नांव गाजूं लागलें. ज्या हिंदुस्थानची संपत्ति-वैभव आम्हीं आजपर्यंत केवळ कानांनीं ऐकत आलों त्या हिंदुस्थानचा-नव्हे आशिया खंडाचा दों मानुएल हा सम्राट् बनला. पोर्तुगीज लोकांना आतां कसल्याच गोष्टीची वाण राहिली नाहीं. लिस्बन शहर आयातीमुळें पूर्ण समृद्ध होऊन गेलें. सोफालचें सुवर्ण, पेगूचीं माणिकें, नर्सिंगचे हिरे, सिहलद्वीपचें जवाहीर, बाबिलोनचे पाचू, मानारचीं मोतीं व रत्नें, इराणचें रेशीम व गालीचे, बंगालचें तलम कापड, चीन जपानचें पोरसेलन सामान, मोझांबिकचें हस्तीदंती सामान, सुमात्राचें बेंजाइन, मलया बेटांतील अंबर, शिवाय आशियांतील निरनिराळ्या प्रदेशांतील अत्तरें, फळें, अक्रोड, दालचिनी, वेलदोडे इत्यादि लिस्बनमध्यें येत असलेल्या अवाढव्य आयातीकडे पाहिलें असतां असें दिसून येतें, कीं, बाहेरच्याच संपत्तीनें हे शहर गब्बर झालें आहे.' असे हे वैभवाच्या उत्तुंग शिखरीं विराजमान असलेले पोर्तुगीज लोक कीं ज्यांच्या ताब्यांत १६ शतकापर्यंत हजारों मैल लांबीचा समुद्रकिनारा असून, इतरांची टाप त्याच्याकडे वांकडया डोळ्यानें पहाण्याची नव्हती, त्याच पोर्तुगीज सत्तेखालीं १७ व्या शतकाअखेर सहा मैल रुंदीचा व १८ मैल लांबीचा गोवा बेटाचा टापू व लहान लहान बेटे येवढीं अवशेष राहिलीं. इतकें झाले तरी कांहीं जणांच्या डोळ्यांवरील धुंद अद्यापिहि उतरली नव्हती. हिंदूंचीं देवळें जमीनदोस्त करावीं, मंदिरांतील सुंदर मूर्तींचे तुकडे तुकडे करावे, त्यांचीं उत्पन्नें गडप करावीं, मूर्तिपूजेचे व जादुटोण्याचे मंत्र सांगितले असतील म्हणून धर्मग्रंथ अग्निसमर्पण करावे; यथेच्छ स्त्रीधनाचा अपहार करावा, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, हिंदुंना येनकेन प्रकारेण अमानुषपणें छळावें, या गोष्टी केवळ सत्तावर्चस्वाच्या वेळेलाच केल्या गेल्या असें नव्हे तर उपरोक्त प्रसंगानंतरहि त्याच पद्धतीचें धोरण ठेवण्यासंबंधीं गंभीरपणें कांहींजणांकडून सरकारला विनविलें गेलें. त्यामुळें १८ व्या शतकांतहि धर्मोन्माद व तदनुषंगिक हालअपेष्टा चालूच राहिल्या. भोंवतालच्या परिस्थितीमुळें त्याला मधुनमधून थोडाबहुत आळा पडे इतकेंच.

सांत तेरेज यांनीं १७२२ मध्यें असोळण्यास ३०० शिपायी पाठवून ३ देवळें जाळून टाकिलीं व त्यांच्याच आग्रहावरून १७३४ पासून पुनश्च लग्न-मुंजीचे, मूर्तिपूजेचे, हजामतीचे, वारसाचे इत्यादि मागील अत्याचारी कायदे अमलांत आणले गेले; परंतु एवढयानेंहि तृप्ति होईना. म्हणून पाद्र्यांनीं सरकाराकडून देशी भाषा बंदीचा कायदा पास करून घेतला. कारण धर्म प्रचारास देशी भाषा आड येई, म्हणून प्रत्येकानें आपले सर्व व्यवहार पोर्तुगीज भाषेंतच केले पाहिजेत एवढेंच नव्हे

तर ज्यांना पोर्तुगीज भाषा येणार नाहीं त्यांना लग्नच करितां यावयाचें नाहीं, असा विचित्र कायदा करण्यापर्यंत मजल गेली. फिरून पहिल्याच छळाची पुनरावृत्ति सुरू झाली. धर्माधिकाऱ्यांचीं अविचारी आज्ञापत्रें, सत्ताधिकाऱ्यांचीं बेमुर्वतपणाचीं फर्मानें, त्याला अनुसरून सैनिकांनीं व पाद्र्यांनीं घरोघर घुसून उडवून दिलेला अनर्थ, या गोष्टींचें पुन्हां पुन्हां वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं. उपरोक्त सांत तेरेज शुद्धीवर असतांना त्यांनीं काढलेल्या उद्गारांतच वरील प्रसंग सांगावयाचा तर 'परमेश्वराचें आलय हें जुगाराचा अड्डा, धर्मभ्रष्टांच्या सूडाचें क्षेत्र व अंधारकोठडी बनून गेलें आहे. हीं भयंकर व अनुचित कृत्यें करणाऱ्या फ्रांसिस्कन धर्मप्रचारकांनीं बारदेशांतील इगरजेंत अनेक बायका चोरून व बळजबरीनें आणून त्यांच्या पातिव्रत्याचे धिंडवडे काढून वारंवार होत असलेल्या या जुल्म जबरदस्तीमुळे बारदेशांतील सर्व जनतेवर डोंगर व परकी मुलख यांत पळून जाण्याची विपत्ति ओढवली आहे.' इत्यादि. परंतु याच सान्त तेरेज आर्च बिशपनें पुढें आपलीं जुल्माचीं भयंकर कृत्यें चालूच ठेवलीं. त्याच्या या कृष्णकृत्यास धर्मसमीक्षण सभेनेंहि ताल धरून साह्य दिलें. या पाद्र्यांच्या घोर अत्याचारानें पूर्वीप्रमाणें पुनश्च गोमांतकावर अनर्थ-परंपरा कोसळली; बहुतेक प्रदेश, ओस पडला; व्यापारी पेठा उजाड दिसूं लागल्या; चोरांचा सुळसुळाट झाला; बुद्धिवैभवाच्या व कारागिरीच्या माणसांचा अभाव पडूं लागला; सरकारी तिजोरी मोकळी झाली. अशी विपरीत परिस्थिति पाहून त्या वेळचे व्हॉइसरॉय गोंधळून गेले व काय करावें हें त्यांस सुचेना. परिस्थितीचा विचार करण्याकरितां राजेसाहेबांच्या आज्ञेवरुन त्यांनीं धर्मपंडित व पाद्रीमंडळ बोला-विलें. या धर्मपरिषदेनें पुष्कळ वाटाघाटीनंतर आपला असा निर्णय दिला कीं "आमच्या राज्यांतील सर्व हिंदूंनीं एक खिरस्ती तरी व्हावें, किंवा आमचें राज्य सोडून तरी चालतें व्हावें, असा एकदा कायदाच करून टाक-ल्यास साहजिकपणेंच खिस्तीधर्माची दीक्षा त्यांस घ्यावी लागेल; कारण ह्यांचीं कांडें करून आणि रक्ताचें पाणी करून एकदा थाटलेला संसार घरदार, जमीनजुमला, शेतीवतनवाडी, हीं सर्व केवळ आपल्या भोळ्या धर्मसमजुती करितां ते सोडून देतील हें संभवनीय नाहीं: अर्थात् परदेशीं जाण्याचा हा त्यांचा उगाच धाक आहे. त्यांच्या भेडसावण्यास आपण अगदीं भीक घालूं नये. जरा सरकारचा नेट पाहिला कीं ते धर्मांतर केल्याविना राहाणार नाहींत. खेरीज आपल्या असद्धर्मी प्रजेवर अशा प्रकारची सक्ती करणें हें किरिस्तॉंव राजाचें कर्तव्यच आहे. स्पेनच्या फेरनांद इझाबेल या कॅथालिक राजानें ऐहिक फायद्याकडे लक्ष न देतां कमींत कमी १२४००० कुटुंबें आपल्या राज्यांतून हाकलून लावलीं; पण इतक्यानेंहि त्या देशाची अवनति झाली नाहीं. इतकेंच नव्हे, तर उलट धाडशी कृत्यांचें बक्षीस म्हणून परमेश्वरानें त्यांना मनोवांच्छित गडगंज सुख व वैभव दिलें. तेव्हां सरकारनें या इतिहासाकडे लक्ष देऊन योग्य त्या उपायांची योजना करावी."

व्हाइसरॉय 'साल्दाज द गामा' नें या धर्मपरिषदेच्या सल्ल्याला अनुसरून कांहीं दिवस वाट पाहिली; तथापि दिवसांच्या दिवस गेले, महिनेंहि गेले, वर्षेंहि लोटलें, परंतु देशत्याग केलेलीं हिंदुकुटुंबें परत येण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां या आर्चबिशपांच्या नादीं लागून राज्यकारभार हांकतां येणें सर्वथैव अशक्य आहे, हें जाणून व्हाइसरायांनीं राजेसाहेबांस खरमरीत पत्र लिहिलें कीं, "धार्मिक अत्याचारानें बादशाही मुलखां [illegible] मोठमोठे

व्यापारी हद्दपार झाल्यामुळें येथील व्यापार बंद पडून सरकारचें अपरिमित नुकसान झालें आहे. तशांत मराठ्यांच्या नित्य हल्ल्यांनीं राज्याचें संरक्षण करणें कठीण होऊन बसल्या कारणानें सैन्यांत कमतरता करतां येत नाहीं, आणि असलेल्या सैन्याला पगार देणें सरकारी खजिन्याच्या खालावलेल्या स्थितींत मुष्कील झालें आहे. अशा समयीं खिस्तेतर लोकांना अभयाचें आश्वासन दिल्याविना गत्यंतर नाहीं; कारण आपल्या अफाट राज्याची छाटाछाट आधींच झाली असतां अवशिष्ट भागांतहि आम्ही पूर्वीचाच प्रमाद केला तर वाढत जाणाऱ्या लोकविद्वेषानें पोर्तुगीज लोकांस थोड्याच काळांत आपलें चंबू-गबाळें खाकेंत मारून ताबा वरून घरचा रस्ता सुधारावा लागेल. तरी याचा पूर्ण विचार होऊन काय ती राजाज्ञा व्हावी" पण, हा हितोक्तीचा उपदेश राजेसरकारास तितकासा रुचला नाहीं, व त्यांच्या डोळ्यांवरील धुंद कांहीं केल्या उतरेना. अर्थातच 'वदणार तो न्याय व करणार तो कायदा' अशीच परिस्थिति गोमांतकास पत्करावी लागली.

परंतु परमेश्वराच्या घरीं दुसऱ्याच कांहीं गोष्टींची घटना केवळ गोमांतकाकरितांच नव्हे तर सर्व जगाच्या हिताच्या दृष्टीनें चालली होती. युरोपांत राज्यकर्त्यांच्या एकमुखी, एकतंत्री व अनिरोधनीय अशा सत्तेविषयीं सर्वत्र अविश्वास व तिरस्कार उत्पन्न होऊन ठिकठिकाणीं त्यांच्या विरुद्ध जबर मोहीमा सुरू झाल्या व १७५९ मध्यें झालेल्या फ्रान्सच्या राज्यक्रांतीनें, राजसत्तांना जबरदस्त धक्काच बसून त्या भराभर उन्मळून पडूं लागल्या. धर्मस्वातंत्र्याचें व विचारस्वातंत्र्याचें वारें वाहूं लागलें. स्वतंत्रता, समता व विश्वबंधुता या उदात्त तत्त्वांचा जयघोष जनतेच्या मनीं मुखीं होऊं लागला. यालाच अनुसरून पोर्तुगालमध्येंहि स्वार्थान्ध, धर्मान्ध, व विषयलोलुप बनलेल्या राजसत्तेविरुद्ध एक उदार मतवादी लोकपक्ष निर्माण झाला. धर्माधिकाऱ्यांनीं सत्ताधिकाऱ्यांच्या मदतीनें धर्माच्या नांवावर प्रजेच्या जीविताची व वित्ताची उडवलेली दाणादाण लोकपक्षानें उघडपणें जगास विदित केल्यामुळें, लोकक्षोभाचा पारा सारखा वर चढूं लागला. १८२१ मध्यें मार्केन्द पोंबाल यांच्या नेतृत्वाखालीं मोठी चळवळ सुरू होऊन जेझुईट पाद्र्यांचे जिकडेतिकडे खून पडूं लागले. धर्माधिकारी हा एक उपहासाचा विषय होऊन बसला व त्यांच्या बरोबरच सत्ताधिकाऱ्यांनाहि लोक सुखानें कारभार करूं देईनासे झाले. लोकपक्ष आपले इच्छित मनोरथ पूर्ण करण्याकरितां तनमनधनानें अट्टाहास करीत होता. लहान सहान चकमकी, मारामाऱ्या, खून, धमक्या या चालल्याच होत्या. डॉ. आफोन्स कोस्त यांनीं भर पार्लमेंटांत राजाला बजावलें, कीं, 'जर तुम्ही तुमच्या स्वैर वागणाऱ्या सत्तेस नियंत्रणाचें बंधन घालून प्रजेच्या हिताकडे न पाहाल तर आपला हा राजवैभवी मुकुट लवकरच वितळून खालीं पडण्याचा प्रसंग येईल, हें समजून असा.'

याच सुमारास गोमांतकांतील चंद्रवाडी, पारोडें येथील हिंदुदेवाल्यासमीप राजाज्ञेप्रमाणें उभारलेल्या खिस्तमंदिरावरून प्राचीन काळापासून दसऱ्यानिमित्त प्रतिवर्षी जात असलेल्या चंद्रनाथाच्या मिरवणुकीस पाद्र्यांनीं आडकाठी घेतली; मोठमोठे मोहोरे हरेस घातले गेले; परंतु उपयोग झाला नाहीं. हा अन्याय्य प्रकार प्रस्तुतच्या धर्मस्वातंत्र्यमूलक वातावरणास न रुचणारा असल्यामुळें तो प्रत्यक्ष पाहिलेले डॉ. आल्मेद यांनीं हिंदुजनतेच्या भयंकर छळाची एकंदर करुणकहाणी या प्रसंगाला निमित्त करून पोर्तुगाल पार्लमेंट पर्यंत नेऊन भिडविली व जोरदारपणें प्रतिपादन केलें कीं "हिंदुलोक पोर्तुगीज नागरिक

आहेत, 'मुसल्मानांच्या जाचांतून सुटावें म्हणून आम्ही तुम्हांस ( पोर्तुगीजांस ) मदत केली. मोबदला आम्हांस तुम्ही काय दिला?' असा प्रश्न जर ते हिंदुलोक आम्हांस करतील तर दुःखां ल्या त्यांच्या अंतःकरणाचें समाधान होण्याजोगें उत्तर आम्हांकडून त्यांना मिळेल काय? कॅथॉलिक धर्माच्या नादानें, वाटच्या खिस्तांच्या चिथावणीनें आणि निर्दय पाद्र्यांच्या जुलमानें कांना विनाकारण पिळून त्यांचीं निर्मल व शुद्ध अंतःकरणें तुडवीत राहाणें हें कोणत्याच राज्य योग्य नव्हे. कॅथॉलिक धर्म स्वीकारा म्हणून हट्टीपणानें आम्ही हिंदूंना सांगणें, किंवा त्यांच्यावर सक्ती करणें म्हणजे आम्ही स्वतःच शांत लोकांना बंडखोर बनविणें नव्हे काय? आपल्या हातांत राजदं म्हणून त्या सत्तेच्या जोरावर परधर्मीयांस पीडा देणें किंवा कमी लेखणें हें योग्य होणार नाहीं. परिस्थितीकडे बघून एका धर्माच्या लोकांनीं दुसऱ्या धर्माच्या लोकांचा छळ करणें, हे अरेराव प्रकार इतउत्तर चालणें मुळींच शक्य नाहीं. १८२२ त आपण त्यांना जीं आश्वासनें दिलीं त्यांन मच हरताळ फासतों, यावरून राजेलोकांचे शब्दावर प्रजेचा कितपत विश्वास असेल याचा आपणच करा, आणि हिंदुप्रजा व ख्रिस्तीराज्यकर्ते यांचा संबंध 'जित जेते' या नात्यानें जडलेला नसून काच्या सुखार्थ व हितार्थ भागीदारीनें जडलेला आहे. हें लक्षांत ठेवा,'' या खरमरीत भाषणानें कीचा प्रतिबंध गेला खरा, परंतु हिंदुलोकांना 'जेंतिवा' प्रमाणें—जनावराप्रमाणे—वागविण्याची आ पडलेली पद्धत नष्ट होणें शक्य नव्हतें.

परंतु पोर्तुगालमध्यें अशी ही अरेरावी व अनाचार मुकाट्यानें सहन करण्यास लोक सिद्ध दिवसानुदिवस लोकमतानुवर्ती सभासदांनीं पार्लमेंट भरून जाऊं लागलें हणजे सत्ताधिकाऱ्यांचीं अंध सर्व कृष्णकृत्यें उघडपणे खडाखड पार्लमेंटांत विचारण्यांत येऊं लागलीं; राजकीय सत्ता झुगार प्रयत्नांची पराकाष्ठा होऊं लागली; प्रजेचे पुढारी भराभर तुरुंगांत कोंबले गेले; सीमापार झाले; अन गांजले गेले; पण त्या मुळें प्रजापीडनसंतापानें भयंकर लोकक्षोभ निर्माण झाला व या जनसंतापाच्या जळफळाटाचें पर्यवसान १९०८ फेब्रुवारीच्या २ ऱ्या तारखेस भररस्त्यांत राजे दो कार्लुस व प्रिन्स दो यांच्या खुनांत झालें!

स्वाभाविकपणेंच या खुनानंतर कांहीं दिवस सर्वत्र धुमाकूळ माजून राहिला. राजकीय अद्यापि आपल्या अस्थिर परिस्थितीची सत्यता पटली नव्हती; परंतु लवकरच ३ ऑक्टोबर या दिवशीं क्रांतिकारक लोक थेट राजवाड्यापर्यंत जाऊन भिडले. तेव्हां राजे मानुअल यांच्या घराण्यांतील मंडळी व क्षाचे लोक पळून गेले, आणि रिपब्लिकचें, लोकसत्तेचें तांबडें हिरवें व मध्यस्थलीं तारा निशाण आनंदानें पोर्तुगाल देशावर फडकूं लागलें. झालें! गोमांतकांत ही आनंदाची वार्ता संदेशानें पोहोचविण्यांत आली व जवळ जवळ ४०० वर्षे भयंकर अत्याचाराखालीं दडपून गे गोमांतकावर रिपब्लिकचें मध्यस्थलीं तारा असलेलें तांबडें हिरवें निशाण डुलूं लागलें. स्व समता व विश्वबंधुता, यांचा विजयध्वज गोमांतकांत रोवला गेला! गोमांतकांतील ख्रिश्चनांना ज घटनेनें तितकासा आनंद झाला नाहीं, तरी हिंदुजनतेच्या आनंदाला मात्र पारावार नाहींसा झाला.

रिपब्लिकच्या उज्ज्वल ब्रीदाप्रमाणें अर्थातच त्याचा जयजयकार झाला. धार्मिक अत्याचा घोर अंधारी रात्र संपून गेली. सरकार धार्मिक बाबतींत तटस्थ झालें. ख्रिस्ती लोकांप्रमाणें हिंदुन

आपले विधि व उत्सव उघडपणें व पूर्ण स्वतंत्रतेनें करण्यास मोकळीक झाली. खिस्ती व खिस्तेतर हा भेद तत्वतः राहिला नाहीं. सर्वांना सारखेच हक्क प्राप्त झाले. धार्मिक विषमतेमुळें आजपर्यंत बंद असलेलें विद्यादेवीचें द्वार सर्वांना सताड उघडें केलें गेलें. पाद्रीलोकांच्या अनियंत्रित सत्तेला फांटा मिळाला. राष्ट्रांतील कोणताहि अधिकार व दर्जा कोणालाहि स्वपराक्रमानें प्राप्त करून घेण्यास आडकांठी राहिली नाहीं. लोकांना स्थानिक स्वराज्याचे हक्क मिळाले. पार्लमेंटांतहि लोकांना वाव मिळाला. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हिंदूंच्या मानेवरील धर्मच्छळाचें जाचक व संतापदायक जूं आकस्मिक रीतीनें व अतर्क्य घटनेनें नष्ट झालें. हिंदुजनतेची असह्य व अमानुष बंधनांतून मुक्तता होऊन ती आपलें जीवित सुखासमाधानानें घालवूं लागली. ५ ऑक्टोबर १९१० सालापासून गोमांतकांत अनियंत्रित राजसत्तेच्या ठिकाणीं प्रजासत्ताक राज्यपद्धति प्रस्थापित झाली व तेव्हांपासून पोर्तुगाल पार्लमेंटकडून रिपब्लिकन गव्हर्नर जनरल इकडे पाठविण्यांत येऊं लागले. त्यांचा अधिकार दीव, दमण व गोंवा या प्रदेशांवर चालतो. राज्यकारभारासाठीं एक कायदे करणारें Legislative व दुसरें ते अमलांत आणणारें Executive अशीं दोन कौन्सिलें असत; पहिल्या कौन्सिलांत प्रजेचे १२ व सरकारचे ६ प्रतिनिधि असत, व दुसऱ्यांत प्रजापक्षाचे २ व सरकारचे ४ प्रतिनिधि असत. येथील सरकार पोर्तुगालच्या पार्लमेंट सभेस जबाबदार असे. पोर्तुगालांत गोव्यातर्फे निवडून दिलेले एक एक प्रतिनिधि असलेल्या पार्लमेंट व सिनेट अशा दोन सभा असत. परंतु अलीकडे एकमुखी—सत्ता पद्धतीनें (*Dictatorship*) सर्व राज्यकारभार चालतो.

या पद्धतीला अनुसरून रिपब्लिकन गव्हर्नर जनरल 'पेद्रो द आर्मोरिम' हे राज्यकारभार पहात असत, ते नुकतेच निवर्तले. ते वयोवृद्ध होते. ते न्यायी, करारी, शांत व स्वकर्तव्यदक्ष असे असत. ह्या हिंदुत्वाच्या अक्षम्य अपराधासाठीं (!) गेल्या ५—५० वर्षांपूर्वी पर्यंत वाटेल तसले अपरिमित छळ दुःसह यातना व भयंकर अपमान हिंदुजनतेला सोसावे लागले व त्या अनन्वित राक्षसी अत्याचाराविरुद्ध एक ब्रही काढणें कोणाला शक्य नव्हतें, त्याच राज्यांत ४०० वर्षांपूर्वी स्वधर्मांतून ओढून नेलेले हजारों लोक पुनश्च परमेश्वरी कृपेनें हिंदुधर्माच्या शीतल छायेखालीं सुखासमाधानानें व उघडपणें येऊन आपली अंतःकरणाची तळमळ शांत करूं शकले, या अभूतपूर्व घटनेनें या गव्हर्नर जनरलांची कारकीर्द पोर्तुगीज इतिहासांत अत्यंत महत्त्वपूर्ण झाली आहे.



# पुरोहित विरुद्ध पाद्री.



सेंट झेवीअरचें स्नेहीमंडळ, पुरोहितांनीं भ्रष्टीकृत लोकांना शुद्ध करून घेतल्यामुळें कसें खवळलें व त्यासाठीं त्या वर्गाचे अनान्वित हाल करणारे अत्याचारी कायदे-कीं ज्यांचें वर्णन शब्दांनीं करणें थिओडोर प्रिंसिगरसारख्या सुप्रसिद्ध इतिहासकारालाहि अशक्य झालें, ते कसे करण्यांत आले हें मागील प्रष्ठांतून सांगण्यांत आलेंच आहे.

पुरोहितवर्गाचा नाश इच्छिण्याचें कारण, पणजी हायकोर्टाचे माजी सर न्यायाधीश दों नोरौन्य ह्यांनीं आपल्या सुप्रसिद्ध ' गोमांतकस्थ हिंदु व पोर्तुगीज रिपब्लिक ' या ग्रंथांत असें दिलें आहे कीं, " ते सर्व पंडित ह्मणजे वैद्य असून लग्नसराईनिमित्त आठ दिवस वधुवरांच्या घरीं रहातात. ह्या अवधींत येतां जातांना वाटेंत ते अनेक किरिस्तांव आजाऱ्यांची तपासणी करतात, आणि नाडी हातांत घेऊन त्यांना पहिली गोष्ट सांगतात ती ही कीं, ' तुमचे पूर्वज त्यावेळीं हिंदु देवतांची भक्ति करीत होते त्यावेळीं फार सधन असत. आतां धर्माच्या फरकामुळें सर्वांतच फरक पडला आहे. " इ०

# प्रकरण ५ वें.

# गोमांतकाच्या धार्मिक मुक्ततेचे प्रयत्न.

केवळ हिंदुत्वाच्या संरक्षणासाठीं सतत ४०० वर्षे दुःसह हाल अपेष्टा व अनन्वित जुलूम सहन केलेल्या असहाय हिंदुजनतेच्या अंतःक्षोभांतून निर्माण झालेल्या भयंकर ज्वाळांनीं पोर्तुगीज राजसत्तेचा वैभवशाली मुगुट वितळून धुळीस मिळविला गेला व १९१० मध्यें लोकसत्तेचें निशाण गोमांतकांत रोवलें गेलें, येथपर्यंत सर्व ठीक झालें. परंतु धार्मिक अत्याचाराचा तीक्ष्ण खंजीर जरी याप्रमाणें हिंदुहृदयांतून उपटून काढण्यांत आला, तरीहि त्यानें केलेली जखम इतकी खोल, लांब, व रुंद होती, व त्यानें ओतलेलें विष नसानसांत व रोमरोमांत इतकें भिनून गेलें होतें, कीं, हिंदुसमाजाचें अंतःस्वास्थ्य ठिकाणावर कसें येईल याची सर्व विचारी व दूरदृष्टि सज्जनांस धास्ती आणि चिंता वाटत होती. पहिल्यासारख्या अधिक धार्मिक अत्याचारांची भर पडणार नव्हती, हें स्पष्ट झालें होतें; तरी आपल्याच धर्माचे, आपल्याच संस्कृतीचे, आपल्याच हाडामांसाचे व रक्ताचे निम्म्याहून अधिक लोक भयावह असणाऱ्या परधर्मांत स्वेच्छेनें वा परेच्छेनें डोळ्यांदेखत वावरतांना पाहून, विचारवंतांचें काळीज चर्रर होत होतें. पण हा प्रश्न कोणीं व कसा सोडवावयाचा?

केवळ गोमांतकाचाच नव्हे तर गोमांतकाबाहेरहि हा विकट प्रश्न विचारवंतांपुढें उभा होताच. हिंदुधर्माचे, हिंदुसंस्कृतीचे व हिंदुरक्ताचे कोट्यावधि हिंदु लोक सारखे मुसल्मान किंवा ख्रिस्ती बनविले जात असल्यामुळें हिंदुसमाज विगलितगात्र होत चालल्याचें दिसून येतच होतें. स्वधर्मीयांच्या या विलक्षण ओहोटीकडे दुर्लक्ष करणें म्हणजे स्वसंस्कृतीला रसातळास नेणारें आहे, याची मध्यंतरीं दुर्दैवानें लुप्त झालेली किंवा करविली गेलेली जाणीव कोठेंकोठें डोकावूं लागली होतीच. या जाणिवेला जीवंत व मूर्त स्वरूप देण्याचें महान् स्पृहणीय कार्य महाराष्ट्रांत कै. श्री. गजानन भास्कर वैद्य प्रभृति मंडळींनीं व उत्तरेंत हुतात्मे स्वामी श्रद्धानंद यांनीं चालविलें होतें. याच सुमारास मसूर ब्रह्मचर्याश्रमाचे संस्थापक श्रीविनायकमहाराज मसूरकर धर्मप्रसारार्थ उदंड देशाटण करीत सर्वत्र फिरत होते. गोमांतकांतील पहिल्याच परिभ्रमणांत, त्यांच्या दृष्टीसमोर वरील अवघड प्रश्न उपस्थित झाला व तो त्यांनीं मोठ्या चातुर्यानें व अपूर्व धाडसानें सोडविण्याचा निश्चय त्या वेळींच केला. हा त्यांचा त्या वेळचा सत्यसंकल्प परमेश्वरी कृपेनें, पुण्यश्लोक पूर्वजांच्या आशीर्वादानें व अनेक कार्यकर्त्यांच्या बहुमोल साह्यानें पुढें कसकसा सुयशस्वी झाला हें पाहाण्यापूर्वींच ज्या परमवंदनीय महाभागांनीं गोमांतकीय हिंदुजनतेचा हा 'गोवा' सोडविण्यासाठीं जे अनेकविध प्रयत्न केले, त्यांच्या त्या प्रयत्नांची एकेक लाट वाढतां वाढतांच पुढील शुद्धिकार्याची प्रचंड भरती आली. त्यांच्या आयुष्यांतील गोमांतकाशीं निगडित असलेल्या कांहीं प्रसंगांची येथें

प्रेमादर व कृतज्ञतापूर्वक आठवण करणें अनाठाई होणार नाहीं—नव्हे तें पवित्रतम कर्तव्यच आहे, हें जाणून तशा कांहीं प्रसंगांचें दिग्दर्शन मात्र प्रस्तुत प्रकरणांत करावयाचें योजिलें आहे.

### ( १ ) श्री· विद्यारण्य माधव—

विजयनगरच्या श्री विद्यारण्य माधवांनीं मुसलमान लोकांच्या मगरमिठींतून गोमांतक सोडवून सप्तकोटीश्वरादिक देवस्थानांची पुनश्च स्थापना, माधवतीर्थावर धर्मभ्रष्टांचें शुद्धीकरण, इत्यादि गोष्टींनीं हिंदुजनतेच्या देवधर्मसंस्कृतीची, जीविताची व वित्ताची स्थिरस्थावर कशी घडवून आणली आणि त्यावेळचें हिंदुधर्मावरील भयंकर संकट कसें निरस्त केलें याचें मागें विवेचन आलेंच आहे.

### ( २ ) श्री समर्थ रामदास स्वामी :—

एकदां चाफळीं तिसऱ्या प्रहरीं भोंवतीं शिष्यांचा मेळा घेऊन श्रीसमर्थ चर्चा करीत बसले असतां एक नवखे गृहस्थ श्रीदर्शनास आले. 'या बसा' इत्यादि लौकिक व्यवहार झाल्यावर श्री समर्थांनीं नित्याप्रमाणें त्यांना विचारिलें—"आपण कोठें असतां ? तिकडचे सर्व लोक सुखी आहेतना ? लोकांचे आचार विचार स्वधर्माला अनुसरून चालले आहेतना ? स्वधर्माचरणाला प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष कांहीं विघ्न नाहीं ना ? परवंचनेमुळें किंवा आत्मवंचनेमुळें लोकांनीं आचार—विचाराला झुगारून दिलें नाहीं ना ?" ही प्रश्नमाला ऐकून तो गृहस्थ घुटमळला. 'महाराज ! काय सांगावें ! कपाळीं काय लिहिलें आहे तें सांगतां येत नाहीं.' एवढेंच त्या गृहस्थानें उत्तर दिलें. श्री समर्थांचें सर्व बोलणें नेहमीं अत्यंत आतुरतेचें असे ! त्या गृहस्थाच्या अशा संदिग्ध भाषणानें त्यांची आतुरता अधिकच वाढून ते ह्मणाले, "सांगा, जसें असेल तसें यथातथ्य सांगा, शंका धरूं नका, आपणच आपल्या कर्माचे धनी आहोंत !" श्री समर्थांचें असें आश्वासन मिळाल्यावर तो गृहस्थ म्हणाला, "महाराज, मी समुद्रकांठचा आहें. तिकडे सर्वत्र भ्रष्टाकार आहे, अन्याय आहे..............."त्या गृहस्थाच्या मुखांतून हे शब्द निघतांच श्री समर्थ कांहीं एक न बोलतां एकदम उठले व आपआपल्या उद्योगाला लागण्याची शिष्यांना आज्ञा करून आपण स्वतः त्या प्रांताकडे जावयास तसेच निघाले ! स्वधर्मरक्षणासाठीं देह झिजविण्याची कोण ही तत्परता ! पोर्तुगीज लोकांनीं केलेल्या अनन्वित छळाला बळी पडलेल्या मुलुखांतील तो गृहस्थ होता. श्री समर्थ प्रथम तिकडे एकटेच गेले ते त्या मुलखांत गेले, तेथील स्थिति अवलोकन केली. त्या लोकांची भाषा अवगत करून घेतली आणि त्यांना त्यांच्या भाषेंत बोध करून धीर दिला, व आश्वासित केलें ! गोमांतकांत गोविंद नांवाच्या शिष्याची नेमणूक केल्याचा समर्थप्रतापांत उल्लेख आहे. तद्वतच सीतारामबुवा चिपळूणास, त्रिंबक आकाशे तळकोकणीं दंडाराजपुरी प्रांतांत, दामोदर देवगड प्रांतांत, भैरव गोकर्ण प्रांतांत, राघव, जयवंत, जयराम, अनंत मौनी, शिवराम हे कर्नाटक, तैलंगण आणि दक्षिण दिग्विभागीं समर्थांनीं 'जगदोद्धारण प्रसंगें आज्ञापिले' असेंहि तेथेंच ह्मटलें आहे [ स. प्र; १० समास ] तद्वतच श्रीसमर्थ संप्रदायाची परंपरा दक्षिण कोंकणांतहि कुडाळ देशकर आद्यगौड ब्राह्मणांत चालू असल्याचें व तिचे मांडकुली कोचरें व पाट या तीन गांवांत मठ असल्याचें श्री, बा. अ. पाटील स. संपादक 'आद्यगौड' ब्राह्मण यांनीं नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. ( करमणूक समर्थ—अंक ) असो.

श्रीसमर्थांचा नित्याचा दंडक म्हणजे नित्यनूतन उदंड देशाटण करीत हिंडावें व सर्वत्र लोक शोध शोधून त्यांना भक्तीच्या गुणें बोधावें असा असे. या परिभ्रमणांत त्यांनीं गांवोगांवच्या देवदेवतांना धर्मसंस्कृतीच्या रक्षणार्थ जागृत होण्याविषयीं प्रेमभरानें व आतुरतेनें केलेल्या अत्यंत हृदयस्पर्शी प्रार्थना, लोकोद्धारासाठीं अहर्निश तळमळणाऱ्या श्रीसमर्थांच्या अंतःकरणाची अस्सल ओळख करून दिल्याविना रहात नाहींत. कोंकण प्रांतावर फिरंग्यांनीं चालविलेल्या आसुरी अत्याचारांतून वांचविण्यासाठीं त्यांनीं भगवान परशुरामाची अशीच एक प्रार्थना केलेली आहे, ती अशी:—

" महाकोप अग्नि ऋषी जामदग्नी—समर्था तया जाणिजे सर्व सूज्ञीं ।
सदासर्वदा घेतसें नाम तुझें—वरिष्ठा स्वभावेंचि हें गोत्र माझें ॥ १ ॥
वसे सागराचे तिरीं सूत तुझा—समाचार तो घेत नाहींच माझा ।
तयाला बहूता परी शीकवावें—स्वभावेंचि थोडेल ऐसें करावें ॥ २ ॥
किती येक मागें बहू युद्ध केलें—किती वेळ या ब्राह्मणां राज्य दीलें ।
अकस्मात सामर्थ्य तें काय झालें—युगा-सारिखें काय नेणो विझालें ॥ ३ ॥
चिरंजीव आहेसि ऐसी वदंती—समर्था तुझें चित्त काठिण्य कीती ।
तुझे नामधारी तुला हें कळेना—कृपाळूपणें चित्त कैसें वळेना ॥ ४ ॥
नकोरे उदासीन हें वाक्य मानीं—समर्था असावें बहू साभिमानी ।
करावी दिनानाथ हे सत्यवाचा—तुला चिंतितों दास मी राघवाचा ॥ ५ ॥

( सांप्रदायिक विविध विषय १ खंड. )

( ३ ) श्री शिवाजी महाराज:—

श्री समर्थ येऊन गेल्यानंतर श्री शिवराय गोमांतकांत विधर्मीयांचा समाचार घेण्याकरितां आले. गोमांतकांत पाऊल ठेवतांच त्यांनीं निस्सहाय व दुःखार्णीत वर्षांच्या वर्षे होरपळत असलेल्या हिंदुजनतेच्या परित्राणार्थ जी सर्वांना उच्च स्वरानें हांक मारिली ती गतप्रकरणीं इतिहासांत कथन केलीच आहे. श्री शिवरायांचा तो प्रसिद्ध जाहिरनामा, ती अंतःकरणाला पीळ पाडणारी प्रचंड हांक, देवधर्म रक्षणार्थ सघद्ध होण्यासाठीं हिंदुमात्रास केलेलें तें दिव्य पाचारण, प्रत्येकाच्या कर्णरंध्रांत जोरजोरानें जाऊन घुमलें आणि निर्जीव, निस्तेज, व निर्बल मानमान होणारी हिंदुजनता नवचेतनेनें प्रस्फुरित होऊन खडबडून जागी झाली. श्री शिवरायांनीं घातलेल्या या झणझणीत अंजनानें दैन्यवाणी हिंदुजनता प्रतिकारक्षम बनली. तिची ही स्वकर्तव्यजागृति फिरंग्यांच्या डोळ्यांवरील ऐश्वर्योन्माद व त्यांची धर्मवेडाची लहर कशी जिरवूं शकली हें खालील दिलेल्या एका प्रसंगावरून कळून येईल.

सत्तासामर्थ्यसंपन्न व महाबलाढ्य विजापूरकरांना धूळ चारणारा शिवाजी नीट गोव्यावर रोख धरून, चाल करून येत आहे, हें पहातांच फिरंग्यांचें सैन्य गर्भगळित झालें होतें. वाडीकर सावंत आदिक भोंवतालचे मराठे सरदार ,श्रीशिवरायांनीं उपरोक्त उपदेशामृतानें आधींच वश करून घेतले होते. पहिल्याच झटापटींत हाडे चांगलीं खिळखिळीं झाल्यानें निरुपायानें फिरंग्यांनीं आपला अनंत शेणवी नांवाचा चतुर वकील श्रीशिवरायाकडे पाठवून तह केला. तह करून गेल्यानंतर त्या बदमाष अनंत

शेणव्यानें पोर्तुगीजांस असा सल्ला दिला कीं, आतां संधि झाल्यामुळें मराठ्यांचें सैन्य आज बेसावध राहील, तरी रात्री १२ वाजतां पोर्तुगीज सैन्यानें मराठ्यांवर हल्ला चढवावा ह्मणजे आपलें उद्दिष्ट साधून रेवेंज विजापूरकरांकडूनहि ह्या पराक्रमाबद्दल आपणांस बराच प्रांत व कित्येक सवलती मिळतील! या मसलतीनें पोर्तुगीजांना आतां अचानकपणें श्रीशिवाजीस हार मारावयास मिळणार या कल्पनेनें ब्रह्मांड ठेंगणें झालें, व ठरल्याप्रमाणें त्यांनीं रात्रौ अचानक छापा घालण्याची तयारी चालविली; परंतु सुदैवानें लवकरच ही बातमी श्रीशिवरायांस समजली व त्यांनीं आपला तळ कांहीं कोसांवर पाठीमागें हालविला. मराठ्यांचें सैन्य पूर्वीच्या स्थळीं विश्रांति घेत घोरत पडलें असेल या कल्पनेनें फिरंग्यांनीं त्याच स्थळावर अचुकपणें पहाटेपर्यंत सारखा तोफांचा भडिमार केला; पण श्रीशिवरायांनीं अलौकिक चातुर्यानें आपलें मराठी सैन्य तोफांच्या टप्प्यापलीकडे सुरक्षितपणें दबा धरून बसविलें होतें. दिशा उजळूं लागण्याच्या सुमारास फिरंग्यांचा दारूगोळा संपला, रात्रभर केलेल्या परिश्रमानें ते अगदीं थकून गेले. अशाच वेळीं नवीन दमाचें मराठें सैन्य एकाएकीं त्याच्यावर 'हरहर महादेव' ह्मणून तुटून पडलें, व त्यांनीं फिरंग्यांची दाणादाण उडवून दिली. १०–१२ हजार सैन्यांपैकीं फक्त १०००–१२०० लोकच जिवानिशीं वांचले! अर्थातच पोर्तुगीजांनीं तह करून प्रतिवर्षी कांहीं नव्या तोफा, जडजवाहीर, आणि नजराणे देण्याचें मान्य केलें व तत्काळ २०००० पुतळ्या व इतर कित्येक बहुमोल वस्तु दिल्या. असा हा विजय संपादून मराठे सैन्य स्वराज्यीं परत आले.

( ४ ) श्री. संभाजीमहाराजः—

श्री शिवछत्रपतीनंतर १६८३ मध्यें श्री संभाजीमहाराजांनाहि, पाद्रीशाहीच्या चियावणीनें होणाऱ्या हिंदुजनतेच्या अपमानास्पद छळणुकीचा जाब विचारण्याकरितां गोमांतकांत आपले घोडे भरधांव फेंकावे लागले. फिरंग्यांच्या त्वेषानें मडकून जाऊन त्यांचा पाठलाग करीत करीत संभाजी महाराजांनीं प्राणाचीहि क्षिती न करितां कुंभारजुव्याचे खाडींत आपला वेगवान घोडा कसा पिटाळला व त्या हातघाईच्या प्रसंगीं त्यांचा घोडा वाहून जाऊं लागला असतां त्या स्वामिकार्यतत्पर रणशूर खंडोबल्लाळानें संभाजी महाराजांना सांवरून तीरावर कसें आणलें, ही गोष्ट इतिहासप्रसिद्धच आहे. ज्या वेळीं संभाजी महाराजांनीं आपल्या तिखट तरवारींनीं व अचुक भाला फेकीनें मर्दनगडावर पोर्तुगीज सैन्याची अगदीं धूळधाण उडवून दिली. त्यावेळीं गोव्याचे व्हाइसरॉय कौंट् ऑफ् अल्वार (Count of Alvor) यांनीं संकट निवारणार्थ पोर्तुगीज सत्तेचा राजदंड सेंट् फ्रान्सिस्क झेविअर याचें हातीं देऊन त्याच्यावर गोव्याचें संरक्षण करण्याविषयीं श्रद्धा भक्तिपुरःसर भार घातला, व त्याच्या सुदैवानें त्यावेळीं गोमांतकाचा बचाव झाला. संभाजीमहाराजांच्या हातून हा प्रदेश कायमचा स्वतंत्र होण्याचा योग अगदीं जवळ येऊन ठेपला होता, पण त्यांना मध्येंच मोगल सैन्याशीं टक्कर देण्याकरितां जावें लागल्यानें गोव्याचा बचाव होऊं शकला; पण या प्रसंगामुळें कौंट् ऑफ् अल्वारनंतर प्रत्येक व्हाइसरॉयानें आपलीं अधिकारसूत्रें सेंट झेविअरच्या हातांतून घेण्याचा प्रघातच पडून गेला व तो १९१० तील लोकसत्तेच्या पहिल्या गव्हर्नरजनरलपर्यंत अव्याहतपणें चाललाच होता. या एका गोष्टीवरूनच संभाजी-

महाराजांनीं व त्यांच्या पराक्रमी व धाडसी रणशूरांनीं फिरंग्यांच्या मनांत केवढी दहशत व वचक उत्पन्न केला होता, हें सिद्ध होतें.

( ५ ) श्री. व्यंकटराव घोरपडे:—

संभाजीमहाराजानंतर सावंतवाडीचे भोंसले व इतर मराठे यांच्याशीं फिरंग्यांच्या नेहमीं चकमकी होत असत. ज्यावेळीं चिमणाजीअप्पांनीं वसई सर केली ( १७३९ ) त्याच सुमारास व्यंकटराव घोरपडे यांनीं गोव्यावर स्वारी करून साष्टीप्रांत जिंकला व फिरंग्यांना कधींहि न विसरेसा यथेच्छ चोप डिंगाडीच्या माळावर दिला; श्री. व्यंकटराव घोरपडे यांच्या ह्या स्वारींत फिरंग्यांस तह करणें भाग पडलें. मोडी लिपींत लिहिलेला या तहाचा कागद इतिहाससंशोधक श्री. पिसुर्लेकर यांनीं भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध केला आहे. तो तहाचा कागद असा:—

( शिक्का वाटोळा ).

" तहनामा करार विदमाने राजश्री वेंकटराव व राजश्री दादाजीराव सरदार, राजश्री रावप्रधान । अंतीन करनेल दे आल्कास न जुजे पेद्र माऊसकुल येखल्दार फिरंगी अमल जंजिरे गोवा तेरीख छ २४ मोहरम सु ॥ तिसां स त्सैन मया अल्फ.

फिरंगी यांच्या मुलकामध्यें फौजा मुकाम जाहल्या आहेत त्या उठोन जान्याच्या खर्चास फिरंगी याही सद्या द्यावे रुपये लाख सात दर रुपयास असुरफी २ दोन प्रमाणे देता तपसील.

तहनामेवर उभय तर्फेनें निशाणें व शिके होतांच दोगे फिरंगी मोतबर दोन लाख रुपये घा घेऊन लस्करांत येतील तेणेकरून पहिली खिस्त फारीक होईल ते रुपये पावले नंतर साष्टी बारदेशांतील फौज उठवावी आणि कोट व पल्कट सोडून देऊन मुलूख खराब जाहला तो आबदानीस यावयास रयत गांवीं येऊन कमाविसी व्हावया कारणें कुलीं फौजा फिरंगी याची सरद सोडून आपल्या कादात जावें आणि कांहीं जमावानसीं एक सरदार फिरंगी याच्या मुलकां बाहीर सरदेस रहावा त्या बराबर दुसरे खिस्तीचे रुपये आठा दिवसांत फारीक होई प्रावेतंव दोघे फिरंगी यांनीं लस्करांत रहावें.

ते दुसरे खिस्तीचे रुपये तीन लाख आठ दिवसाच्या वाईदामधे द्यावे त्याच्या जिनस नकद व सोनें रुपये पोवले व सकलाद द्यावे. येणेप्रमाणें फारीक जाहले. नंतर फिरंगी याचा दोन लाख रुा हुंडीबाबत राहिले ते फारीक करून देत यावेत. दोघे बोलीस मोतबर आदमी ठेऊन सदरहू दोघे फिरंगी यांनीं गोव्यास जावें. तेरीख मजकूर ( लेखनसीमा )."

ह्या तह ता. २७ एप्रिल १७३९ रोजीं गोव्यांतील राय ( Raia ) गांवीं ठरण्यांत आला. फिरंगी यांच्या तर्फेने Antonis Carneiro de Alcacoa व Joseph Pedro हे ह्या प्रसंगीं हजर होते. असो. इतउत्तर उत्तरेकडील राजकारणें विशेष नेयस लागल्यानें मराठ्यांचें लक्ष साहजिकच गोमांतकाचे प्रश्नावरून निघालें.

( ६ ) श्रीमत्स्वामी विवेकानंद:—

" आपल्या आक्रोशानें दही दिशा भरून सोडणाऱ्या, दुःखी कष्टी प्राण्यांचे दुःख दूर करण्याकरितां, पतीकरितां शोक करणाऱ्या विधवेचे अश्रु पुसण्याकरितां, हंबरडा फोडणाऱ्या मातेचें सांत्वन

करण्याकरितां, अन्यायी व मागसलेल्या लोकांना या जीवनार्थ कलहांतून वांचविण्याकरितां, मनुष्य प्राण्याच्या ऐहिक व पारलौकिक कल्याणासाठीं शास्त्रज्ञानाचा उपदेश सरसकट सर्वांना करण्यास, स्वतःची मुक्ती साधून लोकांनाहि सुखी व समाधानी करण्याकरितां—'आत्मनो मोक्षार्थं जगद्धिताय च'—तथापि प्रसंग विशेषीं दुसऱ्याच्या कल्याणार्थ स्वतःचा बळी देण्यासहि सतत उद्युक्त राहण्यास सांगणाऱ्या" स्वच्या संन्यास धर्माची ज्यांनीं आजन्म दीक्षा घेतली होती, ते श्रीमत् स्वामी विवेकानंद इ. स. १८९२ मध्यें गोमांतकांत आले होते. सर्व जग हिंदुमय करण्याच्या कल्पनेनें ते कसे वेडावलेले (!) होते हे सर्वविश्रुत आहे. साहजिकच खिस्तमय बनलेल्या गोमांतकाची धार्मिक मुक्तता झाल्यास पहावी या हेतूनें ते गोमांतकांत आले होते. पोर्तुगीजांनीं केलेल्या अनन्वित छळानें त्यांच्या तळपायांची आग मस्तकास जाई. एतत् संबंधीं कांहीं तरी उपाययोजना करण्याची ते बरीच खटपट करीत होते. मडगांवाला ते बरेच दिवस राहिलेले होते. तेथें त्यांचे सुप्रसिद्ध वेदान्ती व आर्यवैद्य ब्रह्मीभूत श्रीस्वामी सुब्रह्मण्य आनंदतीर्थ यांच्याशीं नेहमीं भाषण-व्यवहार चालत. ते त्यांच्या जवळ पोर्तुगीज भाषेचाहि अभ्यास करीत असत; पण त्यांना पुढील कामाची ओढा विशेष असल्यानें येथें अधिक दिवस काढणें त्यांना शक्य झालें नाहीं.

( ७ ) वॅ. सावरकरः—

अंदमानमध्यें सश्रम कारागृहवासाच्या अमानुष हालअपेष्टा भोगीत असतांच ह्या धर्मवीरानें, विधर्मीयांच्या तीव्र विरोधांत अंदमान जगतांतील धर्मांतराचा प्रश्न सोडविल्याविषयीं मागे उल्लेख आलेलाच आहे. बंदीगृहात शरीरानें बद्ध असतांहि श्री. तात्याराव मात्र मनानें समाजसंस्कृति रक्षणाच्या उत्तान विचारांत सदैव निमग्न असे. अशाच अवस्थेत त्यांनीं सुप्रसिद्ध 'गोमांतक-काव्या' ची निर्मिति केली, व गोमांतकाचा प्रश्न महाराष्ट्रीयांच्या हृदयाशीं थेट नेऊन भिडविला. कारागृहांतून सुटतांच त्यांनीं प्रस्तुत प्रश्नाचे 'मुतउवाच' केले होतें. स्वामी श्रद्धानंदांजवळाहि त्यांनीं बरीच वाटाघाट करून त्यांचें गोमांतकांत येण्याविषयीं अभिवचन मिळविलें होतें. पण दुर्दैवानें तसा योग जुळून आला नाहीं.

× × × ×

स्थानिक प्रयत्नः—गोमांतकाबाहेरील कांहीं ठळक व्यक्तींकडून गोमांतकाच्या धार्मिक मुक्ततेसाठी झालेल्या प्रयत्नांचें अल्पसें दिग्दर्शन केल्यानंतर प्रस्तुत काळीं साक्षात् स्थानिक मंडळीकडूनहि केल्या गेलेल्या प्रयत्नांचा परिचय करून देणें, सयुक्तिक होईल. मागे म्हटल्याप्रमाणे आपले लाखो धर्मबांधव आपल्या डोळ्यांदेखत परधर्मांत नांदतांना पाहून तेथील कांहीं विचारवंतांनाहि वाईट वाटत होतें;पण डोक्यावरील सत्ता ही धर्मांध व कडवी असल्याने या बिकट परिस्थितींतून कसा मार्ग निघेल याची चिंता जो तो आप आपल्या मनाशीं करीत बसला होता.

अशा अवस्थेत १८९५ सालीं सत्तरीच्या राण्यांनीं सरकारकडून पूर्वी दिलीं गेलेलीं आश्वासनें न पाळलीं गेल्यामुळे पुनश्च स्वातंत्र्याचें रणशिंग फुंकलें; त्याचा उपशम करण्याकरितां गव्हर्नरजनरल साशाद यांनीं संकेश्वर मठाधिपति जगद्गुरु श्रीमत् शंकराचार्यांची स्वारी सत्तरी महालांत मोठ्या इतमानानें व थाटानें बोलावून नेली. ही संधि साधून कांहींजणांनीं श्रीचरणांजवळ धर्मभ्रष्ट लोकांच्या पावनाचा प्रश्न काढला; पण त्यांच्याकडून प्रस्तुत गोष्टीस मान्यता मिळाली नाहीं, असें सांगतात.

यानंतर मधून मधून हा प्रश्न उचल खात असे. भारतकार डॉ. हेगडे देसाई, वे. शा. सं. वामन रामचंद्र नाईक करंडेशास्त्री, भिषग्वर्य रामचंद्र पांडुरंग अथवा दादाराव वैद्य इत्यादि समाजधुरंधर मंडळी प्रस्तुत गोष्टीला चालना देत असत; पण कार्यारंभ दृष्टिपथांत येण्याचें कांहींच चिह्न दिसेना. उपरोक्त भिषग्वर्य श्री. दादाराव वैद्य, ज्यांना पुढील शुद्धिचळवळींत ३१ तास तुरुंगवास पतकरावा लागला त्यांच्या शब्दांतच ही परिस्थिति वाचकांपुढें मांडणें ठीक होईल. श्री दादाराव वैद्य म्हणतात "गोमांतकांत झालेल्या खिस्ती गावड्यांचे हिंदूकरणाची आम्हांस आमच्या सज्ञानावस्थेपासून आजपर्यंत तीव्र इच्छा मात्र वाटत होती; परंतु इकडील केवळ कॅथोलिक धर्माच्या पाद्रीलोकांच्या कडव्या अंमलानुसारच पोर्तुगीज मुख्य अधिकारी वागणारे, म्हणून त्यांच्या अंमलांत पूर्वोक्त इच्छेप्रमाणें आमच्याकडून कर्तव्य किमपि झालें नाहीं. अलीकडील १४-१५ वर्षांत पोर्तुगाल सरकार रिपब्लिक झालें, पण त्यानें त्यांच्या पाद्रीस लग्नास मोकळीक आणि वितुष्ट दांपत्यास घटस्फोटाचें सौलभ्य मिळवून देण्यापलीकडे अधिक सत्कृत्य फारसें कांहीं केल्याचें दिसत नव्हतें, आणि गोव्यांत तर कोणताहि धर्म झूठ असें प्रतिपादन करणारे गव्हर्नर या रिपब्लिकाचे कारकीर्दीत आले. त्यांच्या हातून देखील इकडच्या सर्वसाधारण (हिंदु-मुसल्मान-खिस्ती) प्रजेच्या निढळाच्या घामामुळें 'सरकारी तिजोरींत जमणारा पैसा वार्षिक हक्कानें उपटणारें पाद्रीखातें रिपब्लिक कायद्यानें हक्कदार ठरत नाहीं, म्हणून तो त्या खात्याला न देण्याचें रास्त कर्तव्य घडूं शकलें नाहीं. यावरून रिपब्लिक कारकीर्दीत देखील गावडे लोकांची शुद्धि 'अशक्यच' असें मानून आम्ही त्या बाबतींत अगदीं उदास होतों."

वरील मंडळीप्रमाणेंच ह्या कार्याची विचारणा नव्या दमाचे कांहीं तरुणहि मधून मधून करीत असत. त्यांच्या प्रयत्नांचा त्रोटक इतिहास, ज्यांनीं जीवित तृणवत् मानून, प्रस्तुत शुद्धिकार्यांत आश्रमी-यांच्या खांद्याला खांदा लावून आपल्या सर्वस्वासह उडी घेतली त्या श्रीयुत रामचंद्र नारायण लवंदे यांच्या शब्दांत वाचकांस सादर करणें अप्रस्तुत होणार नाहीं. श्री. रामभाऊ लवंदे लिहितात, "अंदाजें ८—१० वर्षांमागें मी वसंत पूजनोत्सवास आमची ग्रामदेवी श्रीभगवती चिवलकरीण इच्या देवळांत माशेल येथें गेलों होतों. तेथें मला कांहीं चिंबल येथील आलेले खिस्ती गावडे दिसले. विचारपूस करतां ते मूळचे हिंदु असून बायवायीच्या त्या भयंकर सत्रांत त्यांच्या पूर्वजांना बाप्तिस्मा दिल्याचें सांगितलें. इतक्या पिढ्यांनंतरहि त्यांचे आचारविचार हिंदूंचेच असल्याचें ऐकून मला आनंद झाला. नुकतीच मुंबईमध्यें हिंदु मिशनरी स्थापन करून कै. गजाननराव वैद्यांनीं कार्य चालू केलें होतें, त्यांच्याकडे जाऊन त्यांत हें वृत्त कळवावें आणि जमल्यास पहावें असा निश्चय केला. मग माहिती गोळा करण्याकरितां आमच्या घराशेजारच्या चिंबलगांवीं गावड्यांच्या वाड्यावर जाऊन त्या गावड्यांचे पुढारी पारकु, बेरास व आलेस या तिघांना भेटलों व त्यांच्या रीतिभाती समजावून घेतल्या. नंतर सवड काढून श्री दिगंबर दास (विठ्ठल कामत चंदगडकर) यांचें पत्र घेऊन मुंबईस गेलों आणि वैद्यांना भेटून सर्व हकीगत निवेदन केली. त्यांना आनंद होऊन त्यांनीं माझें व्याख्यान त्यांच्या गणेश आश्रमांत ठरविलें. गोमांतकांतील कांहीं मंडळी या व्याख्यानास हजर होती. मला त्यांचीं नांवें माहीत नसल्यामुळें

लिहितां येत नाहींत. व्याख्यान झाल्यावर मी श्री. वैद्यांचा निरोप घेऊन घरीं आलों. श्री. वैद्यांनीं खर्चाचा वगैरे विचार करून आणि 'आपण संधि साधून श्री. गोपाळ महादेव चिपळूणकर यांस बरोबर घेऊन गोव्यास येऊं,' असें सांगितलें. पुढें पत्रव्यवहार केला, पण पत्ता नाहीं ! त्यामुळें कार्य तसेंच राहिलें तरी पण मी आमचे मित्र डॉ. त्रिविक्रम येळेकर, रायचंदर, श्री. विष्णु कामत आजेरकर म्हापसें, यांच्याबरोबर पुन्हां पुन्हां जागृती करीत रहात असें. पुढें एकदां मी, येळेकर व डॉ. हेगडे देसाई चिवलला जाऊन गावडयांच्या अडीअडचणी लक्ष्यांत घेतल्या. तदनंतर मी श्री. दिगंबर दास यांच्या मार्फत डॉ. कुर्तकोटी यांचेकडे बोलणें केलें. त्यांनीं आश्वासन देऊन लोकमत तयार करण्यांस मला सांगितलें. त्यानंतर आमचे स्वामी श्रीमत् इंदिराकांत यांच्याशीं हा प्रश्न काढला, पण त्यावेळीं त्यांनीं होकार दिला नाहीं. तदनंतर आम्हीं कांग्रेसच्या वेळीं बेळगांवीं हुतात्मे धर्मवीर स्वामी श्रद्धानंदांची गांठ घेतली. त्यांनीं प्रस्तुत प्रश्न लवकरच हातांत घेऊं असें आश्वासन दिलें. परंतु पुढें दुर्दैवानें तेहि श्री. वैद्यांप्रमाणें दिवंगत झाले. यापुढें आम्हीं गावडयांशीं अधिक संबंध आणावयाचें ठरविलें. या कामीं डॉ. येळेकर यांचे मला फार साह्य झालें. याप्रमाणें मधून मधून कांहीं तरी करीत आम्हीं राहिलों, पण इष्टकार्यमार्ग अशा कांहीं तरी करण्यानें सिद्धीस जाणें शक्य होणार नाहीं, असें आम्हांस खचित वाटूं लागलें. आमच्या कार्याची दिशा कोठें तरी चुकत आहे म्हणूनच गाडी रुळावर येत नाहीं, हे आम्हांला आतां उघड समजलें व कार्य आटोक्याबाहेरचें आहे या जाणिवेनें आम्हीं निराश होऊन बसलों.''

× × × × ×

वरील सर्व विवेचनावरून हें स्पष्ट दिसून येईल कीं, गोमांतकांतील भ्रष्टीकृत जनांचें शुद्धीकरण व्हावें असें कांहीं व्यक्तींस वाटत होतें. पण ही सदिच्छा कशा पद्धतीनें प्रत्यक्ष व्यवहारांत आणावयाची हाच मोठा प्रश्न होता. विजेंत किंवा वाफेंत कांहीं तरी अत्यद्भुत शक्ति असावी अशी कल्पना पुष्कळांस होती; पण ती कार्यक्षम करणारा किंवा प्रत्यक्ष व्यवहारांत उतरविणारा योग्य कल्पक पुरुष उदित झाला नव्हता. तो तसा बुद्धिमान् पुण्यात्मा जन्मास येतांच जशी वीज किंवा वाफ प्रत्यक्ष व्यवहारांत अवतरली, तद्वतच प्रस्तुत गोमांतकाचा अवघड प्रश्नहि आपल्या विशाल बुद्धिमत्तेनें व अलौकिक चातुर्यानें सोडवून तो प्रत्यक्ष यशःसिद्धतेस नेणारा एक पुण्यप्रतापी श्रेष्ठ पुरुष धर्मभास्कर श्रीविनायक महाराज मसूरकर यांच्या स्वरूपांत गावडे लोकास त्यांच्या महद्भाग्यानें कसा लाभला हें पुढील प्रकरणांतून पहावयाचें आहे.





# गोमांतक शुद्धीचा

# इतिहास.

(उत्तरार्ध.)





श्री शांतादुर्गा मंदिर, कवळें-गोवा.

# प्रकरण १ लें.

# परिस्थिति—निरीक्षण.

सृष्टीमध्यें बहु लोक । परिभ्रमणें कळे कौतुक ।
नाना प्रकारींचे विवेक । आडळों लागती ॥ ( श्री समर्थ. )

माही शिवरात्रीचा दिवस हिंदुमात्राला अत्यंत पवित्र व संस्मरणीय असा वाटतो. कारण, हा दिवस म्हणजे सर्व देवांचा देव जो श्रीशंकर त्याच्या मंगलमहोत्सवाचा असतो. जन्मदुःखें हीं ोकाच्या पाठीमागें निरंतरचीं लागलेलींच असतात; परंतु मन या नित्याच्या व्यवसायांतून काढून अल्प-ल जरी ईश्वराभिमुख केलें तरी त्या दुःखकष्टांचा परिहार होऊं शकतो, अशी श्रेष्ठ सज्जनांची स्वानुभूति हे. साहजिकच दुःखमय संसारयात्रा थोडीतरी सुखावह व्हावी व प्रत्यहींच्या प्रापंचिक गोष्टींनीं उद्विग्न लेल्या मनाला शांति व समाधान मिळावें ह्या हेतूनें सर्वजण मोठ्या आनंदोत्साहानें या धार्मिक महोत्सवां-त भाग घेतात. या शिवरात्रीच्या दिवशींहि जेथें यथाशक्ति भक्तिपूत अंतःकरणानें शिवपूजन होत हीं, असें एकहि हिंदूचें घर आढळून यावयाचें नाहीं. हा पुण्योत्सव गांवोगांव व घरोघर साजरा ण्यांत येतो. त्यांतल्यात्यांतहि जीं शिवाचीं स्थानें महत्त्वाचीं गणलीं गेलीं आहेत, तेथें तर शिव-त्रीचा हा महोत्सव फारच मोठ्या प्रमाणांत साजरा करण्यांत येतो. कारवार जिल्ह्यांतील 'गोकर्ण' थें असेंच एक शिवाचें स्वयंभू स्थान आहे. गणाधिराज गणपतीनें ह्या स्थानींच रावणाच्या शक्तीचा े मोठ्या युक्तीनें जिरविला, अशी आख्यायिका आहे. उत्तरेकडील लोक काशीस जितकें महत्त्व ात, तितकेंच महत्त्व महाराष्ट्र कर्नाटक आदिक दक्षिणेकडील भागांतील लोक गोकर्णाला देतात. ाहजिकच अशा ह्या पुण्यपावन क्षेत्रीं माघी शिवरात्रीच्या महोत्सवाला हजारों मैलांवरून लोक धांव ांवून जावे त्यांत नवल तें काय ?

अशाच एका माघी शिवरात्रीला गोकर्णास जाण्याचा बेत श्री. विनायक महाराज मसूरकर यांनीं १९२२ सालीं केला. नित्यनूतन हिंडून उदंड तीर्थाटन करावें असा त्यांचा नित्याचा दंडक असे. तीर्था-नांत जगदुद्धारक भक्तवत्सल परमेश्वराचें अपरंपार ऐश्वर्य अनेकविध स्वरूपांत प्रत्ययास येतें. वासांत सृष्टीचें धीरगंभीर व अफाट स्वरूप पाहून मानव जातीची क्षुद्रता मनाला पटते व 'या एकंदर चंड सृष्टीचा हेतु तरी काय असावा, हा ओघ कोठून निर्माण झाला, कोठें जाणार' त्यादि स्वरूपाची प्रश्नमालिका साहजिकच अंतरंगांत उभी राहते व इंद्रियांचे चोचले पुरविण्याकरितां किंवा ग्राम्य-विषयसुखोपभोगाकरितांच हें आयुष्य आपणांस प्राप्त झालें नसून तें कांहीं री महत्तम हेतूच्या—कर्तव्याच्या परिपूर्तीसाठीं आहे, ह्याची स्पष्ट जाणीव उद्भूत होते. कर्मधर्मसंयोगानें

वाटेंत मोठमोठ्या अधिकारी पुरुषांच्या व साधुसंतांच्या गांठी भेटी होऊन स्वतःच्या ज्ञानाचा कचे पणा व अपुरेपणा समजून येतो व त्यामुळें कूपमंडूकदृष्टि निवळून व ताठा सोडून देऊन 'प्रणिपात, परिप्र व सेवा' ह्यांनीं समन्वित अशा मार्गानें शिष्टांपासून ज्ञान ग्रहण करण्याची बुद्धि उदित होते. तद प्रवासांत सर्व गोष्टी प्रत्यक्ष दृष्टीखालून जात असल्याकारणानें लोकपरिस्थितीचें ज्ञान होऊन, जग कोण भूमिकेवर आहे, त्याची गति कोणीकडे चालली आहे, आपल्या समाजाला ह्या तीव्र जीवनार्थ झगड स्वत्व सांभाळून जगाच्या पुढें निदान जगाच्या बरोबर तरी कसें जातां येईल, इत्यादि गोष्टींची विचा मनांतल्या मनांत सुरु होते. हिंदुस्थानांतील तीर्थक्षेत्रांची मांडणीहि अशी कांहीं मजेदार आहे तीर्थयात्रा करणाराला समस्त भारतवर्ष पायांतळीं घालावयास मिळतें. साहजिकच यात्रेकरूला त्या परिभ्रमणांत ह्या पुण्यभूमींतील नानाविध कौतुकें दृष्टिगोचर होतात व परमेश्वराची सेवा यथायुक्त ण्याची त्याला नवदृष्टि व नवचेतना प्राप्त होते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ह्या नित्याच्या पर णांत श्रीसमर्थांनीं म्हटल्याप्रमाणें 'नानाप्रकारींचे विवेक' आढळून येऊन मनुष्याला चतुरत्व होतं म्हणूनच वंदनीय पूर्वजांनीं 'पायीं तीर्थयात्रा घडो' असें एक सुंदर मागणें देवाजवळ मागितलेलें पूर्वजांच्या ह्या पूर्वापार क्रमाला अनुसरूनच श्रीमन्महाराजहि आपल्या एका शिष्योत्तमासह गोकर्ण यात्रेस निघाले. गोकर्णास जाण्याचा मार्ग त्यांनीं गोमांतकांतून हेतुपुरःसर आंखला होता. त्या लोंढामार्गानें गुरुशिष्यांनीं गोमांतकांत प्रवेश केला.

गोमांतकांतील निसर्गरमणीयता सर्वांनाच श्रुतिगोचर आहे. तथापि तिचें तें नयनमनोह प्रत्यक्ष दृष्टीस पडल्यानंतर कोणाहि व्यक्तीला कल्पनातीत आनंद झाल्याविना रहात नाहीं. ठाईं दृष्टिगोचर होणारा विस्तीर्ण व घनगंभीर समुद्र, त्या समुद्राच्या सपाटीपासून तों थेट आकाशाला भिडणारीं तीं भरगच्च वनराजींनीं विभूषविलेलीं व मेघाच्छादित राहणारीं उत्तुंग गिरिशिखरें, त्या वरून अतिवेगानें आसमंतांतील दऱ्याखोऱ्यांत प्रचंड निनाद उठवीत उड्या टाकीत जाणारे ते धबधबे धबधब्यापासून उगम पावून आपल्या कांठीं वसलेल्या अनेक लहान मोठ्या सुंदर व टुमदार न नगरांतील रहिवाशांचे पापताप शांत करीत आनंदानें गमन करणाऱ्या त्या नद्या, त्या नद्यांच्या जी सर्वत्र गजबजून राहिलेलीं अफाट व अपरंपार पिकें, त्या पिकांनीं आपला देह आंथरून प्र चित्तरंजनार्थ सर्वत्र सिद्ध करून ठेविलेले हिरवेगार गालिचे, या निसर्गरमणीय गालिचांच्या बिछा कांठीं कांठीं मध्येंच डोकें वर काढून अतिथीला साखरपाणी देण्याकरितां उत्सुकतेनें निमंत्रण करण नारळांचीं झाडें, त्यांच्या सान्निध्यांत स्वतः जवळचें मधूर व गोड असणारें अमृत अतिथिदेवाला त्याला आकंठ तृप्त करण्याकरितां विनम्र शिरांनीं उभे असलेले आम्रादि वृक्षवृंद—अशा एक ना हजारों गोष्टींनीं गोमांतकाचा ह्या नयनमनोहारी देखावा कोणाहि–भावनाशून्य माणसाला देखी रोमांचित व सद्गदित केल्याविना रहात नाहीं. मग ज्यांची दृष्टि अशा सामान्य जनांपेक्षां कितीतरी विस्तारलेली असून, परमेश्वराचें विश्वस्वरूप अवलोकन करण्याचाच ज्यांचा नित्य अभ्यास आहे, अवस्था हें दृश्य पाहून काय होत असेल ह्याची कल्पना वाचकांनींच करावी.

परंतु जगताचें स्वरूप वरील सारखेंच सदैव सुंदर, नयनमनोहारि किंवा आनंदपूर्ण भा होत राहिलें असतें तर मग हा मृत्युलोक इंद्राचें नंदनवनच आहे, असें म्हणावें

'नित्यमेव सुखं स्वर्गे' हा अनुभव येथें मृत्युलोकांत कोणाला व कसा यावा ? या भूलोकावर सुख व दुःख यांची सांगड या जोडी फोडतां यावयाची नाहीं. सुखाचें मूळ दुःखांत व दुःखाचें मूळ सुखांत गोंवलेलें असावें अशीच सृष्टिविधात्याची योजना आहे. जन्माबरोबरच मृत्यूचें बीजहि मनुष्य घेऊन येतो किंवा रक्त प्रणयाला मृत्यु येऊन त्याच्या देहाचें पृथक्करण होण्याचा अमंगल प्रसंग हा दुसऱ्या प्रकारा प्राण्याच्या जन्माचा सुमुहूर्त असतो. जग हें असें सुखदुःखात्मक आहे आणि ह्याचा अनुभव आमच्या प्रवासी द्यायालाहि लवकरच आला. वरील प्रकारचें अनुपम सृष्टिसौंदर्य पाहून हर्षनिर्भरतेनें परमेश्वराला धन्यवाद देतदेत आमचे प्रवासीजन मडगांवपर्यंत येऊन पोहोंचले. मडगांवलाच पूर्वी मठग्राम म्हणत व तें प्राचीन काळीं परशुरामाची राजधानी होतें. एवढेंच नव्हे तर विजयनगराच्या अमदानींत व नंतरहि हें शहर वैभवोत्कर्षाच्या शिखरीं विलसत होतें; परंतु पोर्तुगीजांच्या मक्षस्थानीं पडल्यापासून इतर ठिकाणा-प्रमाणेंच येथील हिंदूंचें महत्त्वर्य ओढवलें व त्यांची सर्वतोपरि धाताहात झाली. जेथें पूर्वी ७१८ शें देवमंदिरें होतीं, असें सांगतात, तेथें विद्यमान परिस्थितींत फक्त एकच मोठें मंदिर उभें असलेलें दिसतें व तेंहि १९१४ सालीं बांधण्यांत आलेलें ! बाकीचीं जाळून, पोळून व लुटून उध्वस्त करण्यांत आलीं, तर कित्येक तशींच्या तशींच क्रॉस चढवून चर्चमध्यें रुपांतरित करण्यांत आलीं. मडगांव येथील राममंदिराचें किंवा जुन्या गोव्यांतील श्रीशिवमंदिराचें बनविण्यांत आलेलें ख्रिस्तमंदिर वरील गोष्टीला साक्षीभूत आहेत. ख्रिस्तमंदिराचें येथील अपरंपार वैभव हिंदुस्थानांत अन्यत्र क्वचित्च पहावयास सांपडेल. प्रस्तुतच्या पडिक अवस्थेंतहि येथील अनेक ख्रिस्तीमठ व मंदिरें, त्यांनीं पूर्वी उपभो-गिलेल्या ऐश्वर्याची साक्ष देऊं शकतात. गोव्यांतील ख्रिस्ती मंदिराचें भव्य, विशाल आणि वैभवसंपन्न स्वरूप पाहून पाहाणाराचें मन क्षणभर आनंदाश्चर्यानें स्तिमित होतें; पण हा पहिला भर ओसरून मनुष्य जरा पुढें जाऊन विचार करूं लागतो तोंच त्याच्या अंतश्चक्षूंसमोर रोमांचकारी गतेतिहास मूर्तिमंतपणें उभा रहातो. त्या उत्तुंग आणि नयनमनोहारी ख्रिस्ती मंदिरांच्या स्वरूपांत अमानुष हिंदुधर्मच्छलाची करुणकहाणी त्याला आठवते. ख्रिस्ती धर्मसमीक्षण सभेकडून गांजलेल्या त्या असंख्य निरपराधी लोकांच्या किंकाळ्या, कैक स्त्रियांच्या पातिव्रत्याची केली गेलेली धुळधाण, त्यांच्या अर्भकांचा अमानुषपणें केलेला वध, घनघोर बाटवाबाटवी, देशत्याग इत्यादि रोमांचकारी गोष्टी हृदयांत एकदम कालवाकालव करून सोडतात व पहिली मानंदाश्चर्याची वृत्ति नष्ट होऊन तेथें उद्वेग चीड, संताप व अनिवार क्रोध उद्भुत होतो. सर्व जगताच्या पाप प्रक्षालनार्थ आत्मबलिदान करणाऱ्या त्या ख्रिस्ताच्या अनुयायांचे हिंस्र पशूलाहि लाजविणारे चाळे प्रेक्षकांच्या अंतःकरणाच्या चिंधड्या उडवून देतात. जिकडेतिकडे स्थापन करण्यांत आलेलीं हीं ख्रिस्तमंदिरें किंवा प्रत्येक लहान मोठ्या कोना-कोपऱ्यांत हेतुपुरःसर * उभे करण्यांत आलेले क्रॉस शांतिब्रह्म ख्रिस्ताच्या अनुयायांचा रक्तलांच्छित दिग्विजय सूचित करून मनाचा मडका करतातच; परंतु ह्या चुना विटांच्या निर्जीव देवळांपेक्षांहि जीं जिवंत बोलतीं चालतीं देवळें, स्वधर्मसंस्कृतीपासून हिसडून नेलेल्या हजारों

* It was the deliberate policy of the portuguese to plant a cross where they proceeded.

Guide to Goa.

ऱ्यावां लोकांच्या स्वरूपांत इकडेतिकडे वावरत असतात, त्यांना पाहून मात्र कोणाहि जातिवंत हिंदूच्या तळपायांची आग मस्तकास गेल्याविना रहात नाहीं. खिस्ती भाषा, खिस्ती पोषाख, खिस्ती आचार खिस्ती विचार अशा सर्व अंगांनीं खिस्ताळून गेलेले ते आपलेच धर्मबांधव पाहून कोणत्या स्वाभिमानी पुरुषाचें चित्त ठिकाणावर राहील ? खिस्ती मंदिरांतून प्रार्थना करून आल्यानंतर त्यांचा घोळका जेव्हां बाहेरच्या बाजूस दारूसाठीं व मांस खेदीसाठीं इतस्ततः भटकूं लागतो; त्यांतल्या त्यांतहि ज्या हिंदु युवतीला तिचें निस्सीम सचारित्र्य व अनुपमेय विनयशीलता ह्यामुळें अखिल जगांत अग्रपूजेचा मान मिळालेला आहे, तीच हिंदु युवती आता खिस्ती झाल्यामुळें मनसोक्त पद्धतीनें समाजांत उघड उघड मदिराप्राशन करून व चिरूट ओढून नाचरंग करीत फिरतांना जेव्हां दिसून येते, तेव्हां कोणत्या हिंदुधर्म-प्रेमी माणसाच्या अंतःकरणाचें पाणी होणार नाहीं ? आज हे बुटासुटांत वावरणारे खिस्ताळलेले ' किरिस्तांव ' साहेब, किंवा त्यांच्या मोठमोठे फॅशनेबल झगे घालून स्वच्छंदपणें वावरणाऱ्या साहेबीणी हे आपलेच पूर्वीचे धर्मबांधव आहेत, नव्हे त्यांच्यांतील कित्येक लोकांचा संबंध प्रत्यक्ष आपल्या कुलाशींहि असूं शकेल, ह्या विचारानें कोणा हिंदूचें मन शतधा विदीर्ण होणार नाहीं ! हिंदुदेवमंदिरें व पवित्रस्थानें वरीलप्रमाणें खिस्ती मंदिरांत व मठांत रूपांतरित झालेलीं, त्याच हिंदुधर्माचे पूर्वीचे अनुयायी ग्राम्य विषयोपभोगांच्या पाठीमागें लागून उच्च आचारविचारांपासून वंचित केलेले; भाषा, पोषाख, रीतिरिवाज, आचार, व्यवहार, ह्यांवर खिस्तीपणाचा पगडा बसलेला ह्याप्रमाणें जिकडेतिकडे सर्व वातावरण अगदीं खिस्ताळून गेलेलें असें हें भयानक दृश्य पाहून विचारवंत हिंदूला, भगवान् परशुरामाची पुण्यभूमि ही हीच कीं काय, असा संभ्रम उत्पन्न झाल्यास त्यांत आश्चर्य तें काय ! गोमांतकाच्या ह्या खिस्तमय अवस्थेचें श्री. 'अरुणोदय' कविवर्यांनीं केलेलें वर्णन, या मनःस्थितींत अंतःकरणाला तेव्हांच पटतें. ते ह्मणतातः—

[ चालः—उद्धवा शांतवन कर जा...... ]

लोटले वर्ष शतचार । हा मुलुख सकल हिंदूंचा ।
गजबजे कृष्णभक्तांनीं । मुळिं नसे वास खिस्त्याचा ।
मुसलमान भाई आले । रुतला न पाय परि त्याचा ।
तों भकलें नशीब उजाड ।
खिस्त्यांची आली धाड ।
जाहला प्रदेश उजेड ।
पाद्र्यांचा गिधाडकाला । मानवा पार ना त्याला ॥ १ ॥
खिस्ताच्या सुयशासाठीं । चालियली दाटावाटी ।
घेतली स्त्रियांची अब्रू । लुटियली सर्व संपत्ती ।
फोडिले देवदेव्हारे । सिंचिले गाईच्या रक्तीं ।



सॅंट फ्रांसिसचें लहान प्रार्थना मंदिर (जुनें गोंवें).



ख्रिस्ती मठांत रूपांतरित केलें गेलेलें जुनें गोंवें येथील हें प्राचीन शिवमंदिर आहे. दैवी चमत्कारामुळें त्या मंदिरावर ख्रिस्ताचा क्रॉस चढूंच शकत नाहीं असा सर्व लोकांना अनुभव आलेला आहे !

जे चर्च आज दिसतात ।
पूर्वींची देवळें होत ।
स्थापिला त्यांत गुरु खिस्त ।
हां ! पुन्हां ऐक या बोला । मोठाच खरा हा घाला ॥ २ ॥ इ. इ.

गोमांतकाच्या परिस्थितीचें ज्ञान यथार्थत्वानें करून देणारें हें कवीचें शब्दचित्र कोणाचें अंतःकरण भेदून टाकणार नाहीं ?

गोमांतकांतील वरील सर्व हृदयभेदक परिस्थिति गुरुशिष्यांनीं दुःखित मनानें निरीक्षण केली· सामान्य माणसाचेंहि चित्त जर वरीलसारख्या दृश्यानें क्षोभायमान होतें, तर आमच्या ह्या धर्मकार्यार्थच प्राणसर्वस्व वेंचणाऱ्या तेजस्वी व्यक्तींच्या मनाचा भडका कसा उडून गेला असेल, त्यांच्या चित्तांत चीड–संताप–उद्वेग यांनीं कसें काहूर उसळून दिलें असेल, ह्याची कल्पना कोणालाहि करतां येण्यासारखी आहे; परंतु झाल्या किंवा होत असलेल्या गोष्टींविषयीं नुसता कोरडा शोक करून काय उपयोग ? हिंदुसमाजाचें आश्चर्य संपविण्याला केवळ शोकच उपयोगी पडणारा नाहीं. तसे अमित दुःखाश्रु आजपर्यंत अनेक लोक ढाळीत आलेलेच आहेत. जें दुःख सार्वजनिक स्वरूपाचें झालेलें आहे त्याचा केवळ शोक करून कार्यभाग कसा उरकेल ? म्हणून त्यासाठीं रडत किंवा व्यर्थ ओरडत न बसतां त्याच्या प्रतिकारार्थ आपल्याला जो उपाय सुचेल त्याची योजना, जन्मदारभ्य लोककल्याणाचें व लोकसेवेचें पवित्र यशकंकण ज्यांनीं हातीं बांधलें आहे, त्या ज्ञानी पुरुषांनीं प्रथम केली पाहिजे—

न जानपदिकं दुःखमेकः शोचितुमर्हति ।
अशोचन्प्रतिकुर्वीत यदि पश्येदुपक्रमम् ॥

अशी थोर सज्जनांच्या जगन्मान्य दंडकाप्रमाणेंच आमच्या प्रवासी जनांनींहि प्रस्तुतप्रसंगीं विचारणा केली व ते आपला पुढील मार्ग आक्रमिते झाले. गोमांतकांतील परिस्थितीचें सूक्ष्मपणें निरीक्षण करीत करीत त्यांनीं कांहीं दिवस प्रवास केला. ह्याप्रमाणें त्यांचा क्रम चालला आहे तोंच गोकर्ण येथील शिवरात्रि–महोत्सव अगदीं समीप आल्याकारणानें, प्रवासक्रियाला तांतडी करणें भाग पडलें. तेव्हां महोत्सव संपवून पुनश्च गोमांतकांत यावयाचें आणि तेंहि गोकर्णापासून गोमांतक व तेथून थेट मलूरपर्यंत पायींच प्रवास करीत जावयाचें, असा त्यांनीं विचार केला व मूरगांवावरून बोटीनें गोकर्णाकडे ते निघून गेले. ह्या त्यांच्या गोमांतकांतील वास्तव्यांत मडगांव येथील श्री. नागेशराव [illegible]डेकर, प्रो. त्र्यंकटराव नाईक, मूरगांवचे श्री. पंडित इत्यादि गृहस्थांचा विशेषपणें परिचय झाला व यांनीं श्रीमन्महाराजांना अत्यंत प्रेमादरपूर्वक वागविलें.

गोकर्णाला भक्तजनांची अपरंपार गर्दी लोटली होती. महोत्सव मोठ्या थाटानें चालला होता. यथाशक्ति, यथामति शिवपूजा करण्यांत प्रत्येकजण दंग झाला होता. वस्तुतः एक म्हातारा नंदी, एक मोडकेंसें खाटलें, एक जुना परशु व व्याघ्रचर्म हेंच प्रापंचिक ऐश्वर्य असलेला शंकर स्मशानक्रीडा पिशाचभूतादिकांचा सहवास, गळ्यांत रुंडमाळा, भयंकर नागाचें परिवेष्टन, अंगाला चिताभस्माची उटी व हातांत नृकरोटी अशा अमंगळ स्वरूपांत जरी नटलेला दिसत असला, तरी

त्रैलोक्याच्या मंगलार्थच त्यानें तामसिक स्वरूप घेतलें आहे, अशी हिंदुमात्राची श्रद्धा आहे. सत्व, रज व तम ह्या तीन गुणांवरच जगताचे व्यवहार अधिष्ठित असतात. केवळ सात्विक व राजस वृत्तींच्या परिपोषानें जागतिक व्यवहार यथायोग्य पद्धतीनें चालणार नाहींत. मानवी समाजाला तमोगुणाच्या विकासाचीहि अत्यंत आवश्यकता असते. श्रीमत् स्वामी रामतीर्थांनीं म्हटल्याप्रमाणें ' तमोगुण हा दगडी कोळसा आहे. या तमोगुणाच्या साह्याविना रजोगुणरूपी अग्नि आणि बाष्प तसेंच सत्त्वगुणरूपी दिव्य प्रकाश उत्पन्न होणार नाहीं. ज्या मानानें दगडी कोळशाचा पुरवठा कमी अधिक असेल, त्यामानानें अग्नि आणि प्रकाश कमी अधिक उत्पन्न होऊं शकतील. ' व अर्वाचीन शास्त्रज्ञांन्यानींहि हें सिद्ध केलेंच आहे कीं, तमोगुणाविना मनुष्यांत तेज, साहस, मर्दुमकी, बाणेदारपणा, करारीपणा इत्यादि मानवी जीविताला यशस्वी करणारे आवश्यक गुण उत्पन्न होऊं शकत नाहींत. तमोगुणाचें हें महत्त्व जाणूनच आर्यलोकांनीं महादेवाला तमोगुणाची अधिष्ठात्री देवता मानिलें आहे. जेव्हां शौर्याच्या, वीर्याच्या किंवा पराक्रमाच्या गोष्टी करावयाच्या असतात तेव्हां ' हरहर महादेव ' म्हणून जयघोष करण्याच्या प्रघाताचा उगम ह्याच कल्पनेंत आहे. अलौकिक पराक्रमाचे वीर पुरुष श्री-शिवदेवताच उत्पन्न करूं शकते, हें जाणून तत्सिद्ध्यर्थ वेदांत स्थळोस्थळीं तशा प्रार्थना केलेल्या आढळून येतात. ऋग्वेदांत अशीच एक सुंदर प्रार्थना केलेली आहे कीं, " जो प्रत्यक्ष पराक्रमरूपच आहे, जो जटाभारांनीं मंडित आहे आणि ज्याचा आश्रय अखिल वीरपुरुष करीत असतात, त्या दैदीप्यमान जटाधारी व त्वेषयुक्त रूप धारण करणाऱ्या शंकरास वंदन करून आम्ही येथें पाचारण करीत आहों तो आपल्या हातांत आवश्यक वाटणारीं औषधें धारण करून आम्हांस सौख्य, सुरक्षितपणा, अभय यांचा लाभ करून देवो. हे वीर पुरुषांस आश्रयभूत झालेल्या देवा, तुझ्याजवळील उत्कृष्ट वैभव देवढें आम्हांकरितां असूं दे. तूं आम्हांस सौख्य दे व आमचा कैवारी हो. तूं द्विगुणित सामर्थ्यवान् असल्यामुळें आम्हांस सुरक्षित ठेव. " ( ऋ. मं. १ )

साहजिकच समाजांत वीरपुरुष निर्माण होऊन, तो बलवीर्यशाली बनावा एतदर्थ ह्या त्रैलोक्येश्वराची उपासना सामुदायिक पद्धतीनें होण्यासाठींच प्रस्तुत सारखा महोत्सव पूर्वजांनीं प्रचलित केलेला आहे. व्यक्तिशः उपासनेपेक्षां सर्व समाजांत धार्मिक बुद्धि जागृत रहावी, ह्याच वरील सारख्या उत्सवांत खास दिक मूलभूत हेतु असतो; पण ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष्य झालें किंवा करविलें गेलें म्हणजे नुसती तांत्रिक पद्धतीची शिवपूजा समाजाला तारक कशी होणार?

गोकर्ण येथील शिवरात्रमहोत्सव यथाक्रमानें पार पडला व आमचे प्रवासतिजन पददलित अवमानित व नतद्रष्ट झालेल्या हिंदुसमाजाला बलवीर्यशाली बनविण्यासाठीं ' महाबळेश्वरा 'ची प्रार्थना करून, कृतसंकल्पाप्रमाणें पायीं प्रवास करीत परत गोमांतकाकडे येण्यास निघाले. आपलें आन्हिक कर्म उरकून सकाळीं प्रवासास प्रारंभ करावा; माध्यान्हींच्या सुमारास कोठच्या तरी गांवांत राहून तेथें मधुकरी अथवा कोरडी भिक्षा मागावी. गांवाच्या मानानें २।४ दिवस तेथें वस्ती करून प्रवचनादिक कार्यक्रमानें लोकांत धर्मप्रेमाचा वह्नि चेतवावा आणि समस्तांचें प्रेम संपादन करून पुढील गांवीं जावें. अशाक्रमानें अंकोला, कारवार, सदाशिवगड इत्यादि स्थळीं मुक्काम करीत करीत गुरुशिष्यांनीं पुनरपि गोमांतकांत प्रवेश केला.

वाटेंत सदाशिवगड येथील वैश्यजातीचे व्यापारी श्री. व्यंकटेशराव कुर्डेकर ह्यांनीं आपला एकुलता एक मुलगा, पूर्वकालीन पद्धतीला अनुसरून द्वादश वर्षांच्या अभ्यासक्रमासाठीं आश्रमांत समाविष्ट केला होता. तद्वतच त्या मार्गांतील आणखीहि कांहीं ३।४ मुलें ह्यावेळींच आश्रमांत आलीं होतीं. अर्थात्‌च आतां आमच्या या प्रवासी मंडळीचा परिवार पहिल्यापेक्षां बराच वाढलेला होता. आतां मागच्या प्रमाणें पुढें जाण्याची ओढ नसल्यामुळें मंडळी शांतपणें खेडयापाडयांतून प्रवास करीत करीत चालली होती. वाटेंत काणकोण, मडगांव, पणजी इत्यादि स्थळीं यथानिर्दिष्ट पद्धतीनें कार्यक्रम झाले. पणजीहून आश्रमीय जन श्रीमांगिरीश व श्रीशांतादुर्गा ह्या सुप्रसिद्ध देवस्थानांच्या दर्शनार्थ गेले. वाटेंत पोर्तुगीजांनीं केलेल्या हिंदूंच्या अमानुष छळाची साक्ष देत शेंकडों वर्षे उभ्या असलेल्या खिस्ती मंदिरांच्या व मठांच्या प्रचंड इमारती नूतन मुलांस दाखविण्यांत आल्या.

तदनंतर मंडळी पुढील मार्गास लागली. रस्त्यावरून प्रवास करतां करतां साहजिकच श्रीमन्‌महाराज शिष्यांना नानाविध विषयांवर वाद–विवाद संवादानें शिक्षण देत. कारण आश्रमीय विद्यापीठ हें सदैव ' प्रवासी ' च असल्याकारणानें त्यांतील अभ्यासाचे पाठ पण फिरतां फिरतां, चालतां चालतांच दिले जात, हें उघड आहे. पण एकाद्या खोलींत कोंडून घेऊन तेथें गिरविलेल्या धडयापेक्षां बाहेर सृष्टि देवतेशीं तादात्म्य पावून व जिवंत वस्तुपाठ डोळ्यांसमोर ठेवून घेतलेले धडे, मनोबुद्धीवर किती उत्कृष्ठ ठसा उमटवीत असतील, हें निराळें सांगावयास पाहिजे असें नाहीं. अशाच स्वरूपाचा एक मनोरम विषय श्रीमन्महाराज मुलांस समजाऊन देत होते. तो त्या वेळच्या संवादांतील विषय मोठा उद्बोधक असा असल्यामुळें येथें दिला जात आहे.

महाराजः— काय पाहिलेंस का खिस्ती धर्माचें वैभव?

शिष्यः— हो, पाहिलें तर! परकीयांनीं हा प्रांत इतका सर्वस्वी ग्रासून टाकिला आहे कीं, तो पूर्वी हिंदूंचाच असेल अशी कल्पनाहि करण्याला कठीण जातें. हे लोक भाग्यवान् आहेत ही गोष्ट खोटी नाहीं; पण आम्हीं हिंदु लोक असे दिवाळखोर कसे बनलों !

महा०:— " हिरेव झाडा पाहीना तो दिवाळखोर " असें श्रीसमर्थांनीं म्हटलेलें तुला आठवत नाहीं काय ! सृष्टीचे कायदे अभेद्य असतात. तेथें कोणालाहि क्षमा नाहीं. सृष्टिनिबंधानुसार जे वागतील त्यांनाच भाग्यश्री उपभोगावयास लाभणार !

शिष्यः— मग हिंदुलोकांपेक्षां परधर्मीय लोकांची संस्कृति इतक्या कनिष्ठ पायरीची धडधडीत दिसत असतांनासुद्धां ते सृष्टिनियमानुसार वागतात, असें म्हणावयाचें कीं काय ? ज्यांची नीतिमत्ता म्हणजे दुसऱ्यांना लुबाडून स्वतःचा तळीराम गार करावयाचा अशी आहे, त्यांना कोणत्या सृष्टिक्रमाप्रमाणें वैभवसंपन्नता प्राप्त व्हावी ? ज्या पाद्रीशाहीचा हा प्रांतांतील अनन्वित अत्याचारांचा इतिहास प्रस्तुत कालींहि अंगाचा थरकांप करून सोडतो, त्या पाद्री लोकांना जगद्वंद्य हिंदुधर्मीयांवर कोणत्या सृष्टिक्रमानें विजय मिळावा ?

महा०:— तूं वैयक्तिक नीतिमत्तेच्या दृष्टीनें म्हणत असशील तर हिंदु मनुष्य परधर्मीयापेक्षां वरचढ असेल, नाहीं असें नाहीं; पण व्यक्तिगत पुण्य व सामाजिक पुण्य ह्यांत अंतर आहे कीं नाहीं ?

शि०:— अर्थातच आहे. वैयक्तिक पुण्यापेक्षां सामाजिक पुण्य अधिकच असणार.

महा०:— तर मग सामाजिक पुण्याईचा अंश ज्यांच्याजवळ अधिक त्यांच्याकडे सामाजिक वर्चस्व वैभवादिक आपण होऊन धांवून जावें ह्यांत आश्चर्य तें काय ? व्यक्तिगत पुण्याईला व्यक्तिगत मानसिक सौख्य फार तर लाभेल; पण तेंहि सामाजिक सौख्याच्या अभावीं नित्य बाधित असेंच रहाणार. समाज बुडत असतां तदंतर्गत व्यक्ति कशी तरूं शकेल ? अपूर्ण समाजांत एखाद्याच व्यक्तीला पूर्णत्वाप्रत कसें जातां येईल ? शरीरापासून निराळा होऊन हात पुष्ट होऊं म्हणेल तर तें शक्य होईल काय ? परंतु या उघड सिद्धांताकडे दुर्लक्ष केलें गेलें असल्यामुळें, हिंदुलोक सध्यांच्या कनिष्ठावस्थेत येऊन पोहोंचले आहेत. नाहीं तर तीच परधर्मीयांची सामाजिक दृष्टी पहा—परधर्मीयांच्या समाजहितरतत्परतेपुढें हिंदु धर्मीयांची समाजहिततत्परता पासंगाला तरी पुरेल काय ? ह्या पाद्री लोकांचीच गोष्ट घेघ. हजारों मैलांवरून ते इकडे येतात. आपला देश, आपलें जातगोत, आपले आप्तेष्टसुहृद सर्व बाजूला ठेवून केवळ खिस्तधर्माचा प्रसार व्हावा ह्या हेतूनें वाटेल त्या हालअपेष्टा, मानापमान, उपासतापास सहन करतात. अर्थातच त्यांच्या परिश्रमाप्रमाणें त्यांना फळ मिळतें. तीच हिंदूंची गोष्ट घे. ते कधींहि समाजाचा विचार करणार नाहींत, मग समाज तिकडे ठार झाला तरी चालेल. कांहीं ठराविक देवधर्माच्या क्रिया केल्या म्हणजे आपण जगाचें कांहीं लागत नाहीं, ह्या खुळचट व भ्रामक कल्पनेचा समाज शत्रूच्या आहारीं न पडावा तर काय व्हावें ? आतां आपण ह्या महा शिवरात्रीच्या उत्सवाहून आलों आहोंत ना ? तेथें हजारों लोक जमले होते व आपण एक कुळचाभर पाणी व एक बिल्वपत्र शिवमस्तकीं वाहिलें म्हणजे कृतकृत्य झालों—आपलीं सर्व पातकें भस्म झालीं, ह्या भावनेनें घरोघर परत गेले. पण ज्या शंकरानें जगद्धितासाठीं हलाहल विष प्राशन केलें, विश्वांतील सर्व ऐश्वर्याचें स्वामित्व असतांनासुद्धां स्वतःसाठीं त्यांतील एका फाटक्या चिंधीचीहि अपेक्षा धरली नाहीं, त्या सर्वांतर्यामीं वसणाऱ्या महेश्वराची उपेक्षा करून बाह्यतः त्यास केवळ एक बिल्वपत्र वाहिल्यानें तो महादेव संतुष्ट कसा होईल ? कल्पना कर कीं, त्या देवाचीं मंदिरें जाळून फोडून उध्वस्त व भ्रष्ट केलीं जात आहेत, त्या ईश्वराचीं मानवशरीर धारण करणारीं जिवंत देवळें—त्याचे भक्तजनभ्रष्टतेच्या निरयगर्तांत खितपत पडले आहेत. अशा अवस्थेंत पांचक्षणांची पुष्पादिकांची जडपूजा त्या विश्वकल्याणतत्पर शिवदेवाला कशी पावेल ? शिवस्वरूपांत सर्व भारतवर्षाची व त्यायोगें सर्व मानवजातीची पूजा करण्याची बुद्धि जोंपर्यंत हिंदूंना होणार नाहीं, तोंपर्यंत त्यांचें नष्टचर्य संपलें जाणार नाहीं ! ”

ह्याप्रमाणें संवाद चालला आहे तोंच ही मंडळी मंगेशी येथें येऊन पोहोचली. मंगेशी येथें श्रीमंगेशाचें दर्शन घेऊन मंडळी कवळ्यास श्रीशांतादुर्गेच्या दर्शनार्थ गेली. तेथील शंकरमठाचे अधिपति श्रीपूर्णानंदस्वामी ह्यांनीं आश्रमीय जनांना प्रेमादरपूर्वक ठेऊन घेतलें, व आश्रमकार्याचा गौरव केला. येथून मंडळी म्हपशाकडे गेली. तेथें गांवाबाहेरील देवीच्या देवळांत मंडळीनें मुक्काम केला. इतक्यांत खोर्ली येथील श्रीसमर्थभक्त विनायक शेट लांजेकर हे तेथें आले. श्रीमन्महाराजांचें दर्शन घेऊन त्यांना

मनस्वी आनंद झाला व त्यांनीं आग्रहपूर्वक आश्रमीय मंडळीस आपल्या घरीं वस्तीसाठीं चलण्यास विनविलें. ह्यावेळीं जरी मंडळी त्यांच्या घरीं गेली नाहीं, तरी श्री. लजेकर ह्यांच्या आश्रमावरील अकृत्रिम व निःसीम प्रेमामुळें, आश्रमीय मंडळीचे म्हापसें येथील पुढील मुक्काम मात्र नेहमीं त्यांच्या घरींच होत ोते. येथील मुक्काम पूर्वक्रमाप्रमाणें संपवून मंडळी पेडण्याहून सावंतवाडीकडे गेली व त्याच पद्धतीनें प्रवास करीत करीत मयूरास पोहोंचली.

वरील प्रवासांत साहजिकच आश्रमीय जनांचा हजारों लोकांशीं संबंध आला. आश्रमाचा ज्या ज्या मनुष्यांशीं संबंध येईल त्याला त्याला वाटलेल्या लोकांसंबंधीं माहिती विचारावी; त्यांचे आचार, रीतिरिवाज समजून घ्यावे; प्रत्यक्ष खिस्ती माणसाकडूनहि ते कसे वाटले, घरादारीं त्यांचा आचार व्यवहार कसा असतो, त्यांच्या एकंदर समजुती काय काय आहेत, त्यांच्या प्रस्तुतच्या अवस्थेंत त्यांना आनंद वाटतो कीं नाहीं इत्यादि गोष्टी त्याला न दुखवितां व त्याला राग न येईल अशा पद्धतीनें प्रेमळ पणें विचारून घ्याव्या, असा क्रम सारखा चाले. ह्याप्रमाणें ठाईठाईं शोध घेण्याचें काम चालू असतांच आश्रमीयांचा गोमांतकांतील अनेक जातींच्या लोकांप्रमाणेंच खिस्ती गावड्यांशींहि संबंध आला. हे लोक शेतकरी आहेत. एक लंगोटी, डोक्याला रुमाल, खांद्यावर कांबळें व कमरेला कोयती हाच त्यांचा सर्वसामान्य वेश आहे. आतां इतर गोष्टींप्रमाणेंच त्यांच्या पूर्वीच्या वेषांतहि पालट होत चाललेलाच आहे. शरीरप्रकृतीनें ते चांगले दणकट व काटक आणि स्वभावानें सात्विक व मृदु वृत्तीचे आहेत. ह्यांना चारशेंवर्षांपूर्वी जुलमानें बाटविलें. गोव्यांत मूळ वसाहत परशुरामानें वसविली तेव्हांच त्यांनाहि आणण्यांत आलें, त्यांच्या मूळ पुरुषामुळेंच शिवशर्म्याला श्रीमंगेशाचें दर्शन झालें; त्यामुळें त्याची 'मूळकेश्वर' म्हणून मंगेशाच्या पाठीमागें स्थापनाहि करण्यांत आली आहे; मंगेशाच्या देवस्थानांत ते प्रसाद पालखीसाठीं आले असतां त्यांना ती दिल्याविना इतर कोणाला कौल मिळत नाहीं, असा सर्वांना अनुभव आलेला आहे; जन्म, लग्न, व मरण ह्या संस्कारासाठीं ते पाद्र्याकडे जातात. त्यांनीं कांहीं हिंदूंचे आचारविचार पाळलेले आहेत; देवस्थानचे महाजन लोक त्यांना कुळधर्माच्या दिवशीं मूळकेश्वरांच्या नांवानें जेवावयास घालतात; इत्यादि स्वरुपाच्या त्यांच्या विषयींच्या पुष्कळशा गोष्टी आश्रमीयजनांच्या कानांवर आलेल्याच होत्या. साहजिकच जेव्हां त्यांच्यापैकीं कांहीं गावड्यांचा प्रत्यक्ष संबंध आला तेव्हां त्यांच्या समाजांत आश्रमीय मंडळींनीं प्रवेश केला, व त्यांच्यासंबंधींच्या परिस्थितीचें सर्वसाधारण ज्ञान करून घेतलें. ह्याचे लोकांच्या शुद्धिकरणासंबंधीं कांहीं स्थानिक माणसांनीं प्रयत्न केले होते, त्याचें स्वरूपदिग्दर्शन मागील प्रकरणीं केलेंच आहे. श्रीमन्महाराजांनींहि ह्याच दुर्दैवानें स्वधर्मवंचित केल्या गेलेल्या गावड्यांच्या शुद्धीकरणाचा प्रश्न हातीं घेण्याचें निश्चित केलें. त्याची उपाययोजना त्यांनीं कसकशी आंखली हें आतां पुढील प्रकरणीं पाहूं.

---

# श्री सप्तकोटीश्वर.



हें सुप्रसिद्ध प्राचीन देवस्थान गोमांतकांत आहे. मुसलमानांनीं ह्या मंदिराचा विध्वंस करून तेथील लिंग बाहेर माळावर फेंकून दिलें होतें. विजयनगरच्या श्रीविद्यारण्यांनीं मुसलमानांचा यथेच्छ समाचार घेऊन ह्या देवाची पुनरपि संस्थापना केली. श्रीशिवरायांची स्वारीहि डिचोलीस असतांना प्रस्तुत देवालयाचा लौकिक ऐकून एका श्रावणी सोमवारीं येथें पूजनार्थ आली होती. ध्यानांत निमग्न असतां शाकारणींतील एक ल्हाळा त्यांच्यापुढें पडला. तेव्हां मंदिराचा जीर्णोद्धार करण्याकरितां ही आपणांस अनुज्ञाच झाली असें जाणून, शिवरायांनीं जीर्णोद्धार करण्यासाठीं कारभाऱ्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें देवालय लौकरच बांधून झालें. देवस्थानाच्या पूजेअर्चेसाठीं ७०० होनांची नेमणूक महाराजांनीं करून दिली. "शके १५९० कीलक नामसंवत्सरे कार्तिक शु. ५ सोमे श्रीशिवराज्ञा देवालयारम्भः।" असा लेख अद्यापिहि दरवाजावर पहावयास सांपडतो. हें सप्तकोटीश्वराचें देवस्थान म्हणजे गोमांतकाचा समग्र इतिहास डोळ्यांपुढें उभा करण्याचें उत्कृष्ट साधनच होय. सर्वसामान्य जनांना रमविण्यासारख्या शिल्पकलेच्या चित्ताकर्षक गोष्टी तेथें नसतील. तथापि गतेतिहासाचें मूर्तिमंत स्वरूप कोणाच्याहि अंतश्चक्षूं समोर चटकन उभें करण्याचें दिव्य सामर्थ्य मात्र ह्या प्राचीन देवस्थानांतून असतें. भाराभर ग्रंथ वाचूनहि जें ज्ञान होणार नाहीं, तें ज्ञान या प्राचीन स्थळांच्या दर्शनमात्रेंच होतें. हीं पुरातन देवस्थानें म्हणजे हिंदुमानवकुलाचा साक्षात् इतिहासच होय!



# प्रकरण २ रें.

# उपाययोजना.

[ आचार्य चाणाक्य. ]

दुस्साध्यमपि सुसाध्यं करोत्युपायज्ञः ॥

उपाय पर्याय दीर्घ प्रेत्न । विवेकबळें नाना यत्न ॥
करील तयाचें महिमान । तोचि जाणें. ॥

दासबोध.

दीर्घ प्रयत्नांवांचून ह्या जगांत कोणतीहि गोष्ट साध्य होत नाहीं. महत्प्रयत्नानें दुसाध्य गोष्टहि सुसाध्य होऊं शकते—असाध्य तें साध्य होतें, असा सार्वत्रिक अनुभव आहे; पण नुसत्या यत्नसातत्यानेच कोणत्याहि कार्यात यश मिळत असतें, तर ह्या जगांत जे कितीतरी प्रामाणिकपणें केले गेलेले प्रयत्न निष्फळ झालेले दिसतात, ते तसे कां दिसावे, हा प्रश्न उपस्थित होतो. ह्मणजेच प्रयत्नांतील प्रामाणिकपणा या उत्कटपणा हाच केवळ यशःसिद्धीला कारणीभूत होत नाहीं, असें निदर्शनास येतें. ह्मणूनच श्रीसमर्थांनींहि—

" भाग्यासि काय उणें रे । यत्नांवाचूनि राहिलें ॥ "

असा सिद्धांत प्रथम केल्यानंतर तावडतोब अपयशाचें कारण सांगून—

" यत्न तो करावा कैसा । हेंचि आधीं कळेचि ना ॥ "

असें आपलें विधान पूर्ण केलें आहे अर्थात् ' केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं । ' हे जरी खरें असलें तरी त्याबरोबरच तें यथायोग्य पद्धतीनें—अचुकपणें करणें ही गोष्टहि विशेष अगत्याची आहे. अचुक प्रयत्न झाल्याविना कार्य कदापिहि यशःसिद्ध व्हावयाचें नाहीं. कार्यसिद्धींतील अचुक प्रयत्नांचें हें मोठें महत्त्वाचें स्थान जाणूनच श्रीसमर्थांनीं ' अचुक यत्न तो देवो । ' अशी मोठ्या मार्मिकपणें त्याची स्तुति गाइली आहे. अशा ' अचुक यत्नदेवाची ' जोड ज्यानें करून घेतली तो खरोखरच भाग्यवान् होय. ह्या ' अचुक यत्नदेवाच्या ' महनीय उपासनेमुळेंच श्रीविनायक महाराज मसूरकर ह्यांना गोमांतकांतील शुद्धिकार्याची दुर्भेद्य कोंडी फोडतां आली.

गोकर्णाच्या यात्रेच्या समयीं गोमांतकांतील परिस्थितीचें आपल्या सूक्ष्म व अंतर्भेदी दृष्टीनें निरीक्षण करून चारशें वर्षांत दुःसाध्य झालेला तेथील हिंदुकरणाचा प्रश्न श्रीमन्महाराजांनीं हातीं घेण्याचें निश्चित केल्याचें मागें कथन केलेंच आहे. आतां तो निश्चय तडीस नेण्यासाठीं त्यांनीं अचुक पद्धतीची उपाययोजना कसकशी आंखली हें प्रस्तुत प्रकरणीं पहावयाचें आहे.

कोणतेंहि कार्य हातीं घ्यावयाचें म्हणजे प्रथम तत्संबंधींची सांगोपांग विचारणा करणें अत्यंत आवश्यक असतें. म्हणजे त्या कार्याचें क्षेत्र, त्याची व्याप्ति, त्याची साधनसामुग्री, त्याचे शत्रुमित्र, त्याचें बलाबल, त्यांतील अडिअडचणी, गतेतिहास, देशकालपरिस्थिति इत्यादि गोष्टींचा सूक्ष्मपणें विचार करावा लागतो. ह्या निर्दिष्ट केलेल्या कांहीं आवश्यक गोष्टींचा सर्वांगीण विचार केल्याविना कार्य करण्याची घाई केल्यास तें फसल्याविना राहाणार नाहीं, हें सुनिश्चित आहे. म्हणूनच कार्याच्या उपाययोजनेंत 'मुख्य यत्न विचाराचा।' असावा असें श्रीसमर्थांनीं सांगितलें आहे. त्याला अनुसरूनच गोव्यांतील शुद्धिकार्यासंबंधींच्या विचाराचा 'मुख्य यत्न' श्रीमन्महाराजांनीं प्रथम केला.

गावड्यांच्या शुद्धिकार्यांतील मुख्य गोष्ट विचारांत घ्यावयाची होती, ती अर्थातच त्यांच्या मनोभूमिकेसंबंधींची होती. गावडे लोकांसंबंधीं सर्वसामान्य समजूत अशी होती, कीं, त्यांचें हिंदुधर्मावर अंतस्थ प्रेम असल्यामुळें, त्यांना हिंदुधर्मात प्रविष्ट करून घेणें कांहीं कठीण नाहीं; पण प्रत्यक्षतः ज्यांनीं त्या दृष्टीनें कांहीं थोडासा प्रयत्न करून पाहिला होता, त्यांना त्या कार्याची दुष्करता व दुस्साध्यता प्रत्ययास आलेलीच होती. गोमांतकाचा प्रश्न सोडविण्यासाठीं आतांपर्यंत केल्या गेलेल्या प्रयत्नांची दिशा कशा स्वरूपाची होती, हें गतप्रकरणीं दाखविण्यांत आलेंच आहे. त्या प्रयत्नांचा शांतपणें विचार केल्यास आढळून येईल, कीं, गावडे लोक हिंदुधर्मावर अंतस्थपणें उत्कट प्रेम करीत आहेत, असें गृहीत धरूनच पुढील गोष्टींचा विचार करण्यांत येई-म्हणजे गावडे लोक हे केव्हांहि हिंदुधर्मांत येण्यास एका पायावर सिद्धच आहेत; येऊन जाऊन मुख्य प्रश्न काय तो श्रीशंकराचार्यांच्या आज्ञापत्राचा आणि पोर्तुगीज सरकारच्या रोषाचा, अशीच दृढ समजूत होती. परंतु ह्या दोनच गोष्टी शुद्धिकार्याला प्रतिबंधक स्वरूपाच्या होत्या, असें मानतां येत नाहीं. कारण सरकारी विरोधाचा अभाव व श्रींचें आज्ञापत्र ह्या दोन्हींहि गोष्टींचें आनुकूल्य ब्रिटीश हिंदुस्थानांत आहे; तरीसुद्धां हिंदुधर्मावर प्रेम करणाऱ्या हिंदूंचे कांहीं आचार-विचार पाळणाऱ्या किंवा हिंदुदेवाला नवससायास सुद्धां करणाऱ्या अशा कित्येक जातीच्याजाती खिस्ती व मुसलमान धर्मांत नांदत आहेतच. मग त्या हिंदू कां होत नाहींत ! पण प्रत्यक्ष गोमांतकांतसुद्धां आतां शुद्धिकार्यास श्रीशंकराचार्यांची अनुमति आहे, सरकारी विरोधाचा प्रश्न आतां उरलेला नाहीं, किंवा प्रथमारंभीं उद्भूत होणाऱ्या कित्येक अडिअडचणींचा लवलेश राहिलेला नाहीं. एवढेंच नव्हे तर हजारों गावडे हिंदुधर्मांत जाऊन सुखासमाधानांत वावरत असलेले प्रत्यक्ष दिसत आहेत-अशा अवस्थेंत त्याच गावड्यांचे स्थळोस्थळीं पसरलेले हजारो बांधव अद्यापिहि खिस्तीधर्मांतच कां काळ कंठीत बसले आहेत किंवा त्यांच्याच प्रमाणें हिंदुधर्मावर अंतस्थ प्रेम करणारे व हिंदुदेवाला नवससायास करणारे उच्चवर्णीय हजारों खिस्तीलोक हिंदुधर्मांत कां येत नाहींत ! असा प्रश्न उपस्थित होतो. अर्थात् शुद्धीकरणाला होणाऱ्या प्रतिबंधाचा उगम वरील गोष्टींपेक्षां अन्यत्र कोठेंतरी शोधावा लागतो आणि त्या दृष्टीनें विचार करतां शुद्धिकांक्षी लोकांच्या मनोभूमिकेकडेच प्रथम वळावें लागतें. कोणा व्यक्तीचें एखाद्या धर्मांतील कांहीं आचार-विचारांवर वा विशिष्ट चालीरीतींवर प्रेम आहे एवढ्यावरूनच ती व्यक्ति त्या धर्माचा अंगीकार करावयास एकाएकीं पुढें सरसावेल असें होऊं शकत नाहीं. मनुष्यमात्राचा स्वभाव असा आहे कीं, जोंपर्यंत एखाद्या गोष्टीवर त्याचें खरेंखुरें अंतःकरणपूर्वक प्रेम बसलेलें नाहीं तोंपर्यंत ती गोष्ट तो आत्मसात् करीत नाहीं. ती गोष्ट तो आपलीशी म्हणत

नाहीं. त्या व्यक्तीचें एकाद्या गोष्टीवर खरें प्रेम आहे असें तेव्हांच म्हणतां येईल, कीं, जेव्हां ती व्यक्ति त्या गोष्टीसाठीं वाटेल तें साहस-वाटेल तें दिव्य, आपल्या सर्वस्वाची आहुति देऊनसुद्धां करूं शकेल। यांयकामुळें आतेष्टसुहृद्, जातगोत, शेतीवतनवाडी, एवढेंच काय पण स्वतःचे पंचप्राणहि त्या प्रेमावरुन ओंवाळून टाकले जातील, तेंच खरेंखुरें प्रेम होय. सर्व जग हातांत तरवार घेऊन विरुद्धपक्षाला उभें राहिलें, असंख्य पर्वतप्राय अडथळे जरी मार्ग रोखून बसले तरीसुद्धां ज्याची कांस सोडली जाणार नाहीं, तेंच खरें प्रेम होय. बाह्यतः एखाद्या गोष्टीबद्दल जरी प्रेम दिसत असलें तरी त्याच्याकरितां जर यत्किंचितहि झीज सोसण्याची सिद्धता नसेल तर तें प्रेम असून नसून सारखेंच नव्हे का ? म्हणजे ज्या गोष्टीची आपणाला तळमळ नाहीं, जिच्या संप्राप्तीसाठीं आपण वेडावून गेलों नाहीं, जिच्यावांचून आपले व्यवहार अडत नाहींत, किंवा जिच्यावांचून आपलें निभूं शकेल, त्या गोष्टीवर आपलें खरेंखुरें प्रेम आहे असें कसें म्हणतां येईल ? सर्वांच्या नित्यपरिचयाचा देशभक्तीचा दृष्टांत येथें देतां येण्यासारखा आहे. स्वदेशाविषयीं मनांतून प्रेम वाटत नाहीं, अशी एखादी व्यक्ती येथें आढळून यावयाची नाहीं; तथापि त्या स्वदेश-प्रेमासाठीं आत्मार्पण करण्यास कितीजण सिद्ध असतात ? त्याच्यासाठीं वाटेल ती झीज, वाटेल त्या हालअपेष्टा सहन करण्यास कितीजण उत्सुक असतात ? आपल्या देशाची उन्नति व्हावी अशी कितीकांना तळमळ लागून राहिलेली असते ? अन्नान्नदशेला येऊन पोहोंचलेल्या आपल्या देशबांधवांना पाहून कितीकांच्या पोटांत कालवाकालव होत असेल ? त्यांची ती दैन्यवाणी दारिद्र्यावस्था पाहून कितीकांचीं अंतःकरणें शतधा विदीर्ण होत असतील ? स्वर्गपदादेखीलहि श्रेष्ठ व परम वंदनीय असलेली आपली भूमाता परक्यांच्या लाथा खात तिलपत पडलेली पाहून तिच्या कितीशा सुपुत्रांचा शोक संतापानें चडफडाट होत असेल ? मग असलें हें कोरडें देशप्रेम, असला हा निष्क्रिय देशभक्तपणा काय कामाचा ? लोकमान्य टिळकांनीं म्हटल्याप्रमाणें "कोणाहि देशभक्ताची तारीफ, केवळ त्याच्या ध्येयावरुन जग करीत नसून त्या ध्येयाकरितां तो स्वतः किती स्वार्थत्याग व उद्योग करितो यावरुन करित असतें."

• ख्रिस्ती गावड्यांचें हिंदुधर्मावरील प्रेमहि वरील देशभक्तांच्या कोटींतीलच होतें. म्हणजे तळमळ, स्वार्थत्याग व उद्योग ह्यांविरहित असलेलें देशभक्तांचें देशप्रेम जितकें देशोद्धाराच्या दृष्टीनें उपयोगी ठरूं शकेल, तितकेंच गावड्यांचेंहि हिंदुधर्मप्रेम हिंदुधर्म-प्रवेशाच्या-हिंदुकरणाच्या दृष्टीनें उपयुक्त ठरलें असतें. साहजिकच अशा लोकांकडून स्वधर्माचा स्वीकार करावयाचा तर त्यांच्या मनांत उत्कट धर्मप्रेम जागृत करणें हेंच प्रथम व प्रमुख कर्तव्य होतें. कारण जोंपर्यंत एकाद्या गोष्टीवांचून आपलें नडत नाहीं, आपले नित्यव्यवहार सुरळीतपणें चाललेलेच असतात, जिच्या वांचून आपलें निभूं शकतें अशी मनःप्रवृत्ति बद्धमूल झालेली आहे, तोंपर्यंत त्या गोष्टीच्या संप्राप्तीविषयीं उत्कंठा किंवा अखंड तळमळ कशी लागेल ? म्हणूनच ही मनःप्रवृत्ति आमूलाग्र पालटावयाची, त्या लोकांच्या मनांत आपल्या पूर्वजांच्या धर्माविषयीं जाज्वल्य अभिमान निर्माण करून प्रस्तुत पतितावस्था निःशेष झाडून टाकण्यास त्यांस उत्तेजित करावयाचें व स्वधर्म स्वीकारण्याकरितां प्राणाचीहि मोल देण्याची उत्कट तत्परता त्यांच्या ठायीं निर्माण करावयाची, हीच गोमांतकांतील शुद्धिकरणांत अत्यंत श्रेष्ठ, आवश्यक व म्हणूनच आद्य कामगिरी होती.

पण हें उत्कट धर्मप्रेम केवळ एकाददुसऱ्या व्यक्तीच्या ठायीं निर्माण करून भागणारें नव्हतें त सबंध समाजच समाज त्या एकाच एक उच्चध्येयानें भारून टाकून स्वधर्मासाठीं मरावयास सिद्ध करण्याची आवश्यकता होती. एक तर व्यक्ति व समाज यांचे संबंध अभेद्य स्वरूपाचे असतात. प्रत्येक व्यक्तीवर समाजाची म्हणून एक सत्ता—दडपण सदैव असतेंच आणि सर्वसामान्य सृष्टिस्वभाव पाहिला तर प्राणिमात्र सामाजिक सत्तेविरुद्ध सहसा जाऊं इच्छित नाहीं. कारण समाजाविना आपलें अस्तित्व टिकविणें त्याला अशक्यच असतें. नित्य व्यवहार, जातगोत, संरक्षण इत्यादि गोष्टींसाठीं त्या व्यक्तीला समाजाकडे धांव घ्यावी लागते. प्रत्येक व्यक्तीचें जीवित साऱ्या समाजाच्या जीविताशीं अनेक धाग्यांनीं इतकें घट्ट जखडलेलें असतें कीं, समाजाला सोडून एकटें राहण्यास साहजिकच कोणाचीहि सदैव अनुत्सुकता असते. हा प्राणिमात्राचा स्वभाव लक्षांत घेतां एकाधा गावड्याच्या ठायींच हिंदु-धर्म-प्रवेशाची भावना उत्कटत्वानें वाढीस लावून कार्यभाग होणारा नव्हता. त्यांतूनहि एकादी व्यक्ति शुद्धीकरणास सिद्ध झाली, तरी जातिसमावेशन वा रोटीबेटी व्यवहार ह्या जटिल प्रश्नापेक्षांहि त्या घटनेनें धर्मवेड्या पोर्तु-गीज सरकारला आपण होऊन दिलेल्या जागृतीचा प्रश्न विशेष महत्त्वाचा होता. कारण पोर्तुगीज सरकार कायद्याच्या जोरावर किंवा अन्य कोणत्याहि उपायांनीं एका व्यक्तीला पेंचांत आणणें अशक्य नाहीं. हि हुना हिंदुकरणाच्या अप्रिय प्रश्नानें पुढें आपल्या राज्यांत कधींहि डोकें वर काढूं नये अशी खबरदारी सावधतेनें घेणें त्याला अशक्य होणार नाहीं, ही गोष्ट सुनिश्चित होती. पण तेंच त्यांच्या स्वसंरक्षित गावड्यांचा सबंध समाजचा समाजच जर एकदम हिंदुधर्मात समाविष्ट केला गेला तर पोर्तुगीज सरकारला समाजावर अन्यायाचा वरवंटा लोकसत्तेच्या तत्त्वाच्या लाजेकाजेस्तव तरी सरसहा फिरवितां यावयाचा नाही अशी अपेक्षा करणें चुकीचें नव्हतें. त्द्वतच पूर्व हिंदुसमाजालाहि गावड्यांचा इतका मोठा समाज आप-समाजांत येऊन बसल्यावर त्याची आपण होऊन व्यवस्था लावणें भाग पडेल, हेंहि उघड होतें. अ गोमांतकांतील शुद्धीकरणाचा अवघड पेंच सुटावयाचा तर तो वैयक्तिक शुद्धीकरणानें न सुटतां सामुदा शुद्धीकरणानेंच सुटणार होता. तथापि एक व्यक्ति आपल्या पक्षाला मिळविणें हें थोड्याफार परि नंतर साध्य होईल; पण सबंध समाजचा समाज एकाच उत्कट धर्मप्रेमानें भारून सोडावयाचा व कार्यहि शुद्धिविरोधी शत्रूपक्षास त्याचा कांहीं एक सुगावा लागूं न देतां करावयाचें, हा मो अवघड पेंच होता.

समाजाचें संभूय समुत्थान ही गोष्टच प्रथम महादुःसाध्य असते. समाज हा कांहीं एक चिखल गोळा नसतो, कीं ज्याला आपण पाहिजे तो आकार पाहिजे त्यावेळीं क्षणांत देऊं शकूं. वाटेल ती एकाएकीं त्याच्या गळीं उतरविणें शक्य नसतें. कित्येक पिढ्यान्‌पिढ्याचे संस्कार त्याच्या आंगवळणीं प असतात. एखादी गोष्ट जरी कितीहि अनिष्ट अशी दिसत असली तरी तिच्या पकडींतून सुटून जाण्या समाज तिच्या कित्येक पिढ्यांच्या सान्निध्यानें अनुत्सुक असतो. अनेक शतकांच्या सहवासामुळें प रूढी लोकांच्या हाडींमासीं खिळलेली असते आणि ती जरी कितीहि मूर्खपणाची दिसत असली तरी प्राचीनत्वामुळें तिला एक प्रकारचें महत्त्व किंवा पवित्रपणा प्राप्त होतो; त्यामुळें सर्वसामान्य समा ती सोडून देण्याची इच्छा होत नाहीं. पण सर्वसामान्य समाजाची गोष्ट कशाला ? इंग्लिश लोक सर्व जगांत अत्यंत प्रगमनशील व पुढारलेले म्हणून टेंभा मिरवीत असतात; पण त्यांच्याहि अशा

वेडगळ समजुती अद्यापि प्रचलित आहेत कीं, त्या म्हणून कोणाल्याहि नवलच वाटेल. श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं इंग्लंडच्या पुराणमतवादित्वाविषयीं टिळकचरित्रांत एक परिशिष्ट घातलें आहे, तें असें:—

"इंग्रज लोक हे जितके प्रगमनशील तितकेच पुराणमतवादी आहेत. इकडे प्रगतीचें पाणी त्यांच्या हनुवटीपर्यंत येऊन मिडलेलें असतें व इकडे ते तोंडानें जुन्या गोष्टींचा पुरस्कार करीत असतात. केंब्रीज युनिव्हर्सिटींत बायका पास झाल्या तरी त्यांना पदवी देत नाहींत–पण इकडे बायकांना मतदारीचा हक्क मिळून एक बायको पार्लमेंटची सभासद म्हणून निवडलीहि गेली. बायकांना मतदारीचा हक्क मिळेना, पण त्यापूर्वी सर्व प्रकारच्या कचेऱ्यांतून बायका पुरुषांप्रमाणें कामधाम करीत होत्या. पार्लमेंटांत राजाला कांहीं एक अधिकार उरलेला नाहीं व 'गॉड सेव्ह दि किंग' हें (राजस्तोत्र) गाइलें जात असतां एकादा पार्लमेंटचा सभासद खुशाल बसला तरी त्याचें कोणास कांहीं करतां येत नाहीं. पण सर्व व्यवहार राजाच्या नांवानेंच चालला पाहिजे. लढाची बातमी शिळी होऊन तत्संबंधीं केलेल्या मद्यप्राशनाच्या धुंदींतून लोक शुद्धीवर येऊन कामालाहि लागल्यावर, मग कांहीं दिवसांनीं जुन्या पद्धतीप्रमाणें राजाच्या तुतारीवाल्यांनीं मोठया त्वानल्यानिशीं मिरवणूक काढून शहरांत चारच वाड्यांवर लढाचा जाहिरनामा वाचून दाखवावयाचा असतो, तसा वाचून दाखविला. जुनें लंडन शहर व नवें लंडन शहर यांच्यांतला भेद लोपून शेंकडोशें वर्षे झालीं तरी अजून या दोहोंच्या दरम्यान काल्पनिक सीमेवर राजदूतांनीं उभें राहून पलीकडे दहा हातावर उभा राहिलेल्या लॉर्ड मेयरला तुतारी वाजवून आपल्या आगमनाची वर्दी दिली पाहिजे. त्यांनीं कोण म्हणून विचारिलें पाहिजे. यांनीं आम्ही राजदूत म्हणून सांगितलें पाहिजे. मग जुन्या काळचें वेशी उघडण्याचें नाटक करण्याकरितां रस्त्यावर आडवा लावलेला रेशमाचा दोरा तोडला पाहिजे व मग राजदूतांनीं आंत प्रवेश केला पाहिजे!"

"पार्लमेंटांत सभासदाच्या नांवानें निर्देश करावयाचा नाहीं, तर त्याची निवडणूक करून दिलेल्या गांवाच्या किंवा पेठेच्या नांवानें करावयाचा! वडील राजपुत्राला परवां बॅरिस्टर करून घेण्यांत आलें. श्रीमंतांच्या मुलांचा अभ्यास त्यांच्या शिक्षकांनीं घोकला तरी चालतो. त्याचप्रमाणें त्यांच्या परीक्षाहि अभ्यास केल्याशिवाय उतरतात, हें ठीकच आहे. पण राजपुत्राला तो "बडे बापका बेटा" म्हणून जर बॅरिस्टर करून घेतां येतें, तर त्याजकडून नेहमींच्याच सरनाम्यांतील तपशील भरून घेण्याचें कां वगळतां येऊं नये! ज्याला परीक्षा माफ त्याला प्रतिज्ञालेख कां माफ होऊं नये! पण नाहीं. त्यांत जुना नमुना बरोबर वठला पाहिजे. मौज ही कीं त्याप्रमाणें सरनामा (declaration) भरून देतांना राजपुत्राला आपल्या हातानें खालील गोष्टी लिहून द्याव्या लागल्या.

प्र०:—'तुझ्या बापाचा धंदा कोणता?'

उ०:—'माझ्या बापाचा सांगण्यासारखा धंदा नाहीं.'

प्र०:—'तूं स्वतः काय करीत असतोस?'

उ०:—'मी बेकार निरुद्योगी आहें!'

सारांश इतका पुराणमतवादीपणा इतर देशांत क्वचितच आढळेल आणि हे इंग्लिश लोक हिंदी लोकांना जुन्या मताच्या अभिमानाबद्दल हंसणार!" असो.

इंग्लंडसारख्या सुधारलेल्या व सत्तासामर्थ्यवान् राष्ट्राची जेथें अशी स्थिति, तेथें गरीब विचाऱ्या हिंदुसमाजाविषयीं काय बोलावयाचें ! तात्पर्यार्थ इतकाच ध्यावयाचा कीं, कोणताहि समाज आपल्या पूर्वसमजुती व आंगवळणीं पडलेले आचारविचार मग ते अनिष्टहि कां असेनात, एकदम फेंकून देईल अशी अपेक्षा करणें चुकीचें असतें. अशा अवस्थेत त्याच्या जीवितक्रमांत महत्त्वाचा पालट घडवून आणावयाचा ही गोष्ट सहजसाध्य होऊं शकत नाहीं—तर ती महत्प्रयासानें, मोठ्या युक्तिबुद्धीनें सिद्धीस जात असते. साहजिकच गावड्यांच्या समाजांत एकसमयावच्छेदेंकरून उठावणी होण्यास त्याचें मनोगत प्रथम हातीं घेऊन त्याला मानवेल व पचनीं पडेल अशाच बेतानें त्याच्या मनाची तयारी करीत राहणें प्राप्त होतें.

आतां हिंदुधर्माचा साक्षात् स्वीकार करण्यांत कोणत्या महदापत्तींचा डोंगर आपल्या पायांवर आपणांच ओढून घ्यावा लागेल ह्याची भयप्रद जाणीव गावड्यांस होणें स्वाभाविकच होतें. आपण हिंदुधर्म स्वीकारला तर पाद्रीलोक काय थैमान घालतील, त्यांच्या चिथावणीनें आपले खिस्ती जमीनदार लोक खवळून आपल्या शेतीवाडी कशा काढून घेतील, तद्वत्च सरकारचाहि रोष आपणांवर होऊन आपलें जीवित सर्वतोपरि धोक्यांत कसें येईल, ह्या गोष्टींचें भयानक चित्र त्यांच्या दृष्टीपुढें उभें राहाणें स्वाभाविकच होतें. आणि ही त्यांची भयव्याकुलता सर्वसामान्य अशा कोणत्याहि उपायांनीं निर्मूलन होणारी नव्हती. जिच्या बळावर कोणत्याहि महत्संकटांना न जुमानतां, हातांत शीर घेऊन धीरोदात्त वृत्तीनें ते लोक स्वधर्म संग्रामांत उडी घे शकतील अशी कांहीं तरी अद्वितीय प्रचंड शक्ति त्यांच्या ठायीं जागृत करणें हा एकचएक उपाय त्यासाठीं अवलंबणें भाग होतें. तथापि समाजांत झाल्या तरी सर्वच व्यक्ती कांहीं एकाच विचाराच्या असूं शकत नाहींत. 'व्यक्ति तितक्या प्रकृति' हा सृष्टिस्वभावच आहे. मग एकाच गोष्टींत, तीहि धर्मप्रवेशासारख्या महत्त्वपूर्ण बाबतींत सर्व समाजाची एक सर्व मान्यता मिळवावयाची कशी ही अडचण अर्थात्च उपस्थित होते. तेव्हां समाजाचें संभूय समुत्थान कसें होतें, एकाद्या गोष्टीविषयीं सर्व समाज एकाच मतानें केव्हां विचार करूं लागतो, ह्या दृष्टीनें सामाजिक मनाचा अभ्यास करूं लागलें असतां असें आढळून येतें कीं, समाजांत एकादी भावना जेव्हां जोरकसपणें जागृत केली जाते, तेव्हां बाकीच्या सर्व गोष्टींतील भिन्नभिन्न मत-मतांतरें एका अंगाला राहून सर्व समाज एका ध्येयानें प्रेरित होऊं शकतो. जसें कीं एकादें सर्वसामान्य भय उपस्थित झालें म्हणजे आत्मसंरक्षण करण्याच्या उपजत बुद्धीनें सर्व समाजचा समाज झट्कन् एक बुद्धीचा होतो. भयाप्रमाणेंच प्रेम, द्वेष इत्यादि भावनाहि सर्वसामान्य झाल्यास समाजांत तत्काळ एकी होते. एकाच विभूतीविषयीं पूज्यभाव बाळगणाऱ्या अनेक व्यक्तींत प्रेमाचें नातें निर्माण होऊं शकतें. ही गोष्ट लक्षांत घेतां ध्येयसिद्धीच्या दृष्टीनें धर्मप्रेमाची एकच एक उत्कट भावना गावड्यांच्या समाजांत निर्माण करून नवचैतन्याच्या लाटांनीं सर्व समाज भारून टाकण्याची आवश्यकता होती.

आणि असें हें नवचैतन्यदायी अद्वितीय सामर्थ्य, खऱ्या उत्कट धर्मप्रेमाव्यतिरिक्त अन्य कोणत्या उपायांनीं निर्माण करतां येईल ! धर्माहून श्रेष्ठ असें जागृतित्त्व अन्य कोणतेंहि नाहीं. धर्मामुळेंच सर्व श्रेष्ठ सद्गुणांची उत्पत्ति होत असते. त्याच्या योगेंच चित्त नवचैतन्ययुक्त होऊन तें पवित्र उदार व

स्वकर्तव्य तत्पर बनतें. धर्माचें वारें एकदां सर्वत्र संचरूं लागलें कीं तेथें वीर्य, शौर्य, व तेज यांची प्राणप्रतिष्ठा व्हावयाचीच. धारिष्ट, करारीपणा, निग्रह, हव्यास ह्या गोष्टी तेथें धांवून यावयाच्याच. धर्मामुळें मनुष्याच्या ठायींचा ब्रह्मभाव जागृत होतो व दैवी आनंदानें त्याचें जीवित भरून जातें. आपण पापी-पतित नाहीं, आपला जन्म क्षुद्रजीव जंतूंप्रमाणें नाहीं, ही जाणीव त्याला धर्मामुळें होऊं शकते व " धरिल्या देहाचें सार्थक करीन। आनंदें भरीन तीन्ही लोक।" अशा वृत्तींत तो दंग होऊन जातो. ह्या अशा अवस्थेंतच त्याला भीति कशाची वाटणार ? तो कोणाला भिणार ? "आनंदं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कदाचन।" साहजिकच तो जीवित्व तृणवत् मानून निर्भयपणें आपलें ध्येय साध्य करून घेणार ! पुष्कळांची कल्पना अशी असते, कीं, मनुष्य इहपरलोकींच्या क्षुद्रसुखाच्या इच्छापूर्तीसाठींच जिवावर उदार होऊन पराक्रमाच्या गोष्टी करण्यास उद्युक्त होत असतो; पण हें म्हणणें चुकीचें आहे. मनुष्य केवळ ग्राम्य सुखासाठींच येथें जगत नाहीं. तसें असतें तर श्वानशूकरादिक नीच योनींत जन्म घेण्यास त्यास केव्हांहि आनंदच वाटला असता; पण तशी इच्छा स्वप्नांतहि कोणास होत नाहीं. कारण प्रत्येकांच्यां ठायीं कांहींना कांहीं तरी उच्च वृत्तीचा अंश हा वसतच असतो व त्यांच्या साठींच आपलें जीवित वेंचण्यांत त्याला धन्यता वाटते. त्याच्या त्या उच्चवृत्ति चेतविल्या गेल्या म्हणजे तो त्यांच्यासाठीं वाटेल त्या हालअपेष्टा सहन करील. प्रसंगीं त्यासाठीं प्राण सर्वस्वाहि वेंचील असा मनुष्यमात्राचा स्वभाव आहे. सुप्रसिद्ध पाश्चात्य तत्त्ववेत्ता कार्लाईल ह्यानेंहि पण असेंच म्हटलें आहे.*

अर्थात बायका पोरें, घरदार किंवा शेती वतन वाडी ह्यांच्या संरक्षणाच्या दृष्टीपेक्षांहि प्रत्येक प्राणिमात्राच्या अंतरंगांत सुप्तपणें वसत असलेल्या उच्च ध्येयाकरितां प्राणत्याग करण्याच्या वीर वृत्तीला

* "It is a calumny on men to say that they are roused to heroic action by ease, hope of pleasure, recompense,-sugar plums of any kind in this world or in the next! In the meanest mortal there lies something nobler. The poor swearing soldier hired to be shot, has his 'honour of a soldier,' different from drill regulations and the shilling a day. It is not to taste sweet things, but to do noble and true things and vindicate himself under God's Heaven as a God made Man, that the poorest son of Adam dimly longs. Show him the way of doing that, the dullest daydrudge kindles into a hero. They wrong man greatly who say he is to be seduced by ease. Difficulty, abnegation, martyrdom, death, are the allurements, that act on the heart of man; kindle the inner genial life of him, you have a flame that burns up all lower considerations. Not happiness, but something higher: one sees this even in the frivolous classes, with their point of honour and the like. Not by flattering our appetites: no, by awakening the Heroic that slumbers in every heart can any Religion gain followers." (H. & H. W. 76).

प्रामुख्यानें चालन देऊनच गावड्यांना त्यांच्या ध्येयसिद्धीचा मार्ग दाखवावयाचा होता. बाकीच्या सर्व गोष्टी गौण स्वरूपाच्या होत्या. ह्या एकाच एक उपायानें सर्वत्र प्रचंड शक्ति जागृत होऊन मध्य व दुस्तर संकटांना चांगलीच थप्पड बसणार होती व त्या योगेंच चारशें वर्षें दुस्साध्य होऊन बसलेला गोमांतकांतील शुद्धीकरणाचा प्रश्न सुटणार होता.

ह्याप्रमाणें गोमांतकांतील शुद्धिकार्य यशःसिद्ध करावयाचें तर प्रथमतः धर्मप्रेम जागृतीची प्रचंड लाट सर्वत्र उसळून देऊन तद्द्वारा लोक देवधर्मासाठीं मरण्यास सिद्ध केल्याविना गत्यंतर नाहीं, असा मुख्य निश्चय श्रीमन्महाराजांनीं केला व तदनंतर प्रत्येक महत्कृत्यांत सदैव त्याच्या अंगभूत व अनुगामी असणाऱ्या अनेक क्रियांचा सांगोपांग विचार करण्यास श्रीमन्महाराज प्रवृत्त झाले. ह्या आनुषंगिक गोष्टींची विचारणा त्यांनीं केली, त्याचेंहि स्वरूपदिग्दर्शन थोडक्यांत येथें करणें अप्रासंगिक होणार नाहीं.

वरील गोष्टींपैकीं पहिली गोष्ट अर्थातच मनुष्यबलाची होती. प्रत्येक महत्कार्याच्या संपादणीत मनुष्यबलाची जशी तीव्र उणीव भासमान होते तशी अन्य कोणत्याहि गोष्टीची नाहीं. जेथें कार्यकर्त्यांची भरपूर समृद्धि आहे, तेथें यशःशैलशृंग स्वाधीन करून घेणें अशक्य होत नाहीं. कार्यें पुष्कळ आहेत व तीं सिद्धीस नेण्याचीं साधनेंहि विपुल असतात; पण त्या साधनांचा यथायोग्य पद्धतीनें उपयोग करून कार्यें सिद्धीला नेणारी माणसें सदैव दुर्मिळच असतात. अर्धवट पडलेल्या किंवा सिद्धीस न गेलेल्या कार्यांचे सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण केल्यास आढळून येईल, कीं, बाकीचीं सर्व साधनें अनुकूल असताहि ती कार्यकर्त्यांची त्यांत उणीव पडल्यामुळेंच तीं तडीस जाऊं शकलीं नाहींत. ही सार्वजनिक अनुभवाची गोष्ट आहे. पण कार्यकर्ते नुसते संख्येनें मुबलक असले तरीहि भागत नाहीं. ते अनेक शोभनीय सद्गुणांनीं युक्त असावे लागतात. त्यांतल्यात्यांतहि धर्मोद्धारासारख्या महनीय कृत्यांप्रीत्यर्थ तर लोकोत्तर गुणांचे कार्यकर्तेच लागतात. म्हणजे ज्यांचीं अंतःकरणें मृदु थोर व पवित्र आहेत, जे सदैव धीर गंभीर उदार व विनयशील असून अखंड सावधवृत्तीनें वर्तत असतात, वाटेल त्या भीषण संकटपरंपरेनें ज्यांचे धैर्यदुर्ग कदापि ढांसळूं शकत नाहींत, शत्रूंचे पीळपेंच जे अचुकपणें उकलूं शकतात. कोणत्याहि प्रकारच्या ऐहिक सुखलालसेनें जे कदापि पीडित होऊं शकत नाहींत, केवळ एक परमेश्वर, परमेश्वरी कार्य, व परमेश्वराची सेवा हाच ज्यांनीं आपला निश्चितार्थ ठरविलेला आहे व ज्यासाठीं त्यांनीं आपलें तन-मन-धन परमेश्वराच्याठायीं समर्पित केलीं आहेत, अशा कर्तव्यतत्पर तेजःसंपन्न, बाणेदार, महानिश्चयी व उत्कृष्ट धारणेच्या पुरुषांचीच आवश्यकता असते. साहजिकच अशा मोलाचे खंदे धर्मवीर ह्या महत्कार्यास पुरविण्याची योजना श्रीमन्महाराजांना प्रथम आंखावी लागली.

कार्यसिद्धीस नेण्याच्या बाबतींत मनुष्यबलाइतकाच द्रव्यबलाचा प्रश्नहि महत्त्वाचा असून त्याविषयीं विचार करणें भाग होतें. द्रव्याभावीं कोणत्याहि कार्यास हात कसा घालतां येईल ? 'सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः !' ही गोष्ट सर्वांच्याच अनुभवाची आहे. कार्य पुष्कळ श्रेष्ठ असलें व त्याची इतर साधनसामुग्रीहि यथायुक्त पद्धतीनें जुळविलेली असली, पण द्रव्यसाहाय्य अंतिम क्षणापर्यंत पुरेल अशी योजना केलेली नसेल तर तें कार्य निष्फळ झाल्याविना राहाणार नाहीं. कार्याला प्रारंभ होण्यापूर्वी एकंदर खर्चाचा ठोकळ मानानें जरी अंदाज बांधलेला असला, तरी अनपेक्षित पद्धतीनें खर्चाचीं कितीतरी निरनिराळीं खातीं मध्यंतरीं

उपस्थित होत असतात व त्या सर्वांची तोंडमिळवणी करणें आयत्या वेळीं कसें दुरापास्त होऊन बसतें, गोष्ट प्रत्यहींच्या व्यवहारांतहि सर्वांच्या परिचयाची आहे. एका व्यक्तीच्या प्रपंचांत जर ही अवस्था, तर रों लोकांशीं सारखा व्यवहार होणाऱ्या सार्वजनिक चळवळींत कार्यकर्त्यांची कशी तारांबळ उडत ल ह्याची कल्पनाच करावी. सत्कार्याला मनोभावें साह्य करणारा वर्ग फारच अल्प प्रमाणावर असतो. त्यहीं निघणाऱ्या शेंकडों चळवळींचें ओझें साहजिकपणें ह्याच वर्गावर नित्य पडत असतें. अर्थातच त्याकडून द्रव्याचा पुरवठा सतत होत राहील अशी अपेक्षा करणें मूर्खपणाचें असतें. कार्याचें महत्त्व ळखून, केवळ द्रव्याभावीं कार्याचा नाश न व्हावा एतदर्थ आणीबाणीच्या प्रसंगीं आपण होऊन गार्थ धांवत येणारे लोक विरळाच ! पण उलट कार्यकर्त्याच्या पदरीं मूर्खपणा बांधून त्याला 'येनकेन रेण' त्याच्या मार्गांत नानाविध संकटें निर्माण करणाऱ्यांची मात्र केव्हांहि उणीव असत नाहीं. अवस्थेंत कार्यकर्त्याला मोठ्या धिम्मेपणानें व चातुर्यानें आपल्या अंगीकृत कार्याची इमारत स नेण्याइतकी सिद्धता आगाऊच करून ठेवावी लागते. अर्थातच कार्याच्या उठावणीस द्रव्याचा र पाठिंबा लागतो. कार्यसिद्धींत द्रव्यबलाचें हें महत्त्व जाणूनच चाणक्यानीं 'अर्थमूलं कार्यम्' यथार्थतेनें उद्गार काढले आहेत.

असें हें द्रव्यसाह्य कसकशा पद्धतीनें मिळवावयाचें ह्याची योजना ठरविणें प्राप्त होतें. गोमांतकाची ष्ट परिस्थिति लक्षांत घेतां स्थानिक लोकांकडून त्या चळवळीनिमित्त द्रव्यनिधि गोळा करणें क नव्हतें; कारण तसें कोणाकडून द्रव्यसाह्य मिळविल्यास त्या त्या व्यक्तीचा शुद्धिचळवळीशीं र प्रस्थापित केला जाऊन तिला कदाचित् सरकारी रोषालाहि बळी पडावें लागेल. अर्थातच तकांतून शुद्धिचळवळीसाठीं कांहींहि द्रव्यसाह्य न घेतां त्याची परस्परच बाहेरून उभारणी करावी, निश्चय श्रीमन्महाराजांनीं केला. हें सावधगिरीचें धोरण अत्यंत आवश्यक कसें होतें, हें पुढें जेव्हां श्रमीय कार्यकर्त्यांना पकडून त्यांना "तुम्ही पैसे कोठून आणतां, तुम्हाला मदत कोण करतो, पेडणेकरांनीं तुम्हाला किती पैसे दिले?" असे नानाविध प्रश्न खोदून खोदून विचारण्यांत आले, एवढेंच तर तीं नावें सांगण्यासाठीं आश्रमीयांच्या जटा उपटून त्यांना मार देण्याचाहि धाक घालण्यांत आला, सर्वांच्याच प्रत्ययास आलें. असो.

मनुष्यबल व द्रव्यबल ह्या दोन प्रश्नांप्रमाणेंच पोर्तुगीज-सरकारच्या धोरणाचाहि विचार करणें आवश्यक गतेतिहासाकडे लक्ष देतां धर्मवेड्या पोर्तुगीज लोकांच्या सत्तेखालील लोकांना प्रकटपणें पुनरपि त्यांच्या ांच्या धर्मांत समाविष्ट करावयाचें म्हणजे साक्षात् अग्नीशीं खेळावयाचें भयंकर साहस करणें होय, ही गोष्ट ठीं उघड होती. कल्पनाहि करतां येणार नाहीं, अशा असंख्य आपत्तींशीं झुंजावें लागणार, हें निश्चित होतें. ांच्या धार्मिक स्वातंत्र्यांत न्याय्य दृष्टीनें लोकसत्तेला हात घालतां यावयाचा नाहीं, हें स्पष्ट होतें. तथापि तात्त्विक सिद्धांत गोमांतकाच्या लोकशाहींत प्रत्यक्ष सृष्टींत कशा पद्धतीनें सोडविला जाईल ह्याचीहि विचारणा तज्ज्ञ कायदेकुशल पंडितांजवळ करणें आवश्यक होतें. शुद्धिचळवळ हाणून पाडण्यास गीज सरकाराला ही चळवळ बेकायदेशीर ठरविणें, कार्यकर्त्या लोकांची धरपकड करणें व शुद्धीकृत ंना नानाविध उपायांनीं संकटांत व पेचांत आणणें हे तीन मार्ग होते. अर्थात् शुद्धिचळवळीला असा

एकादा प्रतिबंधक कायदा निघालाच किंवा मुद्दाम आकस्मिक पद्धतीनें उपस्थित केला गेला, कार्यकर्तेलोक कैद झाले व शुद्धीकृत अन्याय्य मार्गानें छळले जाऊं लागले, तर हा प्रश्न पोर्तुगाल पार्लमेंट किंवा आंतराष्ट्रीय हितसंबंधाच्या दृष्टीनें ब्रिटीश कायदेमंडळें किंवा थेट ब्रिटीश पार्लमेंटपर्यंत नेऊन भिडविणें प्राप्त होतें. कारण ख्रिस्ती मिशनऱ्यांना जर सर्वत्र शांततेच्या मार्गानें आपला धर्मप्रसार निष्प्रतिबंधपणें करतां येतो तर मिशनऱ्यांच्याच पद्धतीनें काम करणाऱ्या हिंदुधर्मप्रचारकांना त्यांच्याच हिंदुधर्माचा प्रसार त्यांच्याच भूमींत करूं न देणें हा धडधडीत अन्याय होय. ख्रिस्ती पाद्र्यांना जर आपला धर्मप्रसार करण्याचा हक्क सर्वत्र गाजवितां येतो तर हिंदुधर्मप्रचारकांना तरी तशी आडकाठी कां व्हावी ? हे व अशाच स्वरूपाचे प्रश्न मोठमोठ्या वरिष्ठ पुढाऱ्यांच्या साह्यानें धसाला लावून सोडवून देण्याची व्यवस्था करणें प्राप्त होतें.

पण कायदेशीर प्रतिबंधापेक्षांहि अन्य मार्गांनीच चळवळीला खो घालण्याचे प्रयत्न होणें अधिक संभाव्य होतें. म्हणजे कार्यकर्त्यांना राजकारणी हेतु चिकटवून किंवा त्यांना शांततामंजक लोक ठरवून 'येनकेन प्रकारेण' त्यांचा कांटा उपटून टाकावा, हाच तो मार्ग होता. एवढ्यासाठीं संस्थेच्या ध्येयाविषयीं व कार्यकर्त्यांच्या चारित्र्याविषयीं यथार्थ माहिती देऊन कांहीं सत्ताधिकारी लोक आपल्या प्रेमाचे करून ठेवणें कार्यसिद्धीला उपकारक होतें. यथार्थ माहितीच्या अभावीं सत्ताधिकाऱ्यांचा गैरसमज होणें किंवा हेतुपुरःसर तो कोणी करवून देणें अशक्य नसतें. ह्या अशुद्ध पायावरच पुढील सर्व इमारत रचली जात असल्यामुळें प्रथमपासूनच हा सत्ताधिकारी वर्ग परिचयाचा व प्रेमाचा झाला म्हणजे त्याच्याकडून परस्पर नसतीं उठलेलीं वा उठविलेलीं वादळें आपोआप निरस्त केलीं जातात. त्याचप्रमाणें कार्यकर्ते व त्यांची संस्था ह्यांच्याविषयीं जनतेचे श्रेष्ठ पुढारी व सन्मान्य नागरिक ह्यांच्या मनांत प्रेमादर उत्पन्न करून ठेवणें उचित असतें. म्हणजे शत्रुपक्षाकडून किंवा विघ्नसंतोषी व्यक्तींकडून संस्थेसंबंधीं सर्वत्र पसरवून दिलेले गैरसमज आवश्यक त्या प्रसंगीं स्वतः ते छातिठोकपणें दूर करूं शकतात.

पण एवढ्यावरहि न थांबतां सर्वसामान्य जनतेंतहि संस्थेविषयीं अमर्याद प्रेम व विश्वास निर्माण करून ठेवावा लागतो. म्हणजे संस्थेवर कोणतेंहि संकट कोसळतांच समस्त जनता दुःखी कष्टी होते. संस्थेच्या झालेल्या कोणत्याहि अन्याय्य गांजणुकीमुळें तींत तीव्र असंतोष निर्माण होतो—ती शोकसंतप्त—हवालदील होते व एकमुखानें त्या कृत्याचा तीव्र निषेध जिकडून तिकडून होऊं शकतो. आंतून बाहेरून सर्व अंगांनीं ह्याप्रमाणें उत्पन्न झालेल्या जनक्षोभाला तोंड देण्याचें सामर्थ्य कोणाहि महाबलवंताजवळ असूं शकत नाहीं. प्रजापीडन संतापामुळें समुद्भूत झालेल्या दावानलाच्या प्रचंड वावटळींत महान् महान् साम्राज्येंहि भस्मसात् होऊन गेल्याचीं उदाहरणें इतिहास दाखवीतच आहे. साहजिकपणेंच अंगीकृत चळवळीविरुद्ध सत्ताशाहीचा अवश्यमेव होणारा रोधयुक्त प्रतिरोध थंड करण्यात समस्त २४ कोटी हिंदुजनतेचा प्रचंड दाब निर्माण करणें, हा एकच एक निर्वाणीचा उपाय श्रीमन्महाराजांना वाटला व त्या दृष्टीनें सार्वत्रिक उठावणी करण्याची योजना त्यांना आंखावी लागली.

पण या कोणत्याहि गोष्टीला न जुमानतां सत्ताधिकारी मुळांतच शुद्धि चळवळीस प्रतिबंध करूं लागले तर शुद्ध होऊं इच्छिणाऱ्या व्यक्तींना गोमांतक सीमेच्या लगतच्या ब्रिटिश सीमेंत नेऊन तेथें शुद्धिसंस्कार करण्याची तद्वतच त्यांचे विवाहविधि निर्धास्तपणें उरकण्याची भरपूर व्यवस्था करणें प्राप्त होतें. तद्वतच कांहीं जमीनदारांच्या स्वभाववैचित्र्याप्रमाणें कांहीं गावक्यांवर कदाचित् आपल्या शेतीवाडीला मुकण्याचाहि

प्रसंग ओढवणें शंभवनीय होतें. तेव्हां त्यांच्या पोटापाण्याची व्यवस्था गोमांतकांत व ब्रिटिश सीमेंत आश्रमप्रेमी अशा सज्जन सुशील व समंजस जमीनदारांकडे करुन ठेवणें श्रीमन्महाराजांना आवश्यक वाटलें.

खेरीज शुद्धीकरणाचा प्रश्न हा सर्वसामान्य जनतेला नवीनच असल्यामुळें दिर्घी अनुमति प्रस्तुत प्रकरणीं एकाएकीं मिळविणें शक्य नव्हतें. विधर्मीसंस्कृतीच्या शेंकडोशें वर्षांच्या भीषण मान्यामुळें हिंदु समाज स्वतःच्याच किनेक गोष्टी अंगदीं परक्या वा नवख्या दृष्टीनें पाहूं लागावा, हें स्वाभाविकच होतें. तथापि धार्मिक जीवन हाच हिंदु लोकांचा प्रधानजीवित हेतु असल्यामुळें समाज नियंत्रण करणाऱ्या धार्मिक संस्थांच्या योग्य अधिकारी पुरुषांवर त्यांचा विश्वास बसत नाहीं असें सहसा होत नाहीं. त्यांच्या उपदेशानुसार आपल्या आचार-विचारांत योग्य तो पालट करण्याची त्यांची तयारी असते. म्हणून प्रथम त्यांना यथार्थ धर्मरक्षणाच्या उचित कर्तव्याची स्पष्ट जाणीव कीर्तन-प्रवचनादिद्वारा करुन देऊन तें प्राप्त कर्तव्य शास्त्रविरोधी कसें नाहीं, तद्वतच त्याला सर्व शिष्ट व थोरथोर व्यक्तींचा आधार प्राचीन काळापासून कसा होता व सद्यःकालींहि आहे, हेंहि विद्यमान धार्मिक पीठाधिपतींच्या आधारानें पटवून देणें भाग होतें व त्या दृष्टीनें त्या त्या धार्मिक पीठांचा कार्याला पाठिंबा मिळविण्याची आवश्यकता श्रीमन्महाराजांना वाटली.

त्याचप्रमाणें कोणत्याहि कार्यांत विघ्नें हीं यावयाचींच. दुस्तर संकटांना तोंड दिल्याविना एकाएकीं कोणालाहि यशस्वी होतां येणार नाहीं. प्रत्येक कार्यांत खो घालण्यास सदैव तत्पर असलेल्या विघ्नसंतोषी व्यक्ती सदासर्वकाळीं समाजांत वावरत असावयाच्याच. कार्यकर्त्यांचा उत्कर्ष सहन न होऊन मत्सरानें त्यांचा उपहास करावा, त्यांच्या प्रत्येक गोष्टीला नाकें मुरडावीत, त्यांच्याविषयीं वाटेल त्या खोट्यानाट्या कंड्या पिकवून त्यांना जनतेच्या मनांतून खालीं उतरवावें, एवढेंच नव्हे तर प्रसंगीं स्वतःचें नांक कापून कार्याला अपशकून करावा, असा त्यांचा जन्मसिद्ध स्वभाव असतो. वैयक्तिक क्षुद्र स्वार्थासाठीं ते समाजाची केवढीहि हानि करण्यास मागेंपुढें पाहाणार नाहींत. साहजिकच अशा व्यक्ति शत्रुपक्षाच्या आयत्याच पथ्यावर पडतात व परस्पर त्यांच्या करवींच त्या कार्याला मूठमाती देण्याची मोठी मोहीम त्याला चालवितां येते. आपल्या वाग्जालानें समस्त जनतेची दिशाभूल करुन चळवळीचा ओघ पालटून टाकावयाचा व त्यायोगें शत्रुपक्षाकडून सक्रिय शाबासकी मिळवून, पुन्हा आपण जनतेचे हितकर्ते आहोंत असें जगाला भासवावयाचें हेंच त्यांचें मुख्य धोरण असतें. हें धोरण सिद्धीस नेण्यासाठीं त्यांनीं आंखलेले डाव फार खोल व जहरी स्वरुपाचे असतात, ज्यांची कल्पना सामान्य माणसाला कदापिहि करतां यावयाची नाहीं. साहजिकच अशा आपस्वार्थी, विघ्नसंतोषी, कार्यविघातक व पाताळयंत्री समाजकंटकांना बरोबर ओळखून त्यांच्या राक्षसी डावपेंचांतून चळवळ सुरक्षितपणें पार पाडण्याचें कार्य मोठ्या युक्तिबुद्धीनें व हिम्मतीनें करणें भाग असतें. कार्यघात होण्यास एकदोन क्षणहि पुरतात, पण कार्याची उभारणी करण्यास वर्षेंच्या वर्षें, आयुष्यांच्या आयुष्यें खर्ची घालावीं लागतात. 'काडीला माडी जाळतां येते, पण काडीला माडी बांधतां मात्र येत नाहीं' ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. अशा अवस्थेत अत्यंत चातुर्यानें व धीरोदात्त वृत्तीनेंच सर्व कामें व्यवस्थितपणें पार पाडावीं लागतात. अर्थातच कोणत्याहि चळवळीला प्राणभूत असणाऱ्या अशा ज्या मनुष्यबळ, द्रव्यबळ

इत्यादि गोष्टी त्यांच्यावर वरील सारख्या दुर्जनांच्या आकांडताडवानें कांहींहि परिणाम होणार नाहीं. एवढेंच नव्हे तर त्या सदैव त्यांच्या आटोक्याबाहेरच राहतील, अशी व्यवस्था किंवा कार्याची आंखणी प्रारंभापासून केलेली नसल्यास महत्परिश्रमानें उभालेल्या कार्याची लवकरच धुळधाण उडाल्याशिवाय राहाणार नाहीं, हें निःसंशय होय. म्हणूनच श्रीमन्महाराजांनीं वरील गोष्टी दृष्टीआड न होण्याची सावधानता प्रारंभापासून बाळगण्याचें उपयोजिलें होतें.

चळवळीला एकदां प्रारंभ झाला कीं, कोणता प्रसंग केव्हां व कसा उपस्थित होईल हें निश्चितपणें अजमावणें नेहमींच शक्य नसतें. ध्येयनिष्ठ व एकशिस्तीच्या कार्यकर्त्यांचा संघ हाच शत्रुपक्षीय हृदयांत महाभीति निर्माण करीत असतो. साहजिकपणें अशा ह्या अभेद्य संघाला कोठून तरी भोसका पाडण्यासाठीं शत्रुपक्षीयांचे अविरत प्रयत्न चाललेलेच असतात. कार्यकर्त्यांच्या प्रत्येक हालचालीचें सूक्ष्मपणें निरीक्षण करून त्यांची प्रत्येक गोष्ट वाटेल त्या मार्गानें हाणून पाडण्यासाठीं तर त्यांनीं चंग बांधलेला असतो. बाह्यात्कारी कार्यप्रेमाचा मोठा आविर्भाव आणून त्या संघांत शिर्गे मोडून घुसण्याचा प्रयत्न करण्यासाठीं कांहींजणांची नेमणूक अर्थातच केली जाते व लब्धप्रतिष्ठितपणें चळवळीचीं सूत्रें आपल्या हातीं घेण्याचा त्यांचा उपद्व्याप सुरू होतो. अर्थातच शत्रुपक्षाच्या ह्या अशा अनेकविध भेदक कुटिल प्रयत्नांना दाद न देणाऱ्या खंबीर, समयज्ञ व धोरणी पुरुषांचा कार्यक्षेत्रावर सतत पुरवठा करणें भाग असतें. अघाडीच्या तुकडीचें जरी कांहीं बरें वाईट झालें तरी तिची भूमिका तत्क्षणीं घेणारे—एवढेंच नव्हे तर संभाव्य असलेल्या पुढील पुढील महत्संकटांना यथायोग्य पद्धतीनें तोंड देऊं शकणारे असे—एकापेक्षां एक बरचढ वीर जय्यत तयार करून ठेवावे लागतात, व चळवळ निकरानें चालवावी लागते. ही गोष्ट लक्षांत घेऊनच श्रीमन्महाराजांनीं कार्याची आंखणी केली; तद्वतच मुख्य केंद्रांतून सर्व हालचालीचें नियंत्रण कसें शिस्तवार पद्धतीनें चालवावें लागेल, कार्यकर्त्यांशीं दळणवळण—पत्र व्यवहारादि गोष्टी शत्रुपक्षाच्या दृष्टिपथांत न येतील अशा सांकेतिक पद्धतीनें कशा ठरविल्या पाहिजेत; लांबवर दृष्टी फेंकून सर्व धोरणें कशीं व्यवस्थित पद्धतीनें व सावधानपणें सांभाळावीं लागतील इत्यादि स्वरूपाच्याहि कित्येक गोष्टींची विचारणा श्रीमन्महाराज करण्यास विसरले नाहींत. असो.

ह्याप्रमाणें शतकानुशतकें दुःसाध्य ठरलेला गोमांतकांतील प्रश्न सुसाध्य करण्याच्या दृष्टीनें श्रीमन्महाराजांनीं जी उपाययोजना आंखली ती स्थूलमानानें वरील स्वरूपाची होती. वस्तुतः सर्वमान्य प्रचलित पद्धतीला अनुसरून आपल्या बुद्धिसर्वस्वानें आंखलेली ही त्यांची योजना तावडतोब जनतेपुढें यावयास पाहिजे होती. तथापि परकी व कडव्या सत्तेखालील दूरच्या प्रांतांत करावयाची कामगिरी, पोर्तुगीजांचा गतेतिहास लक्षांत घेतां, ह्याप्रमाणें गाजावाजा करून संपादणें कधींहि शक्य व्हावयाचें नाहीं, ही गोष्ट सूर्य प्रकाशाइतकी स्पष्ट होती. ही योजना आधींच प्रसिद्ध करणें म्हणजे आपण होऊनच विघ्नसंतोषी व्यक्तींना कार्यनाशार्थ आमंत्रण देणें आहे, हें श्रीमन्महाराज संपूर्णतेनें ओळखून होते. सर्वसामान्य जनतेप्रमाणेंच ही योजना सर्वमान्य व वंदनीय पुढाऱ्यांपुढेंहि मांडण्यांत आली नाहीं. कारण, त्यांच्यापुढें प्रत्यहीं हजारों सुंदर योजना येतच असतात. तेव्हां त्या

प्रघातापेक्षां स्वकर्तृत्वानें अगोदर कार्य रंगारूपाला आणून नंतरच त्यांचा पाठिंबा व आशीर्वाद घ्यावा, असें त्यांनीं ठरविलें व एका क्षणाचाहि विलंब न लावतां श्रीमन्महाराज पुढील व्यवस्थेस लागले. 'आधीं करावें मग सांगावें' हा समर्थ पुरुषांचा दंडक कोणास शिरोधार्य वाटणार नाहीं ? योग्य उपायपूर्वक कोणतेंहि कार्य केलें असतां तें यशःसिद्धतेस जावें हें सर्वथैव योग्यच आहे. आणि म्हणूनच जो योग्य उपाय जाणतो तो दुस्साध्य कार्यहि सुसाध्यतेस नेतो, असें आचार्य चाणक्यांनीं म्हटलें आहे-'दुस्साध्यमपि सुसाध्यं करोति उपायज्ञः।'—आतां श्रीमन्महाराजांच्या ह्या उपाययोजनेप्रमाणें तें कार्य कसकसें यशःसिद्धतेप्रत गेलें, हें पुढील प्रकरणांतून पहावयाचें आहे.



# अचुक यत्न तो देवो ।



फक्त कार्याची सिद्धि जर कार्यातून वजा केली, तर त्या कर्त्याची जी पूर्वतयारी असते तिला प्रयत्न म्हणतात.

❀ ❀ ❀ ❀

दैव गतीच्या अपारिहार्य फेऱ्यांत सांपडून दुःखाच्या भोंवऱ्यांत गटंकळ्या खात असतांना नुसतेंच रडत बसण्यापेक्षांहि प्रातिकूल दैवगाति कशाने प्राप्त झाली याचा विचार करणें व दैवालाच बदलावयास लावणाऱ्या नवीन वर्तनाचा अंगीकार करणें हें अधिक शहाणपणाचें होय.

❀ ❀ ❀ ❀

उद्योग व निश्चय हीं परमेश्वर प्राप्तीचीं दोन चाकें आहेत. दैव हें तिसरे चाक कोणी म्हणतात. पण तें मला आजपर्यंत आढळलें नाहीं. उद्योग करून यश आलें नाहीं तरीहि दैव नाहीं; दैव अनुकूल करून घेण्याकरितां पुन्हां उद्योग केला पाहिजे. उद्योगापुढें दैवाला केव्हां तरी माघार घ्यावीच लागते. उद्योग झाला म्हणजे परमेश्वराचा पदर धरून त्याला विचारूं ! पण त्यापूर्वी उद्योग झाला पाहिजे.

❀ ❀ ❀ ❀

उद्योगाचें फल अमुकच होईल ही गोष्ट आपले हातीं नाहीं. म्हणून ईश्वरावर भार टाकून संतोषानें काम करावें व ईश्वरेच्छेला शरण जाऊन कसाहि प्रसंग आला तरी त्यास तयार असावें यांतच मनुष्याचा मोठेपणा आहे.

लो० टिळक.



## धर्मभास्कर श्रीविनायक महाराज मसुरकर.



सकळ जन तरावे । वंशाही उध्दरावे ॥
स्वजन जन करावे । रामरूपीं भरावे ॥

# अचुक यत्न तो देवो।



फक्त कार्याची सिद्धि जर कार्यांतून वजा केली, तर त्या कर्त्याची जी पूर्वतयारी असते तिला प्रयत्न म्हणतात.

❀ ❀ ❀ ❀

दैव गतीच्या अपरिहार्य फेऱ्यांत सांपडून दुःखाच्या भोंवऱ्यांत गटंकळ्या खात असतांना नुसतेंच रडत बसण्यापेक्षांहि प्रतिकूल दैवगति कशानें प्राप्त झाली याचा विचार करणें व दैवालाच बदलावयास लावणाऱ्या नवीन वर्तनाचा अंगीकार करणें हें अधिक शहाणपणाचें होय.

❀ ❀ ❀ ❀

उद्योग व निश्चय हीं परमेश्वर प्राप्तीचीं दोन चाकें आहेत. दैव हें तिसरें चाक कोणी म्हणतात. पण तें मला आजपर्यंत आढळलें नाहीं. उद्योग करून यश आलें नाहीं तरीहि दैव नाहीं; दैव अनुकूल करून घेण्याकरितां पुन्हां उद्योग केला पाहिजे. उद्योगापुढें दैवाला केव्हां तरी माघार घ्यावीच लागते. उद्योग झाला म्हणजे परमेश्वराचा पदर धरून त्याल विचारूं! पण त्यापूर्वी उद्योग झाला पाहिजे.

❀ ❀ ❀ ❀

उद्योगाचें फल अमुकच होईल ही गोष्ट आपले हातीं नाहीं. म्हणून ईश्वरावर भार टाकून संतोषानें काम करावें व ईश्वरेच्छेला शरण जाऊन कसाहि प्रसंग आला तरी त्यास तयार असावें यांतच मनुष्याचा मोठेपणा आहे.

लो० टिळक.



## धर्मभास्कर श्रीविनायक महाराज मसुरकर.



सकळ जन तरावे । वंशही उध्दरावे ॥
स्वजन जन करावे । रामरूपीं भरावे ॥

## प्रकरण ३ रें

# ध्येयसिद्धीच्या मार्गावर

सकळ जन तरावे, वंशही उद्धरावे ।
स्वजन जन करावे, रामरूपीं भरावे ॥ श्रीसमर्थ.

( श्रेणी १ )

उषःकालाला नुकताच प्रारंभ होत होता. सर्व रात्रभर वृक्षवनराजींत झोपीं गेलेला पक्षीगण हळूहळू जागत होऊं लागून आपआपल्या ठायींच किलबिल किलबिल शब्द करूं लागला होता. आपल्या मंजुळ व कर्णमधुर स्वरांनीं जणूं काय तो पक्षिसंघात प्रेमभरानें त्या जगदुद्धारक दीनानाथाची स्तुतिस्तोत्रेंच गात होता. प्रभातकाळीं मंदमंद वाहणाऱ्या वाऱ्याच्या योगानें पल्लवद्रुम डोलत होते—जसें कांहीं पक्ष्यांच्या भूपाळीचे सुंदर आलाप ऐकून हर्षनिर्भरतेनें ते तल्लीन होऊन गेले होते. अशावर्षींतच पूर्वदिशा थोडथोडी उजळूं लागली व उषादेवीनें भगवान् श्रीसूर्यनारायणाच्या स्वागताची जंगी सिद्धता चालविली. अशाच समयीं गोमांतकांतील एका वाडींतः—

" उठा उठा हो साधुसंत । साधा आपुलालें हित ॥
गेला गेला हा नरदेहो । मग कैंचा भगवंत ॥

ही भूपाळी उच्च व खड्या आवाजांत म्हटली जात होती. प्रातःसमयींच्या त्या प्रशांत व पवित्र वातावरणांत कर्तव्यजागृतीचे ते श्रेष्ठ बोल कर्णपथावर आदळतांच कोणत्या अंतःकरणांत प्रसन्नता उदित होणार नाहीं ? "अरे, खरोखरच ! आपलें कितीतरी आयुष्य व्यर्थ गेलें आणि केव्हांच असें संपूनहि जाईल. मनुष्य जन्माला आल्यासारखें व त्या मनुष्यत्वाला शोभेसें यशस्वी जीवित आपल्या हातून केव्हां घालविलें जाणार ? आयुष्य भराभर मार्गी लागलें आहे तें केव्हां संपेल ह्याचीहि निश्चिती नाहीं. काळरूपी चोर सारखा घिरट्या घालीत आहे; अशा अवस्थेंत आपण स्वस्थपणें घोरत कां पडलों आहों ? आपण जागे होऊन आपलें हित केव्हां साधणार ? सर्वांगांनीं घराला अग्नि लागली असतां सावकाशपणें व स्वस्थ मनानें झोपा घेणारा मी आत्महत्यारा नव्हे का ? भगवंताला विसरून मला काय प्राप्त होऊं शकणार ? अरेरे ! मी आपल्या आईला उगीच कष्टविलें असें होणार का ? मी या पृथ्वीला भारभूतत्व होऊन राहाणार ? छे ! छे ! ! आतां तरी आयुष्य व्यर्थ घालवावयाचें नाहीं. धरिल्या देहाचें सार्थक करून आनंदें तिन्ही लोक भरून टाकावयाचे, ' अशा स्वरूपाची विचारमाला प्रवृत्त करण्याचें ज्यांच्या अंगीं सामर्थ्य आहे ते शब्द निर्जीव कसे म्हणावयाचे ? भूपाळीचे उपरोक्त दोन चरण परत्परत घोळघोळूनच अत्यंत तन्मयतेंत म्हटले जात होते. हें उद्बोधक गीत ऐकतांच वाडींतील एकूणएक

मंडळी जागृत झाली व सर्वजण प्रातर्विधि उरकण्यास बाहेर गेले. तदनंतर सर्वांनी मिळून भक्तवत्सल प्रभूची मनोभावें प्रार्थना केली, ती अशीः—

( चालः—घनश्याम सुंदरा )

" रक्ष रक्ष ईश्वरा भारता। प्राचीना जनपदा।
भोगियली बहु जयें एकदां, वैभव सुखसंपदा ॥ धृ० ॥
सगरद्वीपाहुनी, सिंधु तो काश्मीरापासुनी।
कृष्णकुमारीकडे शांतिचें, राज्य देई पसरुनी।
प्रेमभाव धरुनियां पुत्र हे, ऐक्य करुत झडकरी।
कर्तव्या जागुनी करूं दे, कर्तव्यें हीं खरीं ॥
शाश्वत–सत्य–ज्ञान –दिवाकर उगवो हृदयांतरीं।
धर्मतेज देखुनी चकित हो, देववृंद अंबरीं ॥
गाढतमीं बुडतसे राष्ट्र हें, उद्बोधन या करीं।
कृपाकटाक्षें पुन्हां चढूं दे, वैभवशिखरावरी ॥
रोमरन्ध्रीं चैतन्य खेळवी, राष्ट्राच्या ईश्वरा।
सात समुद्रांवरी फडकुं दे, यशोध्वजा सुंदरा ॥
( चाल ) हे पार्थसारथे हे कंसारि विजयवंता,
हे एकवचन रामा, हे धनुर्धरानंता,
सोडी न यांसी विफला, हा काळ असे पडता।
आर्यपुत्र जरी अपात्र दिसले, घ्याया स्वीया पदा।
रक्ष भारता सहायहीना, ईशा चिर सौख्यदा ॥"

ह्याप्रमाणें आपल्या असंख्य स्तुतिपाठकांकडून आळविला गेल्यावर दर्शनोत्सुक भक्तजनांवर कृपावर्षाव करण्याकरितां भगवान् श्रीसूर्यनारायण पूर्वदिग्भागीं उदित झाला, व आपल्या अनंत रश्मिकरांनीं सृष्टिदेवतेवरील निराशारूप अंधकारपटल पूर्णपणें दूर सारून त्यानें सर्वांचीं हृदयें आशामय किरणांनीं व्याप्त करून सोडिलीं. गाई म्हशी चरावयास बाहेर येत होत्या. आसपासचे डोंगर, खडक, जलप्रवाह, वृक्ष, लता इत्यादि जडसृष्टि आतां स्पष्टपणें दृष्टिगोचर होऊं लागली होती. आतांपर्यंत स्वस्थानींच किलबिलाट करीत असणारे पक्षिवृंद भक्ष्य-शोधार्थ इतस्ततः संचार करूं लागले होते. मानवी सृष्टींतहि हालचाल सुरू होऊन जो तो आपआपल्या उद्योगाला लागत होता. ह्याच वेळीं काणकोण गांवांतील रस्त्यावरून एक पांचपंचवीस साधूंचा मेळा, तोंडानें—

सगुण चारित्रें परमपवित्रें हरिचीं वर्णावीं।
सज्जनवृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥
संतसंगें अंतर रंगें नाम बोलावें।
कीर्तनरंगीं देवासन्निध सूखें डोलावें ॥

जेणें करुनि मूर्ति ठसावे अंतरीं श्रीहरीची ।
ऐसी कीर्तन मर्यादा हे देवाचे घरची ॥
भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या ।
प्रेमभरें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ॥
अद्वय भजनें अखंड स्मरणें वाजवीं करटाळी ।
एका जनार्दनीं मुक्ति होय तात्काळीं ॥ १ ॥

हें एकनाथमहाराजांचें गीत मोठमोठ्यानें म्हणत एका रांगेनें चालला होता. मेळ्यांत पांच वर्षांपासूनचींहि मुलें होतीं. सर्वांनीं एकाच पद्धतीनें धोतरें नेसलेलीं होतीं. प्रत्येकाच्या डोक्यावर जटाभार होता, व हातांत दंड कमंडलु असून खांद्यावर धूतवस्त्राचे पिळे होते. सर्वांच्या तोंडावर दिव्यआनंद विलसत होता. एक मुलगा वरील गीताचा एक एक चरण सांगे व बाकीची मंडळी तो म्हणत. अशा क्रमानें मंडळी चालत चालत एका वाडीपाशीं येऊन थडकली. येथें वरील मुलानें 'जयजय रघुवीर समर्थ!' असा जयघोष केला, तेव्हां मंडळी थांबली व वाडींत त्या सर्वांनीं प्रवेश केला. हा मेळा पाहून गांवांतील लोकांचे अनेक तर्कवितर्क सुरु झाले. कोणी म्हणूं लागला 'कायहो हें साधूंचें पेव इकडे कुठें फुटलें!' तोंच दुसऱ्यानें म्हणावें 'अहो ही रामलीला असेल.' इतक्यांत तिसऱ्यानें म्हणावें 'अहो, फुटलें असेल कारवारच्या बाजूला एकादें तारूं त्यांतील ही मंडळी इकडील किनाऱ्याला लागली असतील!' त्याबरोबर एखाद्या भाविकानें पुढें होऊन म्हणावें. 'तसें नाहीं हो. ही सामान्य मंडळी दिसत नाहींत. त्यांच्या तोंडावरील तेज तर पहा. असा वाटेल त्याचा अपमान काय करावा!—' अशाप्रकारचे अनेक विचार जो तो आपआपल्यापरी करीत राहिला; पण कोणाचेंच समाधान न झाल्यामुळें विशेष उत्साही मंडळी त्यांच्या पाठोपाठ निघून आली. तेथें त्यांनीं पाहिलें तों सर्व मंडळी अग्नि चेतवून त्याच्या समोंवार वर्तुलाकार बसली होती. मध्यांचे दिवस थंडीचे नसतांना ही मंडळी अशी शेकत कां बसली आहे, ह्याचा उलगडा गांवच्या प्रेक्षक लोकांना होईना. इतक्यांत 'यत्ते अग्ने तेजस्तेनाहं तेजस्वीभूयासम्। यत्ते अग्ने वर्चस्तेनाहं वर्चस्वी भूयासम्। यत्ते अग्ने हरस्तेनाहं हरस्वी भूयासम्। ॐ स्वस्ति, श्रद्धां मेधां यशः प्रज्ञां विद्यां बुद्धिं श्रियं बलं। आयुष्यं तेज आरोग्यं देहि मे हव्यवाहन।' इत्यादि प्रकारचे मंत्र म्हटलेले त्यांच्या कानांवर पडले. तेव्हां त्यांना कळून चुकलें कीं, हें शेकणें नसून अग्नीच्याच उपासनेचा हा कांहींतरी प्रकार असावा. इतक्यांत मंडळी अग्नीची उपासना संपवून यथाक्रमानें निर्दिष्ट जागीं उभी राहिली व नंतर—

ध्येयः सदा सवितृमंडलमध्यवर्ती
नारायणः सरसिजासनसन्निविष्टः।
केयूरवान् मकरकुंडलवान् किरीटी
हारी हिरण्मयवपुर्धृतशंखचक्रः ॥

अशी सूर्यस्तुति करुन सर्वांनीं साष्टांग नमस्कार घालण्यास प्रारंभ केला. कांहीजण आधींपासूनच एका बाजूला कितीवेळ तरी नमस्कार घालीत असलेले त्या गांवांतील मंडळींना दिसून आले होते. नमस्कार

सेपवून हठयोगाचीं आसनें करण्यांत आलीं. तीं पाहून तर ग्रामस्थांस विशेषच मजा वाटली. शिस्तवार चाललेल्या ह्या गोष्टी पाहून ग्रामस्थ मंडळी स्वतःशीं कौतुकानें विचार करीत आहेत तोंच आंतल्या बाजूनें एक मुलगा त्यांच्याकडे आला. त्याच्या हातांत कांहीं पुस्तकें तद्वतच श्रीहनुमंताचीं चित्रें दिसत होतीं. त्या मुलानें बाहेर येऊन ग्रामस्थ मुलांना जवळ बोलविलें व त्यांना तीं चित्रें पुस्तकें दाखविलीं. तें मारुतीचें सुंदर चित्र व तीं लहान लहान पुस्तकें पाहून जो तो तीं मागूं लागला. तेव्हां त्या मुलानें सांगितलें कीं, 'जो कोणी नियमितपणें १२ साष्टांग नमस्कार घालील, त्याला हें हनुमंताचें चित्र मिळेल, २४ घालील त्याला मनोविकासाचें पुस्तक, ३६ घालील त्याला मनाचे श्लोक व ६० नमस्कार घालील त्याला हें मनःप्रभावाचें पुस्तक मिळेल,' ही अट ऐकतांच पुस्तकें मागणाऱ्या मंडळीचा घोळका एकदम मार्गे झाला. तेव्हां त्या मुलानें साष्टांग नमस्कारामुळें शारीरिक मानसिक व बौद्धिक उन्नति कशी घडून येते, खेरीज इतका हा अपरिमित लाभ करून देणारें हें साधन किती सोपें, विन खर्चाचें व स्वाधीनचें आहे हें त्यानें सर्वांना आपल्या मोहक वाणीनें पटवून दिलें; त्याबरोबर पुष्कळांना उत्साह चढून त्यांनीं नमस्काराचें मूल्य देऊन पुस्तकें व चित्रें घेण्याची आपली इच्छा दर्शविली व त्यांना त्याप्रमाणें नमस्कार घालण्यास शिकवून मुलानें त्यांस पुस्तकें व चित्रें दिलीं. ह्या सर्व प्रकार गांवांतील कांहीं मोठी मंडळी पहात होती. त्यांनीं त्या मुलाजवळ कोण कुठले, इत्यादि माहिती विचारुन घेतली. त्यावरून ही मंडळी सातारा जिल्ह्यांतील ब्रह्मचर्याश्रमापैकीं आहे, असें त्यांस कळलें. इतक्यांत खांद्यावर झोळ्या अडकवून बहुतेक मंडळी बाहेर पडली. ती मंडळी जी निघाली ती रस्त्यावरून "रघुपति राघव राजाराम! पतित पावन सीताराम!! जानकिजीवन रामनाम! सुंदर माधव मेघश्याम!!" असें भजन करीत करीत चालली. मधूनमधून घर लागलें कीं, तेथें उभें रहावें व मोठ्या धीर गंभीरपणें खड्या सुरांत:—

जगीं होइंजे धन्य या रामनामें। क्रिया भक्ति ऊपासना नित्यनेमें॥
उदासीनता तत्वता सार आहे। सदासर्वदा मोकळी वृत्ति राहे॥
भवाच्या भयें काय भीतोस लंडी। घरीं रे मना धीर, धाकास सांडीं॥
रघूनायकासारिखा स्वामि शीरीं। नुपेक्षी कदा कोपल्या दंडधारी॥
उठा रे उठा धर्म हा नष्ट झाला। असा टाहो सर्वत्र साधूंनीं केला॥
तयांच्या हाकेला तुह्मी सिद्ध व्हावें। असें देखुनी श्रीप्रभू राम धावें॥
भजा राम विश्राम योगीश्वरांचा। जपू नेमिला नेम गौरीहराचा॥
स्वयें नीववी तापसी चंद्रमौळी। तुम्हां सोडवी राम हा अंतकाळीं॥

अशासारखा एखादा श्लोक म्हणावा, तोंपर्यंत कोणीं कांहीं आणून भिक्षा वाढली तर घ्यावी, नाहींतर तसेंच पुढें निघून जावें. अशा क्रमानें सर्व गांवभर हिंडून मंडळी मुक्कामीं परत आली. बहुतेक सर्व झोळ्या रिकाम्याच परत आलेल्या होत्या. कारण, भिक्षा मागणाऱ्यांकडे तुच्छवृत्तीनें पाहण्याचीच बहुतेकांना संवय असते. त्यांतून तो भिक्षेकरी तासन्तास आर्जवें करीत घराबाहेर उभा राहिला तर चार दुणे रागारागानें त्याच्या तोंडावर फेंकलेजावयाचे; अर्थात् अशा वृत्तीच्या मालकाच्या घरांतून, कांहीं न मागणाऱ्या व श्लोक म्हणेपर्यंतच उभे राहणाऱ्या भिक्षूंना काय प्राप्ति होणार हें सांगावयास नकोच. बरें,

जो भाविक वर्ग भिक्षेकऱ्यांना कदापि विन्मुख पाठवीत नाहीं, त्या पुष्कळांकडूनहि वरील मंडळीला भिक्षा मिळूं शकली नाहीं; कारण, मुलांच्या तोंडून ते दिव्य श्लोक ऐकून त्यांचीं मनें इतकीं भरारून गेलीं कीं, भिक्षा घालण्याचें भान त्यांना उरलेंच नाहीं. थोडया वेळानें ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली त्या वेळीं ती मंडळी कितीतरी पुढें निघून गेली होती, तेव्हां कांहीं जणांनीं मुक्कामावर भिक्षा आणली तथापि गांवांतून आणिलेली भिक्षा एकदां श्रीचरणीं अर्पण केल्यानंतर मागाहून आलेली भिक्षा न घेण्याचा त्यांचा नियम असल्यामुळें त्यांना ती तशीच दुःखित अंतःकरणानें परत न्यावी लागली. भिक्षेचा हा कार्यक्रम होत होता त्याच अवधींत कांहीं मुलें गांवांतून भांडींकुंडीं व लाकडें पत्रावळी आणण्यासाठीं बाहेर गेलीं होतीं, तींहि आलीं. तदनंतर स्वयंपाक सिद्ध करण्यांत आला, व देवाला नैवेद्य दाखवून, सर्वांनीं तो प्रसाद मोठ्या प्रेमभरानें भक्षण केला. सामान्य दृष्टीनें विचार करतां, भाजी, आमटी, ताक, दूध, तूप इत्यादि जिन्नस कांहींहि नसतांना केवळ तो भात ( कारण भिक्षेंत तांदूळांव्यतिरिक्त कांहींच आलेलें नव्हतें ) भक्षण करतांना कोणाला आनंद वाटेल ? पण ज्यांना परमेश्वरी सेवेचा बिकट मार्ग आक्रमावयाचा त्यांना ही जिव्हालौल्याची सामान्य दृष्टि ठेवून कसें भागेल ? सर्व दुःखांचा उपशम करणारा परमेश्वरी प्रसाद! मग तो कोणत्याहि स्वरूपांत कां असेना तोच अशा उच्च ध्येयानुवर्ती लोकांना इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां खरी प्रसन्नता प्राप्त करून देऊं शकतो. असो. ह्याप्रमाणें भोजन इत्यादि आटोपून मंडळीनीं थोडीशी विश्रांति घेतली व नंतर संध्याकाळपर्यंत जो तो आपल्या अभ्यासांत मग्न झाला. अभ्यास संपवून मंडळीनीं सायंसंध्या व अग्निकार्य केलें व श्रीसमर्थांचीं करुणाष्टकें म्हणावयास प्रारंभ केला. करुणाष्टकें म्हणजे आधींच करुणरसानें ओथंबलेलीं त्यांतून तीं एकाग्र चित्तानें कोणी म्हणूं लागला म्हणजे मग प्रेमरसाच्या लयलुटीला सीमाच रहात नाहीं. 'तदनंतर सुश्राव्य असें भजन तासभर झालें. गांवांतील मंडळी देवळाकडे सारखी लोटत होती. कारण, भजनाचा कार्यक्रम संपतांच श्रीमद्भगवद्गीतेवर श्रीमन्महाराजांचें प्रवचन व्हावयाचें होतें. मंदिर स्त्रीपुरुषादिकांनीं अगदीं फुलून गेलें. नियुक्त वेळीं श्रीमन्महाराजांची स्वारी आली व तिच्याच्या शिरस्त्याप्रमाणें देवदर्शनास आंत गेली; पण, देवस्थानीं मूर्ति आढळली नाहीं. तेव्हां ग्रामस्थांनीं मागील पाद्रीशाहीची हकीकत सांगितली. पूर्वीच्या त्या अत्याचाराच्या भयंकर इतिहासाचें हें दृश्यस्वरूप पाहून कोणा जातिवंत हिंदुमाणसाला चीड व संताप येणार नाहीं ? पण त्या भावना जेथल्या तेथेंच दाबून टाकून श्रीमन्महाराज बाहेर प्रवचनासाठीं आले व आसनाधिष्ठित झाले. नंतर तास दीडतासपर्यंत अस्खलितपणें प्रवचनाचा ओघ चालला होता. मंडळी चित्राप्रमाणें तटस्थ बसली होती. प्रथम गीताग्रंथांची निःसीम थोरवी अनेक दृष्टांनीं सिद्ध करून दाखवून ज्या ग्रंथाची कथा म्हणजेः—

जें सकळां कौतुका जन्मस्थान । कीं अभिनव उद्यान विवेकतरूचें ॥
नातरी सर्व सुखाची आदि । जे प्रमेय महानिधी ।
नाना नवरस सुधाब्धि । परिपूर्ण हे ॥
कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळ पीठ ।
शास्त्र जातां विशिष्ट । अशेषांचें ॥
नातरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार ।
लावण्य-रत्न-भांडार । शारदेचें ॥

अशा स्वरूपाची आहे, ज्या कथेमुळें रसांना रसाळपणा आला, शब्दरूपी लक्ष्मीस सच्छास्त्रीयपणा लाभला व आत्मबोधाला विशेष शोभा आली, किंवा जिच्यापासूनच–

चातुर्य शहाणें झालें । प्रमेय रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें येथ ॥
माधुर्यी मधुरता । शृंगारीं सुरेखता ।
रूढपण उचिता । दिसलें भलें ॥

जी कथा ह्याप्रमाणें 'अद्वितीय उत्तम । पवित्रैकनिरुपण । ' व 'परम मंगल धाम ' आहे, व जी ह्या आपल्या अंगच्या अलौकिक तेजःसंपन्नतेमुळें आज हजारों वर्षे निखिलविश्ववंद्य होऊन बसली आहे. त्या कथेच्या अभ्यासाचें महत्त्व व आवश्यकताहि प्रतिपादण्यांत आली. तदनंतर ग्रंथनिर्मितीच्या वेळची कालपरिस्थिति, ग्रंथ सांगणाऱ्या श्रीकृष्णाची भूमिका व ग्रंथ ज्याला सांगितला त्या अर्जुनाची मनःस्थिति ह्या गीता ग्रंथाच्या अभ्यासासाठीं आवश्यक व प्रामुख्यानें विचार करावयाच्या गोष्टी सुस्पष्ट करून सांगण्यांत आल्या. श्रीकृष्णाचें अवतारकार्य हा विषय चालू असतांना तर श्रोते आनंदानें बेहोष होऊन गेले होते. कुलक्षय व तदंतर्गतभूत नाना सामाजिक अनर्थ व विपत्ति टाळण्यासाठीं वैयक्तिक प्राणहानि सुखानें स्वीकारणाऱ्या अर्जुनाच्या शोकसंमोहाचा उगम सामान्य जनांप्रमाणें वैयक्तिक सुखस्वार्थांत नसून तो संजयदिग्दर्शीमुळें उत्पन्न करविल्या गेलेल्या स्मृतिभ्रंशांत आहे. हा स्मृतिभ्रंश नष्ट करावयाचा तर स्वस्वरूपज्ञान झालें पाहिजे; इंद्रियें ज्याला ताप देऊं शकत नाहींत तोच त्या ज्ञानास पात्र होऊन अमृतत्वाप्रत जातो. परमेश्वरार्पणपूर्वक बुद्धीनें स्वकर्तव्यें आचरूनच पूर्वजांनीं ही गति साध्य केली. 'सर्व संसार परमेश्वराचा आहे, ' ह्या भावनेनें यथाप्राप्त कर्माचीच पूजा त्या व्याघनाला वाहून ते धन्य झाले. तसेंच विचारपूर्वक कर्तव्याचरण करून 'याचि जन्में येणेंचि काळें ' कोणालाहि ' संसारीं निराळें, होतां येईल व धारिल्या देहाचें सार्थक करून तिन्ही लोक आनंदानें भरून टाकतां येतील......' इत्यादि प्रकारची विचारपरंपरा, गीताशास्त्राधारें आधुनिक व प्राचीन दोन्ही पद्धतींनीं अगदीं निःसंदिग्धपणें आबालवृद्धांस समजण्यासारख्या दृष्टांतांनीं पटवून देण्यांत येत होती.

वरील प्रकारचें ज्ञानसत्र प्रतिदिनीं मुख्य नगरांत चालू असता दोन दोन चारचार मंडळीच्या कांहीं टोळ्याहि आसपासच्या लहान लहान गांवांतून व वाड्यांवराहि पाठविण्यांत आलेल्या होत्या. प्रत्येक तुकडीचा एकेक नायक असे, व त्याच्या शब्दाबाहेर कोणीहि पाऊलमुद्रां टाकावयाचें नाहीं अशी सक्त आज्ञा असे. प्रसंगीं वाटेल तें नुकसान झालें तरी चालेल, पण नायकाचा शब्द प्राणापलीकडे पाळावयाचा ही कडक शिस्त त्या प्रत्येक तुकडीस लावून दिलेली होती. कडक शिस्तींत वागणारी दोन माणसेंहि हजारों बेशिस्त माणसांना, पुरून उरतात. किंवा श्रीशिवरायांच्या शब्दांतच सांगावयाचें तर " दोन हृदयांचें ऐक्य झाल्यास डोंगर फोडतां येतो व मोठ्या जमावाच्या ठिकऱ्या उडवितां येतात." कार्यकर्त्यांच्या शिस्तवार वागणुकीवर किंवा त्यांच्या मधील एकसूत्रतेवरच कार्याचें यशापयश बहुतेक करून अवलंबून असतें. साहजिकपणेंच ह्या दृष्टीची अखंड वागणूक लोकव्यवहार करतांना कार्यकर्त्यांनीं बाळगणें अत्यंत उचित व आवश्यक असतें. लोकव्यवहार सांभाळणें ही गोष्ट सहजसोपी किंवा पुकाची नाहीं.

सामान्यतः लोकप्रवृत्तीचा विचार केला तर तिचा कल विवेकापेक्षां विकाराकडेच अधिक असतो. त्यांना त्यांची दिशाभूल समजून येत नाहीं; त्यांना त्यांचे दोष सांगणें ह्मणजे त्यांची वाटेल तशीं अनन्वित बोलणीं खाऊन, त्यांच्या रोषाला बळी पडणें असतें. अर्थात् त्यांना पथ्यकर असणाऱ्या गोष्टी अप्रिय न होतील अशा पद्धतीनेंच समजाऊन सांगाव्या लागतात. अशा प्रकारें जरी त्यांना कांहीं गोष्टी समजल्या तरी त्या उमजत नाहींत. कळून आल्या तरी त्या वळत नाहींत. त्यांच्या बहुतेक समजुती अगदीं ठराविक स्वरूपाच्या असतात. त्यांच्या विरुद्ध एक अवाक्षरहि काढणें अशक्यप्राय असतें. हे त्यांचे विचार किंवा समजुती हजारों वर्षांपासून चालत आलेल्या असतात व त्यांच्यांत फरक घडवून आणावयाचा तर तो मोठ्या दक्षतेनें व कुशलतेनें घडवून आणावा लागतो. अर्थात् कार्यकर्ता अत्यंत सावध साक्षपी व दक्ष असा असावा लागतो. त्याच्याकडे सर्वांची दृष्टि अत्यंत सूक्ष्मतेनें लागलेली असते. निंदक व मत्सरी दुर्जनांचा त्याला वाटेल त्या सूक्ष्मसूक्ष्म मार्गांनीं जनतेंतून उतरविण्याचा प्रयत्न चाललेलाच असतो. अशा अवस्थेंत सर्वांचे उदंड सोसून वैयक्तिक सुखाची यत्किंचितहि अभिलाषा न धरतां धीर गंभीर वृत्तीनें व निश्चल मनानें लोककल्याण वा लोकसेवा ह्या एकाच एक निश्चयांत अखंड तल्लीन होऊन राहावें लागतें. लोकांच्या कसोटीला उतरणें ही गोष्ट सामान्य नाहीं. जनतेचा विश्वास एकाएकीं कोणावरहि बसत नाहीं. बाह्य वेषानें कार्य कदापि साधत नाहीं " वेशानें कार्य साधेना । विवेकें कार्य साधतें । " ही समर्थांची उक्ति सुप्रसिद्धच आहे. लोक क्षणोक्षणाला त्या कार्यकर्त्याचें अंतरंग पारखीत असतात. जेव्हां त्याचें कार्य बहुतांच्या मनाला मानवतें तेव्हांच ते त्या व्यक्तीचा विश्वास धरतात. **' बोलण्यासारिखें चालणें । स्वयें करून बोलणें '** । असा ज्यांचा दंडक असेल **' तयांचीं वचनें प्रमाणें । मानिती जनीं । '** असा सिद्धांत आहे. अर्थात् अशीं हीं धकाधकीचीं कामें अशक्त व बावळट व्यक्तीला कशीं साधावयाचीं ? लोकसेवा हें असिधाराव्रत आहे, हें सतीचें वाण आहे, महंती ही सुळावरची पोळी आहे, ती भल्ल्याच माणसाला पचनीं पडत नाहीं. श्री. समर्थांनीं मोठ्या मार्मिकतेनें म्हटलें आहे:—

महंती सुखाची नाहीं । येथें दुःख उदंडही ।
उदंड दुःख लोकांचें । ऐकतां ऊर फुटतो ॥ १ ॥
लोक हे विकारी नाना । फार अन्याय वर्तती ।
पहावे ते किती डोळां । ऐकावे श्रवणें किती ॥ २ ॥
क्षमितां ऊर तो दाटे । बोलतां वाणि खुंटते ।
तऱ्ही ते मस्त मस्तीनें । वळतां वळतीच ना ॥ ३ ॥
वळिवां दुःख मानीती । अन्यायें घात नेणती ।
सांगतां हीत वाटेना । ऐकतां त्रास मानिती ॥ ४ ॥
झंझणिती चंचणीती । फंफणीती हटें हटें ।
हटें ते उद्धटे होती । आपबुद्धी असेचि ना ॥ ५ ॥
उद्धटें वर्तती क्रीया । उद्धटें शब्द बोलती ।
उद्धटें नास्ति मर्यादा । उद्धटें नास्ति नम्रता ॥ ६ ॥

उद्धटें गर्व वर्तावा । उद्धटें प्रीति नासती ।
उद्धटें आर्त तोडिती । उद्धटें प्रीति खंडती ॥ ७ ॥
अखंड सर्व सोसावें । भले-पणाचीं कारणें ।
परंतु सुखता नाहीं । कांहीं कांहीं क्वचीतही ॥ ८ ॥
सीण उदंड होताहे । नेणत्या संगती गुणें ।
जाणता संग भेटेना । दुःकाळ पडिला गमे ॥ ९ ॥
सज्जनें काय करावें । लोक मोठा अनावरू ।
कीं त्यासी काय सांगावें । मनांतून कळेचिना ॥ १० ॥
सज्जनीं फारसी निष्ठा । देव त्यासीच बोळतो ।
अन्याय वर्ततो तों तों । भ्रष्ट होतो अनावरू ॥ ११ ॥

साहाजिकच असा हा कठीण लोकव्यवहार कशा पद्धतीनें सांभाळावयाचा, लोकांचें मनोगत हातीं घेऊन त्यांस स्वधर्माचरणीं प्रवृत्त कसें करावयाचें, आपला व्याप कंटाळवाणा न होतां तो आटोपशीर कसा करावयाचा, वाटेल त्या अवस्थेंत स्वतःच्या मनाचा तोल अखंड कसा सांभाळावयाचा इत्यादि सर्व आवश्यक गोष्टींची यथार्थ जाणीव वरील तुकडींतील प्रचारकांना करून दिलेली होती.

याप्रमाणें नानायुक्ती–बुद्धींनीं भरलेल्या ह्या मंडळींच्या टोळ्या अगदीं दूरदूरच्याहि खेडयापाडयांत जात असत. प्रत्येक स्थळीं चारपांच दिवस वस्ती करावी; कीर्तनद्वारा व गोष्टीनिरूपणांनीं लोकांत स्वधर्मा-विषयीं प्रेम व आस्था निर्माण करावी; आपल्या निष्कलंक आचरणानें व प्रेमळ वागणुकीनें लोकांचीं मनोगतें स्वाधीन करून घ्यावीं; लोकपरिस्थितीचें सूक्ष्मपणें निरीक्षण करून त्याविषयीं सतत विचार करावा:—हे समस्त लोक धर्मप्रवण कसे होतील, बरें काय, वाईट काय, इष्ट' कोणतें, अनिष्ट कोणतें, कोणतें कृत्य तारक होईल, कोणतें मारक होईल, या परिवारांतील सुष्ट कोण, दुष्ट कोण, बोलघेवडे कोण, खरे कार्यकर्ते कोण, शूर कोण, कुकर्मी कोण, भ्रष्ट कोण व अंतर्निष्ठ कोण इत्यादि गोष्टींची चाळणा सतत करावी व त्याप्रमाणें सर्वत्र लोक शोध शोधून त्यांना भक्तीच्या गुणें बोधिल्यानंतर पुनश्च मुख्य मुक्कामावर यावें, असा त्यांचा क्रम चालत असे.

आश्रमीय तुकडयांच्या ह्या फेरींतील विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे या मंडळीचा खिस्ती लोकांशीं बदललेला संबंध हीच होय. ह्या लहान लहान गांवांतून बहुतेक खिस्ती लोकांचीच वस्ती अधिक असावयाची हिंदूंचें मंदिर आढळावयाचें नाहींच. कुठल्यातरी हिंदूच्या ओसरीवर मुक्काम ठोकावा, व भिक्षेंत जें ओलें कोरडें मिळेल तें खावें किंवा तसेंच रहावें अशा पद्धतीनें त्यांचा प्रवास चाले. ह्याच समयीं श्रीमन्म-हाराजांनीं वरचेवर सांगितलेल्या गावडे लोकांशीं ह्या मंडळींचा परिचय होई. त्या लोकांत मिळून मिसळून त्यांच्यापाशीं बोलणेंचालणें करावीं व ओळखी पाडण्याचा प्रयत्न करावा, व त्यांच्या आचारवि-चारांचा व चालीरीतींचा सूक्ष्मपणें अभ्यास करावा, असा त्यांचा क्रम चाले. अर्थातच ह्यासमयीं त्या गाव-ड्यांच्यापैकीं मोठया मोठ्यांच्या साशंक व भेदक दृष्टीनें गडबडावयाचें नाहीं, तरुणांचा उपहास व धिक्कार आनंदानें सहन करावयाचा व बायकामुलांच्या झालेल्या पावन्याबावन्या वृत्तानें मनाला हतोत्साहता

आणूं द्यावयाची नाहीं, अशा धीरगंभीरपणानें निश्चल मनानें व अत्यंत श्रद्धापूर्वक अंतःकरणानें ही मंडळी त्या लोकांत आस्तेआस्ते काम करीत फिरत असे. एखाद्या कार्याविषयीं तात्विक सिद्धांत अचूकपणें बांधणें जितकें कठीण असतें, तितकेंच किंबहुना त्याहीपेक्षां प्रत्यक्ष व्यवहार करणें अधिक कठीण असतें. प्रत्यक्ष कार्य करतांना आशेपेक्षां निराशेचा प्रांतच अतिविस्तीर्ण व दुस्तर असा असल्यामुळें, कार्यकर्त्यांच्या मनाची बैठक जर स्थिर नसेल तर त्याला यशाची अपेक्षा करण्याचें कारण उरणार नाहीं. हें कार्य परमेश्वराचें आहे, आपण केवळ निमित्तमात्र आहोंत; आपल्या वांट्यास हा कार्यभाग आला आहे तो प्राणाचीहि क्षिती न बाळगतां पार पाडणें हेंच आपलें कर्तव्य; निष्काम बुद्धीनें कर्म करण्यापुरताच आपला अधिकार आहे; ह्या उत्कट श्रद्धेनें व निश्चयानें कर्तव्यमग्न होणारेच यशाचे वांटेकरी होत असतात. ह्या दृष्टीनेंच, "रघुनाथ स्मरोनि कार्य करावें। तें तत्काळचि सिद्धि पावे। कर्ता राम हें असावें। अभ्यांतरीं॥" ह्या समर्थवचनावर दृढ विश्वास ठेवून आश्रमीय मंडळी खेडयापाडयांतील 'हरद्रा' चा (मनोभावचा) ठाव घेत घेत फिरत होती. त्या त्यांच्या अत्यंत परिश्रमपूर्वक चाल्लेल्या महत्प्रयत्नांत इतरांप्रमाणेंच त्यांनीं कांहीं खिस्ती गावडे मंडळीचें प्रेम संपादन केलें, व त्यांना श्रीमन्महाराजांच्या दर्शनासाठीं बरोबर घेऊन ते काणकोण मुक्कामीं आले.

आज काणकोण येथें मोठी गडबड उडून राहिली होती. कारण, श्रीमन्महाराजांनीं आपल्या नित्याच्या शिरस्त्याला अनुसरून कांहीं ग्रामस्थ मंडळीस मुक्कामावर प्रसादासाठीं बोलाविलें होतें. आश्रमाचा एकंदर कार्यक्रम पाहून सर्वांनाच आश्रमाविषयीं आत्मीयपणा वाटूं लागला होता. "या पवित्र ब्रह्मचाऱ्यांच्या झोळींत एवढे माझे चार दाणे पडावेत" या शुद्ध सात्विक विचारानें प्रत्येक घरांतून जमलेल्या भिक्षेवर होणारा प्रसाद, भाविक अंतःकरणानें सेवन करण्याकरितां सर्व मंडळी वाडींत एकत्र झाली होती. 'आहारशुद्धौ सत्वशुद्धिः' ह्या न्यायानें ज्या प्रकारचें अन्न पोटांत घालावें त्याप्रमाणें तो जीव बनत असतो. अर्थात् प्रस्तुतप्रसंगीं सेवन केल्या गेल्या परमेश्वरी प्रसादाच्या नुसत्या मीठ भातानें सर्वांच्या चित्तांत एक प्रकारची अननुभूत अशी प्रसन्नता निर्माण झाली होती, जिचें उत्कृष्ट प्रतिबिंब सर्वांच्या चेहेऱ्यावर स्पष्टपणें दृष्टिगोचर होत होतें. गावडे मंडळींनीहि प्रेमादरपूर्वक तो प्रसाद सेवन केला व नंतर त्यांनीं श्रीमन्महाराजांचें दर्शन घेतलें. त्या वेळीं त्यांना देवधर्मासंबंधीं पुष्कळशा गोष्टी सांगण्यांत आल्या. श्रीमन्महाराजांच्या दर्शनानेंच त्यांना विलक्षण आनंद झाला होता, त्यांत ह्या कित्येक गोष्टी ऐकून तर त्यांना त्यांच्या विषयीं विशेषच प्रेम वाटूं लागलें. ह्याप्रमाणें तो संबंध दिवस आश्रमाच्या सहवासांत काढून ती मंडळी आपआपल्या घरोघर गेली, व आश्रमहि आपला काणकोण येथील मुक्काम संपवून लोकांचा निरोप घेऊन मडगांवकडे निघाला. ह्यावेळीं सर्वांना जणूंकाय आपल्या घरांतीलच कोणी अतिप्रिय मंडळी परगांवास जावयास निघाल्याप्रमाणें वियोगदुःख झालें. त्यासमयीं, "समाधान साधूजनाचेनि योगें। परी मागुतें दुःख मोठें वियोगें" ह्या श्रीसमर्थांच्या उक्तीची सत्यता सर्वांना प्रत्ययास आली. जनतेचें हें निष्काम व निस्सीम प्रेम संपादन करणें, कितीकांच्या सामर्थ्यांत असतें!

आश्रमीय मंडळी मडगांवास आली. मडगांव हें फार प्राचीन काळापासूनचें मोठेंच शहर आहे. मडगांव हें पूर्वी 'मठग्राम' या शब्दांनीं ओळखत असत. एकेकाळीं गोमांतकाची येथें राजधानी

होती. वस्तुतः अशा नगरांत मुक्काम कोठें टाकावा ही पंचाइत यावयास नको होती. तथापि पाद्रीशाहीच्या सर्व भक्षक वावटळींत येथील शेंकडों मंदिरें जाळून पोळून उध्वस्त केलीं गेल्यामुळें हिंदुसाधुसंतांना नित्यआश्रयभूत होणारीं स्थानेंच नष्ट झालीं होतीं. पोर्तुगालचे राजे दों जुजे ह्यांच्या सत्तेखालीं जेशुइट पाद्र्यांची उचलबांगडी झाली, लोकांचे अनन्वित प्रकारें छळ करणारी धर्मसमीक्षण समाहि नष्ट झाली व हिंदूंचे पुष्कळसे त्रास कमी झाले. पण देवमंदिरें उभारणें, उत्सव मिरवणूकी काढणें इत्यादि गोष्टी निष्प्रतिबंधपणें होत नसत. पुढें १९१० मध्यें जेव्हां लोकसत्ता सुरू झाली तेव्हां कोठें हिंदुमंदिरें उभारण्यास उघडपणें अनुज्ञा मिळाली. अशा अवस्थेंत मोठमोठ्या गांवांतहि एकादेंच मंदिर दृष्टिपथात यावें यांत आश्चर्य तें काय ? त्यास अनुसरूनच मडगांवांतहि १९२४ सालीं बांधलेलें एक मोठें श्रीविठ्ठल मंदिर आहे. पण तेथें तिरस्कृत वेषाच्या गोसावी मंडळीला एकाएकीं थारा कोण देणार ? तेव्हां मंडळी श्रीमन्महाराजांच्या पहिल्या मुक्कामांत परिचयाचे झालेले सद्गृहस्थ श्री. नागेशराव सडेकर यांचेकडे गेली. त्यांनीं मोठ्या प्रेमानें आश्रमीय मंडळीस राहण्यासाठीं घर मोकळें करून दिलें. तेथें कांहीं दिवस मंडळींनीं मुक्काम केला; परंतु ही जागा गांवांतील मुलांबाळांना नमस्कारासाठीं तद्वतच भजन करणाऱ्यांसाठीं येण्यास दूर पडत असे ह्मणून आश्रमीय मंडळींनीं गांवांतील एका समाधीच्या जागीं येऊन मुक्काम केला. श्रीमत्स्वामी विवेकानंदहि आपल्या गोमांतकांतील मुक्कामांत याच समाधीच्या स्थानीं उतरल्याचें ऐकून मंडळीस आनंद झाला. लौकरच श्रीमन्महाराज मध्यंतरीं मुंबईस गेले होते, ते परत आले. इतक्यांत एक आनंदाची गोष्ट सर्वांस ऐकावयास मिळाली. एका थोर व कुलीन घराण्यांतील कांहीं मंडळी श्रीमन्महाराजांचा दर्शनास आली होती. त्यांच्यापैकीं एका व्यक्तीनें ' महाराज ! काल्च रात्रीं मला स्वप्न पडलें की आमच्या ह्या मडगांवांत कितीतरी तेजस्वी साधूमंडळी मोटारी भरभरून येत आहेत व 'हे पहा हे पहा' असें म्हणत आहे तोंच मला जागृती आली ! माझ्या आईनें मला घाबरून संपूर्ण जागें केलें. तेव्हां मी तिला सर्व स्वप्न सांगितलें. कालच्या स्वप्नाप्रमाणें आम्ही आज सकाळपासून शोध घेत आहोंत आणि आतां आपणां सर्वांना पाहून माझें स्वप्न खरें ठरल्याचें स्पष्ट दिसत आहे. असें बोलतां बोलतां त्या व्यक्तीला अगदीं गहिंवर आला. श्रीमन्महाराजांनीं त्यांचें सांत्वन करून त्यांस सांगितलें कीं, तुमची मनोभूमिका शुद्ध व सात्विक असल्यामुळेंच तुम्हाला असें हें सूचक स्वप्न पडलें, चिंता करूं नका, देवधर्मावर असें निरपेक्ष प्रेम करा. देव तुमचें कल्याण करील." ह्या अगदीं अनपेक्षित प्रकार पाहून सर्वांसच अचंबा वाटला. आश्रमीय मंडळीलाहि देवाचा साह्यकारी हात दिसून आल्यामुळें द्विगुणित उत्साह वाटूं लागला. एके दिवशीं नित्य आन्हिक कर्मे आटोपून मंडळी भिक्षेसाठीं गावांत गेली. पांच पंचवीस साधूंचें हें घोळकें गांवांत भिक्षा मागतांना पाहून पोलिसांत गडबड उडाली. लोकसत्तेच्या कायद्यानुसार भिक्षेला येथें बंदी आहे. आतां पर्यंतचे मुक्काम ल्हान ल्हान गांवांतून झाल्यामुळें ह्या प्रश्न उपस्थित झाला नव्हता. पण मडगांव हें मोठें शहर पडल्यामुळें साहजिकच भिक्षेला प्रतिबंध करण्यांत येऊन सर्व मुलांना पोलीस चौकीवर नेऊन आडकविण्यांत आलें. एक तासाभरांत ही बातमी सगळीकडे पसरली; तेव्हां पहिल्या फेरींतच श्रीमन्महाराजांचा परिचय झालेले प्रो. व्यंकटराव नाईक पोलीसचौकीवर गेले व तेथील युरोपियन अधिकाऱ्याची पुष्कळप्रकारें समजूत घातली. सन्मान्य नागरिक, वयोवृद्ध पुढारी व विद्वान्



श्री. पांडुरंग वामन बोरकर, बोरी (गोवा).



श्री. नारायण कृष्ण भावे (कुडाळ).

प्रोफेसर इत्यादि वऱ्याचशा नात्यामुळें व्यंकटरावांचा शब्द त्यांना अमान्य करतां येईना, व निरुपायानें त्यांच्या शब्दावर विश्वास टाकून त्यानें आश्रमीय मंडळीला गावांत भिक्षेची परवानगी दिली. ह्या गोंधळांत दोन तीन तास कोठेंच निघून गेले. तेव्हां मंडळी मुक्कामावर तशीच परत आली. त्यानंतर मागील गांवाप्रमाणेंच येथेंहि भजन पूजन नमस्कार प्रवचनादिकांचा कार्यक्रम करुन व समस्तांचें निःसीम प्रेम जोडून आश्रमीय मंडळी बोरीकडे गेली. मध्यंतरीं श्रीमन्महाराज मुंबईहून येण्यापूर्वी ब्र. वासुदेव महाराज आदिक शिष्यमंडळी मडगांवचे आसपास असणाऱ्या सावर्डे, काकोडे सांगे इत्यादि गांवीं धर्म जाग्रतीसाठीं गेली होती. प्रत्येक गांवीं ब्र. वासुदेव महाराजांचीं अत्यंत परिणामकारक व अश्रुतपूर्व अशीं कीर्तनें होत. लोक धर्मप्रेमांत अगदीं तल्लीन होऊन जात. ह्या छोटेखानी मुक्कामावरून लोकांना मुख्य मुक्कामावर जाण्याची उत्कंठा लागे. हजारों निरनिराळ्या प्रकृतीच्या व्यक्तींच्या गांठी भेटी व ओळखीपाळखी होत. सर्वांचें आश्रमावर निरपेक्ष प्रेम जडत असे. अशा प्रकारें आपले कार्यक्रम संपवून ही शिष्यमंडळी मुख्य मुक्कामावर आली. मडगांवाचा मुक्काम संपवून श्रीमन्महाराज थोडयाशा शिष्यांना बरोबर घेऊन मुरगांव येथें गेले होते. तेथें श्रीमान् शेटे यांच्या घरीं एक प्रवचन होऊन ही मंडळी बोरीस आश्रमास येऊन मिळाली. श्रीमन्महाराजांना गांवांत नेण्यासाठीं बोरीची ग्रामस्थ मंडळी नदीवर सन्मुख आली होती. मुक्काम श्री. पांडुरंगपंत बोरकर यांचे घरीं करण्यांत आला होता. नित्याप्रमाणें येथें कीर्तनप्रवचनादिक कार्यक्रम झाले. मुक्काम चालू असतां एक दिवस श्री. बोरकर ह्यांनीं आपल्या ओळखीचे कित्येक खिस्ती गावडे लोक मुक्कामावर बोलावून आणविले. त्यांच्याकरितां ह्मणून एक खास प्रवचनाहि करण्यात आलें व नंतर त्यांच्या मुख्याजवळ संभाषण करण्यांतच सर्व दिवस लोटला. श्री. पांडुरंगपंत बोरकर ह्यांचा कार्याचा उत्साह, कळकळ व तडफ पाहून श्रीमन्महाराजांस समाधान वाटलें. त्यांनीं आपल्या हातून आश्रमाची अल्पशी सेवा घडावी ह्मणन आग्रहपूर्वक अभ्यर्थना केली. तेव्हां श्रीमन्महाराजांनींहि यांस तशी सेवा सांगून यथायोग्य पद्धतीनें आश्वासित केलें. अशा पद्धतीनें येथील मुक्काम संपवून आश्रम दुर्भाट येथें तेथील लोकांच्या आग्रहावरुन गेला. जनतेला आश्रमाचे कार्यक्रम पाहून फारच आनंद झाला. येथें भंडाराहि करण्यांत आला. येथून मंडळी श्रीशांतादुर्गेच्या दर्शनासाठीं कवळयास गेली. लोकांच्या झुंडीच्या झुंडी आश्रमाचे कार्यक्रम पाहाण्यास येत. येथें एक प्रवचन व लहानसा भंडाराहि झाला. कवळ्यावरुन मंडळी मंगेशाकडे गेली. श्रीमंगेशावर लघुरुद्र करण्यांत आला. नित्याचे कीर्तन प्रवचनाचे कार्यक्रम झाले. नंतर मंडळी कुंडई बंदरावरुन म्हापशाकडे निघाली. हा प्रवास होडयांतून असल्यामुळें फारच मजेचा झाला. खाडीच्या दुतर्फा सुंदर सुंदर वाडया व मधूनमधून वसलेलीं लहान लहान गांवें फारच नयनमनोहर दिसत होतीं. आधींच गोमांतकाचा प्रदेश ह्मणजे निसर्गरमणीय त्यांतून सायंकाळची वेळ असल्यामुळें सृष्टीचें स्वरुप अतिशय मोहक भासत होतें. पण परमेश्वरसेवेकरतां आयुष्य घालविण्याचा ज्यांनीं संकल्प केला आहे त्यांना ह्या सृष्टिसौन्दर्याचा देखावा परमेश्वराभिमुख करण्यास कारणीभूत व्हावा यांत नवल तें काय ? साहजिकच आश्रमीय मंडळींचा करुणाष्टकें व भजनाचा कार्यक्रम सुरू झाला. त्या प्रशांत समयीं करुणस्वरानें परमेश्वराची होत असलेली ती प्रार्थना ऐकून भोंवतालच्या गांवांतील मंडळी प्रेमानंदभरानें कितीतरी वेळपर्यंत कांठाकांठानें होडया-बरोबर चालत येत असत. हें अपूर्व दृश्य पाहून कोणाचे सात्विक भाव जाग्रत होणार नाहींत ? अशा-

अकारें हा आनंदाचा प्रवास संपवून मंडळी सकाळीं म्हापसें येथें आली. मुक्काम श्री. लांजेकर यांच्या घरीं करण्यांत आला. मारुतीच्या मंदिरांत प्रवचन सप्ताह सुरू झाला. गोमांतकाचा टापू लहानसाच असल्यामुळे ह्या टोंकाची बातमी दुसरीकडे पोहोंचण्यास वेळ लागत नाहीं. आश्रमाच्या आगमनाची वार्ता सर्वत्र पसरली होती. प्रवचनाला अफाट जनसमूह लोटत होता. ग्रामस्थ मुलामुलींना नमस्कारासाठीं मंदिर अपुरें पडूं लागलें. सर्व शहरभर आश्रमाशिवाय दुसरा विषय नाहीं, असें झालें. इतक्यांत एकेदिवशीं पोलिसमॅनसाहेबांनीं आश्रमीय मुलें रस्त्यांतून भिक्षा मागतांना पाहिलीं. त्यावरोबर संताप चढून त्यांनीं सर्वांना पोलीसस्वाधीन केलें व एकदम गोवा सोडून जाण्याचा हुकूम फर्माविला. पोलीस मुलांना तसेच शहराबाहेर घेऊन जाऊं लागले. गांवांत ही बातमी समजतांच पुष्कळ मंडळींनीं कमांडरकडे विनविणी केली. त्याला नाना प्रकारें समजावून सांगितलें. पण तो ऐकेना, तेव्हां निरुपाय झाला. भर दुपारची उन्हाची वेळ, आश्रमीय मुलांना तसेच भुकेलेले तान्हेलेले रस्त्यांतून शहराबाहेर घेऊन जातांना पाहून सर्वजण एकदम हळहळूं लागले. पण सत्तेपुढें कोणाचें शहाणपण चालणार ! इतक्यांत एका व्यक्तीला एक उपाय सुचला व तो तडक कमांडरच्या घरीं जाऊन त्याच्या पत्नीला भेटला. घडलेला सर्व वृत्तांत सांगून तो गृहस्थ म्हणाला " बघा, तुमच्या यजमानांनें हांकलून लावलेले ते साधू मोठे तपस्वी आहेत. त्यांना आम्ही सर्वजण पूज्य मानतों. तुमच्या पाद्याप्रमाणेंच ते आमचे स्वामी आहेत. त्या मंडळींत अगदीं लहान लहान मुलेंहि आहेत. ही आतां भर दुपारची उन्हाची वेळ आहे. त्यांनीं खालेंप्यालेलें कांहीं नाहीं. तुमच्या यजमानांकडून ह्या साधूंचा जर अशा प्रकारें व्यर्थ छळ झाला तर त्यांचा तळतळाट तुमच्या मुलाबाळांना लागेल, हें लक्षांत ठेवा आणि मग तें कांहीं बरें होणार नाहीं. " हे त्या गृहस्थाच्या तोंडचे शब्द ऐकतांच ती कमांडरची पत्नी घावरली. ती ख्रिश्चन असली तरी तिचा साधूसंतांवर विश्वास होता; त्यांतून स्त्री जात पडल्यामुळें तिचें अंतःकरण कळवळलें व तांतडीनें उठून तिनें आपल्या नवऱ्याची समजूत घातली. तेव्हां गांवांतील लोकांकडून त्यानें एक अर्ज लिहून घेतला. नंतर आश्रमीय मंडळीची सुटका होऊन त्यांना एक आज्ञापत्र ( License ) देण्यांत आलें. हें प्रकरण धसाला लावून याचा योग्य न्याय निवाडा करतांहि आला असता, पण भलताच धस किंवा तरफ लावून पुढील कार्य नाशाची आपत्ति कोणता समंजस मनुष्य स्वीकारील ? अर्थात् ' अपमान पुरस्कृत्य मानं कृत्वा च पृष्ठतः ' हाच दंडक कार्यकर्त्यांना उपकारक आणि म्हणूनच अवलंबनीय असतो. हें प्रकरण चालू असतां जवळ जवळ सर्व गांव पोलीसचौकीवर लोटला होता. आश्रमीय मंडळीची सुटका होतांच सर्वत्र आनंदी आनंद झाला व ग्रामस्थांसमवेत सर्वजण मुक्कामावर परत आले. इतक्या भानगडी होईपर्यंत दुपारचे सहजच २-३ वाजले. आश्रमीय मंडळी धरून नेली हें ऐकल्यावर गांवांतील कित्येक मंडळींनीं अन्नग्रहण केलें नाहीं. असो.

येथील कार्यक्रम संपवून श्रीमन्महाराज मुंबईस आले. तदनंतर ब्र. वासुदेव महाराज कांहीं मंडळीस बरोबर घेऊन मोर्जी, शिवोली इत्यादि गांवांत प्रचारासाठीं गेले. नमस्कार, भजन, कीर्तन, भंडारा इत्यादि गोष्टींनीं त्यांनीं तिकडील सर्व वातावरण ' धर्ममय ' करून सोडलें. इकडील मुक्कामांत मंडळींचा कांहीं उच्च वर्णीय ख्रिस्ती कुटुंबाशीं परिचय झाला. बाह्य ख्रिस्ती वेशावरुन ह्यांच्या अंतरंगाचा एकाएकीं कोणाला परिचय होत नाहीं; पण थोड्याशा संबंधानंतर कांहीं निराळाच प्रकार दिसून येतो. कारण, हे ख्रिश्चन झाले तरी ते कांहीं आकाशांतून पडलेले नव्हत. शेंपाचशें वर्षांपूर्वी ते

हिंदुधर्मांतच वावरत होते–ते हिंदुधर्मीय होते; पण पुढील पाद्रीशाहीच्या घोळघाईंत कित्येकांनीं प्राण-रक्षणासाठीं तर कांहींनीं वतनवाडीसाठीं परधर्माचा स्वीकार केला. एकाद्या कुटुंबांत तीनचार भाऊ असले. तर एकानें खिस्ती व्हावें व बाकीच्यांनीं लपून छपून दिवस काढावे, असा क्रम चाले. ह्या पिढींत अर्थातच एकमेकांची एकमेकाला जाणीव होती व परस्पर प्रेमानें ते राहात होते;पण पुढील पिढींत ही गोष्ट विसरली गेली व संबंध तुटला. तथापि अशाप्रकारें खिस्ती धर्मात हीं कुटुंबें गेलेलीं असलीं, तरी त्यांच्यांत बहुशः जातिबंधनें पूर्वीप्रमाणेंच आहेत, म्हणजे बामण–खिस्ती, चारडे खिस्ती ( क्षत्रिय ), कुंभारखिस्ती, अशा जाती त्यांच्यांत आहेत. कित्येकांना मनांतून हिंदुधर्मा विषयीं फारच आदर वाटतो. पण बाह्यतः तसें दाखविणें त्यांना शक्य होत नाहीं. त्यांच्या पैकीं कित्येक कुटुंबांतून हिंदुदेवतांना गुप्तपणें नवससायास करण्याची पद्धति अद्यापिहि आहे. ही मंडळी अत्यंत भाविक व सात्विक वृत्तीची असते. ह्या मंडळीपैकींच कांहींचा परिचय आश्रमाशीं झाला. कांहींजण तर नित्य आश्रमांतून प्रसाद घेऊन जात असत. भिक्षेच्या वेळीं अर्थातच कांहीं ठिकाणीं ह्या खिस्ती कुटुंबांतून भक्तिपुरःसर भिक्षाहि वाढली जात असे !

अशाप्रकारें इकडील खेड्यापाड्यांत हिंडून मंडळी परत म्हापशास आली व मुक्काम पुढें पणजीस नेण्याचें ठरलें. म्हापसेकरांचें आश्रमावर निरतीशय प्रेम असल्यामुळें त्यांना आश्रम आतां दुसरीकडे जाणार हें ऐकून फारच वाईट वाटलें. जनीजनार्दनाला आपली सेवा मान्य होत आहे, हे पाहून आश्रमीय मंडळीस किती धन्यता वाटली असेल याची कल्पना वाचकांनींच करणें बरें.

ठरल्याप्रमाणें मंडळी पणजीस निघून आली. मुक्कामाला मंदिर तितकेसें सोईचें नसल्यामुळें श्री. जिवाजीपंत म्हाळ्ये दुभाषी, रामचंद्रपंत:कामत, रामकृष्ण मास्तर आदिक आश्रमप्रेमी मंडळींनीं एक स्वतंत्र बंगला मोकळा करून ठेविला होता. देवीचें दर्शन घेऊन मंडळी तेथें उतरण्यास गेली. पणजीस मुक्काम आला त्यावेळीं श्रीसमर्थ रामदासस्वामींचे पट्टशिष्य श्रीमत् कल्याणस्वामी ह्यांची पुण्यतिथि होती. साहजिक प्रतिवर्षीच्या आश्रमाच्या शिरस्त्याप्रमाणें येथेंहि पुण्यतिथीचा उत्सव मोठ्या थाटानें आश्रमाकडून साजरा करण्यांत आला. उत्सवानिमित्त श्रीमहालक्ष्मीचे मंदिरांत ब्र. वासुदेव महाराजांचीं प्रतिदिनीं अत्यंत रसाळ व प्रासादिक अशीं हरिकीर्तनें होत होतीं. अखंड रामनाम जपाचा पाहरा, पुराण श्रवण, दासबोध वाचन इत्यादि नैमित्तिक व नमस्कार भजन अष्टकें सवायी आदिक नित्याचे कार्यक्रम चाललेच होते. उत्सवाची सांगता म्हणून शेवटच्या दिवशीं महाप्रसाद करण्यांत आला. प्रसादास गांवांतील बहुतेक शिष्ट मंडळी मोठ्या प्रेमानें आली होती. उत्सवसमाप्तीच्या सुमारास श्रीमन्महाराजांची स्वारी मुंबईस श्रीमत् लक्ष–दासबोधाच्या कामासाठीं गेली होती, ती आली. एक वर्षभर प्रत्यहीं १२० साष्टांग नमस्कार व त्याच अवधींत ग्रंथाची दहा पारायणें करणें ह्या अटीवर लक्ष दासबोधाच्या प्रती गोमांतकांत प्रथमतः येथेंच वाटण्यास प्रारंभ झाला. पुष्कळ मुलामुलींनीं व स्त्रीपुरुषांनीं वरील अटीवर ग्रंथ घेतले. श्रीमन्महाराजांचा प्रवचनसप्ताह सुरू झाला. श्रीमहालक्ष्मीचें भव्य व विस्तीर्ण मंदिरहि श्रोत्यांना अपुरें पडूं लागलें. लांबलांबच्या गांवांहूनहि कित्येक मंडळी प्रवचनासाठीं येत असत. श्रीमन्महाराजांचा गीतेसारखा गहन विषय आबाल वृद्धांस सुलभतेनें पटवून देण्याची उत्कृष्ट हातोटी पाहून सर्वांस आनंद व कौतुक वाटे. त्यांच्या मुखांतून ज्ञानगंगेचे लोटच्या लोट वाहूं लागले

म्हणजे " सिद्ध प्रद्योचेन लाभें । मनचि सारस्वतें दुभें ॥ सकलशास्त्रें स्वयंमें । निघती मुर्खे ॥ " असा अनुभव श्रोत्यांस येऊन ते आनंदसागरांत पोहूं लागत. शिवाय विषय समजावून सांगण्याची पद्धत अशी "उद्बोधक व चित्ताकर्षक" असे कीं, कोणत्याहि व्यक्तीला आपल्या आवडत्या विषयावर एक निराळाच प्रकाश मिळाल्यासारखें होई. त्यामुळें आयुष्यांत निराशेला दूर लोटून कांहीं तरी वेगळे कर्तृत्व करून दाखविण्याचा उत्साह व उल्हास प्रत्येकाच्या ठायीं अवतीर्ण होत असे. त्यावेळीं गांवांत हिंडून पाहिलें तर सर्वांच्या मनीं मुखीं प्रवचनांतीलच विचार घोळत असलेले दृष्टीस पडत असत. इतकी तद्रूपता सर्वांस प्राप्त झाली होती. आश्रमाकडे प्रत्येकजण अगदीं आपलेपणाच्या दृष्टीनें पाहूं लागला. सरकारी हिंदु अधिकारी व पोलीस कामगार यांच्यातहि आश्रमाविषयीं प्रेमादर निर्माण झाला. कित्येक खिस्ती लोकहि कौतुकानें प्रवचनास येत. कित्येकांच्या घरांतून नियमितपणें भिक्षाहि वाढण्यांत येत असे. याप्रमाणें आश्रम सर्वांच्या प्रेमाचा विषय होऊन बसला.

याप्रमाणें मुख्य शहरांत सर्वत्र आनंदी आनंद चालला आहे त्याचवेळीं कांहीं शिष्यमंडळी पणजीच्या आसपासच्या गांवांतून परिभ्रमण करित होती. वेरें, नेरूल कालापूर इत्यादि ठिकाणीं नियुक्त पद्धतीनें कार्यक्रम करून मंडळी पणजीस परत आली.

असा कार्यक्रम चालला असतां एके दिवशीं सर्व मुलांना जुन्या गोव्यांतील प्राचीन व भव्य असणारीं खिस्ती मंदिरें दाखविण्यासाठीं नेण्यांत आलें. हीं मंदिरें गोमांतकाच्या जुन्या वैभवाची साक्ष देण्यासाठींच जणूं उन्हातान्हांत आज कित्येक वर्षें उभीं राहिलेलीं आहेत. त्यांची ती सध्यांची अवस्था पाहून प्रेक्षकाला विषण्णता वाटल्यावांचून राहात नाहीं. पण त्यांतल्यात्यांत हिंदु प्रेक्षकाला त्या मंदिरांचा पूर्वेतिहास झटकन् आठवतो व आपल्या पूज्य मंदिरांची विटंबना करून बनविलेलीं हीं खिस्ती देवळें किंवा मठ पाहून त्यांच्या हृदयाचें पाणी झाल्याविना राहात नाहीं. असेंच एक खिस्ती मंदिर मुलें पाहात होतीं. आंतल्या आंगाला एका भिंतीवर एक मलेंमोठें चित्र काढलेलें होतें. त्या चित्रांत एक पाद्री निरनिराळ्या पंथांच्या व जातीच्या हजारों हिंदूंना पाणी शिंपडून खिस्ती धर्माची दीक्षा देत आहे, असें दाखविलेलें होतें. हें दृश्य पाहून श्रीधर नांवाचा एक लहान बटू अस्वस्थ झाला व श्रीमन्महाराजांना त्यानें त्याविषयीं अनेक प्रश्न विचारले; तेव्हां श्रीमन्महाराज म्हणाले " अरे हेंच चित्र तूं आतांपर्यंत गोमांतकांत ठिकठिकाणीं पाहात आला नाहींस का ? आपल्या देवादिकांच्या बनविलेल्या ह्या दगडामातीच्या निर्जीव मंदिरांपेक्षां हिंदुधर्मातून हाडामांसांची जिवंत मंदिरें ( मनुष्यें ) हजारोंनीं परधर्मांत त्यांनीं नेलेलीं तूं आतांपर्यंत पाहात आलाच आहेस; तेंच कार्य कसें झालें हें या चित्रांत दाखविलें आहे."

यावर श्रीधर मोठ्या आतुरतेनें म्हणाला , "मग महाराज, हे सर्व लोक फिरून आपल्या धर्मांत नाहीं का आणतां येणार ?" "हो हो कां नाहीं ? पण तूं त्यांच्या साठीं मरण्यास तयार होशील का ?" असें त्यास महाराजांनीं विचारलें. त्यावर क्षणाचाहि विलंब न लावतां त्या बटूनें आपली बळकट तयारी दर्शविली. कारण, देवधर्मासाठीं व लोकसेवेसाठींच आपला जन्म आहे, हा एकच एक महत्त्वाचा धडा आश्रमांत प्रथमपासूनच गिरवावयाचा असल्यामुळें श्रीधरला मरणाचें कांहींच वाटत नव्हतें, व त्याला अनुसरूनच पुढें जेव्हां प्रत्यक्ष शुद्धिकार्य सुरू झालें तेव्हां श्रीधरचा आनंद गगनांत मावेना व कार्यकर्त्यांच्या धरपकडीनंतर आरणांत प्रत्यक्ष कार्यक्षेत्रावर पाठविण्याविषयीं त्यानें आपण होऊन श्रीमन्महाराजांजवळ विशेष

आग्रह धरला होता! पण काळानें वैर साधून श्रीधरावर अचानक झडप घातली व सर्व बेत जागच्या जागींच राहिले. बाळ, श्रीधर! तूं गेलास खरा, तथापि तुझें अल्पसें व बहुमोल जीवनचरित्र सर्वांस मार्गदर्शक व नवचैतन्यदायक झाल्याविना राहाणार नाहीं! असो.

आश्रमीय मंडळी ह्याप्रमाणे पणजीकरांत धर्मप्रेमाचें वारें संचरून वेरें मुक्कामीं गेली. येथें रायचंदरचे व्यापारी श्री. रामचंद्र नारायण लवंदे हे मुद्दाम श्रीमन्महाराजांच्या दर्शनासाठीं आले होते. गावडयांचें शुद्धिकार्य करण्यासंबंधींचे आपले विचार श्रीमन्महाराजांचे पुढें मांडले. त्यांचे धर्मप्रेम व कार्याची तळमळ पाहून श्रीमन्महाराजांनीं त्यांना यथायोग्य पद्धतीनें आश्वासित केलें. कित्येक दिवसांची आपली तळमळ शांत होण्याचा सुयोग आलेला पाहून समाधानानें ते निरोप घेऊन घरीं गेले. वेऱ्याचा मुक्काम यथोचितपणें पार पडला व मंडळी पेडण्यास आली. मुक्काम सीतारामविद्यालयांत झाला. देवीच्या मांदिरांत प्रवचनें झालीं. आश्रमाचा एकंदर कार्यक्रम पाहून पेडणें येथील व्हायकाउंट श्रीमंत रावराजे पेडणेकर यांस परम समाधान व संतोष वाटला. गांवांत नित्याप्रमाणें सर्व कार्यक्रम आटोपून श्रीमन्महाराज कांहीं मंडळीसह गोमांतकाबाहेरील आरोंद्यास गेले. व ब्र. वासुदेव महाराज प्रभृति कांहीं शिष्यमंडळी पानवेल, कुंभारजुवें, माशेल डिचोली, साखळी इत्यादि मार्गांतून मुक्काम करीत करीत आश्रमास जाऊन मिळाली. पानवेली येथें श्रीकृष्णराव तारकर यांचे घरीं विद्यार्थ्यांकरितां भंडारा झाला होता. त्या ठिकाणींच श्री. लवंदे यांनीं ख्रिस्ती गावडयांचे पुढारी वितोरीन, कायतान फिलीप, गोंसाळ, आंतोन मानुयेल व मानुयेल पावणा ह्यांस दर्शनार्थ आणले होते त्यांच्या समवेत पुष्कळसें संभाषण झालें. नंतर ते प्रसाद घेऊन घरोघर गेले व आश्रमीय मंडळीहि पुढें गेली.

## ( श्रेणी २. )

ह्याप्रमाणें खेडयापाडयांसुद्धां गोमांतकाचा बहुतेक सर्व भाग आश्रमीय मंडळींनीं निरीक्षून व परीक्षून सोडला; आणि त्याबरोबरच धर्मप्रेमाचा वन्हिहि सर्वत्र चेतवून दिला. जातिभेद, पंथ, भेद मतमतांतरें इत्यादि गोष्टी जागच्याजागींच राहून जो तो आश्रमावर प्रेम करूं लागला. गोमांतकीय जनतेची प्रेमसंपादणीची अशी ही महत्त्वपूर्ण प्राथमिक कामगिरी संपवून आश्रम गोमांतकाबाहेर पडला व गोमांतकाच्या सरहद्दीवरील ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रदेश आपलासा होऊन तो पुढील कार्यास विशेष प्रकारें साहाय्यभूत करून घ्यावा, एतदर्थ आश्रम त्या उद्योगास लागला. त्या दृष्टीनें दक्षिणेकडील कारवार जिल्ह्यांतील सदाशिवगड, कारवार अंकोला, होनावर, कुमठा, गोकर्ण इत्यादि ठिकाणीं, तद्वतच वरील बाजूला आरोंदा, बांदे, सांवतवाडी, वेंगुर्ले, मालवण, रत्नागिरी, आणि बेळगांव, खानापूर, लोंढा, इत्याळ धारवाड हुबळीपर्यंतच्या सर्व टापूंत आश्रमानें सारखे दौरे काढले. प्रस्तुतच्या महागाईच्या काळांत एकाद्या व्यक्तिलाहि घरांतून बाहेर पडून प्रवासास जाणें खर्चामुळें कसें जिवावर संकट ओढवल्यासारखे वाटतें ही गोष्ट सर्वांस माहीत आहेच. असें असतां पांचपंचवीस माणसांच्या टोळ्या देशाच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सारख्या फिरत ठेवण्यास केवढा अफाट खर्च सतत करावा लागत असेल, किती कष्ट, दगदग, परिश्रम, यातायाती सहन कराव्या लागत असतील, याची कल्पना सुज्ञ लोकांनांच करतां येईल. असो.

अशा प्रकारें गोमांतकाबाहेरील प्रदेशांत कार्यभाग चालला असतां आश्रमाची मुख्य केंद्रावरही दृष्टी कायम होतीच मागील दौऱ्यांत केलेल्या एकंदर सूक्ष्म अभ्यासाचा विचारविनिमय प्रत्यहीं चालूच होता. आतांपर्यंतचे गोमांतकांतील दौरे हे जरा व्यापक स्वरूपाचे झालेले होते त्यायोगें हिंदुसमाजांत सपाटून खळबळ उडाली, पण खिस्तीसमाजांत अद्यापि म्हणण्यासारखी जागृति निर्माण झालेली नव्हती. येथवर आश्रमाचा खिस्ती समाजाशीं संबंध आला होता. त्यांच्या कांहीं ओळखी पाळखीहि झाल्या होत्या; पण त्या हिंदुसमाजाइतक्या झाल्या नाहींत व तें होणें शक्यहि नव्हतें. तेव्हां आतां भोंवतालची सर्वसाधारण मनोभूमिका तयार केल्यानंतर, प्रत्यक्ष खिस्ती समाजाचें अंतरंग हस्तगत करण्याचा उपक्रम करणें क्रमप्राप्तच होतें; पण हें कार्य तसेंच जोखमीचें व विशेष कष्टसाध्य होतें. लोकांचीं मनोगतें स्वाधीन करून घेऊन त्यांना एका विशिष्ट ध्येयाकडे खेंचून न्यावयाचें ही गोष्ट सामान्य नव्हती. त्या लोकांना केवळ 'तुम्ही हिंदु व्हा' असें सांगून कार्यभाग उरकण्यासारखा नव्हता. उलट प्रथम दर्शनींच ही अशी भाषा त्यांनीं ऐकली तर विपरीत परिणाम घडून येऊन ते कायमचे विथरतील हा निश्चित अनुभव होता. अर्थात् आपण कोठें जात आहोंत ह्याची साक्षात् जाणीव त्यांना करून न देतां मोठ्या चातुर्यानें आस्ते आस्ते त्यांची मनोभूमिका इष्ट कार्याभिमुख करणें अवश्य होतें. साहजिकच जे कोणी ह्याप्रमाणें जीव जीवांत घालून व आत्मा आत्म्यांत मिसळून परांतराचा शोध घेतील, जे आपल्या मृदु शब्दांनीं नाना जनांचीं हृदयें निवावितील, सर्व लोकांस राजी राखून त्यांस जे हळूहळू पुण्यश्लोक करीत जातील, वैयक्तिक सुखदुःखाची किंवा मानापमानाची ज्यांस क्षिति वाटणार नाहीं, वाटेल त्या अडीअडचणींत जे निश्चल मनानें व धीरोदात्त वृत्तीनें आपलें कार्य करीतच राहतील ह्मणजेच समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें.—

जयास यत्नची आवडे । नाना प्रसंगीं पवाडे ।
धीटपणें प्रगटे दडे । ऐसा नव्हे ॥
सांकडीमध्यें वर्तों जाणें । उपाधीमध्यें मिळों जाणे ।
अलिप्तपणें राखों जाणें । आपणासी ॥
जो मनोगतांचीं अंगें जाणें । मान प्रसंगसमयो जाणें ।
संतप्तांलागीं निवऊं जाणें । नाना प्रकारें ॥
दुर्जनांसी राखों जाणें । सज्जनासीं निववूं जाणे ।
सकळांचें मनीचें जाणें । ज्याचें त्यापरी ॥
समयीं धीर सांडीना । यत्नीं यत्न वरा करी ।
हिंडतां पारखी लोकां । कार्यकर्ता जिवीं धरी ।
मैत्रिकीहि विटोंनेदी । सर्वांसी सारिखा दिसे ।
विचार जाणतो मोठा । दक्ष तो जाणता जनीं ॥

अशा गुणांची कार्यकर्ती व्यक्ति असावी लागते. तथापि असे सगळेच गुण झाले तरी कांहीं ते सर्वसामान्यतः एकाएकीं कोणाच्या अंगीं येऊं शकत नाहींत.परंतु 'अमुक गोष्ट नाहीं' म्हणून रडत बसणें

हें पुढारीपणाला अनुचित असतें. प्रत्येक प्राण्यांत कांहीं विशिष्ट गुणधर्म असतातच. ते गुण ओळखून त्यांचा यथायोग्य पद्धतीनें उपयोग करुन देणें व त्या व्यक्तीचा विकास करीत करीत पुढें कार्यभाग चालविणें हें पुढाऱ्याचें कर्तव्य असतें. मनुष्य सर्वगुणसंपन्न होऊन नंतर तो कार्यांत घातला जावा, ही गोष्ट जरी इष्ट असली, तरी तो पूर्णतेस येईपर्यंत जगाचे व्यवहार कांहीं थांबलेले नसतात. पोहण्याची कला आल्याविना पाण्यांत पडतां येत नाहीं व पाण्यांत पडल्याविना पोहण्याची कला साध्य होत नाहीं, अशाच स्वरुपाचा हा अवघड पेंच आहे. तेव्हां ज्याप्रमाणें गटांगळ्या खातां खातांच मनुष्य पोहावयास शिकतो, त्याचप्रमाणें कार्य करतां करतांच मनुष्य त्या कामांत प्रवीण होऊं शकतो, हें लक्षांत घेऊन, आस्ते आस्ते अल्पशा मांडवलावरच प्रारंभ करणें पुढाऱ्याला भाग पडतें; परंतु अशा पद्धतीच्या कार्यारंभांत एक मोठा धोकाहि असतो. जसजसें कार्य होऊं लागतें तसतसें जनतेच्या दृष्टीपुढें कार्यकर्त्या व्यक्ती येऊं लागतात व जनता त्यांना कृतज्ञतेनें व प्रेमादरानें वागवूं लागते. वस्तुतः जनतेकडून जो हा त्यांचा मान होऊं लागतो, तो त्या व्यक्तींचा नसून त्या पुण्यकर्माचा असतो. पण ही गोष्ट त्या अर्ध्या अवस्थेंतील प्रचारकांच्या लक्षांत येत नाहीं. जनता गौरव करीत आहे तो कार्याचा नसून आपलाच आहे, आपल्या सामर्थ्यामुळेंच हें कार्य होत आहे, आपली योग्यताच अशा प्रकारची आहे, अशी अहंकाराची भावना जागृत होते. मग लोकैषणा अनावर होऊन बाकीच्या सहाध्यायांचा सहवास खपेनासा होतो. शिलाई आवडूं लागते व वैयक्तिक विकासाच्या दृष्टीनें घालून दिलेली आचारविचारांचीं बंधनें रुचेनाशीं होतात. कार्यसंपादणींत सांगितलेली आपद्धर्ममूलक वागणूक हीच निसर्गाची होऊन बसते. संस्थेला प्राणभूत असणारे शिस्तीचे नियम बंधनकारक वाटूं लागतात व त्या बंधनांतून एकदां कसें बसें निसटून स्वातंत्र्यानें वावरण्यासाठीं संस्थेतून बाहेर पडण्याची अनावर इच्छा होते. ह्या अशा अवस्थेंत त्या व्यक्तीची ती चंचल मनोवृत्ती संस्थेचा नाश करण्यास टपलेल्या शत्रुपक्षाच्या दृष्टोत्पत्तीस येते व संस्था ठार मारण्यास हें सावज त्यास आयतेंच पथ्यावर पडतें. मग त्या व्यक्तीच्या कामाच्या लोभाच्या चैनीच्या वा क्षुद्र सुखस्वार्थाच्या नीच वृत्ती चाळविल्या व चेतविल्या जातात. तेव्हां जिवाचे कोड पुरविणारी ही मंडळी त्या व्यक्तीची उघडच 'सुहृन्मित्र'–जिवलग स्नेही होतात. डोळ्यांवर धुंदी चढते. शत्रुमित्राची परीक्षा होत नाहीं. शत्रूच्या मोहक वाग्जालांत ती व्यक्ति पुरेपूर आडकते व आपले सहाध्यायी आप्तेष्ट वा गुरुजन ह्यांनीं सांगितलेली कोणतीहि हिताची गोष्ट ऐकण्याची तिची तयारी नसते. आपलीं माणसें उलट द्वेष्यतेच्या कोटींतच ढकललीं जातात. शत्रूच्या नादीं लागून त्यांची वाटेल तशी नालस्ती करण्यांत येते. स्वतःची प्रष्टता साळसूदपणें लपवून संस्थेवर प्रेम करीत असणाऱ्या सात्विक सज्जन व सरळ माणसांचा भलताच गैरसमज करुन देण्यांत येतो. एवढेंच नव्हे तर ज्यांनीं आपल्याला लहानाचे मोठें केलें, ज्यांच्या मुळें आपलें जगांतील अस्तित्व शक्य झालें, ज्यांनीं आपणांस नांवलौकिकास चढविलें, त्या उपकारकर्त्यांना अडविण्याचा, त्यांना संकटांत घालण्याचा, त्यांचा प्रत्यक्ष नाश करण्याचाहि नीचतम प्रयत्न तो निश्चयानें आत्मविनाशमूलक असतांहि–अंगीकारला जातो.

परंतु कार्यांत घातलेल्या व्यक्तींची चाळवाचाळव जशी वरीलप्रमाणें बाह्य गोष्टींमुळें होऊं शकते तशी ती निसर्गतःहि होण्याचा संभव असतो. प्रकृति–स्वभावानुसार मनोवृत्तींत पालट होणें अशक्य नसतें.

जो मनुष्य आज सात्विक, प्रामाणिक, पवित्र वा शुद्धमनाचा दिसत आहे तो उद्यां तसाच राहील असा भरंवसा देतां येत नाहीं. त्याच्या मनोवृत्तींत उदयास्त, चढउतार किंवा उत्पत्ति, स्थिति, लय ह्या अवस्था होतच असतात. ज्या मानानें त्या समाजाचा, जातीचा वा कुटुंबाचा विकास झालेला असेल त्या मानानेंच उच्च वा नीच संस्कार त्या त्या व्यक्तीच्या ठायीं प्रतीत झाल्या विना रहात नाहींत. अर्थातच त्या व्यक्तीवर श्रेष्ठ प्रतीचे संस्कार करून तिला उन्नतावस्थेस नेत असतांना, ती आपल्या मूळ स्वभावावर केव्हां व कशी जाईल ह्याचा विश्वास नसल्यामुळें, सूत्रचालकाला फारच दक्षतेनें सर्व कार्यभाग अशा व्यक्तीकडून पार पाडून घ्यावा लागतो. कार्यकर्त्यांच्या ह्या अस्थिर स्वभावविशेषाला अनुलक्षूनच श्रीसमर्थांनींहि—

" आपल्या मनासि रोधावें । परांतर शोधावें ।
क्षणक्षणां सांभाळावें । बदलेल म्हणोनी ॥ "

अशी सावधानतेची सूचना देऊन ठेविली आहे.

अर्थातच ह्या सर्व गोष्टी विचारांत घेउन, गोमांतकांतील कार्यासाठीं श्रीमन्महाराजांनीं कांहीं प्रचारकांची एक तुकडी वे. शा. सं. विष्णु रामचंद्र मोडक शास्त्री, ब्र. आनंदमूर्ती व ब्र. गणपतीबुवा ह्यांच्या नेतृत्वाखालीं पाठविण्याचें निश्चित केलें. हिंदुपदपादशाहीच्या त्या हृदयंगम काळांत ज्याप्रमाणें प्रत्येक मराठ्या वीराला आपला पराक्रम दाखविण्याची संधि प्राप्त झाली असतां अवर्णनीय आनंद होत असे, त्याचप्रमाणें प्रस्तुत प्रसंगींहि वरील त्रिमूर्तींची अवस्था झाली; पण वस्तुतः ह्या प्रचारकांना साधावयाची कामगिरी वरील वीरांपेक्षांहि अधिक अवघड होती. कारण तो काळ सध्यांच्या इतका निकृष्ट अवस्थेस गेलेला नव्हता. जनता सध्यांइतकी स्वाभिमानशून्य व परवशतेच्या दुर्गतींतील हजारों दुर्गुणांनीं युक्त बनलेली किंवा बनविली गेलेली नव्हती. खेरीज त्यांच्याजवळ सत्ता, सामर्थ्य व वैभव ह्याहि गोष्टी होत्या; पण ह्यांपैकीं एकहि गोष्ट अनुकूल नसतां केवळ परमेश्वरी कृपेवर व सद्गुरुवचनावर श्रद्धा ठेवून गोमांतकासारख्या दूरच्या व परकी सत्तेंतील प्रांतांत, कीं, जेथील सत्ताधिकाऱ्यांचें धर्मवेड विश्वतोमुख झालेलें आहे, तेथें आज ४०० वर्षे परधर्मांत खितपत पडलेल्या लोकांना नवचैतन्य देऊन त्यांना स्वधर्मासाठीं मरणहि पत्करण्यास उद्युक्त करावयाचें ही गोष्ट सामान्य कशी ह्मणावयाची? साहजिकपणेंच अशा ह्या असामान्य कामगिरीवर पाठवितांना त्यांना यश चिरण्यासाठीं आश्रमीय मंडळींनीं परमेश्वराची मनोभावें प्रार्थना केली. श्रीमन्महाराजांनींहि ह्या वेळीं विशेषत्वानें त्यांना अनेक युक्ति-बुद्धीच्या सूचना देऊन आशीर्वादपूर्वक निरोप दिला. श्रीसमर्थांच्याच शब्दांत ह्या सर्व सूचनांचा तात्पर्यार्थ द्यावयाचा तर तो असा देतां येईलः—

बोलावें न्यायनीतीनें । मर्यादा राखणें जनीं ।
अभ्यास करावा आधीं । साळवंद पाठांतरें ॥
प्रसंगमान जाणावें । वागावें बहुतांपरी ।
भक्तिभाव असों द्यावा । घालावा भार ईश्वरीं ॥
प्रत्यहीं मागणें भिक्षा । मिळाली न मिळे तरी ।
नित्य नूतन हिंडावें । धुंडावे भक्त प्रेमळ ॥



वे. शा. सं. शास्त्रीबुवा.



ब्र. आनंद मूर्ति.



ब्र. गणपतीबुवा.

कथा ते करावी आधीं । बाधी ते दुराशा नको ।
उपाधी आतळावेना । जावेना वैभवाकडे ॥
सर्वत्र लोक शोधावे । बोधावे भक्तिच्या गुणें ।
रहावें दुर्बळाचेथें । देवाल्यीं कां नदीतिरीं ॥
पर्वतीं उदकापासीं । सन्निधचि येकीकडे ।
फार येकांत सेवावा । अभ्यास नित्य नूतनू ॥
साहावी शीत उष्णादि । पाहावीं रम्यशीं स्थळें ।
करावें आपणें कष्ट । बांधावे ते हळुहळू ॥
उदटें बोलणें खोटें । बोलावीं मृदु उत्तरें ।
वादवेवाद तो खोटा । दाटावा मद मत्सर ॥
वोळखी कराव्या दाटा । येके ठायीं स्थिरों नये ।
भक्तीस लोक लावावे । पावावे परपारतें ॥
अत्यंत साक्षपी व्हावें । न व्हावें आळसी कदा ।
पुण्यमार्ग प्रतिष्ठावा । लावावी धर्मवासना ॥ ... इ० इ०

सद्गुरुमुखांतील हीं अमृतवचनें मस्तकीं धारण करून व अंतःकरण-संपुटांत मोठ्या प्रेमादरानें तीं साठवून उपरोक्त तिघे आश्रमीय प्रचारक गोमांतकांत येऊन दाखल झाले. गोव्यांत आल्यावर आश्रमीय प्रचारकांनीं प्रथम पेडणें, म्हापसें, पणजी, मडगांव इत्यादि प्रमुख ठिकाणच्या पूर्वपरिचित व्यक्तींच्या गांठी भेटी घेतल्या. नमस्कार व पारायणें करण्याच्या अटीवर आश्रमीय वाङ्मय स्वीकार-लेल्या जागोजागच्या व्यक्तींना त्यांनीं एकत्र बोलावून आणून त्यांना पुनरपि नवचेतना दिली. एकाद्या दिवसाचें व्रत सांभाळणें किंवा एक दिवस नियमांत राहणें सुलभ असतें. पण तेंच व्रत, नियम किंवा अट दिवसांचे दिवस व महिनेच्या महिने सतत पाळीत राहणें ही गोष्ट मी मी म्हणणाऱ्या मोठ्या एक-निष्ठांतहि शक्य होत नाहीं. अंगीकृत गोष्टींत मधूनमधून शिथिलता येणें स्वाभाविकच आहे; पण या अशा शैथिल्याच्या प्रसंगींच जर त्या व्यक्तीला एखादा साह्यकारी व सन्मार्गदर्शक हात मिळाला तर ती व्यक्ति सावरून पुढें गेल्यावांचून राहत नाहीं. ह्या प्रचारकांच्या आगमनानें सर्व मंडळींत पुनरपि नवजागृति उत्पन्न झाली. भजन, अष्टकें, नमस्कार, इत्यादि पद्धतींच्या उपासनेला पुनश्च जोर आला. याप्रमाणे कांहीं दिवस सर्व कार्यक्रम प्रचालित केले जात होते. त्याच सुमारास महाराष्ट्र-हिंदुसभेचे अध्यक्ष पुण्याचे सुप्रसिद्ध विद्यानिधि, सिद्धेश्वर शास्त्री चित्राव हे गोमांतकांत आले. ठिकठिकाणीं आश्रमीय कार्याचा व्याप पाहून त्यांना सानंद कौतुक वाटलें, व तसे धन्योद्गार त्यांनीं ब्र. आनंदमूर्तीजवळ पणजी मुक्कामीं काढले. एवढेंच नव्हे तर पुण्यास परत आल्यावर त्यांनीं मुंबईच्या श्रद्धानंद पत्रांत आपल्या दौऱ्याचें जें प्रतिवृत्त प्रसिद्ध केलें त्यांतहि त्यांनीं आश्रमीय कार्याचा गौरवपर उल्लेख केला. असो. सर्व मोठमोठीं गांवें घेऊन आश्रमीयांनीं पणजीस देवीच्या मंदिरांत तळ दिला व तेथून आसपासच्या खेडोखेडीं जाण्याचा उपक्रम नित्य सुरु ठेवला. पोणत्यादी

एकाद्या गावांत जावें, एखाद्याच्या वाडींत ओटीवर किंवा झाडाखालीं मुक्काम करावा, मिश्र करून आपलें भजनपूजन अखंडपणें चालू ठेवावें. गांवांत कोणी साधू आले आहेत म्हणून साहजिकच भिन्नभिन्न प्रवृत्तीचे लोक निरनिराळे हेतु मनांत धरून त्यांच्या मुक्कामावर येत. कित्येकजण भाविक वृत्तीनें प्रेमभरानें येत तर कित्येकजण नाल्स्ती करण्याकरितां, तर कित्येकजण पाणी जोखून टर उडविण्याकरितां, आणि कित्येक तर स्वार्थ संपादण्यासाठींहि येत. त्या कोणावरहि न रागावतां :किंवा न संतापतां शांत चित्तानें त्या सर्वांचें यथायोग्य पद्धतीनें समाधान करावें:—

सद्बुद्धि सांगणें लोकां । जेणें ते सुख पावती ।
प्रसंग राखणें आधीं । सोसावे बहुतांपरी ॥
सर्वहि पेरणें विद्या । लोकांमध्यें हळूहळू ।
नेणतें जाणतें करणें । कथा निरुपणें सदा ॥

या समर्थाज्ञेनुसार आपला कार्यक्रम नित्य करीत राहावें. पुष्कळांशीं दाट ओळखी पाडाव्या आणि त्यांचें प्रेम संपादन करीत करीत दुसऱ्या गांवीं निघून जावें, असा त्यांचा कार्यक्रम असे. अशा पद्धतीचाच मुक्काम एकदां कालापूर येथें झाला. कालापूर येथें एक देवीचें देऊळ आहे; पण तेथें उतरण्यास मंडळीस अनुज्ञा मिळाली नाहीं, तेव्हां मंडळींनीं एका झाडाखालीं वस्ती केली. इतक्यांत एकाएकीं श्री. गोपाळराव परीट या नांवाचे एक गृहस्थ शोध करीत करीत आले व गेल्या रात्रींच 'तुझ्या गांवांत कांहीं ब्रह्मचारी येतील त्यांस मदत कर. जा, उठ, उठ!." अशा अर्थाचें आपणास पडलेलें स्वप्न त्यांनीं सांगितलें. आपण अंगीकारलेलें कार्य परमेश्वराचेंच आहे, त्याचा दाखला पुनश्च असा अनपेक्षित पद्धतीनें मिळालेला पाहून सर्वांनाच विस्मय वाटला व सर्वांनीं त्या भक्तवत्सल दयाघनाची धन्यतापूर्वक स्तुति गाइली. तदनंतर श्री. गोपाळराव परीट ह्यांनीं आश्रमीय मंडळीस आपल्या घरीं शेजारच्या ओटीवर मुक्कामासाठीं नेलें. ह्या दिवसापासून या परीट कुटुंबांतील सर्वच मंडळी आश्रमाची एकनिष्ठ सेवक बनली व त्यांनीं अखंड स्वार्थत्यागपूर्वक पुढील सर्वकामांत फारच प्रामुख्यानें भाग घेतला. अत्यंत पुढारलेल्या वर्गांतहि बहुधा दुर्मिळ असणारी सद्गुणसंपदा ह्या सामान्य किंवा खालच्या म्हणून गणल्या गेलेल्या लोकांत वसत असलेली पाहून कोणाला परमेश्वरी लीलेचें कौतुक वाटणार नाहीं ? आणि अशीं माणसें आपणांला साह्यभूत झालेलीं पाहून कोणाचा कार्योत्साह वाढणार नाहीं ! नित्याच्या दंडकाप्रमाणें कालापूर येथेंहि कार्यक्रम सुरू झाले. सायंकाळीं भजनाच्या वेळेला पुष्कळच मंडळी जमत असे. भजनानंतर प्रश्नोत्तर स्वरुपाचे पुष्कळसे मजेचे संवाद होत असत; कधीं कधीं निरुपणहि चाले. हें निरुपण अर्थातच शहरच्या पद्धतीनें करावयाचें नसून अत्यंत सुलभ व सोप्या पद्धतीनें करावें लागे. श्रोते मंडळींत पुष्कळशी ख्रिश्चन मंडळीहि असावयाचीच. हिंदु झाला काय किंवा ख्रिश्चन झाला काय प्रत्येकाला आध्यात्मिक ज्ञानाची आवड स्वाभाविकपणेंच असते. प्राणीमात्राचा हा स्वभाव विशेष लक्षांत घेऊनच ज्याच्या त्याच्या मनःप्रवृत्तीला अनुरुप अशा ज्ञानाच्या गोष्टी अत्यंत मनोवेधक व चटकदारपणें समजावून सांगणें आवश्यक असतें. प्रथमपासूनच दुसऱ्यांच्या धार्मिक समजुतींत दोष दाखवूं गेल्यास कार्यभाग कधींच उरकण्याची आशा नको. उलट त्यांचें शत्रुत्व मात्र पदरीं पडतें. कोणतीहि गोष्ट धीराधीरानेंच घ्यावी लागते. म्हणून त्यांचें मन न दुखवितां अप्रत्यक्षपणें त्यांच्या मनावर सतत चांगले संस्कार करीत राहणेंच युक्त असतें. एवढ्याकरित



शुद्धिकार्यांत प्रारंभापासून अविश्रांत श्रम घेतलेलें फालापूर येथील परीट-कुटुंब.

त्यांच्या चालीरीतींचा, आचार–विचारांचा व धार्मिक समजुतींचा सूक्ष्मपणें अभ्यास करून आणि त्यांना त्यातल्या पद्धतीनें उच्च, उदात्त व पवित्र गोष्टी समजावून सांगून 'मुळाकडे मानत मानत' घालण्याचा प्रयत्न आश्रमार्थि जन करीत असत. कित्येक वेळीं श्रीज्ञानेश्वर, चांगदेव, नामदेव, तुकाराम, समर्थ आदिक थोर मोर साधुसंतांच्या ईश्वरी साक्षात्काराच्या व चमत्काराच्या नवलकथाहि सांगण्यांत येत. त्यावेळीं आनंदाची एकच लाट सर्वत्र उठे. ख्रिस्ती मंदिरांत झालें तरी त्या लोकांना धर्माचें ज्ञान पाद्री इतक्या प्रेमळपणें व तासन् तास थोडेंच देत बसला आहे ? गरीब बिचाऱ्या गावड्यांना तर लग्न, जन्म व मरण ह्या तीन संस्कारांखेरीज ख्रिस्ती मंदिराची पायरीहि चढण्याचा प्रसंग येत नव्हता व त्या प्रसंगीहि धार्मिक ज्ञानाऐवजीं तेथें वेठ–बिगारीचें कामच त्यांच्याकडून करवून घेण्यांत येत असे. साहजिकच आश्रमीय प्रचारकांच्या रसाळ, प्रेमळ व प्रासादिक वाणींतून निघालेलें ज्ञानामृत सर्वांची अंतःकरणें निवर्वू लागलें, ह्यांत आश्चर्य तें काय !

ह्याप्रमाणें कालापूर येथें भजन–कथा–निरूपणाचे प्रत्यहीं कार्यक्रम चालले होते. आस्ते आस्ते लोकांची पुष्कळच गर्दी जमूं लागली. याच वेळीं एक ख्रिस्ती गावडा वरील सर्व गोष्टी अत्यंत लक्षपूर्वक ऐकत असल्याचें आढळून आलें. प्रचारकाच्या तोंडांतील एकहि शब्द तो खालीं पडूं देत नव्हता. एखाद्या अधाशाप्रमाणें त्या गोष्टी तो भराभर कर्णद्वारें प्राशनच करीत होता, असें म्हणणें अधिक शोभेल. त्याची श्रवणतत्परता अगदीं कौतुक करण्यासारखी होती. श्रीसमर्थांच्याच शब्दांत सांगावयाचें तर—

" भिक्षुक देशावरी सादर । कां व्यापारी मिळतां व्यापार ।
कां मुसारी मिळतां मुसार । मापासमयीं ॥
कां जिवलगाची ऐकतां वार्ता । अत्यंत श्रवणीं सादरता ।
कां न्यून बोलत असतां । सादर ऐके ॥
कां शूद्र शेतीं पाहूल पाहे । कान देऊन उभा राहे ।
श्वासोच्छ्वास दीर्घ वाहे । म्हणोनी कोंडी वळें ।

अशी त्याची अवस्था दृष्टोत्पत्तीस आली. साहजिकच एके दिवशीं त्याला जवळ बोलावून आणण्यांत आलें. प्रथम त्याचें नांवगांव विचारून घेऊन नंतर त्यास घरदार, मुलेंबाळें, शेतीवतन-वाडी इत्यादि स्वरूपाच्या त्याच्या मासिक गोष्टींविषयीं अनेक कुशल प्रश्न मोठ्या प्रेमळपणानें विचारण्यांत आले. आपली कांहींहि ओळख नसतां आपल्या अगदीं जवळच्या आप्तेष्ट सुहृदाप्रमाणें हे स्वामी आपला क्षेमसमाचार विचारीत आहेत, हें पाहून त्या गावड्यास धन्यता वाटली. मागें पानवेल येथें आश्रमाच्या मुक्कामावर आपण प्रसाद घेऊन गेल्याचें त्यानें सांगितलें व थोडावेळ बसून तो निघून घरीं गेला. दुसऱ्या दिवसापासून तो न बोलाविता नियमितपणें आश्रमीय मंडळींजवळ येऊन बसूं लागला. या जगांतील राजापासून रंकापर्यंतच्या कोणाचाहि संसार घेतला तरी त्यांत कोणत्याना कोणत्या तरी स्वरूपाचीं दुःखें हीं असावयाचींच. हीं दुखें निमूटपणें कशीं सहन करावीं लागतात व त्यांना तोंड देतां देतां मनुष्य कसा अगदीं बेजार व दैन्यवाणा होऊन जातो, ही गोष्ट सर्वांच्या परिचयाची आहे. अशा ह्या दुःखतमयीं आपणास कोठून तरी आधार मिळावा, आपलें हृद्गत कोणाजवळ तरी ओकून हृदयाचा भार

हल्का करतां यावा, आपणांजवळ कोणी तरी चार प्रेमाचे व सहानुभूतीचे शब्द बोलावे, व त्या मधुर शब्दांनीं आपलें दुःखसंतप्त अंतःकरणें निवविलें जावें, अशी इच्छा मनुष्य मात्रास स्वाभाविकपणेंच असते. एका प्रेमाच्या शब्दासाठीं तो किती हापापलेला असतो हें सूज्ञांस माहित आहेच. म्हणूनच सहानुभूतिपूर्वक आपलें दुःख कोणी ऐकणारा मिळाला म्हणजे मनुष्याचा दुःखभार हल्का होत असतो. 'स्निग्धजन-संविभक्तं हि दुःखं सह्यवेदनं भवति !' हा कविकुलगुरु कालिदासांचा सिद्धांत किंवा 'दुःख दुसऱ्याचें जाणावें। ऐकून तरी वाटून घ्यावें॥ (द. ११-५) ही दासबोधाची शिकवण हेंच सांगत आहे.

आपला दुःखभार हल्का करण्याकरितां साहजिकपणेंच आमच्या वितोरीन गावड्याला आश्रमीय मंडळीच्या स्वरूपांत जिवलग स्नेही प्राप्त झाल्यावर कां आनंद वाटणार नाहीं? त्यांच्या प्रेमळ संगतींत त्याला समाधान वाटूं लागलें. त्यांच्या विषयीं त्याचे मनांत अकृत्रिम प्रेमादर व विश्वास निर्माण झाला. आश्रमीय प्रचारकांचा शांत स्वभाव, त्यांची अखंड समाधानी वृत्ति, त्यांचा प्रेमळपणा, त्यांची सर्वांशीं नम्रपणाची वागणूक, दुःखिताविषयींचा त्यांचा कनवाळूपणा, रावापासून रंकापर्यंत सर्वजण सदासर्वकाळ सुखी असावे ही त्यांची उत्कट सात्विक भावना, बोलण्यासारखी त्यांची क्रिया व निःस्वार्थपणें सर्वांना 'परोपरी सिकविणें। आडणुका सांगत जाणें। निवळ करूनी सोडणें॥' दा. १९।१० हा त्यांचा नित्याचा दंडक पाहून वितोरीन प्रमाणेंच अन्य कितीतरी लोकांना त्यांच्याविषयीं आत्मीय भाव व अकृत्रिम प्रेमादर वाटूं लागला. ते लोक ख्रिस्ती आहेत किंवा त्यांचा ख्रिस्ती धर्म कमीप्रतीचा आहे अशा कोणत्याहि प्रकारचे उद्गार न काढतां, उच्चतम व सर्वमान्य असणाऱ्या सदाचाराच्या गोष्टीच आश्रमीय लोक सर्वांस सांगत असल्यामुळें व राव असो वा रंक असो, गरीब असो वा श्रीमंत असो, हिंदु असो वा ख्रिस्ती असो, स्वामी सर्वांनाच त्यांच्या त्यांच्या कल्याणाचा मार्ग सांगतात, हें प्रत्यक्ष पाहिल्यामुळें व अनुभवल्यामुळेंच सर्वांचेंच प्रेम व विश्वास आश्रमीयांवर बसावा ह्यांत नवल तें काय?

हा एकच एक मार्ग असतो. कारण व्यक्तीचें काय किंवा समुदायाचें काय मानसिक सामर्थ्य वाढवून त्याला ध्येयनिष्ठ बनविण्यास उपासनेसारखें अन्य कोणतेंहि साधन नाहीं. उपासनेच्या योगें मन सात्विक, शुद्ध, निर्मळ व प्रेमळ बनतें; त्यांतील दुबळेपणा, कच्चेपणा, तर्कटीपणा ताठरपणा व दुष्टपणा, नष्ट होतो. उपासनेच्या योगानें उपासकाच्या अंतःकरणांत दया, प्रेम, वात्सल्य उद्भूत होतें. त्याला दुसऱ्याला साह्य करण्यांत परोपकार करण्यांत आनंद वाटूं लागतो; त्याचें अंतःकरण दुसऱ्याच्या सुखासाठीं तळमळतें व आपलें जीवित केवळ स्वार्थासाठीं नसून तें कांहींतरी श्रेष्ठ कर्तव्यासाठीं आहे, याची जाणीव त्याला सतत त्रास देऊं लागते, त्याला स्वस्थ बसूं देत नाहीं. उपास्यदेवतेचे गुण उपासकांत उतरूं लागतात. एकाच देवतेच्या उपासकांत नकळत प्रेमभाव, बंधुभाव, व आत्मीयभाव जाग्रत होतो आणि त्या मंडळीचा एक स्वतंत्र समुदाय व संघच निर्माण झाल्याविना रहात नाहीं. साहजिकच योग्यवेळीं अशी सामुदायिक उपासना प्रचलित करण्याविषयीं प्रचारकांना श्रीमन्महाराजांनीं आज्ञापिलेंच होतें. त्याला अनुसरून त्यांनीं, जीं कांहीं खिस्ती गावडे मंडळी त्यांच्यावर उत्कट प्रेम करूं लागली होती त्यांना श्रीबलभीम मारुतिरायांची समाजोद्धारक श्रेष्ठ उपासना करण्यास प्रवृत्त केलें. याप्रमाणें बलभीमाची उपासना कांहीं घरांतून प्रचलित होत आहे इतक्यांतच एक मजेदार प्रसंग घडून आला. एका खिश्चन गावड्याच्या घरीं त्याचा एकुलता एक मुलगा तापानें भयंकर आजारी झाला होता. मुलगा एकाएकीं आजारी झाला तेव्हां 'त्याला भूतपिशाचादिकांची बाधा निःसंशय झाली' हा खेडेगांवच्या नित्याच्या समजुतीप्रमाणें अंगारे, धुपारे इत्यादि नाना प्रयोग सुरू झाले. गावडे लोकांत 'देव खेळविण्या'चा प्रघात फार आहे. त्याला ते 'धाडी' असें म्हणतात. कोणतीहि महत्त्वाची गोष्ट, प्रथम त्यालाच विचारण्यांत येते. देव खेळविला म्हणजे आजारी मनुष्यसुद्धां औषधाविना बरा होतो असा त्यांचा दृढ विश्वास असतो; त्यानें तें सर्व केलें, पण कांहीं केल्या गुण येईना. ही गोष्ट वितोरीन गावड्याला समजली. आश्रमीय जनांवर त्याची दृढ श्रद्धा बसली होती. आपलें प्रत्येक सुखदुःख त्यांच्याजवळ जाऊन सांगितल्याशिवाय त्याला चैन पडत नसे. तेव्हां साहजिकच प्रस्तुत प्रसंगींहि वितोरीन त्या दुसऱ्या गावड्यास घेऊन आश्रमाच्या मुक्कामावर आला व त्यानें सर्व वृत्तांत आश्रमीय मंडळास सांगितला. तेव्हां त्या दुःखित गावड्याला धीर देण्यांत आला व त्यास "घाबरूं नकोस. हा बघ मारुतिराय! सर्व भूतपिशाचें त्याला चळचळ कांपत असतात. त्याची कृपा संपादन केली म्हणजे कशापासूनहि त्रास होत नाहीं." असें प्रेमळपणानें सांगण्यांत आलें. नंतर मारुतिरायांचे अनेक पराक्रम वर्णन केले गेले व या कलियुगांतहि तुळशीदास, समर्थ आदिक थोरथोर पुरुषांना त्यांचा साक्षात्कार कसा झाला व त्यायोगें त्यांच्याकडून जगदुद्धाराचें महत्कार्य कसें पार पडलें इत्यादि गोष्टी अत्यंत मनोरंजक पद्धतीनें त्या गावड्यास निमित्त करून सर्वांस समजावून सांगण्यांत आल्या व सरतेशेवटीं "हे बघ आमच्या मारुतिरायांचे हे असे पराक्रम आहेत. तुला पाहिजे असेल तर तूंहि त्याची प्रत्यक्ष प्रचीती घे. हें मारुतिरायाचें चित्र घे. त्याची मनोभावें पूजा कर म्हणजे तुझा मुलगा तात्काळ बरा होईल." असें त्या गावड्यास उद्देशून कथन करण्यांत आलें. त्या गावड्यानें ही गोष्ट मान्य केली. तेव्हां आश्रमीय प्रचारकानें श्रीसद्गुरुचरणांचें ध्यान केलें व मोठ्या प्रेमळपणानें मारुतिरायाची प्रार्थना करून एक चित्र व अंगारा त्या गावड्यास दिला. सर्वजण घरोघर गेले आणि एकदोन दिवसांत त्या गावड्याचा मुलगा बरा झाल्याची कर्णमधुर वार्ता सर्वांच्या कानीं आली. भक्तरक्षणार्थ

देवानें धावणें केलें. ' न मे भक्तः प्रणश्यति ' ह्या भगवद्वचनाची प्रचीती सर्वांस आली. मारुतिरायांची उपासना सद्यःफलदायी कशी आहे हें सर्वांस कळून चुकलें.

वरील प्रसंग घडून आल्यानंतर पुष्कळांनीं श्रीहनुमंताच्या उपासनेचा अंगिकार केला. इतक्यांत चैत्राचा महिना उजाडला तेव्हां आश्रमीय मंडळींनीं हनुमानजयंतीचा उत्सव करण्याचें ठरविलें. गावड्यांना कालापूर हें बरेंच मध्यवर्ती पडत असल्यामुळें, शिवाय श्री. गोपाळराव परिट व गावड्यांतील प्रमुख वितेरीन हीं निःसीम प्रेमाचीं आणि जिवलग बनलेलीं दोन माणसें तेथेंच रहात असल्यामुळें, सर्व दृष्टीनें उत्सवासाठीं हेंच स्थळ पसंत करून नियुक्त केलें गेलें. त्यावर एक म. .हे घालण्यांत आला व सुंदर आरासहि करण्यांत आली. कांहीं भजनी मेळेहि तयार झाले. मारुतिरायांच्या जन्मकाळीं मांडवांत शेंकडोशें लोक लोटले. भजनाची एकच गर्दी झाली होती. नामसप्ताह अखंडपणें चालू होता. सर्व वातावरण आनंदानें गजबजून गेलें होतें. ' उत्सवांतील मारुतिरायांच्या मूर्तीस जन्मकाळीं आम्हांस स्पर्श करून दर्शन घेतां यावें ' ह्या ख्रिस्ती गावड्यांच्या इच्छेनुसार त्यांना आश्रमीय जनांनीं अनुज्ञा दिल्यामुळें, गावड्यांचा आनंद गगनांत मावेनासा झाला व त्यांनीं बजरंगबलीचा जयजयकार सारखा चालविला. ख्रिस्ती गावडे मोठ्या प्रेमभरानें या उत्सवांत सर्वत्र वावरतांना पाहून आश्रमीय मंडळीला सानंद कौतुक वाटल्यावांचून राहिलें नाहीं व त्यांनीं धन्यतापूर्वक परमेश्वराची प्रार्थना केली. सर्व कार्यक्रम आटोपल्यावर एक लहानसा भंडाराहि करण्यांत आला व प्रेमपूर्वक तो प्रसाद घेऊन सर्व मंडळी घरोघर गेली. कडव्या धर्माच्या पोर्तुगीज साम्राज्यांत ख्रिस्ती लोकांनीं मारुतीचा उत्सव स्वतंत्रपणें साजरा करणें ही गोष्ट कांहीं सामान्य स्वरूपाची नव्हती. वास्तविक हें मोठें धाडसच होतें; पण विशेषतः कोठेंच गाजावाजा न करतां लहानशा प्रमाणांत हा उत्सव झपाट्यानें उरकून घ्यावा अशी आश्रमीय मंडळींनीं हिंमत बांधली आणि अपेक्षे बाहेर हा उत्सव साजरा झालेला पाहून त्यांना धन्यता वाटली, यांत नवल काय ? त्यांचा आत्मविश्वास दृढावला व परमेश्वराची पुनरपि एकदां मनोभावें प्रार्थना करून ते आपापल्या पुढील उद्योगास लागले.

## [ श्रेणी तिसरी. ]

कालापूर येथील हनुमज्जयंतीच्या उत्सवामुळें आतांपर्यंतच्या धर्मप्रसाराच्या चळवळीचें स्वरूप पालटून गेलें. म्हणजे जी चळवळ इतक्यादिवस कांहीं विशिष्ट गांवांत व विशिष्ट व्यक्तींमधूनच चाललेली होती, ती आ. ा अधिक व्यापक स्वरूपाप्रत जाणें शक्य झालें. वैयक्तिक दृष्टीपेक्षांहि सामुदायिक दृष्टीनें म्हणजेच मोठ्या प्रमाणावर जागृति व्हावी, हाच उत्सवाचा खरा मूलभूत हेतू असतो व त्यादृष्टीनें कालापुरचा उत्सव ही एक महत्त्वपूर्ण घटना घडून आली.

उत्सव आटोपून गावडेलोक आपापल्या घरीं गेल्याचें मागें सांगितलेंच आहे. घरीं गेल्यावर प्रत्येकानें मारुतिउत्सवाचा सकल वृत्तांत ज्याला त्याला निवेदन केला. मानसशास्त्राचा सिद्धांत असा आहे कीं, सुख काय किंवा दुःख काय दुसऱ्याला निवेदन करून आपलें हृदय हलकें केल्याशिवाय मनुष्याच्या मनाला बरें वाटत नाहीं—चैन पडत नाहीं. तद्वतच जी गोष्ट आपणाला प्रिय झालेली आहे, तिचा तशाच पद्धतीनें दुसऱ्यांनीं पुरस्कार व अंगीकार करावा अशीहि

लेकाला साहजिकच तीव्र इच्छा असते; पण व्यक्ति तितक्या प्रकृति असतात, ह्याची जाणीव त्याला त्या त्साहमरांत होऊं शकत नाहीं. हनुज्जयंतीचा उत्सव स्वतंत्रपणें साजरा करण्यांत आपण कांहींतरी विशेष तकृत्य केलें असें ह्या गावड्यांना वाटणें स्वाभाविकच होतें; पण इतरांनाहि ती गोष्ट तशीच वाटेल ो त्यांची अपेक्षा सफल कशी व्हावी ? प्रत्येक समाजांत झालें तरी भिन्नभिन्न पक्षांचीं भिन्न भिन्न मतें ों असतातच. अर्थातच आपल्या पैकीं कांहीं लोकांनीं मारुतीचा उत्सव स्वतंत्रपणें साजरा ला, ही गोष्ट त्यांस रुचली नाहीं, व त्यांच्याविरुद्ध त्यांनीं एकच गिल्ला आरंभिला. ह्या नपेक्षित भडिमारामुळें उत्सवकर्त्यांमध्यें जी कांहीं थोडीशी अर्ध्याकच्च्या दिलाची मंडळी होती ती ावरली व त्यांनीं आपल्या कानाला खडा लावून घेतला; पण ज्यांच्या अंतःकरणांत धर्मप्रेमाचा हि विशेषत्वानें चेतविला गेला होता त्या वितोरीन गावड्यासारख्या कांहीं व्यक्ति हतोत्साह होणाऱ्या व्हत्या. त्यांनीं वरील लोकांचा उपहास शांतपणें सहन केला. आश्रमीय प्रचारकांनीं पण "तुम्ही .णाचीहि क्षिति बाळगूं नका, तुह्मी देवाधर्माचा उत्सव केला त्यांत काय बिघडलें ? तुह्मी इतर खिस्त्यां- ारखे थोडेच आहांत? तुम्ही स्वतःला खिस्ती म्हणवितां पण तुम्हाला ख्रिस्तीसाहेब रोटीसाठीं कांहीं बोला- .त नाहींत. बेटीची गोष्ट तर बोलावयासच नको, तुम्हाला हिंदु ह्मणावें तर मारुतीचा उत्सव केलात ्णून तुमचे ज्ञातिबांधव तुम्हांला हंसत आहेत;—तुमचा उपहास करीत आहेत; मग अशा लोंबकळ- ाऱ्या अवस्थेंत कां रहातां ? वस्तुतः तुम्ही हिंदुच आहांत. तुमच्या पूर्वजांना पाद्र्यांनीं चार शतकां- र्वी छलबलानें कुत्रूप जबरदस्तीनें ( गावड्यांच्या शब्दांत ' फोर्सानें ' ) बाटविलेलें आहे. त्यावेळचा ाळ तो निराळा होता. आतां कांहीं पूर्वीसारखा अत्याचाराचा काळ राहिला नाहीं. मग तुम्ही ापले देवधर्म पूर्वीप्रमाणें कां चालवूं नयेत? तुह्मी मोठे भाग्यवान् ह्मणूनच तुम्हांस हा मारुतिरायाचा उत्सव र्विघ्नपणें पार पाडतां आला., तुमचें महापुण्य ह्मणून तो तुह्मांस करावयास मिळाला. मारुतिरायाची ही पासना आतां प्राण गेला तरी चालेल, पण सोडूं नका. मारुतिरायाच्या कृपाप्रसादानें व श्रीमन्महा- ाजांच्या आशीर्वादानें ही उपासना तुह्माला कल्याणप्रद झाल्याविना राहणार नाहीं." अशा पद्धतीनें यांना उपदेश करून त्यांस आश्वासित केलें. ह्या सर्व गावड्यांत वितोरिन ह्मणजे मूर्तिमंत 'उत्साह'च ोता. आश्रमावरील त्याचें प्रेम केवळ अवर्णनीय होतें. आश्रमीय जनांकडून मिळालेल्या वरील रणेनें तो उत्तेजित झाला व ' बस, आह्मी कोकणें जाऊन ( हिंदु होऊनच ) पुढील वर्षी मारुतिरायाचा त्सव साजरा करणार, मग काय वाटेल ते होवो ' असें ह्मणून त्यानें आनंदानें टाळी पिटली. वस्तुतः वितोरिन या क्षणींच मनानें सर्वस्वी कोंकणा ( हिंदु ) बनला व आश्रमीयांनींहि त्याला 'विठ्ठल' ह्मणून संबोधून त्याचा नामकरणविधि सर्वांसमक्ष उरकला ! गोमांतकांतील दुःसाध्य हिंदुकरणाच्या प्रयत्न- सिद्धींत प्रथमतःच विठ्ठलाची संप्राप्ति झालेली पाहून आश्रमीय मंडळीला किती आनंद व उल्हास ाटला असेल ह्याची कल्पना वाचकांनींच करावी. महंमद पैगंबराला जेव्हां पहिलाच अनुयायी मिळाला तेव्हां त्यालाहि असाच मनस्वी आनंद झाला असल्याचें कार्लाईलनें * ह्मटलें आहे. असो.

* It is certain my conviction gains infinitely the moment another will believe in it. It is a boundless favour

( H. H. W. Page 60 ).

स्वजनांचा रोष पतकरूनहि आश्रमाची कास न सोडणारे असे कांहीं एकनिष्ठ गावडे आहेत, हें श्री प्रसंगीं प्रत्यक्षत: दिसून आल्यामुळें आश्रमीय मंडळीला साहजिकच उत्साह वाटला. संकटाचा लवले नसतांना प्रेम दाखविणारे पुष्कळच असतात; पण मित्र परीक्षा ही आपत्कालींच होत असते. हे उत्सवाचें हें आनंददायि वृत्त समग्रपणें कथन करण्यासाठीं व पुढील दिशा आखण्यासाठीं आश्रमीय प्रचा श्रीमन्महाराजांकडे मसुरास निघून आले. तेव्हां मसुरास आश्रमीय शुद्धिमंडळांत तत्संबंधीं बरीच वाद होऊन चळवळीला आतां निराळें वळण देण्यास प्रत्यवाय नाहीं, असें ठरलें व त्याप्रमाणें यथोचित आज्ञा घेऊन ते परत गोमांतकांत गेले.

आश्रमीय प्रचारकांचें गोमांतकांतील आतांपर्यंतचें धर्मप्रसाराचें धोरण प्रत्यक्ष हिंदूकरणाचा ' न काढतां अप्रत्यक्षपणें हिंदुसंस्कृतीविषयीं त्या लोकांच्या मनांत अधिकाधिक प्रेमादर निर्माण क राहण्याचें कसें होतें हें मागें दाखविलेंच आहे. पण आतां त्या धोरणांत मसूर येथें ठरल्याप्रमाणें पा करून, गोमांतकांत निर्माण केलेल्या हिंदुधर्माच्या एकनिष्ठ व निःसीम उपासकांच्या नूतन–गाव संघाच्या द्वारें हिंदूकरणाचा दिव्य संदेश घरोघर पोहोंचविण्याचें उपयोजण्यांत आलें. त्याप्रमाणें आश्र जनांनीं विठ्ठल गावडा, कालापूरचे श्री. गोपाळराव परीट व आणखी दोनचार गावडे बंधू ह्यां ठिकठिकाणीं गावड्यांच्या वस्तींत जाऊन प्रत्यक्ष हिंदूकरणाच्या दृष्टीनें जागृति करण्यास प्रारंभ केला.

तथापि कोणत्याहि समाजांत एखाद्या कल्पनेचा प्रसार एकाएकीं होऊं शकत नाहीं. लोकां मनावर कित्येक पिढ्यांच्या संस्कारांचीं पुटें सारखीं बसलेलीं असल्यामुळें, त्यांचें दडपण एकदम फें देण्यास ते सहसा प्रवृत्त होत नसतात. त्या गोष्टी तत्त्वतः कितीहि वाईट व अनिष्ट असोत, ' त्यांना प्रथम पटावयाच्या नाहींत व महत्प्रयासांतीं पटल्या तरी त्याविरुद्ध आचरण करण्यास त्य धीर व्हावयाचा नाहीं. 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी' मानण्याच्या कल्पनेचा उगमहि वरील गोष्टींतच आहे, उघड होय. साहजिकच एखाद्या कल्पनेचा प्रसार लोकांमध्यें जो होतो, तो एकाएकीं होऊं शकत ना कल्पना तात्त्विक, शास्त्रीय किंवा धार्मिक कोणतीहि असो, तिच्या प्रसाराची दिशा एक विशिष्ट स्वरूपा असते. कांहीं अल्पसंख्याक व्यक्ति प्रथम तिचा पुरस्कार करतात व त्यांच्या तीव्र श्रद्धेमुळें आणि वैयक्ति महत्तीमुळें ( Prestige ) त्या कल्पनेचा समाजांत प्रवेश होऊं शकतो. नंतर ह्या व्यक्तीपार त्या व्यक्तीपर्यंत आस्ते आस्ते तो विचार प्रसृत होत जातो. पण ही कल्प पुरातन कालापासून चालत आलेल्या व्यवहाराशी वा समजुतीशीं जुळत नसल्यामुळें लोक ति प्रथम उपहास करतात; तिच्याविषयीं तुच्छता दर्शवितात. तथापि त्या कल्पनेचे प्रणेते वा अ त्या योगें हतोत्साह न होतां जोरजोरानें आपले सिद्धांत जेथें तेथें अव्याहतपणें सांगत असतात साहजिकच लोकांच्या दृष्टीपुढें तेच ते विचार एकसारखे येत राहिल्यामुळें त्यांची इच्छा असो वा नसो डोक्यांत घुसून बसतात. सध्याच्या जाहिरातीच्या युगांत 'डोंगरे बालामृत' 'किर्लोस्कर नांगर 'रेमिंगटन टाइप रायटर' 'स्वान पेन' इत्यादि शब्दयोगांनीं लहानापासून थोरांपर्यंतच्या सर्वांच्या डोक्यांत कसें घर केलें आहे. हें सर्वांस विदितच आहे. ह्याच पद्धतीनें त्या नूतन कल्पनेचा वारंवार ज तेंत उच्चार केल्यामुळें–तिचा जप झाल्यामुळें ( Repetition ) ती जनमनाला परिचित होऊन बसते व पहिल्या उपहासाच्या अवस्थेंतून निघून ती पुढच्या चर्चात्मक अवस्थेंत जाते. तिच्याविषयीं वाद

वाद संवाद सारखे होऊं लागतात. हा वादविवाद अर्थातच अगदीं पूर्ण निर्मळ स्वरुपाचा म्हणजे तर्कतेनें वा विचारपूर्वक असा होत नाहीं. तर केवळ भावनाप्राधान्यानें होतो. साहजिकच साध्या वाचाचीपासून तों तोंडातोंडीं व लठ्ठालठ्ठीपर्यंत हि मजल जाते; परंतु असा हा वादविवाद होतां होतांच त्या कल्पनेचा सावकाश पद्धतीनें प्रसार होत जातो. विशेषतः नूतन पिढींत त्या कल्पनेचा त्वरित अंगीकार करण्याकडे विशेष प्रवृत्ति असते. जुन्या रूढ कल्पनांविषयीं थोडासा अप्रिय भाव स्वभावतःच तरुण लोकांत असतो. नवीन नवीन कल्पना ग्रहण करण्याकडे त्यांच्या मनाचा ओढा विशेष असतो. साहजिकच नूतन कल्पनेचें बीजारोपण त्यांच्या ठायीं त्वकर होतें. मग त्या कल्पनांचा अंगीकार करणाऱ्यांचे लहान लहान गट निर्माण होत जातात व त्यांच्याकडूनच त्या कल्पनेचा प्रसार उत्साहपूर्वक जिकडेतिकडे सुरु होतो. त्यामुळें सर्व वातावरण त्याच विचारांनीं भरुन जातें. यांतून कोणालाहि निसटतां येत नाहीं. मग मनुष्याच्या अनुकरणशील स्वभावाला अनुसरुन संसर्गा-संसर्गानें ( contagion ) ती गोष्ट जिकडेतिकडे आचरलेली दिसून येऊं लागते. होतां होतां त्या कल्पनेला बहुसंख्याक लोकांचा पाठिंबा मिळतो व नंतर ती लौकरच आपल्या प्रभावानें सर्वांच्या हृदयांत कायमची जाऊन बसते. सूर्यकिरण ज्याप्रमाणें, आस्ते आस्ते अखिल विश्वांतील सर्व कानेकोंपरे व्यापून टाकतात, त्याप्रमाणें त्या नूतन विचाराच्या लहरी सर्वांचीं अंतःकरणें भारुन टाकतात, आणि त्यांचा संबंध एकदा भावनांशीं निगडित झाला म्हणजे तो चिरकालीन स्वरुपाचा होतो.

वर दर्शविलेल्या क्रमपद्धतीला अनुसरुनच, श्रीमन्महाराजांनीं उचारलेल्या हिंदूकरणाच्या महामंत्राचा प्रसार गोमांतकांत होत गेला. आश्रमीय जन आतां पूर्वीप्रमाणें एकेका गांवांत अधिक दिवस वस्ती न करतां, सारखे ह्या गांवाहून त्या गांवांत व तेथून लगेच पुढें, अशा पद्धतीनें तो दिव्य मंत्र ज्याच्या त्याच्या कानीं घालीत हिंडूं लागले. प्रत्येक समाजांत झालें तरी कोणत्याहि कल्पनेविषयीं अनुकूल, उदास व प्रतिकूल अशा त्रिवर्गाचे लोक असावयाचेच. तेव्हां त्यांच्यातील अनुकूल असतील तेवढे प्रथम हुडकून काढून ते आपल्या पक्षांत सामील करुन घेण्यासाठीं, श्री. विठ्ठल गावडा, श्री. गोपाळ परीट प्रभृति अगदीं विश्वासांतील माणसांना पाठवून देण्यांत येई. जेथें जेथें म्हणून गावड्यांचे अड्डे असत तेथें तेथें त्यांना जाण्यास सांगितलेलें असे. कारण, ह्या ठिकठिकाणच्या अड्ड्यांमधून–गटांगटांमधूनच त्या गांवच्या 'राजकारणा'ची चर्चा अगदीं मनमोकळेपणानें होत असते. कोणत्याहि गांवाच्या अंतःकरणाचा ठाव घ्यावयाचा तो येथेंच घ्यावा लागतो. ग्रामस्थांचें हें अंतःकरण–हें हृद्गत–हें जगदांतर जाणण्याची दिशा श्रीसमर्थांनींहि अशीच सांगितली आहे. ते म्हणतातः—

ठायीं ठायीं शोध घ्यावा । मग ग्रामीं प्रवेश करावा ।
प्राणीमात्र बोलवावा । आप्तपणें ॥
उंचनीच म्हणों नये । सकळांचें निववावें हृदय ।
अस्तमानीं जाऊं नये । कोठें तरी ॥
जगामध्यें जगमित्र । जिव्हेपाशीं आहे सूत्र ।
कोठेंतरी सत्पात्र । शोधून काढावें ॥
कथा होती तेथें जावें । दुरी दर्नासारखें बैसावें ।

तेथील सकळ ह्रद्र घ्यावें । अंतर्यामीं ॥
तेथें भले आढळोन येती । व्यापक तेहि कळों येती ।
हळुहळू मंदगती । रीग करावा ॥
हेत समजोन उत्तर देणें । दुसऱ्याचें जीवींचें समजणें ।
मुख्य चातुर्याचीं लक्षणें । तीं हीं ऐसीं ॥
बहुत बोलणें ऐकावें । तेथें मौन्य धरावें
अल्प चिन्हें समजावें । जगदांतर ॥

ह्या समर्थांच्या आदेशानुसारच आश्रमीयांनींहि आपला कार्यक्रम आंखलेला होता. त्यायोगें त्यां गांवांतील सर्व परिस्थिति आकलन करतां येऊन तसें पुढील धोरण ठरवितां येत असे. मग जे अ असतील त्यांच्या ओळखी साधीत साधीत भिन्नभिन्न पक्षोपपक्षांशीं संबंध आणवावा; शांतपणें, प्रेम पणानें सच्चरित्रानें व आपल्या मृदुवाणीनें त्यांचीं अंतःकरणें आकर्षून घ्यावीं, त्यांचा विश्वास संपा करावा. नंतर आपल्या पूर्वजांचा श्रेष्ठ धर्म वाटेल त्या हालअपेष्टा सहन करून, प्रसंगीं प्राणाहि वेंचून मि विण्याची आवश्यकता व न्याय्यता त्यांना मोठ्या युक्तियुक्तीनें पटवावी आणि अशाप्रकारें तटस्थांना प्रतिकूलांना अनुकूल करीत राहण्याचा प्रयत्न सारखा करीत राहावा, असा आश्रमीय जनांचा कार्य चाले. ह्या उपक्रमामुळें प्रत्यहीं 'नवमतवादां' च्या पक्षांत एकएक, एकएक, अशी नवीन नव माणसांची भर पडूं लागली व नदीचें पात्र उगमाशीं आकुंचित असलें तरी पुढें हजारों ओढे न मिळाल्यामुळें तें जसें प्रशस्त वा विस्तीर्ण होत जातें, तद्वतच हिंदूकरणाला अनुकूल झालेल्या वरील लोकां गोष्ट झाली. किंवा पाणी चुलीवर ठेविलें असतां ज्याप्रमाणें त्यांतील प्रत्येक बिंदूला अग्नीची आंच लागून तो व येऊं लागतो, व पृष्ठभागावरील त्या स्थळींचा बिंदु खालीं जाऊं लागतो, आणि असें होतां होतां, एक आला दो आले, चार आले ह्या क्रमानें हजारों जलबिंदु तापून जेव्हां खालींवर होऊं लागतात, तेव्हां त्या पाण्यांत भयं खळबळाट होतो—त्या पाण्याला उकळी फुटते; तद्वतच नवीन विचारांच्या योगें एकापासून वाढतां वाढ समाजांतील समस्तांचीं मनें त्या एकाच विचारानें भारून जातात. एकेक बिंदूंत अन्य अनेक बिंदु मिळ सिंधूंतील प्रचंड लाट निर्माण होते, तीच अवस्था वरील गोष्टीची होऊं लागली.

पण अशाप्रकारें आश्रमाचें हें कार्य सर्वस्वी निष्प्रतिबंधपणें चाललें होतें, असें मात्र नव्हे. प्रत्ये समाजांत कांहीं माथेफिरू माणसें हीं असावयाचींच. कोणी हिंदु गोसावी गांवोगांवीं हिंडत आहे व शेंकडोंशे हिंदु व ख्रिस्ती लोक त्यांच्या भजनीं लागत आहेत, हें पाहून अशा मंडळीचा मनःसंताप सा जिकपणेंच झाला व आश्रमीय प्रचारकांना त्रास देण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. म्हणजे सायकलीवरू प्रवास करीत असतां त्यांच्या सायकलींत काठ्या घालून त्यांना पकडण्याचा प्रयत्न करावा, सायकली आ वाव्या, त्याना दगड मारावे, शिविगाळ करावी व कित्येक वेळां दहापांच जणांनीं मिळून एकदम त्यांच्या वर चोरटा हल्लाहि करावा. अशा निरनिराळ्या प्रकारांनीं त्या मंडळींनीं त्यांना त्रास देण्यास कसूर केले नाहीं. पुढारलेल्या व सुशिक्षित म्हणून गणल्या गेलेल्या पाश्चात्य देशांतहि श्रीमत् स्वामी विवेकानंदांच असहिष्णुतेमुळें कसा छळ झाला, हें सर्वांस विदितच आहे. "इंग्लंडांत आणि अमेरिकेंत केवळ भाष्य

ग्राताच्या वैचित्र्यामुळें पुष्कळवेळां सामान्य लोकांनीं मजवर हल्ले केले असहिष्णुतेनें तहि जगांत केवढे अनर्थ चालविले आहेत त्याची आपणांस कल्पनाहि नाहीं. या असहिष्णुतेस हा च्या मळी पडून त्यांतील अस्थि परक्या देशांत कोठेंतरी पडतील कीं काय असेंहि कित्येक वेळां त्या मनांत येई. धर्माच्या नांवानें एखाद्या परधर्मीयाचा वध करणें, हें कांहीं विशेष पापात्मक समजलें त नाहीं." इत्यादि त्यांनीं स्वमुखानें कथन केलेलीं वचनें ग्रंथांतरीं उपलब्ध आहेत. साहजिकच जेथें व्या भाविकांचा हा असा इतिहास आहे, तेथें त्यांच्या लहान मावंडांनींहि ह्याच स्वरूपाचे कांहीं 'पराक्रम' वे यांत नवल तें काय? परंतु पुढील कार्यावर दृष्टि देऊन त्यांच्या त्या सर्व गोष्टींचा गाजावाजा कोणत्याहि रें न करतां आश्रमीय मंडळी—

" प्रसंग राखणें आधीं । सोसावें बहुतांपरी ।
न्याय अन्याय सोसावा । सोशितांहि विटों नये ।
न्यून पैशून्य झांकावे । " ( मानपंचक )

आश्रमाच्या नित्य शिकवणुकीप्रमाणें अखंड समाधानवृत्तीनें कार्य करीत राहिली.

अशाप्रकारें शांतपणें, धैर्यानें, चिकाटीनें व स्वसुखाच्या निरभिलाषवृत्तीनें काम करतां करतां साह- कच आश्रमीय प्रचारकांनीं बहुजनसमाजाचें प्रेम व विश्वास संपादन केला व वितोरीन गावडयासारखी ल्येक मंडळी ख्रिस्ती समाजांतून हुडकून काढून त्यांना धर्मसेवेसाठीं प्राणाचेंहि मोल देण्यास सिद्ध केलें.

वरीलप्रमाणें गोष्टी होतां होतां प्रत्येक वाडयावर 'हिंदूकरणास' अनुकूल झालेल्यांचे लहान हान गट निर्माण झाले. त्यांतल्यात्यांतहि कांहीं कुटुंबांचें आश्रमावर निःसीम प्रेम जडलें व त्या टुंबांतून आश्रमीय जन सांगतील त्याप्रमाणें आचार—व्यवहार होण्यास प्रारंभहि झाला. ह्मणजे स्नान रून शुचिर्भूत होणें, दारू केव्हांहि न पिण्याची शपथ घेणें, देवाची पूजा अर्चा करणें, लहान मुलांनीं ष्टांग नमस्कार घालणें, शेंडी राखणें, मुलांमुलींचीं नांवें हिंदुपद्धतीचीं ठेवणें, घरासमोर तुलसीवृंदा- नें घालणें, गळ्यांतील क्रॉस टाकून देऊन तुळशीच्या मण्यांची माळ घालणें इ. इ. ह्याप्रमाणें कांहीं वडे मंडळी आश्रमाची निःसीम व एकनिष्ठ उपासक बनली व क्षणाक्षणानें आणि कणाकणानें पण श्चितपणें 'हिंदुत्वाचा' मार्ग त्यांच्याकडून आक्रमण केला जाऊं लागला. तेव्हां ह्या सर्व गोष्टी मन्महाराजांच्या कानांवर घालून पुढील दिशा आंखून घेणें युक्त होतें. त्याप्रमाणें आश्रमीय चारक बाहेर ब्रिटिशहद्दींत येऊन त्यांनीं श्रीमन्महाराजांची गांठ घेतली. ह्या समयीं श्रीमन्महाराज श्चिमहिंदुस्थानांत निरनिराळ्या स्थळीं सारखे दौरे काढून चळवळीत साहाय्यभूत होणाऱ्या अनेक गोष्टींची मवाजमव करीत होते.

प्रचारकांनीं सांगितलेल्या सर्व गोष्टींचा यथास्थितपणें विचार झाल्यावर श्रीमन्महाराजांनीं, कार्याच्या दृष्टीनें गोमांतकांत आतां आश्रमाची एखादी मोठी शाखा पाठविण्याची आवश्यकता दिसून आली व त्याला अनुसरून यांनीं पहिल्यापासून अविश्रांत परिश्रम घेऊन गोमांतकांतील खेडोपाडीं हिंडून धर्मजागृति केली ोती व ज्यांनीं आपल्या अंगच्या अनेक शोभनीय गुणांनीं तेथील आबालवृद्धांना चटक लावून सोडलेली ोती, त्या ब्र. वासुदेव महाराजांच्या नेतृत्वाखालीं एक आश्रमीय शाखा गोमांतकांत तावडतोब पाठविण्यांत

आली. त्यांनीं त्यावेळीं आश्रमीय शाखेसह गांवन् गांव अगदीं टिचून घेतला व आपल्या रसाळ, प्रासादिक व अमोघ वाणीनें जिकडेतिकडे धर्मप्रेमाचें वारें संचारून सोडलें. ब्र. वासुदेव महाराजांचे कार्यक्रम ह्याप्रमाणें चालू झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं श्रीमन्महाराजहि गोमांतकांत आले व मग म्हापसें, पणजी, मडगांव इत्यादि मोठमोठ्या शहरांतूनहि आश्रमाचे मुक्काम झाले. म्हापसें येथें मुक्काम असतां कालापुरचे श्री. गोपाळ परीट हे एक दिवस तेथें आले व त्यांनीं आपल्याला गावडे लोकांच्या शुद्धीकरणासंबंधीं पडलेलें एक आश्चर्यकारक स्वप्न श्रीमन्महाराजांस निवेदन केलें. शुद्ध व सात्विक मनोवृत्तीच्या माणसांना पडलेलीं स्वप्नें, अंतःसृष्टींतील कित्येक अतर्क्य व गूढ गोष्टी आश्चर्यकारक पद्धतीनें सूचित करीत असतात. तोच प्रकार श्री. परीट यांच्या बाबतींतहि झाला. देवाच्या घरीं बनत असलेल्या शुद्धीकरणाच्या चळवळीचें प्रसाद चिन्हें श्री. परीट यांना स्वप्नांतरीं झालेल्या दाखल्यानें सूचित होत होतीं. असो. मंडळी म्हापसें शहून पणजीस आली. ह्या वेळीं पणजी येथें श्री. शंखवाळकर वकील ह्यांच्या घरींच आश्रमाचा मुक्काम झाला होता. ' स्वधर्मे निधनं श्रेयः ' या श्रेष्ठ गीतावचनावर अत्यंत उद्बोधक व अगदीं यशस्वी सोडणारीं अशीं श्रीमन्महाराजांचीं प्रवचनें झालीं. " प्लेग, एन्फ्लुएंझा, कॉलरा आदिक सांथानीं बळी पडून नादानपणें मरण स्वीकारण्यापेक्षां स्वधर्मासाठीं मरण पत्करणें कसें शूरपणाचें व जीवंतपणाचें लक्षण आहे, हें स्वधर्मासाठीं पत्करलेलें मरण व्यक्ति, कुटुंब आणि समाज ह्यांचा विकास करीत करीत जगताला शांतिसौख्यपदीं विराजमान कसें करील; यथार्थ धर्मरक्षणाची दिशा कोणती; धर्मसंस्कृतीचें रक्षण व्हावयाचें ह्मणजे केवळ वैयक्तिक दृष्टीनें थोडेसें पुण्याचरण करून कसें भागत नाहीं, तर त्याबरोबरच ह्या पुण्याचरणास कायमचा खो घालून ! समाजसंस्कृति समूळ रसातळास नेण्यास बसलेल्या विधर्मी शत्रूंचाहि विचार कसा करावा लागतो; एवढेंच नव्हे तर ज्याच्या योगानें शत्रूचें धारण पोषण होईल, ती ती प्रत्येक क्रिया आत्मविनाशमूलक व धर्मसंस्कृतिविघातकच कशी असते; हिंदुसमाजांतील वैयक्तिक भाव किंवा पृथक्पृथक्पणाचा स्वभाव ह्या शत्रूच्या कसा पथ्यावर पडत आहे; समाजाची स्थिति–स्थापकता ढासळून टाकणाऱ्या वैयक्तिक स्वातंत्र्याच्या भरमसाट कल्पना दुष्ट शत्रूंनीं हिंदुसमाजांत कशा मुद्दाम वाढीस लावल्या आहेत, व त्यामुळें सामाजिक ऋण, सामाजिक भावबंधन इत्यादि गोष्टी नष्टप्राय कशा होत चालल्या आहेत; हिंदुसंस्कृति जगवावयाची तर ' जो जो हिंदु जगांत ए वसतो तो सर्व माझा असे ' अशी जाज्वल्य वृत्ति प्रत्येकाच्या ठायीं उद्भूत होणें आवश्यक कसें आहे; पाश्चात्य लोकांच्या ऐहिक सत्तावैभवाचें गमक त्यांच्या सामाजिक बुद्धींतच कसें आहे; सर्वभूत हितेरतत्वाच्या दृष्टीनें चेोर कोटी लोकांच्या हितासाठीं प्राणसर्वस्व अर्पण करण्यास सदैव सिद्ध असलेल्या लोकांना स्वतःचेंहि हिताहित पाहण्याची इच्छा नसलेल्या हिंदुलोकांपेक्षां परमेश्वरानें सुखैश्वर्यसंपन्न करावें हें युक्तच कसें आहे घरांतील कर्तासवरता मुलगा जेव्हां कुटुंबाचा भार वाहूं लागतो, तेव्हां तो इतरांपेक्षां कसा आपल्या बापाला साहजिकच अधिक प्रिय कसा होतो त्द्वतच कोट्यवधि लोकांच्या हिताचा सारखा विचार करणारे व तत्प्रीत्यर्थ आपल्या सर्वस्वाची आहुति देणारे लोक परमेश्वराला अधिक प्रिय व्हावेत हें व्यावहारिक दृष्टयाहि सर्वथैव उचितत्व कसें आहे; आणि म्हणूनच सामाजिक पुण्याई जबरदस्त वाढविल्याविना हिंदु समाजाचा तरणोपाय कसा नाहीं, त्यांचे नष्टचर्य संपावयाचें त स्वधर्मरक्षणाच्या उचित दृष्टीनें परकीयांचें धारणपोषण करणाऱ्या सर्व गोष्टी तत्काळ

द कशा केल्या पाहिजेत; एवढेंच न हे तर त्या उपायांच्या अवलंबनांत मरण आलें तरी तेंच सर्वथैव श्रेयस्कर जें आहे—भगवंतालाहि 'स्वधर्मे निधनं श्रेयः' व हीच गोष्ट कशी अभिप्रेत आहे," इत्यादि स्वरूपाच्या गोष्टी श्रीमन्महाराजांनीं सुंदरपणें विशद करून सांगितल्या व अप्रत्यक्षपणें शुद्धिचळवळीसाठीं जोरदार पाठवणी दिली. लोकांचीं अंतःकरणें धर्मप्रेमानें भारून गेलीं. त्याच्या त्याच्या मनींमुखीं प्रवचनांतील शब्द नाचूं लागले. समाजांत एक प्रकारचें विलक्षण नवचैतन्य निर्माण झालें.

वरच्या समाजांत ह्याप्रमाणें नवचैतन्याची प्रचंड लाट जोरानें उसळली जात असतांच आश्रमीय जनांनीं आतांपर्यंत आपलीशी करून ठेविलेली गावडेमंडळी प्रत्यहीं मुक्कामावर येऊन श्रीमन्महाराजांचें दर्शन घेऊन जातच होती. विठ्ठल, गोपाळ प्रभृति प्रचारक, त्यांच्या परिचयाच्या कित्येक गावडे लोकांना तद्वतच कित्येक प्रतिकूल या तटस्थ पुढाऱ्यांनाहि आर्जवानें वा भिडेनें श्रीमन्महाराजांकडे घेऊन येत. समाजांतील भरालून गेलेलें तें वातावरण पाहून त्यांच्या मनावर साहजिकच विलक्षण परिणाम होत असे. धर्मप्रेमानें भारलेल्या त्या अफाट जनसमुदायाचें आश्रमावरील उत्कटप्रेम पाहून त्यांच्या मनांतील ताठरपणा थोडा कमी होत असे. मनुष्याचें मन जोंपर्यंत एका विवक्षित बिंदूला चिकटून आहे, तोंपर्यंत त्याच्यांत पालट करणें फार परिश्रमाचें काम असतें. पण 'येन केन प्रकारेण' त्या बिंदूपासून मन जरी यत्किंचितहि ढळवितां आलें, त्या मनुष्याची मनोभूमिका थोडिशी जरी हलवितां आली, त्याच्यांत चलबिचल करतां आली कीं, त्याला इष्ट त्या मार्गावर घेऊन येणें त्या क्षणापासून शक्य होऊं लागतें. वरच्या समाजांतील खळबळाट व नवचैतन्याच्या लाटा पाहून त्या गावड्यांच्या मनांत अननुभूत असा सात्विक भाव जागृत होई व श्रीमन्महाराजांच्या दर्शनानें व संभाषणानें बाकीचा पुष्कळसा कार्यभाग उरकून जात असे. हिंदुकरणाच्या प्रश्नाचा सहानुभूतिपूर्वक दृष्टीनें ते विचार करूं लागत. ह्या नवीन विचारांनीं युक्त होऊन ते घरोघर जात. ह्या अशा क्रमानें प्रथम प्रतिकूल असणारे पुष्कळसे गावडेप्रमुख स्वधर्म स्वीकारण्याच्या प्रश्नाचा आस्थेनें विचार करूं लागले.

ह्याच सुमारास गावडे लोकांची एक सभा भरावयाची होती. ह्या सभेला ते 'बोस' असें म्हणतात. ह्या बोसांत त्यांच्या ज्ञातिसंबंधाच्या महत्त्वाच्या प्रश्नांचा विचार होतो. प्रत्येक वाड्यावरील प्रतिनिधि आपल्या 'बुद्वंता' सह (बुद्धिवंत—जाणता—पुढारी) येऊन बोसांत भाग घेत. हे बुद्वंत कोणत्याहि गोष्टींत जो निर्णय देतील तो सर्वांनीं मानावयाचा, अशी त्यांची शिस्त आहे. पुष्कळ दिवसांनंतर भरणाऱ्या ह्या मोठ्या बोसांत विठ्ठल प्रभृति नवमतवाल्या गावड्यांनीं हिंदुकरणाचा प्रश्न हलकेंच काढावा व गोष्टी विशेषशा धसाला न लावतां सर्वसाधारण रागरंग काय आहे ह्याचा शोध घ्यावा; आपल्या पक्षाला किती बुद्वंत पडतात, किती वाड्यांवरील लोकांना आपली कल्पना रुचते—म्हणजे साधारणतः आपल्या पक्षाला किती माणसें पडतील ह्याची अटकळ बांधावी, असें आश्रमीय मंडळींनीं ठरविलें व त्याप्रमाणें विठ्ठलप्रभृति नवमतवादी मंडळी बोसास गेली. बोसाचा नियुक्त कार्यक्रम पार पडल्यावर विठ्ठलनें 'कोंकणें जायां' चा, (हिंदु होण्याचा) प्रश्न हलूंच बोसापुढें टाकला. त्याबरोबर जुन्या मताच्या लोकांकडून जिकडून तिकडून एकच विरोधाचा ध्वनि उठला. कांहीं बुद्वंतांनीं तर फारच आकांडतांडव केलें व विठ्ठला म बोदूं देण्यापर्यंत पाळी आली. तेव्हां कांहीं समंजस

बुद्धंतांनीं 'अशुभस्य कालहरणं' ह्या दृष्टीनें 'प्रस्तुत प्रश्नाचा पुढें विचार करूं' असें सांगून बोस संपविला.

वरील गोष्ट होऊन कांहीं दिवस झाल्यानंतर पुनः एकदां बोस भरला व त्यांत 'कोंकणें जाया' च्या प्रश्नाला पुनरपि तोंड लागलें. जुनी मंडळी कांहीं केल्या विठ्ठलप्रभृतींचें म्हणणें मानण्यास सिद्ध नव्हती. 'हे असले अनाहूत प्रश्न उकरुन काढून उगाच शांततेनें चाललेल्या समाजाच्या गाड्याला खीळ घालणें श्रेयस्कर नाहीं,' असें त्यांचें आग्रहपूर्वक सांगणें होतें. उलटपक्षीं अन्न ना वस्त्र असलें हें नांदानपणाचें मेलेलें जिणें जगून तरी काय करावयाचें असें नवमतवाले लोक ठासून विचारीत होते. कांहींजण हिंदु-होण्याच्या मार्गांतील नानाविध अडचणी पुढें मांडित होते; कांहींजणांना नूतन कल्पनेची न्याय्यता मान्य होती, पण 'शेंकडोंशें वर्षांचें समाजाला एक विशिष्ट प्रकारचें लागलेलें वळण एकदम सोडून सर्व समाजच्या समाज ह्या हिंदुकरणाच्या गोष्टीचा एकसहा स्वीकार कसा करील' असें वाटून ते वरील गोष्टीला अनुकूलता दर्शवीत नव्हते; तर कांहींजणांचा वरील कल्पनेला मूलतःच विरोध होता. परंतु ह्या सर्व विरोधांपेक्षांहि एक विरोधी वर्ग मोठा आश्चर्य करण्यासारखा होता. आणि तो म्हणजे ज्यांनीं वैयक्तिक दृष्टीनें प्रस्तुत प्रश्नाला आतांपर्यंत मान्यताच दर्शविली होती अशांचा होय ! वस्तुतः ह्या व्यक्ती आतांपर्यंत निश्चित स्वरूपाचीं अश्वासनेंच देत आल्या होत्या; परंतु सर्व समाजांत आल्यावर त्यांचीं वैयक्तिक मतें केव्हांच विल्याला गेलीं! परंतु मानसशास्त्राच्या दृष्टीनें विचार करतां अशी गोष्ट होणें ह्यांत वावगें असें कांहीं नाहीं. प्रत्येक व्यक्तीवर समाजाची म्हणून एक सत्ता असतेच–एवढेंच नव्हे तर असंख्य पाशांनीं व्यक्तींचें अंतर्बाह्य जीवन समाजाशीं अभेद्य स्वरूपांत जखडलें गेलेलें असतें. साहजिकच सर्वसामान्य मनुष्य जेव्हां समाजांत येतो तेव्हां त्याच्या व्यक्तिगत मनोवृत्ति सामाजिक मनांत विलीन होऊन जातात. समुदायांत सर्व सामान्य व्यक्तींचीं कोणतीहि क्रिया स्वतंत्र बुद्धीनें होऊं शकत नाहीं. समाजांत त्या वेळीं जी भावना वर्चस्व गाजवीत असेल तिच्या लाटेंत हाहि वाहून जातो. हजारों माणसांना टाळ्या पिटतांना पाहिले कीं हाहि नकळत टाळ्या वाजवूं लागतो. लोकांनीं कसलाहि जयजयकार केला कीं हाहि तसाच जयजकार करतो; लोक दुःखशोकानें आक्रंदूं लागले कीं हाहि आक्रोश करूं लागतो; अशी त्याची भावनाविवश अवस्था होऊन जाते. वैयक्तिक मन सामुदायिक मनांत निःशेष जिरुन मुरुन वा मरुन जातें. समुद्रकांठावरील वाळूच्या कणाला प्रचंड तुफानांत जितकें स्वयंगतिकत्व असतें तितकेंच ह्या अशा व्यक्तींना सामुदायिक जगांत असतें. साहजिकच त्यांचा व्यक्तिगत विचार आश्वासनें आणि अभिवचनें इत्यादि सर्व गोष्टी समुदायांत गेल्यावर जेथल्या तेथेंच राहतात व समाज करील वा म्हणेल तसें तो त्यावेळीं करूं लागतो.

वरील गोष्टहि अशाच स्वरूपाची झाली. गावड्यांच्या समाजचालक 'बुद्धंतां' कडून हिंदू-करणाच्या कल्पनेला विरोध होतांच बाकीच्या बहुतेकांनींहि त्यांच्यांतच आपला सूर मिळविला. व विठ्ठलपक्षाचा ओघानेंच संपूर्ण पराभव झाला !

विठ्ठलानें दुःखित अंतःकरणानें श्रीमन्महाराजांची गांठ घेतली व सर्व वृत्तांत कथन केला. कांहीं आश्रमीय प्रचारकाहि वरील प्रकारानें अगदीं, हतोत्साह झाले. श्रीमन्महाराजांनीं त्या सर्वांची नानाप्रकारें समजूत घातली व 'जगदंतर हातीं घेणें ही गोष्ट अत्यंत कठीण कशी असते' पिढ्यान् पिढ्यांच्या संस्कारानें समाजाच्या समजुती ठराविक ठशाच्या कशा होऊन बसतात, त्या समजुती अनिष्ट असल्या व

त्यांची अन्यय्यता दिसून आली तरीहि त्यांच्या शेंकडोंशें वर्षांच्या सहवासामुळें त्यांच्या पकडींतून मोठमोठ्या जाणत्या लोकांनाहि कधीं निसटून जातां येत नाहीं, आणि म्हणूनच समाजाच्या आयुष्यांत स्थित्यंतर घडवून आणावयाचें तर तें किती चातुर्यानें अक्कलहुशारीनें व मोठ्या धीरगंभीर वृत्तीनें घडवून आणावें लागतें, ' ही गोष्ट श्रीमन्महाराजांनीं त्यांना उत्तम प्रकारें विशद करून सांगितली. नंतर बोसांतील एकंदर परिस्थिति सूक्ष्मपणें विचारून घेऊन श्रीमन्महाराजांनीं सद्यःपरिस्थितींत अनुकूल व प्रतिकूल असणारे कोणकोणते ' बुद्वंत ' आहेत, प्रतिकूलांना स्वपक्षाला कसकसे आणतां येईल, इत्यादि गोष्टींची घाटघाट केली व पुढील कामाची दिशा आंखून दिली.

प्रचारक मंडळी ताजीतवानी होऊन पुन्हां एकदां कामावर गेली. प्रथम त्यांनीं साधारणतः अनुकूल दिसून आलेले कांहीं ' बुद्वंत ' गांठले. त्यांची परोपरीनें समजूत घालून ते स्वपक्षसाहाय्यकारी होतील अशी अविश्रांत खटपट करण्यांत आली व नंतर त्यांच्या साह्यानें विरोधी असणाऱ्यांशीं अनुसंधान बांधण्यांत आलें. कुंडई येथील श्री. रामचंद्र कुट्टीकर ही गावडे ' जगांतील ' अशीच एक अत्यंत महत्त्वाची व्यक्ती होती. महत्प्रयासानें त्यांना श्रीमन्महाराजांपर्यंत नेण्यांत आलें. श्रीमन्महाराजांनीं त्यांना सर्व गोष्टी यथास्थितपणें समजावून सांगितल्या व ' ह्या आपल्या बांधवांना पुनरपि स्वधर्मांत प्रवेशून घेण्याच्या महत्कृत्यांत आपण साह्यकारी होऊन महापुण्य पदरीं बांधून घ्या, ' असें अंतीं त्यांस आग्रहपूर्वक निवेदन केलें; पण त्यांच्या बाबतींत झालेले सर्व प्रयत्न निष्फळ ठरल्याचेंच पुढें प्रत्ययास आलें ! असो. वरील प्रकारच्या गावडे समाजांतील लहानथोर व्यक्तींच्या गांठी भेटी घेऊन त्यांच्या अंतःकरणांत धर्मप्रेमाचा वन्हि चेतवून देण्यांत आला व त्यांनीं हिंदूकरणाच्या असल्या ह्या पवित्र व श्रेष्ठ धार्मिक कृत्यांत मनोभावें साह्य करण्यास मागेंपुढें पाहूं नये असें त्यांस अत्यंत कळकळीनें सांगण्यांत आलें. ह्याच वेळीं श्रीमन्महाराजांनीं पणजी येथील सुप्रसिद्ध हायकोर्ट वकील श्री. श्रीधर जनार्दन कामत-शंखवाळकर-ज्यांच्या घरींच प्रस्तुत खेपेला आश्रमाचा मुक्काम झाला होता, त्यांच्याजवळ पहिल्यानेंच गावड्यांच्या शुद्धीकरणार्थ आश्रमानें चालविलेल्या प्रयत्नांची परिस्फुटता केली. 'सरकारला न्याय्यरीत्या ह्या शुद्धीकरणाला अडथळा आणतां येणार नाहीं' असें कायदा पाहून त्यांनीं सांगितलें. तद्वतच पणजी येथील दुसरे एक ख्रिश्चन कायदेपंडित सि. गॉमिश पैरेरा ह्यांनींहि पण तोच [illegible]ला दिला. तदनंतर ही गोष्ट गोमांतकांतील आश्रमाच्या विश्वसनीय मंडळीपुढें सविस्तरपणें मांडण्यांत आली. हें वृत्त ऐकून सर्वांनाच अत्यानंद झाला. मग पुढील धोरण ठरवावें ह्यासाठीं आश्रमावर निःसीम प्रेम करणारे श्रीमंत रावराजे व्हायकाउंट काकासाहेब पेडणेकर, श्री जीवाजीपंत महाले व श्री. शंखवाळकर ह्यांच्या समवेत बरीच वाटाघाट करण्यांत आली. शुद्धीकरणाची चळवळ सरकारी दृष्टीनें सोज्ज्वळ राहाण्यास त्यांत मुख्य गोष्ट म्हणजे 'धर्मांतर करणारे लोक स्वखुषीनें तसें करीत आहेत, त्यांच्यावर जुलुम जबरदस्ती व अन्याय्य दडपण आणलें जात नाहीं,' हें सरकारला स्पष्टपणें समजून येणें आवश्यक होतें व त्या दृष्टीनें शुद्धीकृतांचा कांहीं तरी प्रतिज्ञा लेख आश्रमाजवळ असणें उचित आहे, असें ठरलें. आणखीहि पुष्कळशा बारीक सारीक गोष्टींचा खल झाला व हें काम वाटेल तें करून शेवटास न्यावयाचेंच असा स्पृहणीय निर्धार सर्वांनीं केला. श्रीमंत काकासाहेबांनीं गावड्यांना त्यांच्या अवीअवर्णीत सर्वतोपरि साह्य करण्याचें मोठ्या आनंदानें मान्य केलें.

ह्याप्रमाणें गोष्टी झाल्यावर श्रीमन्महाराज पणजीचा मुक्काम संपवून मडगांवकडे जाण्यास निघाले. परंतु मध्यंतरीं विठ्ठल, गोपाळ परीट प्रभृतींनीं कालापुरास चलण्याचा आग्रह केल्यावरुन श्रीमन्महाराज कालापुरास गेले. तेथें विठ्ठलनें स्वपक्षीय गावडे मंडळी मुद्दाम बोलावून घेतली होती. श्रीमन्महाराज आले तेव्हां सर्वांना मनस्वी आनंद झाला. परीट ह्यांच्या घरीं मुक्काम करण्यांत आला. सर्वांनीं मनोभावें श्रीमन्महाराजांचें दर्शन घेतलें. तेव्हां ' हिंदु होण्याचा विचार कांहीं केल्या सोडूं नका, ही संधि घालवूं नका. अशी पर्वणी पुनरपि लाभणार नाहीं. तुमच्या जितक्या वाड्यावरील कुटुंबांची सिद्धता झाली असेल त्यांनीं कसलीहि क्षिति न बाळगतां किंवा कोणाचीहि भीति न धरतां हिंदुधर्मांत यावें. आमचा आश्रम तुमच्यासाठीं वाटेल तें साहस करावयास तयार आहे. तुम्ही नेट व उत्साह धरलात कीं, बाकीचीहि मंडळी आपोआपच तुम्हास येऊन मिळतील. तुम्ही कसलीहि चिंता करूं नका. आपल्या पूर्वजांच्या धर्मासाठीं मरावयास तयार व्हा. त्यांतच तुमचें व तुमच्या संततीचें कल्याण आहे. तुमच्या सर्व अडीअडचणी नष्ट होतील, कसलीहि काळजी करूं नका. परमेश्वर तुमचा पाठिराखा आहे. ' इत्यादि प्रकारें अत्यंत कळकळीनें चार उपदेशाच्या गोष्टी श्रीमन्महाराजांनीं सर्वांस सांगितल्या. तेव्हां विठ्ठलनें " आमचे जुने पुढारी आम्हांला मानीत नाहींत, मग काय करावें ? " असें विचारलें; तेव्हां श्रीमन्महाराज त्याला म्हणाले " काळाचा ओघ लक्षांत न घेऊन जर ते पुढारी वागणार असतील तर ते आपोआपच मागें पडतील. तूं लोकांच्या करितां इतकी एकनिष्ठापूर्वक अहर्निश खटपट करीत आहेस, आपला उद्योग धंदा सोडून देऊन गेले कित्येक दिवस तूं सारखा लोककल्याणासाठीं स्वार्थत्यागपूर्वक झटत आहेस—वाटेल त्या हालअपेष्टा सोसून त्यांच्या उद्धारासाठीं अखंड तळमळत आहेस, तर सर्व लोकांचा विश्वास लवकर तुझ्या म्हणण्यावरच बसेल व तूंच त्यांचा पुढारी होशील. तरी तूं निश्चित मनानें हें महत्पुण्याईचें कर्म प्राणाचीहि परवा न बाळगतां पार पाड, " इत्यादि स्वरूपाच्या गोष्टी सांगून त्याला श्रीमन्महाराजांनीं प्रोत्साहित केलें, व त्याच्यामध्यें पुढारीपणाची प्राण प्रतिष्ठा करून श्रीमन्महाराज मडगांवास निघून गेले. येथेंहि इतर ठिकाणाप्रमाणेंच प्रवचनादिक कार्यक्रम उत्कृष्टप्रकारें पार पडले. प्रो. त्र्यंबकराव नाईक श्री. गोविंदराव पै रायतुरकर, श्री. दळवी इत्यादि येथील आश्रमप्रेमी मंडळीजवळ शुद्धीकरणाच्या प्रश्नाविषयींची परिस्फुटता केली गेली. पण, आश्रमानें हें कार्य स्वशिरावर घेऊं नये; सरकारचा कोप भयंकर होईल; शेरीज गावडे शेवटपर्यंत टिकाव धरूं शकणार नाहींत व आश्रम तोंडघशी पडेल; म्हणून आश्रमानें ह्या भानगडींत न पडणें श्रेयस्कर, असाच सल्ला त्यांनीं आश्रमावरील उत्कटप्रेमभरानें दिला. परंतु आश्रमानें आतांपर्यंत कसकशी कामगिरी करीत आणली आहे हें कार्य परमेश्वरकृपेनें सिद्धीस गेलें म्हणजे त्याचे कसकसे भावी सुपरिणाम होतील इत्यादि गोष्टी श्रीमन्महाराजांनीं त्यांना सांगितल्यावर त्यांची समजूत पटली व सर्वांना अतिशय आनंद झाला. ह्याच सुमारास गावड्यांचा आणखी एक बोस झाला; पण त्याच्या संचालकांनीं अमका 'आला नाहीं' 'तमका आला नाहीं' अशा कांहींतरी सबबी काढून तो प्रश्न तसाच भिजत ठेवला. तथापि कांहीं समंजस 'वुद्धतांनीं' ह्या हिंदूकरणाचा प्रश्न असा अंगाबाहेर टाकल्यास नवमतवादी लोकांचा वाढता पक्ष आपल्यांतून कायमचा फुटून बाहेर पडेल, असें बजाविल्यामुळें पुष्कळसा इष्ट तोच परिणाम झाला असल्याचें विठ्ठल प्रभृतींनीं येऊन सांगितलें. तेव्हां एकंदर गोष्टींचा विचार करतां प्रश्न आतां लवकरच धसाला लागणार हें जाणून,

तत्संबंधींची अनेकविध साधनसामुग्रीची जुळवाजुळव " करण्यासाठीं श्रीमन्महाराजांनीं आपला गोमांतकांतील दौरा संपविला व आश्रमीय प्रचारकांना आंखून दिलेला कार्यक्रम सावधान पद्धतीनें पार पाडण्यास सांगून त्रि. सीमेंत पाऊल टाकिलें. लोंढ्याचे मुक्कामांत आश्रमाचे निःसीम भक्त, लोंढ्याचे सुप्रसिद्ध लाकडांचे व्यापारी श्री. अनंतराव घोटगाळकर ह्यानीं आपल्या मालकीपैकीं २५।३० एकर जमीन आश्रम सांगेल तेव्हां आश्रमानें योजलेल्या कार्याकरितां देण्याचें मोठ्या आनंदानें मान्य केलें.

श्री. अनंतरावांप्रमाणेंच विटेगांवचे ( जि. सातारा ) श्री. यापट ह्यानींहि आपली जमीन 'आश्रम सांगेल त्या लोकांच्या सोईसाठीं व सेवेसाठीं सादर करण्यास मला धन्यता वाटेल, असें मोठ्या आनंदानें आश्रमाला सांगितलें. आश्रमानें आपल्या प्रेमी व विश्वस्त मंडळींना ह्यावेळीं प्रेमाग्रहपूर्वक आपआपल्या पैसा अडका ढिल्या सोडावयास विनविलें व अंगीकृत कार्याचें महत्त्व जाणून त्यांनींहि आश्रमाला साह्य होण्याचें अभिवचन दिलें.' 'आश्रमावर निःसीम प्रेम करणाऱ्या श्री. हरिभाऊ वारटक्के प्रमृति मस्कापूर ( कोल्हापूर ) च्या मंडळीनें तर उत्साहभरानें तशी व्यवस्था तांतडीनें केली. आणखीहि आश्रमाच्या कित्येक हितचिंतकांनीं आश्रमाला मनोभावें साह्य केलें, त्या सर्वांचा उल्लेख करणें येथें इष्ट असलें तरी तसें करणें त्यांना अभिप्रेत नसल्यामुळें आम्हांस करतां येत नाहीं. कार्याचें दृश्यस्वरूप कांहींच दृष्टीपुढें नसतांना केवळ पवित्र श्रद्धेच्या बळावर ज्यांनीं ह्या कार्यांत प्रथम साह्य केलें, त्यांचें महत्त्व निःसंशय विशेषच आहे व ज्यांनीं ज्यांनीं तें तसें साह्य नामनिर्देशाची इच्छाहि न धरतां—एवढेंच नव्हे तर तसा उल्लेखहि कोठें केला जाऊं नये असा आग्रह धरून-केलें त्या सर्वांचा आश्रम सदैव ऋणीच आहे. असो. याच वेळीं महाराष्ट्राचे सन्माननीय पुढारी श्रीमान् तात्यासाहेब केळकर यांच्या कानांवरहि प्रस्तुत गोष्ट घालण्यांत येऊन त्यांचा सल्ला विचारण्यांत आला. धार्मिक जागृती, नमस्कारांचें कार्य, दासबोधादि वाङ्मयाचा विनामूल्य धर्मप्रसार इत्यादि गोष्टींमुळें प्रथमपासूनच त्यांना आश्रमाविषयीं प्रेमपूर्वक कौतुक वाटत असे. त्यांतून हें महत्त्वाचें व अभूतपूर्व कार्य कोणाच्याहि साहाय्याविना आश्रमानें कांहींहि गाजावाजा न करतां इतक्या रंगारूपाला आणलेलें पाहून तर त्यांस मनस्वी आनंद झाला. नंतर कार्याच्या पुढील धोरणासंबंधीं ते ह्मणाले " कायदेशीर दृष्टया पोर्तुगीज सरकार लोकसत्ताक असल्यामुळें कोणाच्याहि धर्मस्वातंत्र्यांत त्यास हात घालतां यावयाचा नाहीं. पण गतेतिहासावरून पोर्तुगीज सरकार आंकाडतांडव करील, हें निश्चितच आहे. त्यामुळें चळवळीला कोणतें स्वरूप आयत्यावेळीं येईल हें सांगतां येत नाहीं. पण त्याला भिण्याचें कारण नाहीं. प्रत्येक कार्यांत विघ्नेंहि येणारच. अशा वेळीं तितक्याच दक्षपणें विचार करून सर्व अडकाठी वारणें अशक्य होत नाहीं. आह्मी आमच्याकडून वाटेल ती मदत करण्यास तयार आहों; तुह्मी निश्चित मनानें कार्यांत उडी घ्या. " तद्वतच स्वातंत्र्यवीर बॅरिस्टर विनायकराव सावरकर ह्यानींहि धन्यतापूर्वक सांगितलें कीं, " शुद्धिकार्यांत सरकारकडून अडथळा झाला तर त्याचा प्रतिकार करणारा पहिला सत्याग्रही सैनिक मी आहें, अशी निश्चिती बाळगा. आश्रमानें हें महत्कार्य अवश्यमेव पार-पाडलेंच पाहिजे. वाटेल तें होवो, हें कार्य तडीस गेलेंच पाहिजे. तत्प्रीत्यर्थ आश्रमाच्या आश्रम ठार झाला तरी चालेल. एका महद्यत्नात आहुति देऊन त्या योगें तो अनेकांच्या अंतःकरणांत हुतात्मतेचा महनीय व दिव्य वन्हि चेतविण्यास कारणीभूत होईल, हें निःसंशय होय. "

ह्याप्रमाणें दोन श्रेष्ठ मुत्सद्दी नरवीरांचा पाठिंबा व आशीर्वाद मिळाल्यावर इतर सन्मान्य पुढारी व वर्तमानपत्रकर्ते ह्यांनाहि कार्याची परिस्फुटता न करतांच मोघम पद्धतीनें खालील आशयाचें एक पत्र खाजगी स्वरूपांत धाडण्यांत आलें.

॥ ॐ ॥ १८४९ पौष.

श्रीयुत.........................यांती—

कृतानेक सप्रेम सा. न. वि. वि.—आर्हीं शुद्धिचळवळ हातीं घ्यावी अशी पुष्कळांची इच्छा होती व आहे; व त्या दृष्टीनें आर्हीहि अत्यंत परिश्रमपूर्वक माहिती मिळविली आहे; हें कार्य आपणासारख्यांच्या साहाय्यानें व एकजुटीनें पद्धतशीर प्रयत्न झाल्यास फारच मोठ्या प्रमाणांत होईल असें आमचें मत झालें आहे. तरी आपण ' लेखनद्वारा व्याख्यानद्वारा मनुष्यद्वारा व द्रव्यद्वारा इत्यादि निरनिराळ्या मार्गांनीं कोणतें व किती साह्य्य करूं शकाल हें शक्य तितक्या लवकर कळविण्याची कृपा करावी.

आपला अत्यंत नम्र कृपाकांक्षी व्यवस्थापक
ब्रह्मचर्याश्रम मसूर. जि. सातारा.

ह्या पत्राला सर्व पुढाऱ्यांनीं व केसरी, श्रद्धानंद, बलवंत, प्रबोध—आदिक महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व प्रमुख वृत्तपत्रांनीं अत्यंत प्रोत्साहनपर अशीं उत्तरें पाठविलीं. त्यामुळें आश्रमाला साहजिकच हुरूप आला व दुप्पट उत्साहानें मंडळी कार्यमग्न झाली. मग कोणाच्याच पायांला विसांवा राहिला नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. प्रत्यहीं उठून ह्याला गांठ, त्याला भेट, त्याची समजूत कर, त्याला धीर दे, असा उपक्रम गोमांतकांतील आश्रमीय प्रचारकांचा सतत चालला होता. ह्या उपक्रमामुळें कालापूर, चिंबल, नागझर इत्यादि ठिकाणचे पुष्कळसे गावडे ' अनुकूल ' सदरांत पडत चालले होते. असें होतां होतां एक दिवस दुसऱ्या कांहीं कामानिमित्त गावड्यांचा बोस भरला होता. नियोजित कामाचा विचार झाल्यानंतर साहजिकच ' कोंकणें ' होण्याचा प्रश्न पुन्हां पुढें काढण्यांत आला; पण कांहीं पंचांनीं तो बट्टेवारी उडवून लावण्याचाच निश्चय केला होता. कांहींजणांनीं तर विठ्ठलादिक नवमतवाल्यांना " थांबा, तुमचीं कारस्थानें पाद्रयांस जाऊन कळवितों " अशीहि धमकी देण्यास कमी केलें नाहीं. इतक्यांत एकानें दुसरीच शंका काढली. तेव्हां पुन्हां एकदां पहिले प्रश्न निघून वादाची धुमश्चक्री झाली व तोंडातोंडीनें निमत नाहीं असें पाहून एकानें तर लट्ठालट्ठी करण्यासहि प्रारंभ केला. झालें, सभा उधळली गेली. एका मनुष्यालाहि मोठी सभा कांहीं तरी निमित्त काढून कशी कोलमडून पडतां येते त्याचें प्रत्यंतर आलें. नवमतवादी अंतःकरणांत दुःखी कष्टी होऊन घरोघर गेले.

ह्यावेळीं आश्रमीय प्रचारक मोठमोठ्या गांवांतील शिष्ट शिष्ट मंडळीच्या गांठी भेटी घेण्यांत गुंतले होते. बहुतेक लोकांचा प्रथम ह्या गोष्टीवर विश्वासच बसत नसे. एवढेंच नव्हे तर भीमन्महाराजांच्या सांगण्यावरून श्री. शंखवाळकर वकील जी आपली कांहीं प्रेमाची चार मंडळी, प्रस्तुत प्रश्नाचा खल करण्याकरितां म्हणून मधून मधून जमवीत त्यांनाहि प्रथम प्रथम ही थट्टाच आहे असें वाटत असे व पुष्कळ वेळां " तुमचीं तयार झालेलीं माणसें तरी आम्हांस दाखवा—त्यांची

आम्ही परीक्षा घेतों " अशी मागणी आश्रमीयांजवळ केली जात असे. त्यांच्या म्हणण्याचा आशय असाच असे कीं, कांहीं गावढे तोंडापुरते होहो म्हणतील व आयत्यावेळीं पलटतील आणि पश्चात्तापाची पाळी येईल. मग जेव्हां त्यांना खरी वस्तुस्थिति समजाऊन सांगितली गेली तेव्हां कांहींचें थोडेसें समाधान झालें; पण बहुतेकांना तो एक थट्टेचा विषयच होऊन बसल्यासारखें झालें होतें. श्री. जीवाजीपंत महाले ह्यांना सेवटी चाललेल्या कामाची यथार्थ कल्पना होती व त्याची श्रीमन्महाराजांवर दृढ श्रद्धा असल्यामुळें त्यांस अंतिम यशाचीहि निश्चिती वाटत असे.

आश्रमीय प्रचारक काम आटोपून कालापुरास आले तों विठ्ठल योसांतील अपयशामुळें हातपाय गाळून निराश होऊन बसला होता. नानाप्रकारें समजावून सांगून त्यांनीं त्याची निराशा पळवून लाविली. " जुन्या मताची मंडळी पटवून घेत नसली तर न घेऊं दे. आपण आपल्या पक्षाच्या मंडळी पुरताच प्रश्न सोडवून काम उरकून टाकूं, " असें त्यास समजावून सांगितलें गेलें व त्याप्रमाणें पुन्हां कामास प्रारंभ झाला. मंडळी जितक्या नेटानें कामास लागली तितक्याच नेटानें ' विघ्नांच्या फौजा ' उठल्या. विघ्नांच्यामुळें कार्यास तेज चढतें हें जरी खरें असलें तरी त्यांच्यामुळें कार्यकर्त्यांच्या जीवाचें जें पाणी पाणी होऊन जातें तेंहि दृष्टिआड करून चालत नाहीं. क्षणाक्षणाला उठणाऱ्या नवीन नवीन व असंभाव्य शंका-कुशंकांचें धीर-गंभीरपणें निर्मूलन करण्यांत कार्यकर्त्यांची तितिक्षा कशी पदोपदीं कसोटीस लागत असेल ही गोष्ट अनुभविकच जाणूं शकेल. त्यांतल्या त्यांतहि प्रमुख कार्यकर्त्यांची-नायकांची अशा ह्या वेळीं फारच तारांवळ उडते; कारण पर्वतप्राय विघ्नांनीं त्यांच्या सहाय्यायांचा धीर सुटलेला असतो किंवा सुटतो, व निराशेनें ग्यास झालेल्या त्यांच्या अंतःकरणांत नवचेतना वा नवोत्साह उत्पन्न करणें महत्प्रयासाचें काम असतें. निराशेमुळें कोलंबसाला समुद्रांत फेंकून देण्याचे प्रयत्न त्याच्याच लोकांकडून कसकसे झाले, हें इतिहास सांगतच आहे. अशा ह्या समयीं उद्भूत झालेल्या निराशेच्या काळ्याकुट्ट अंधारांत जर कोणता आशेचा किरण त्या नायकाला दिसत असेल तर तो परमेश्वरी कृपेचाच होय. साहजिकच " न मे भक्तः प्रणश्यति " हें त्या भगवंताचें अभिवचन लक्षांत घेऊन त्याचेंच कार्य पार पाडण्याविषयीं त्याला अगदीं मनोभावें करुणा भाकावी व पुढील मार्ग आक्रमावा असा क्रम ओघानेंच चालतो. त्याला अनुसरूनच आश्रमीय जनांचीहि गोष्ट होत असे. अशा संकटाच्या वेळीं सद्गुरुचरणांचें ध्यान करून ते त्यांच्यावर सर्व भार घालीत व आपलें निमित्तमात्रत्व ओळखून ज्याची करणी त्यास पार पाडून घेण्यास विनवीत. पुष्कळवेळां अशा ह्या विपत्प्रसंगीं श्रीमन्महाराजांकडून अनपेक्षित पद्धतीनें एखादा साहाय्यकारी मनुष्य यावा किंवा निदान संकटाला तोंड देण्यास समर्थ करणारें एखादें प्रोत्साहनपर पत्र तरी यावें असें होत असे व मग साहजिकच प्रचारकांचा कार्योत्साह सहस्रपटीनें वाढे. कार्य पार पाडण्यास उत्साहशक्ति सतत जागृत ठेवावी लागते. ह्या दृष्टीनें तद्गतच कार्याच्या धोरणें बरोबर राखण्याकरितांहि प्रचारकांनीं प्रत्येक ८।१५ दिवसांनीं श्रीमन्महाराजांना जाऊन भेटावें व प्रत्यहीं एक तार व सविस्तृत पत्र पाठवावें, अशी योजना करण्यांत आलेली होती. असो.

रविवारीं गावढ्यांचा प्रचंड बोस भरला. हिंदूकरणाच्या प्रश्नाचा आज सांगोपांग विचार करण्याचें बोसाच्या संचालकांनीं निश्चित केलें होतें. आजचा हा बोस महत्वाचा होणार म्हणून विठ्ठलनें आश्र-

होणारच होणार' असें तो ज्याला त्याला सांगत सुटला ! त्याच्या ह्या वेळच्या या उत्साहातिशयाची एक मजेदार गोष्ट येथें सांगतां येण्यासारखी आहे. एक दिवस त्याच्या मंडळींत नित्याप्रमाणें शुद्धीकरणासंबंधीं कांहीं वादविवाद चालला असतां, हिंदु झाल्यानंतर प्रेतसंस्काराच्या जागेविषयीं अडचण फार पडेल, असें कोणी म्हटलें. विठ्ठल मसूरास असतांना एक दिवस त्यानें इतर प्रश्नांप्रमाणें हा प्रश्नहि श्रीमन्महाराजांजवळ काढला होता. त्यावेळीं श्रीमन्महाराज "तुम्ही हिंदु होणार तर हिंदुप्रमाणेंच प्रेताला अग्निसंस्कार देत चला, आरोग्याच्या व जागेच्या दृष्टीनेंहि तें करणें श्रेयस्कर असतें" अशा आशयाचें कांहीं त्याच्याजवळ बोलले होते. तेच शब्द विठ्ठलनें ह्यावेळीं आपल्या मंडळीस सांगितले व 'आमच्या महाराजांनीं आम्हांला प्रेताला अग्निसंस्कार देण्यास सांगितलें आहे तर माझ्या म्हाताऱ्या आईला आतांच अग्नि देऊन मी ती पद्धति सुरू करतों' असें म्हणून तो खरोखरच आपल्या म्हातारीला घेऊन येण्यासाठीं निघाला ! तेव्हां बाकीच्यांनीं त्याला थोपवून धरलें म्हणून ठीक झालें. असो.

आश्रमीय प्रचारक उत्साहातिभरानें कार्यप्रवृत्त झालेले होते. प्रत्यहीं नवीन नवीन मंडळी येऊन मिळतच होती. त्यांतल्या त्यांतहि सांतान कारनेर, कायतान पेरेर, मिकारो प्रभृति चिंबलच्या मंडळीचा कार्योत्साह विशेषच होता. बाकीचे कोणीहि लोक हिंदु न झाले तरी आपण मात्र हिंदु झाल्याविना राहाणार नाहीं, असा त्यांचा निर्धार होता. ह्यावेळीं त्यांनीं पुढाकार घेऊन चिंबल येथें बोस भरविला. आश्रमीय मंडळीहि उपस्थित होती. कुंडईचे गांवकर श्री. रामचंद्र कुट्टीकर हेहि बोसासाठीं आले होते. विलोरीन, सांतान, कायतान, मिकारो, पियेदाद, कुस्तांव प्रभृति नव पक्षाच्या पुढाऱ्यांचा जोर विशेषच होता. अर्थातच विरोधी पक्षाचें कांहीं चालूं शकलें नाहीं व आपल्या पूर्वजांच्या धर्माचा स्वीकार केल्याविना रहावयाचेंच नाहीं ही गोष्ट बहुमतानें मान्य झाली. ह्या नंतर आश्रमीय प्रचारकांस कांहीं चार उपदेशाच्या गोष्टी सांगण्याविषयीं विनंति करण्यांत आली. तेव्हां 'ते लोक सध्यां विचार करीत असलेला प्रश्न अत्यंत जिव्हाळ्याचा कसा आहे, प्रस्तुतकाळीं ते धड खिस्ती ना हिंदु अशा शोचनीय अवस्थेंत कसे लोंबकळत आहेत; पाद्र्यांनीं व्यसनाधीनते विना उच्च वर्णीय खिस्त्यांना तरी कोणतें धर्मज्ञान शिकविलें आहे तर तें ह्या बिचाऱ्या गावड्यांना शिकवितील ! पण यथार्थ धर्मज्ञानाच्या व सदाचरणाच्या अभावीं त्यांस अंतःकरणाचें खरेंखुरें समाधान कसें मिळणार नाहीं, पाद्र्यांनीं त्यांच्या पूर्वजांना बाटवून त्यांचा धर्म हिरावून घेतल्यामुळें त्यांचें सर्वतोपरि नुकसान कसें झालें आहे; त्यांनीं त्यांच्या शेती-वतन-वाड्या जप्त करून त्यांस अनाथ दशेस कसें आणलें आहे, आणि ज्यांनीं त्यांच्या मातापितरांचे धिंडवडे काढले, त्यांच्या आयाबहिणींची अब्रू घेतली, त्यांच्याच धर्मांत सुखासमाधानानें नांदणें म्हणजे केवढें भयंकर पातक आहे, व ही त्यांची पतितावस्था पाहून ते पूर्वज कसे तडफडत असतील, त्यांच्या मनःकामना अपुऱ्या राहिल्यामुळें त्यांचे आशीर्वाद मिळण्याऐवजीं त्यांचे तळतळाट शिव्या-शापच त्यांस कसे लागत असतील; म्हणून त्या पूर्वजांना संतुष्ट करून त्यांचे आशीर्वाद त्यांना कसे मिळवितां येतील व भावी संततीला



शुद्धिवीर श्री. रामचंद्र नारायण लवंदे, रायबंदर (गोवा).

उभे राहिले व कोठें तरी घर करुन असलेल्या शंकाकुशंकांची घाण त्या अश्रूंच्या प्रवाहांत कधींच वाहून गेली. नंतर सर्वांनीं आपापल्या घरीं जावें व पूर्ण विचार करुन नागझर येथें दोन दिवसांनीं जमावें आणि आश्रमास प्रस्तुत प्रश्नासंबंधीं निश्चित निर्णय द्यावा, असें ठरलें. त्याप्रमाणें एका पंचानें उभें राहून सांगितलें कीं, "रविवारीं सर्वांनीं नागझर येथें यावें व त्या ठिकाणीं आपापल्या असतील नसतील त्या सर्व तक्रारी मांडाव्या. त्यांचा यथायोग्य पद्धतीनें विचार झाल्यानंतर सर्वांनीं स्वसंतोषानें हिंदुधर्मांत जावयाचें नक्की ठरवावें. त्या दिवशीं कोणी हजर राहिला नाहीं तर त्याची तक्रार पुढें ऐकली जाणार नाहीं." यानंतर बोसाचें काम संपलें व मंडळी घरोघर गेली. आश्रमीय मंडळी मुक्कामावर आली व पुढील तजविजीस लागली. आनंदमूर्ति पणजीस गेले व श्री. महात्मे शेलवालकर आदिकांना झालेला वृत्तांत कथन केला. सर्वांना आनंद झाला व नागझरच्या बोसास उपस्थित राहण्याची साहजिकच त्यांना इच्छा झाली. ते उपस्थित झाल्यास गावड्यांना अधिकच जोर येईल. तरी त्यांनीं अवश्यमेव नागझरास यावें, असें सांगून आनंदमूर्ति काळापुरास परत गेले. तोंच रायबंदरचे आश्रमप्रेमी व्यापारी श्री: रामचंद्र नारायण लवंदे व 'भारत' कारांचे बंधु श्री. सुदाव देसाई वकील हे आश्रमीयांचा शोध घेत घेत काळापुरास आले. श्री. लवंदे ह्यांना शुद्धिकार्याची तळमळ कशी होती, हें मागें दाखविलेंच आहे. येरें मुक्कामीं ते मुद्दाम श्रीमन्महाराजांस ह्याच कामाकरितां भेटून गेल्याचेंहि मागें सांगितलेंच आहे; परंतु एक महिन्यापूर्वीपर्यंत श्रीमन्महाराजांनीं आश्रमानें चालविलेल्या प्रयत्नांची परिस्फुटता तशी कोणाशींच केलेली नव्हती; कारण कार्य अत्यंत सावधगिरीनें होणें आवश्यक होतें. साहजिकच श्री. लवंदे यांच्या कानावर जेव्हां हें वृत्त आलें तेव्हां ते तडक मोठ्या उत्साहभरानें काळापुरास आले. आतांपर्यंत आश्रमीयांचा व त्यांचा म्हणण्यासारखा परिचय नव्हता. केवळ तोंड ओळखच होती; पण सज्जनांची मैत्री सात पावलांतच होते "प्राहुः साप्तपदं मैत्रम्" असें जें म्हणतात त्याचें उत्कृष्ट प्रत्यंतर येथें आलें. कारण, ह्या क्षणापासून श्री. लवंदे ह्यांनीं जिवाचीहि क्षिती न बाळगतां आश्रमीयांच्या बरोबर जी कार्यांत उडी घेतली ती घेतलीच !

भोजन आटोपून सर्व मंडळी नागझर येथील सभास्थानीं गेलीं. नागझर येथील हें स्थान लोकांच्या वर्दळीपासून, विशेषतः सरकारी अधिकाऱ्यांच्या जागेपासून, अगदीं एका अंगाला असल्यामुळें बहुतेक महत्त्वाचे बोस त्याच जागीं भरत असत. दोनप्रहरीं चिंचल, नागझर, नागाळी करंजाळ, काळापूर, यांधार,मणमाट (ओडशेल) नावशी, माडयांत, सावल्यांत, करवली धुळापी इत्यादि ठिकाणचे गावडे आपापल्या प्रतिनिधींसह उपस्थित झाले. सभेला प्रारंभ झाला व आतांपर्यंत निघालेल्या सर्व अडीअडचणींचा विचार पुन्हां शांतपणें केला गेला. जुन्या पक्षाच्या कांहीं प्रतिनिधींनीं आपली निर्वाणीची ह्मणून अगदीं परकाष्ठा केली. 'हिंदु लोक आपणास जवळ करणार नाहींत, ख्रिस्ती भाटकर आपलीं दोतें काढून घेतील, पाद्री व सरकार आपणांस नानाप्रकारें छळतील प्रेतसंस्कारालाहि जागा मिळणार नाहीं इत्यादि नित्याचीं व दुसरीं पण काल्पनिक भुतें उभीं करण्यांत आलीं. ह्यावेळीं चिंचलकर गावडे पुढें सरसावले व त्यांच्या प्रतिनिधीनें मोठ्या आवेशानें नवपक्षाची बाजू पुढें मांडली. 'सरकार सगळ्यांना कांहीं तुरुंगांत टाकणार नाहीं किंवा सीमापार करणार नाहीं. ख्रिस्ती भाटकरांनीं आपलीं दोतें काढून घेतलीं तर त्यांनाच उपाशीं मरावें लागेल आणि, सर्व हिंदूंनीं आपणास थारा दिला नाहीं तर दुसरीं तरी आपला त्यांचा घेटीभेटी व्यवहार कोठें होत आहे तर पुढें त्यांच्यावाचून अडतें होईल ?

आपण सर्वजण एक जुटीनें वागलों तर कांहींच अडचण येणार नाहीं आणि जर आली तरी ती आपण आनंदानें सहन करूं. आपले हे स्वामी हाणतात तसें अशा अवस्थेंत जगण्यापेक्षां व स्वतः-साठींच मरण्यापेक्षां आपल्या बांधवांच्या धर्मासाठीं मेलों तर काय बिघडलें? ' चिखलकरांचें हें स्फूर्तिदायक भाषण ऐकून विरोधीपक्ष अगदीं थिजून गेला, व हिंदुधर्माचा पुनः स्वीकार करावयाचाच असें बैठानें मान्य केलें. तेव्हां एका कागदावर सर्वांचे आंगठे संमतिनिदर्शनासाठीं म्हणून उठवून घेण्यांत आले. पाळेंगांवचा प्रतिनिधि जुजे मनवेल व आणखी एकदोन टेवढे मान्यता देण्यास सिद्ध झाले नाहींत. ह्याप्रमाणें गोष्टी झाल्यावर श्री. रामभाऊ रूवंदे ह्यांनीं सर्व पूर्वहिंदूंच्या वतीनें म्हणून सुंदर भाषण करून सर्वांस अश्वासित केलें व सरतेशेवटीं आश्रमाच्या वतीनें आनंदमूर्तींनीं सर्वांस उद्देशून थोडक्यांत सांगितलें कीं, "ऐहिक फायद्यांकडे सर्वथैव दुर्लक्ष करून तुम्ही धर्मासाठीं मरावयास तयार झाला आहां हें पाहून आम्हाला तर फारच आनंद होत आहे; पण तुमचे स्वर्गस्थ पितरहि तुम्हांला धन्यवाद देत असतील, हें लक्षांत ठेवा. धर्मापेक्षां ह्या जगांत कांहींहि श्रेष्ठ नाहीं. कशाचीहि पर्वा न बाळगतां तुम्हीं त्याचा स्वीकार करा. बावीस कोटी हिंदुलोक तुमच्या पाठीमागें आहेत. परमेश्वर तुमचा सत्यसंकल्प निर्विघ्नपणें पार पाडो इतकेंच इच्छितों." नंतर 'धर्माच्या करितां' व 'सदासर्वदा' हे श्लोक सर्वांकडून एकदम म्हणवून घेतले गेले व देवाला सर्वांनीं अनन्यभावें नमस्कार घातले; सर्वांच्या कपाळीं बुक्का लावण्यांत येऊन प्रसाद वाटण्यांत आला. ह्याच वेळीं पणजीहून श्री. सुखठणकर, महात्मे, शंखवाळकर, आंग्ले व दुभाषी ही मंडळी आली. सभेचें काम संपलेलें पाहून त्यांना अत्यंत विस्मय वाटला व कांहीं जणांकडून आश्रमीयांजवळ असे उद्गारहि निघाले कीं, "काय! काम झालें! एकूण आमची कांहींच गरज लागली नाहीं. काम इतकें रंगारपाला आलें असेल असें आम्हांस वाटलें नव्हतें. धन्य आहे तुमची!" तर कांहीं जणांनीं, "हे कागदी घोडे होतील," अशीहि भीति प्रदर्शित केली. इकडे गावडे मंडळींत आनंदोत्साहाची एकच लहर उसळली होती. कांहीं वेळानें सर्वजण ' जयजय रघुवीर समर्थ !' ' हिंदुधर्मकी जय !' असा घोष करीत मोठ्या रस्त्यावर आले आणि तेथून पाहुणे मंडळीला निरोप देऊन जे ते आपापल्या घरोघर निघून गेले.

ह्याप्रमाणें शुद्धीच्या इतिहासांतील हा ' सोक्षमोक्ष 'चा दिवस यशस्वीपणें पार पडला. तदनंतर साधारणतः सर्व वाड्यांची खानेसुमारी घेण्यांत येऊन प्रतिज्ञालेख लिहून घेण्याच्या कामास प्रारंभ झाला. त्या प्रतिज्ञा लेखांचा नमुना असाः—

## प्रतिज्ञालेख.

मी खालीं सही करणार ..................................................

वय......................धंदा..................जात......................राहणार.........

प्रांत गोवा. प्रतिज्ञेवर ( परमेश्वरी साक्ष देऊन ) लिहून देतों कीं, आमचे पूर्वज याच प्रांतांतील मुळचे रहिवासी असून हिंदुधर्मीय होते. या भावनेची जाणीव मला पूर्ण आहे. शिवाय आमच्या कुटुंबांत आहार व्यवहारादि एकंदर चालीरीती पूर्वीप्रमाणेंच कायम आहेत. पुढें जसजसा मला धर्मासंबंधीं अनुभव येत गेला तसतसा त्या आमच्या पूर्वजांच्या हिंदु सनातन धर्मावरील विश्वास वाढत जाऊन त्या विषयींची उत्कंठा आणि तळमळ लागून माझ्या मनाच्या समाधान आणि शांतीकरितां

पूर्ण विचारानें स्वखुषीनें ब्रह्मचर्याश्रमाचे संस्थापक महानुभव 'श्रीस्वामीजी विनायक महाराज मसूरकर' यांजकडे मला आर्यधर्मात घ्या व पावन करा ! ह्मणून आदर व आग्रहपूर्वक विनंती केली. यांत मला कोणी लांच लुचपत किंवा धाक दपटशाहा दाखविलेला नाहीं किंवा कोणत्याहि रीतीनें माझी फसवणूक झालेली नाहीं. येणेंप्रमाणें लेख मी स्वखुषीनें लिहून देत आहें.

साक्ष सही अगर निशाणी

श्री. शांताराम गोवेकरमास्तर, श्री. गोपाळराव परीट यांचे दोन बंधु, पानवेलचे मास्तर श्री. कुंवाडेकर, आश्रमीय प्रचारक श्री. नाना कोंडोलीकर, श्री. शिवाप्पा महाजन, आनंदमूर्ती, लवंदे अशी मंडळी गांवोगांव हिंडून वरील प्रतिज्ञालेखाचें काम झपाट्यानें उरकूं लागली. कारण कालातिक्रम झाला कीं, तीव्र काल कार्याचें फल खाऊन टाकतो. "कालातिक्रमात्काल एव फलं पिबति," असें ज्ञानवृद्धांचें अनुशासन आहे. साहजिकच हें प्रतिज्ञालेखाचें काम उपाशी तापाशी राहून रात्रीं अपरात्रीं वाटेल तेव्हां करावें लागे; कारण सर्व मंडळी शेती धंद्यावर जात असल्यामुळें कितीतरी हेलपाटे व्यर्थ जात. मालक असेल अशी वेळ गांठूनच घरीं जावें लागे. त्यामुळें वरील सर्वमंडळीला हें प्रतिज्ञालेखाचें सोपें वाटणारें कामहि फार दगदगीचें व हालाचें झालें. हिंदुकरणाविषयीं अनुकूल नसणारी अशी कांहीं मंडळी होतीच, त्यांच्या प्रतिनिधींनीं नागझरला अर्थातच सह्या दिल्या नव्हत्या; परंतु ह्या व्यक्तींच्या विरोधाला कांहींच किंमत दिली गेली नाहीं. सामोपचारानें आपलें मत प्रस्थापित होण्याचा मार्ग खुंटलेला पाहून त्यांच्या पैकीं कांहीं असमंजस व्यक्तींनीं वरील मंडळीला ठिकठिकाणीं नाडण्याचा उपक्रम आरंभिला. एवढेंच नव्हे तर यथेच्छ मार देण्याच्या धमक्याहि दिल्या व एकदां तर आनंदमूर्तीवर चोरटा हल्लाहि चढवला. पण त्यावेळीं विठ्ठल गावडा व गोपाळ परीट असल्यामुळें भलताच प्रसंग आला नाहीं. त्या दिवशीं रात्रीं ह्या त्रिवर्गानें श्री. महात्मे ह्यांच्या घरींच मुक्काम केला. तेव्हांपासून आश्रमीयांनीं कधींहि एकट्यानें फिरूं नये, अशी सक्त ताकीद श्री. महात्मे यांनीं दिली व आश्रमांतहि तसें कळविलें. कारण, त्यांना कार्यकर्त्यांच्या जिवाची किंमत कळत होती; पण कार्यकर्त्यांचा जीव प्रत्येक क्षणीं धोक्यांत असतो ही गोष्ट पर्यंकपंडितांच्या सुस्त मेंदूला कशी आकलन होणार!

वरील प्रमाणें प्रतिज्ञालेख घेण्याचें काम मोठ्या धडाक्यानें चाललें होतें. 'गोव्याला शुद्ध होणाऱ्या एका व्यक्तीचीहि सही मला आणून द्या,' ह्या कै. गजाननराव वैद्यांच्या शब्दांची आठवण होऊन, आश्रमीयांत ह्यावेळीं धन्यता वाटल्यावांचून राहिली नाहीं. लवकरच लेखाचा जवळ जवळ दोन हजारांवर आकडा झाला तेव्हां हें काम बाकीच्या मंडळीवर सोपवून श्री. लवंदे व आनंदमूर्ति ठिकठिकाणचे भाटकर पुढारी, सरकारी अधिकारी वर्ग, शिष्टशिष्ट मंडळी आदिकांना भेटून त्यांची सहानुभूति व पाठिंबा मिळविण्याकरतां गेले. चिंबलचे श्री. केशव पुंडलीक कामत, कालापूरचे श्री. विष्णु गिरिधर शेणवी धेंपे, श्री. रायु अनंत प्रभु नाचनोडकर, श्री. लोलीबाबा केंकरे, श्री. सोनू भोसले, श्री. रायु प्रभु ह्यांबरे, धुळापीचे श्री. विश्वनाथ कामत पानवेलकर, नागझरचे श्री. विष्णू गोविंद नाईक पानवेलकर, ताळगांवचे कमलाक्ष अनंत घोडेकर आणि त्यांचे बंधू आणि करमळीचे श्रीधर प्रभू म्हांबरे, पणजीचे श्री. यशवंत प्रभु लवंदे, बोरीचे पांडुरंग वामन बोरकर, म्हापशाचे श्री. विनायक शेट लांजेकर, पेडण्याचे व्हायकाऊंट पितापुत्र इत्यादिकांनीं प्रसंग पडला तर गावड्यांस आधार देऊन चळवळीस पाठिंबा देण्याचें अभिवचन दिलें. कांहीं सहृदय व्यक्तींनीं द्रव्यसाहाय्य देण्याविषयीं आपली इच्छा दर्शविली. पण ह्या चळवळीस त्यांच्याकडून द्रव्यसाहाय्य देतांना सरकारी

दृष्टीनें त्यांच्यावर रोष होण्याचा संभव असल्यामुळें श्रीमन्महाराजांनीं ह्या कार्याप्रीत्यर्थ गोमांतकाबाहेरूनच सर्व द्रव्याचा पुरवठा करण्याचें ठरविलें असल्याचें त्यांस प्रेमपूर्वक कळविण्यांत आलें. सरकारी अधिकारी वर्गांतील कित्येक व्यक्तींनींहि यावत् शक्य त्याप्रकारें साह्यभूत होण्याचें आश्वासन दिलें, त्या सर्वांचा नामनिर्देश येथें करणें शक्य व इष्टहि नाहीं.

ह्याप्रकारें गोष्टी चालत आहेत तोंच दासनवमीचा सुमार झाला तेव्हां वे. शा. सं. शास्त्रीबुवा व ब्र. गणपतीबुवा हे कुंकळ्ळी, म्हारदोळ, प्रियोळ, वेलिंग, बोरी, इत्यादि भागांत कामासाठीं गेले व श्री. गोपाळराव परीट ह्यांच्या मावाला बरोबर घेऊन, ब्र. आनंदमूर्ती मसुरास निघून आले आणि तसेच पुढें आश्रमीय मंडळीसह सज्जनगडावर गेले. तेथें श्रीमन्महाराजांसमवेत आश्रमीय शुद्धिमंडळाची बैठक झाली. गोमांतकांतून आलेले ते हजारों प्रतिज्ञा लेख व त्यांतील त्या लोकांचीं तीं वेडीं वाकडीं खिस्ती ' नांवें ' पाहून मंडळीला मोठी मजा वाटली आतां अगदीं विलंब न लावतां शुद्धिकार्य उरकून टाकावयाचेंच असें निश्चित ठरलें व तत्संबंधींच्या सर्व गोष्टींची यथास्थितपणें विचारणा केली गेली. शुद्धिकार्य आतां प्रत्यक्षपणें पार पडावयाचें तर इतउत्तर गोमांतकांत कोणकोणते कार्यकर्ते ठेवावयाचे, त्यांच्यावर कमी जास्त प्रसंग आला असतां त्यांची जागा एकाहून एक वरचढ अशा आश्रमीय माणसांकडून कसकशी भरून काढावयाची, सांकेतिक पद्धतीनें सर्व पत्रव्यवहार कसा सांभाळावयाचा, गोमांतकांतल्या ठाण्यांत कसकशी व्यवस्था करून ठेवावयाची, द्रव्याचा पुरवठा अंतिमच्या क्षणापर्यंत पुरा कसा पाडावयाचा इत्यादि स्वरूपाच्या अनेक महत्त्वाच्या गोष्टी सुनिश्चित करण्यांत आल्या. त्याचप्रमाणें प्रत्यक्ष शुद्धिकार्याच्या प्रसंगीं समस्त हिंदुजनतेनें एकस्वरानें चळवळीला आशीर्वाद देणें आवश्यक असल्यावरून लहान मोठ्या सर्व पुढाऱ्यांना, वर्तमानपत्रकर्त्यांना, सन्मान्य शिष्टांना व संस्थांना तशा आशयाची विनंती समक्ष वा पत्र द्वारें करण्यांत यावी; तद्वतच दिल्लीत वरिष्ठ कायदेमंडळाची ( लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची ) व मुंबईस प्रांतिकविधिमंडळाची बैठक चालू होती, तेथें आश्रमीय प्रतिनिधि पाठवून श्रीमान् तात्यारावजी केळकर ह्यांच्या साहाय्यानें चळवळीस सर्व हिंदुसभासदांचा पाठिंबा मिळवावा, असें ठरलें. अनेक बारिकसारीक तपशीलाच्या गोष्टी निश्चित करण्यांत आल्या. ह्याच वेळीं आश्रमावर निःसीम प्रेम करणारे धुळ्याचे श्रीसमर्थ भक्त श्री. शंकरराव देव ह्यांच्याहि कानांवर शुद्धीचें वृत्त घालण्यांत आलें. त्यांना अतिशय आनंद झाला व शक्य झाल्यास शुद्धिसमारंभास स्वतः उपस्थित राहण्याचें त्यांनीं अभिवचन दिलें. गडावरील उत्सव संपला.४००वर्षांनंतर घडून आणावयाचें हें महत् विकट कार्य निर्विघ्नपणें पार पाडण्याविषयीं श्रीसमर्थांना पुनः पुनः विनवून अत्यंत कळकळीनें करुणा भाकण्यांत आली. धर्मवेड्या पोर्तुगीजांच्या प्रांतांत उघडपणें त्यांच्या प्रजाजनांना हिंदुधर्माची दीक्षा देण्यांत केवढ्या घोर आपत्तीच्या खाईंत आश्रमाला उडी घ्यावी लागेल ह्याची स्पष्टपणें कल्पना बांधणें कोणालाहि शक्य नव्हतें; पण आश्रमीय प्रचारकांवर बराबाईट प्रसंग ओढवणार हें सुनिश्चित होतें. साहजिकच 'आपापली सर्व शक्ति कार्यकर्त्यांत प्रवेश करो व त्यायोगें ते विजयी होऊन परत येवोत ' अशी सर्वांनीं मिळून विघ्नहर्त्या विनायकाचीहि मनोभावें प्रार्थना केली व मंडळी गडावरून खालीं उतरली. त्याचप्रमाणें एक दोन दिवसांत दिल्लीकडेहि आश्रमाचे प्रतिनिधिहि पाठविण्यांत आले. त्यांनीं वाटेंत केसरी आदिक वृत्तपत्रांचा संपादकवर्ग, श्री. सिद्धेश्वर शास्त्री आदिक हिंदुसभावादी मंडळी, तद्वतच श्री. अण्णाराव भोपटकर, श्री. दा. वि. गोखले, श्री. बाबाराव सावरकर,

डॉ. सावरकर, श्री. दत्तोपंत गोगटे, श्री. तुळजापुरकर वकील, बडोद्याचे स्वामी आनंदप्रिय आदिक मंडळीच्या गांठी भेटी घेतल्या व दिल्लीस जाऊन ते आपल्या नियोजितकामास लागले. त्याचप्रमाणें "श्रीशंकराचार्यांच्या आज्ञापत्राविना तुम्हांस हिंदु होतां येणार नाहीं," असें कोणी तेथें उठविल्यामुळें गावड्यांचा तें आज्ञापत्र आणण्याविषयीं आग्रह चालला आहे, अशा आशयाचें ब्र. गणपतीबुवांकडून पत्र आल्यामुळें आश्रमांतून श्रीयुत ह्यांना नाशीकला श्रीमच्छंकराचार्यांकडे ( डॉ. कुर्तकोटींकडे ) पाठविण्यांत आलें. श्रींनीं " आज्ञापत्राची कांहींच आवश्यकता नाहीं. प्रत्येक ब्राह्मणाला शुद्ध करून घेण्याचा अधिकार आहे, पण त्या लोकांची तेवढ्यानें समजूत होत नसेल तर खुशाल आज्ञापत्र घेऊन जा " असें मोठ्या प्रेमानें सांगितलें व आशीर्वाद पूर्वक आज्ञापत्र स्वाधीन केलें.

इकडे आनंदमूर्ति गोव्यांत येऊन दाखल झाले. पहिलाच प्रश्न इतउत्तर चळवळीचें केंद्र कोठें करावयाचें हा उद्भवला. श्रीमंत काकासाहेब पेडणेकर, श्री. पांडुरंगपंत बोरकर, श्री. रामभाऊ ख्वंदे ही मंडळी आपआपल्या गांवीं म्हणजे पेडणें, बोरी व रायबंदर येथें केंद्र करावें असें म्हणत होती. कांहींजणांनीं कांदोळी सारखीं ठिकाणेंहि सुचविलीं, पण हीं सर्वठिकाणें चळवळीच्या मुख्य भागापासून फार अंतरावर असल्यामुळें तेथून चळवळीचीं सूत्रें चालविण्यास सोईचें पडणार नव्हतें. शिवाय प्रत्येक चळवळीला प्रारंभ झाला म्हणजे आरल्या संसर्गानें आपल्या हितेच्छु मंडळीस उपसर्ग पोहोंचूं नये, अशी सावधगिरी हर अवश्यमेव बाळगण्याविषयीं श्रीमन्महाराजांनीं वरचेवर सांगितलें होतें. साहजिकच तिसवाडी महालाला मध्यवर्ती असलेलें ' कालापूर ' हें गांवच केंद्र म्हणून नियुक्त करण्यांत आलें. मध्यंतरीं " शंकराचार्यांच्या आज्ञापत्राविना तुम्हीं हिंदू कसे होऊं शकाल ? " असें एक भूत सर्व गावडे मंडळीच्या मनांत कोणी उभें केलें होतें हें मागें सांगितलेंच आहे. पुराणमतवादी लोक त्यांची सारखी उपहासपूर्वक थट्टा करीत होते व अनेक ' हुली ' वरचेवर उठतच होत्या; पण आश्रमीय मंडळींनीं लवकरच सर्वांचें शंकासमाधान करून सर्व वातावरण स्थिरस्थावर केलें. एकदोन दिवसांतच पणजी येथें सर्वपक्षीय पुढाऱ्यांची एक बैठक बोलावण्यांत आली व तेथेंच शुद्धीकरणाचें वृत्त निवेदन करण्यांत आलें. आतांपर्यंत ही गोष्ट कांहीं विशिष्ट व्यक्तींनाच तेवढी माहीत होती. वादविवादांत ज्यानें त्यानें आपआपल्या परीनें भाग घेतला. कांहींनीं सरकारच्या भीतीचा संशय प्रकट केला. कांहींनीं सरकारी नोकर म्हणून चळवळींत प्रत्यक्ष भाग घेतां येणार नाहीं असें सांगितलें. कांहींनीं ' मौनं सर्वार्थसाधनं ' पतकरलें, तर कांहींनीं कांहीं निमित्त काढून मोठ्या चातुर्यानें स्थलांतरहि केलें; पण कांहींनीं " काय वाटेल तें झालें तरी चालेल पण शुद्धिकार्य झालेंच पाहिजे, " असें धिटाईनें व मोठ्या आवेशानें प्रतिपादिलें. सरतेशेवटीं आश्रमीयांनीं सांगितलें कीं, " शुद्धिकार्य हें आतां होणारच, तें आतां थांबवणें शक्य नाहीं, शुद्धिसमारंभाचा दिवसहि निश्चित केला आहे. तरी तुम्ही समाजांचे पुढारी या नात्यानें तुम्हांस जसें उचित वाटेल तसें करा. " अखेर न ' भवति न भवति ' होऊन, गावड्यांच्या नांवानें आमंत्रण पत्रिका छापाव्या म्हणजे प्रसंगच आला तर त्या सरकारांत दाखवून निसटण्यास उपयोगी पडतील असें सर्वानुमतें ठरलें.

नंतर कांहीं मंडळीच्या सांगण्यावरून आनंमूर्ती, श्री. ख्वंदे ह्यांस बरोबर घेऊन मडगांवच्या हिंदूकार प्रभृति मंडळीस भेटावयास गेले व तेथून पुढें ' भारत कारांची भेट घेऊन कालापुरास परत आले. गावड्यांचा बोस

दृष्टीनें त्यांच्यावर रोष होण्याचा संभव असल्यामुळें श्रीमन्महाराजांनीं ह्या कार्याप्रीत्यर्थ गोमांतकाबाहेरचें सर्व द्रव्याचा पुरवठा करण्याचें ठरविलें असल्याचें त्यांस प्रेमपूर्वक कळविण्यांत आलें. सरकारी अधिकारी वर्गांतील कित्येक व्यक्तींनींहि यावत् शक्य त्याप्रकारें साह्यभूत होण्याचें आश्वासन दिलें, त्या सर्वांचा नामनिर्देश येथें करणें शक्य व इष्टहि नाहीं.

ह्याप्रकारें गोष्टी चालत आहेत तोंच दासनवमीचा सुमार झाला तेव्हां वे. शा. सं. शास्त्रीबुवा व ब्र. गणपतीबुवा हे कुंडई, म्हारदोळ, प्रियोळ, वेलिंग, बोरी, इत्यादि भागांत कामासाठीं गेले व श्री. गोपाळराव परीट ह्यांच्या मावाला बरोबर घेऊन, ब्र. आनंदमूर्ती मसुरास निघून आले आणि तसेच पुढें आश्रमीय मंडळीसह सज्जनगडावर गेले. तेथें श्रीमन्महाराजांसमवेत आश्रमीय शुद्धिमंडळाची बैठक झाली. गोमांतकांतून आलेले ते हजारों प्रतिज्ञा लेख व त्यांतील त्या लोकांचीं तीं वेडीं वाकडीं खिरती ' नांवें ' पाहून मंडळीला मोठी मजा वाटली आतां अगदीं विलंब न लावतां शुद्धिकार्य उरकून टाकावयाचेंच असें निश्चित ठरलें व तत्संबंधींच्या सर्व गोष्टींची यथास्थितपणें विचारणा केली गेली. शुद्धिकार्य आतां प्रत्यक्षपणें पार पडावयाचे दर इतउत्तर गोमांतकांत कोणकोणते कार्यकर्ते ठेवावयाचे, त्यांच्यावर कमी जास्त प्रसंग आला असतां त्यांची जागा एकाहून एक वरचढ अशा आश्रमीय माणसांकडून कसकशी भरून काढावयाची, सांकेतिक पद्धतीनें सर्व पत्रव्यवहार कसा सांभाळावयाचा, गोमांतकाल्गतच्या ठाण्यांत कसकशी व्यवस्था करुन ठेवावयाची, द्रव्याचा पुरवठा अंतिमच्या क्षणापर्यंत पुरा कसा पाडावयाचा इत्यादि स्वरूपाच्या अनेक महत्त्वाच्या गोष्टी सुनिश्चित करण्यांत आल्या. त्याचप्रमाणें प्रत्यक्ष शुद्धिकार्याच्या प्रसंगीं समस्त हिंदुजनतेनें एकस्वरानें चळवळीला आशीर्वाद देणें आवश्यक असल्यावरून लहान मोठ्या, सर्व पुढाऱ्यांना, वर्तमानपत्रकर्त्यांना, सन्मान्य शिष्टांना व संस्थांना तशा आशयाची विनंती समक्ष वा पत्र द्वारें करण्यांत यावी; तद्वतच दिल्लीस वरिष्ठ कायदेमंडळाची ( लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची ) व मुंबईस प्रांतिकविधिमंडळाची बैठक चालू होती, तेथें आश्रमीय प्रतिनिधि पाठवून श्रीमान् तात्यारावजी केळकर ह्यांच्या साह्यानें चळवळीस सर्व हिंदुसभासदांचा पाठिंबा मिळवावा, असें ठरलें. अनेक बारिकसारीक तपशीलाच्या गोष्टी निश्चित करण्यांत आल्या. ह्याच वेळीं आश्रमावर निःसीम प्रेम करणारे धुळ्याचे श्रीसमर्थ भक्त श्री. शंकररावजी देव ह्यांच्याहि कानांवर शुद्धीचें वृत्त घालण्यांत आलें. त्यांना अतिशय आनंद झाला व शक्य झाल्यास शुद्धिसमारंभास स्वतः उपस्थित राहण्याचें त्यांनीं अभिवचन दिलें. गडावरील उत्सव संपला.४००वर्षांनंतर घडून आणावयाचें हें महत् विकट कार्य निर्विघ्नपणें पार पाडण्याविषयीं श्रीसमर्थांना पुनः पुनः विनवून अत्यंत कळकळीनें करुणा भाकण्यांत आली. धर्मवेड्या पोर्तुगीजांच्या प्रांतांत उघडपणें त्यांच्या प्रजाजनांना हिंदुधर्माची दीक्षा देण्यांत केवढ्या घोर आपत्तीच्या खाईंत आश्रमाला उडी घ्यावी लागेल ह्याची स्पष्टपणें कल्पना बांधणें कोणालाहि शक्य नव्हतें; पण आश्रमीय प्रचारकांवर बरावाईट प्रसंग ओढवणार हें सुनिश्चित होतें. साहाजिकच 'आपापली सर्व शक्ति कार्यकर्त्यांत प्रवेश करो व त्या योगें ते विजयी होऊन परत येवोत ' अशी सर्वांनीं मिळून विघ्नहर्त्या विनायकाचीहि मनोभावें प्रार्थना केली व मंडळी गडावरून खालीं उतरली. त्याचप्रमाणें एक दोन दिवसांत दिल्लीकडेहि आश्रमाचे प्रतिनिधिहि पाठविण्यांत आले. त्यांनीं वाटेंत केसरी आदिक वृत्तपत्रांचा संपादकवर्ग, श्री. सिद्धेश्वर शास्त्री आदिक हिंदुसभावादी मंडळी, तद्वतच श्री. अण्णाराव भोपटकर, श्री. दा. वि. गोखले, श्री. बाबाराव सावरकर,

डॉ. सावरकर, श्री. दत्तोपंत गोगटे, श्री. तुळजापुरकर वकील, बडोद्याचे स्वामी आनंदप्रिय आदिक मंडळीच्या गांठी भेटी घेतल्या व दिल्लीत जाऊन ते आपल्या नियोजितकामास लागले. त्याचप्रमाणें "श्रीशंकराचार्यांच्या आज्ञापत्राविना तुम्हांस हिंदु होतां येणार नाहीं," असें कोणी तेथें उठविल्यामुळें गावड्यांचा तें आज्ञापत्र आणण्याविषयीं आग्रह चालला आहे, अशा आशयाचें प्र. गणपतीबुवांकडून पत्र आल्यामुळें आश्रमांतून श्रीयुत ह्यांना नाशीकला श्रीमच्छंकराचार्यांकडे ( डॉ. कुर्तकोटींकडे ) पाठविण्यांत आलें. श्रींनीं "आज्ञापत्राची कांहींच आवश्यकता नाहीं. प्रत्येक ब्राह्मणाला शुद्ध करून घेण्याचा अधिकार आहे, पण त्या लोकांची तेवढ्यानें समजूत होत नसेल तर खुशाल आज्ञापत्र घेऊन जा" असें मोठ्या प्रेमानें सांगितलें व आशीर्वाद पूर्वक आज्ञापत्र स्वाधीन केलें.

इकडे आनंदमूर्ति गोव्यांत येऊन दाखल झाले. पहिलाच प्रश्न हतउत्तर चळवळीचें केंद्र कोठें करावयाचें हा उद्भवला. श्रीमंत काकासाहेब पेडणेकर, श्री. पांडुरंगपंत बोरकर, श्री. रामभाऊ लवंदे ही मंडळी आपआपल्या गांवीं म्हणजे पेडणें, बोरी व रायबंदर येथें केंद्र करावें असें म्हणत होती. कांहींजणांनीं कांदोळी सारखीं ठिकाणेंहि सुचविलीं, पण हीं सर्वठिकाणें चळवळीच्या मुख्य भागापासून फार अंतरावर असल्यामुळें तेथून चळवळीचीं सूत्रें चालविण्यास सोईचें पडणार नव्हतें. शिवाय प्रत्येक चळवळीला प्रारंभ झाला म्हणजे आपल्या संसर्गानें आपल्या हितेच्छु मंडळीस उपसर्ग पोहोंचूं नये, अशी सावधगिरी तर अवश्यमेव बाळगण्याविषयीं श्रीमन्महाराजांनीं वरचेवर सांगितलें होतें. साहजिकच तिसवाडी महालाला मध्यवर्ती असलेलें ' काला पूर ' हें गांवच केंद्र म्हणून नियुक्त करण्यांत आलें. मध्यंतरीं "शंकराचार्यांच्या आज्ञापत्राविना तुम्ही हिंदू कसे होऊं शकाल?" असें एक भूत सर्व गावडे मंडळीच्या मनांत कोणी उभें केलें होतें हें मागें सांगितलेंच आहे. पुराणमतवादी लोक त्यांची सारखी उपहासपूर्वक थट्टा करीत होते व अनेक ' हुली ' वरचेवर उठतच होत्या; पण आश्रमीय मंडळींनीं लवकरच सर्वांचें शंकासमाधान करून सर्व वातावरण स्थिरस्थावर केलें. एकदोन दिवसांतच पणजी येथें सर्वपक्षीय पुढाऱ्यांची एक बैठक बोलावण्यांत आली व तेथेंच शुद्धीकरणाचें वृत्त निवेदन करण्यांत आलें. आतांपर्यंत ही गोष्ट कांहीं विशिष्ट व्यक्तींनाच तेवढी माहीत होती. वादविवादांत ज्यानें त्यानें आपआपल्या परीनें भाग घेतला. कांहींनीं सरकारच्या भीतीचा संशय प्रकट केला. कांहींनीं सरकारी नोकर म्हणून चळवळींत प्रत्यक्ष भाग घेतां येणार नाहीं असें सांगितलें. कांहींनीं ' मौनं सर्वार्थसाधनं ' पतकरलें, तर कांहींनीं कांहीं निमित्त काढून मोठ्या चातुर्यानें स्थलांतरहि केलें; पण कांहींनीं "काय वाटेल तें झालें तरी चालेल पण शुद्धिकार्य झालेंच पाहिजे," असें धिटाईनें व मोठ्या आवेशानें प्रतिपादिलें. सरतेशेवटीं आश्रमीयांनीं सांगितलें कीं, "शुद्धिकार्य हें आतां होणारच, तें आतां थांबणें शक्य नाहीं, शुद्धिसमारंभाचा दिवसहि निश्चित केला आहे. तरी तुम्ही समाजाचे पुढारी या नात्यानें तुम्हांस जसें उचित वाटेल तसें करा." अखेर न ' भवति न भवति ' होऊन, गावड्यांच्या नांवानें आमंत्रण पत्रिका छापाव्या म्हणजे प्रसंगच आला तर त्या सरकारांत दाखवून निसटण्यास उपयोगीं पडतील असें सर्वानुमतें ठरलें.

नंतर कांहीं मंडळीच्या सांगण्यावरून आनंमूर्ती, श्री. लवंदे ह्यांस बरोबर घेऊन मडगांवच्या हिंदूकार प्रभृति मंडळीस भेटावयास गेले व तेथून पुढें ' भारत कारांची भेट घेऊन कालापुरास परत आले. गावड्यांचा जोस



( १ ) लग्नसमयीं गावड्यांच्या वधुवरांची पालखींतून मिरवणुक.



( २ ) १५०० साली पोर्तुगीजांनीं प्रथमच बांधलेलें सेंट कॅथेरिनचें लहान प्रार्थना मंदिर.

भरविण्यांत आला. प्रथमतः शुद्धिसमारंभ कोठें व्हावा हा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित झाला. एखाद्या गोष्टीविषयीं सर्वांचा निश्चय झाला तरी प्रथमतः उडी ठोकण्यास धिटाई व धाडस लागते,ही गोष्ट सर्वांच्या अनुभवाची आहे. येथें तर धर्मांतरासारखा बिकट प्रश्न होता. आपण पुढें झालों व बाकीच्या गांवांकडून जर कुचराई झाली तर आपलें काय होईल ही भीति प्रत्येकास साहजिकपणेच वाटत होती. पण ह्यावेळीं चिंचल गांवचे सांतान कारनेर प्रभृति पुढारी पुढें सरसावले व काय वाटेल तें होवो, आह्मी प्रथम शुद्ध होणार असा त्यांनीं आपला दृढ निश्चय सभेस कळविला. तेव्हां आपोआपच प्रश्न मिटला. नाहींतर हा शेवटचा क्षण ह्मणजे ' ही तड नाहीं तर ती तड ' असा भयंकर स्वरूपाचा होता. चिंचलकरांनीं हा महत्त्वाचा क्षण साधला ह्मणूनच त्यांचें नांव गोमांतकाच्याच काय पण हिंदुस्थानच्या व जगाच्याहि इतिहासांत अजरामर होऊन राहिलें ! झालें. फा. शु. ६ रविवार ता.२६ फे. १९२८ हा दिवस शुद्धिसमारंभासाठीं निश्चित केला गेला. निमंत्रणपत्रिकेचा नमुना तयार करण्यांत आला. तो असाः--

श्रीयुत........................................................

..................................................................................यांस

वि. वि.

आम्हां गावडे लोकांस खिस्ती केल्यास शेंकडों वर्षें लोटलीं असतील; परंतु बातिसम, विवाह व मरण या तीन संस्कारांपलीकडे आम्हांस खिस्ती धर्माची ओळख नाहीं. आजपर्यंत आम्ही मनानें व आचारविचारांनीं हिंदूच राहिलों, हें आपणास माहित आहेच. आम्ही आजपर्यंत खिस्ती राहिलों याचें कारण आम्हांला हिंदू करुन घेण्याची कोणींच तजवीज केली नाहीं. कदाचित् तें यापूर्वी शक्याहि नव्हतें. अलीकडे मसूर येथील ब्रह्मचर्याश्रमाचे संस्थापक श्री. विनायक महाराज हे या प्रांतांत आल्यावेळीं आम्ही त्यांकडे विनंति केली व त्यांनीं आम्हांस यथाविधि हिंदु करुन घेण्यात कोणतीच हरकत नाहीं, असें सांगितलें. म्हणून आमच्या गावडे वर्गानें त्यांच्या सान्निध्यानें यथाविधि हिंदु होऊन आमच्या वाडवडिलांच्या धर्मांत परत येण्याचें ठरविलें आहे व या समारंभासाठीं मिती.........शके............वार वेळ ..............................................................मुक्रर केली आहे. अशा या मंगलप्रसंगीं आपणासारख्या आमच्या हिंदुसमाजांतील प्रमुख गृहस्थांच्या सहानुभूतीची अपेक्षा आहे तरी आपण आपल्या मित्रमंडळीसह येऊन, हा मंगल प्रसंग साजरा करावा, अशी विनंति आहे.

आपले नम्र सेवक,

| | |
|---|---|
| सांतान सबोस्तियांव कारनेर. | कुस्तांव मानुयेल फेरनांद. |
| पीयेदाद इनास फेरनांद. | मानुयेल जुवांव साल्दान्य. |
| दुर्मींग सोज बेन सोज. | मिकोल दियोग फेरनांद. |
| पेद्रु घोरास फेरनांद. | वितोरीन साल्वादोर बाप्तीस्त. |
| जुजे वस्तांव फेरनांद. | फायतान पीरैर. |
| शावीयेर निकालव फेरनांद. | |

वरील निमंत्रणपत्रिका छापून घेऊन त्या शास्त्री, पंडित, व्यापारी, माटकर, पुढारी आदिक सर्व शिष्टमंडळीला शुद्धिसमारंभाच्या आदल्या दिवशींच रात्रीं पोहोंचतील अशा बेतानें पाठविण्यांत आल्या. लोक उत्सुकतेनें रविवारच्या सकाळची वाट पाहात राहिले. कित्येकांनीं धरणीं पारणीं मांडलीं. कित्येकांनीं नवस सायास केले. कित्येकांनीं देवास कौल लाविले—देवास निरनिराळे प्रश्न विचारले. ज्याच्या त्याच्या तोंडीं गावडे लोकांची शुद्धि व मसूरचा आश्रम हाच विषय होऊन बसला व श्रीसमर्थांनीं म्हटल्याप्रमाणें:-

मैत्रिकी सर्व लोकांसी । मनापासून जाहली ।
वेध हा लागला मोठा । लोक भाटाचे जाहले ॥

अशी आत्मीय जनांची अवस्था झाली. आतां फा. शु. ६ स निश्चित झालेलें हें शुद्धिकार्य कसकसें पार पडलें, त्यावर संकटें कसकशीं आलीं व परमेश्वरी कृपेनें व समस्त हिंदुजनतेच्या पाठिंब्यामुळें तीं निरसन कशीं झालीं इत्यादि स्वरुपाच्या गोष्टी आतां पुढील प्रकरणीं पाहूं.

# विष्णुबुवा ब्रह्मचारी

" ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या धर्मप्रसारामुळें होणारें हिंदुधर्माचें नुकसान महाराष्ट्रांतील लोकांच्या लक्षांत लवकरच आलें. वर्तमानपत्रांतून याविषयीं लेख येत, परंतु ते मिळमिळीत असत. उपदेशकाला खरा शत्रु उपदेशक हाच ठरतो. ख्रिस्ती मिशनरी व हिंदु धर्मोपदेशक यांच्या छक्कडी त्या जुन्या काळीं मोठमोठ्या गांवच्या चव्हाट्यावरुन पहावयास सांपडतात. मिशनरी एकदां हिंदुधर्माविरुद्ध बोलूं लागले म्हणजे त्यांचें तर्कशास्त्र वेडेंवांकडें कसें धांवत सुटे याचा अनुभव सर्वांस असतोच. अर्थात् त्यांना उत्तर देणारा उपदेशकहि भावनाप्रधान वक्ताच असावा लागतो, व हें वक्तृत्वाचें बळ इंग्रजी शिकलेल्या वक्त्यांत प्रायः असत नाहीं. त्याला जुन्या पद्धतीनें शिकलेला व वेदांना अपौरुषेय मानणारा भाविक संन्यासी किंवा ब्रह्मचारीच हवा. टिळकांच्या पूर्वीच्या महाराष्ट्रांतील इतिहासांत विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनीं हिंदुधर्मावरील मिशनऱ्यांचे हल्ले परतविण्याची मोठीच कामगिरी केली. सन १८६५ ते १८७१ पर्यंत ते मुंबईस समुद्रकाठीं धर्मपर व्याख्यानें देत व मिशनऱ्यांशीं वादविवाद करीत. कधीं कधीं सुधारकांशींहि ते वादविवाद करीत. दोघांनांहि ते कोटिक्रमानें निरुत्तर करुन टाकीत अशी प्रसिद्धि आहे. महाराष्ट्रास मिशनऱ्यांच्या कचाट्यांतून ज्यांनीं मुक्त केलें, त्यांत विष्णुबुवा प्रमुख होत. "

( लो. टिळकचरित्र खंड १. )





ॐ दैव्याय कर्मणे शुन्धध्वं देवयज्यायै ॥—य. १।१३.

चिंवल येथील पहिला शुद्धिसमारंभ. (फा. शु. ६ शके १८४९).

# प्रकरण ४ थें.

## प्रत्यक्ष शुद्धिकार्यांत.

जानत्यह्नः प्रथमस्य नाम शुक्रा कृष्णादजनिष्ट श्वितीची ॥
ईयुषीणामुप शाश्वतीनामायतीनां प्रथमोषा व्यद्यौत् ॥

ऋ. मं. १-१८—१२३-१२४

भावार्थः—नूतन वर्षाचा प्रथम दिवस आतां निश्चयानें उगवणार, असें जिच्या येण्यानें समजतें, ती ही उषा पहा काळ्याकुट्ट अंधकारांतून शुभ्र तेजानें मंडित होऊन वर निघत आहे. आजपर्यंत ज्या असंख्य उषा येऊन गेल्या, त्यांच्यामध्यें नामांकित व अद्यापि ज्यापुढें येणार आहेत त्यांच्यामध्येंहि उत्कृष्ट अशी ही पहा आजची उषा उदय पावली आहे.

सृष्टीचें स्वरूप स्वभावतःच जरी नयनमनोहारि असलें तरी, नित्याच्या परिचयामुळें तें तितकेंसें दृष्टीत भरेनासें होतें, त्यांतील आकर्षकपणा मनाला जाणवत नाहींसा होतो; पण ज्या दिवशीं एकादी अलौकिक किंवा अभूतपूर्व गोष्ट घडून यावयाची असते, त्या दिवशीं साहजिकच सृष्टि देवतेचें स्वरूप विशेष रमणीय व मंगलकारक भासल्याविना रहात नाहीं. म्हणजे सूर्यनारायण प्रतिदिनीं जरी उगवतांना दिसत असला तरी त्या विशिष्ट दिवसाचा सूर्योदय अधिकच प्रसन्नकारक व आल्हाद दायक वाटतो. एवढेंच नव्हे तर त्या दिवसाचा निसर्गाचा प्रत्येक व्यापार जणूं कांहीं आज, शांति, सौख्य, आनंद, समाधान, उत्साह यांची वृद्धी करण्याकरितांच घडून येत आहे, अशी सर्वांची भावना होते आणि या तन्मयतेतच त्या दिवसाचे सर्व व्यवहार उल्हसितमनानें पार पाडले जातात.

रविवार फाल्गुन शु॥ ६ शके १८४९ ( ता. २६ फे. १९२८ ) च्या दिवशीं गोमांतकांत ही उषा देवी अशाच आपल्या मनोहर व शुभ मंगल स्वरूपांत अवतीर्ण झाली. गोमांतकाच्याच नव्हे तर अखिल भारत वर्षाच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा आजचा हा पवित्र दिवस होता. साहजिकच हिंदुसमाजाचा भाग्योदय सूचित करणारा तो उषःकाल सर्वांना रमणीय वाटत होता, त्यांत नवल काय ? सर्व सृष्टि आज शुभशकुनमयच झाली होती. त्या मंदमंद वाहणाऱ्या शीतल वायूमधून, त्या पक्षिवृंदांच्या मंजुळ किलकिलाटांतून किंवा त्या धेनुवत्सांच्या हंबरण्यांतून प्रसन्नतेचा व मांगल्याचा एकच एक ध्वनि उमटत होता. गावडे लोकांच्या तर आनंदाला पारावार नव्हता. त्यांच्या मुखकमलावर एक प्रकारचा अनिर्वचनीय प्रफुल्लितपणा विलसत होता. त्यांतल्या त्यांतहि चिंबलकर गावडे तर आपणास हिंदुधर्मांत प्रविष्ट होण्याचा पहिला मान मिळावयाचा असल्यामुळें पराकाष्ठेच्या आनंदांत तल्लीन झाले होते.

तथापि मध्यंतरींच शुद्धिसमारंभ कोणत्या स्थळीं व्हावा ह्याविषयीं चिवलकरांत थोडीशी मानगड उपस्थित झाली. गांवांत तीन तट होते. प्रत्येक तटानें आपला स्वतंत्र मांडव घातला व आपआपल्या मांडवांतच आपण 'चोंकणे' होऊं असा ज्यांनीं त्यांनीं आग्रह धरिला. पण सर्व दृष्टींनीं शुद्धिसमारंभ एकाच स्थळीं होणें आवश्यक होतें. त्याविषयीं विचार करतां करतां श्री. ख्वंदे ह्यांना एक तोड सुचली. श्रीभगवती ही चिवलची मूळ ग्रामदेवता; पण पाद्रीशाहीच्या पहिल्याच तपाव्यांत ह्या 'श्रीभगवतीचें देवस्थान भ्रष्ट करुन उध्वस्त करण्यांत आलें होतें. त्यावेळीं तिच्या भक्तजनांनीं तिला माडेल येथें नेऊन ठेविली व ती अद्यापिहि तेथेंच आहे. अर्थातच श्रीभगवती देवीचें हें प्राचीन स्थान ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें असल्यामुळें त्याच स्थळीं सर्वांचा शुद्धिसमारंभ एकत्र व्हावा म्हणजे सर्व प्रश्न आपोआपच मिटेल, असें श्री. ख्वंदे ह्यांनीं सुचविलें. चारशें वर्षांपूर्वींच्या श्रीभगवती देवीच्या अशा ह्या पवित्र ऐतिहासिक महत्त्वाच्या स्थानीं हटातटानें व छलादलानें बाटविलेल्या तिच्या भक्तगणांना पुनरपि स्वधर्मांत प्रविष्ट करून घेण्याचा अपूर्व योगायोग आलेला पाहून सर्वांनाच सानंदाश्चर्य वाटलें व ज्यानें त्यानें परमेश्वरी लीलेचें कौतुक केलें ! असो.

वर सांगितल्याप्रमाणें शुद्धिसमारंभाचें स्थान निश्चित झाल्यावर मंडळींनीं रातोरात साफसफाई आरंभिली. भगवतीच्या जागेवर झाडेंझुडपें व जाळ्या भयंकरच माजलेल्या होत्या–इतक्या कीं ह्या जागेंत कोणाचें जाणें येणेंहि अशक्य झालें होतें; पण मंडळींनीं रातोरात जागून झाडेंझुडपें तोडून काढलीं व जागा अगदीं स्वच्छ केली. नंतर सडासंमार्जनादिकांनीं तें स्थान सुशोभित करतां येईल तितकें करण्याचे प्रयत्न अहमहमिकेनें झाले. आधींच गोमांतक म्हणजे निसर्गसुंदरीचें माहेरघर, वस्तुतः तेथें कृत्रिम शोभा आणण्याची आवश्यकताहि नाहीं; पण सर्वसामान्य दृष्टीला तेवढ्यानें समाधान कसें व्हावें ? मनुष्य हा जात्याच उत्सवप्रिय असतो. त्यांतून हा प्रसंग तर अभूतपूर्व ! साहजिकच सर्व मंडळी आपापल्या गांवचा समारंभ सर्वांपेक्षां अधिक थाटानें पार पाडावा म्हणून रात्रंदिवस खटपट करीत होती. इतक्यांत शुद्धीचा दिवस उगवला. तेव्हां आपल्या मनाप्रमाणें आरास करावयास भरपूर वेळ न सांपडल्यामुळें तरुण मंडळी मनांतून थोडी रुष्टच झाली !

शनिवार संध्याकाळपासूनच ठिकठिकाणची मंडळी समारंभासाठीं चिवल येथें जमूं लागली. गावड्यांचा तो अलोट उत्साह व समारंभाची ती जंगी तयारी पाहून सर्वांना सानंद कौतुकच वाटलें, व जो तो आपापल्या परीनें धन्योद्गार काढीत होता. तथापि ज्या कांहीं शिष्टव्यक्ती शुद्धिसमारंभाची हकीकत ऐकून नुकत्याच जागृत झाल्या होत्या त्यांनीं "आश्रमानें बाकीच्या कोणत्याहि गोष्टींचा विचार न करितां नुसत्या शुद्धिविधीला एकाएकीं हात घातला आहे," अशी आपली मलतीच समजूत करुन घेऊन "गावड्यांचें पुढें कसें होईल; रोटीबेटी व्यवहार, मंदिर प्रवेश इत्यादि गोष्टी कशा होतील सरकार काय करील" इत्यादि गोष्टींविषयीं आपलीं नाउातर्कटें रचून गावड्यांच्या समक्षच वाद मांडला ! पण दीर्घ परिश्रमपूर्वक केलेलें कार्य चुटकीसरसें कसें ढांसळून पडतें ह्याची यथार्थ कल्पना आश्रमीय मंडळीस असल्यामुळें, अशा शिष्टांना "गप्प बसण्यास काय घ्याल" असेंच जरा निर्भीडपणें विचारणें भाग पडलें.

ह्याप्रमाणें गोष्टी चालतां चालतां रात्र बरीच उलटून गेली. तेव्हां साहजिकच मंडळी झोंपी जाण्याचा विचार करूं लागली. इतक्यांत समारंभाची व्यवस्था सोंपविलेले एक आश्रमीय प्रचारक मुक्कामावर आले व शुद्धिविधीचें सर्व साहित्य संपूर्ण झालें कीं नाहीं इत्यादि गोष्टी आश्रमांतील वे. शा. सं. मोडकशास्त्री यांस विचारूं लागले. बोलणें निघतां निघतां विधीला नक्की आरंभ किती वाजतां करावयाचा असा मुद्दा निघाला. शुद्धिविधीपूर्वी अर्थातच क्षौर करावें लागतें. पण सर्वांचें क्षौर करावयाचें ह्मणजे वेळ कांहीं थोडा लागणार नाहीं व चिपळ येथें तर कितीतरी माणसें शुद्ध व्हावयाचीं. मग इतक्यांचें क्षौर आटोपून सकाळच्या प्रहरींच शुद्धिविधी पार कसा पडणार असा प्रश्न उपस्थित झाला. तेव्हां शास्त्रीबोवांनीं थोडावेळ विचार केला व झटकन् सांगितलें कीं, आतांपासून क्षौराला प्रारंभ करा ह्मणजे झालें. तोंच एका विद्वान गृहस्थानें विचारलें, "अहो रात्रींचें क्षौर करणें शास्त्रदृष्ट्या निषिद्ध नाहीं काय?" शास्त्रीबोवा ह्मणाले, "अहो तें निषिद्ध कोणाला? हिंदूंना का खिस्त्यांना? ते लोक अद्यापि कांहीं हिंदु झाले नाहींत तर त्यांना हिंदूंचें शास्त्र कसें लावावयाचें?" ते गृहस्थ ह्मणाले, "मग तुह्मी सकाळीं त्यांना जें प्रायश्चित्त देणार, तें सक्षौर होणार नाहीं." "तें कां नाहीं" शास्त्रीबुवा म्हणाले, "अहो मुंजीच्यावेळीं जेव्हां दोनदां सक्षौर प्रायश्चित्त घावें लागतें तेव्हां दुसऱ्यांदा नुसत्या दर्भाचीच हजामत करतात हें तुह्मांस माहीत नाहीं काय? ह्याचप्रमाणें सकाळीं केलें म्हणजे झालें." शास्त्रीबुवांचा हा उत्कृष्ट युक्तिवाद ऐकून तो गृहस्थ निरुत्तर झाला!

लगेच गांवच्या पुढाऱ्यांना बोलावून आणून सकाळपर्यंत क्षौर लवकरीनें उरकून घेण्याविषयीं सांगण्यांत आलें. रात्रीं सुमारें बारा वाजतां क्षौरास प्रारंभ झाला. कांहींनीं आपलीं तान्हीं पोरेंही क्षौरासाठीं आणलीं होतीं! तें पाहातांच "तीन वर्षांच्या आंतील मुलाचें क्षौर करूं नका" असें शास्त्रीबोवांनीं सर्वांना मोठ्यानें बजावून सांगितलें. शास्त्रीबोवांचें लक्ष त्यावेळीं गेलें म्हणून बरें झालें. नाहींतर क्षौर करतां करतां पोरें मृत्युमुखीं पडून अनर्थच ओढवला असता. क्षौराची एकच धांदल उडाली होती. जेमेतेम सहा वाजेपर्यंत हा गोंधळ उरकून घेण्यांत आला. केसाची एक भली मोठीच्या मोठी रास पडली होती. नंतर सर्वांना तैलाभ्यंग स्नान करून समारंभस्थानीं येण्यास सांगण्यांत आलें.

समारंभाचें स्थान लतापल्लवादिकांनीं सुंदरपणें शृंगारलें होतें. एका उच्चासनावर श्रीमन्महाराजांचें मोठें छायाचित्र (फोटो) ठेवण्यांत आलेलें होतें. मध्यभागीं एक शोभनीय होमकुंड तयार केलेलें होतें. त्या सभोंवार कर्दळीचे खांब उभे केलेले होते. समिधा, दर्भ, कलश आदि करून सर्व साहित्य यज्ञकुंडाभोंवतालीं व्यवस्थितपणें मांडलें होतें. मध्यमार्गीं होम कुंडानजीक शुद्धिकांक्षी लोकांना बसविण्याची व्यवस्था केलेली होती. लवकरच गावडे मंडळींचा घोळकाचा घोळका शुचिर्भूत होऊन प्रसन्न वदनानें मंडपांत येऊन दाखल झाला. प्रेक्षक–मंडळी आधीं पासूनच येऊन बसली होती. आणि मोटारी व गाड्या भरभरून सारखी मंडळी येत होती. त्यांत सन्माननीय शिष्ट व पुढारी, सरकारी अधिकारी, श्रीमान मालक व व्यापारी अशा सर्व पक्षाच्या व सर्व दर्जाच्या लोकांचा अंतर्भाव होता. ज्यांना अपरिहार्यतेमुळें जातीनें उपस्थित होतां येत नव्हतें, त्यांनीं अभिनंदनपत्रें

व तारा पाठविल्या होत्या. अशांपैकीं हायकाउंट पेडणेकरांची तार सर्वांनाच विशेष महत्त्वाची वाटली. असो.

सर्व गावडे मंडळी जमल्यावर त्यांना व्यवस्थितपणें बसविण्यांत आलें. नंतर वे. शा. सं. शा बोवांनीं श्रीगणेशपूजन कलश स्थापना व पुण्याहवाचन करुन सर्व गावडे मंडळीला उभे रहाण्यास सांगितलें व त्यांच्याकडून " आम्ही आजपर्यंत परकीधर्मांत होतों, आतां आपल्या पूर्वीच्याच धर्मांत मोठ्या आनंदानें येत आहोंत, तरी आमचा अंगिकार करा " अशी सर्व प्रेक्षक मंडळीला प्रार्थना करून घेण्यांत आली. चारशें वर्षेंपर्यंत ताटातूट झालेल्या आपल्या बांधवांची स्वधर्मांत येण्याची ही उत्कंठा पाहून सर्वांचे डोळे अश्रूंनीं भरून आले. वाघाच्या तोंडांतून सुटून आलेल्या आपल्या वासराला पाहून कोणत्या धेनुमातेला प्रेमाचा पान्हा फुटणार नाहीं ? समस्तांचीं अंतःकरणें द्रवलीं व कांहीं सन्माननीय शिष्टांनीं सद्गदीत स्वरानें " तथास्तु " अशी मान्यता दिल्यावर देवास नमस्कार करुन पुढील विधीस प्रारंभ झाला. " एवंगुणविशेषण विशिष्टायां शुभ पुण्यतिथौ मम स्ववैदिकधर्मत्यागपूर्वक परधर्म स्वीकारजनित पापक्षयद्वारा स्वज्ञातिबांधवैः सह संव्यवहार्यतासिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रायश्चित्ताख्यं कर्म करिष्ये । " असा प्रायश्चित्ताचा संकल्प त्यांच्याकडून ह्मणवून घेतल्यावर श्रीगणेशावर व कलशावर अक्षता टाकून त्यांच्याकडून मंत्रोच्चारपूर्वक भस्म गोमय व मृत्तिका यांचीं स्नानें करविण्यांत आलीं. नंतर खालील मंत्र ह्मणून त्या सर्वांना मंत्रोदक स्नान घालण्यांत आलें;

आयान्तु तव शान्त्यर्थं दुरितक्षयकारकः ।
गंगेच यमुने चैव गोदावरि सरस्वती ।।
नर्मदे सिंधु कावेरी जलेऽस्मिन् सन्निधं कुरु ।।
सर्वे समुद्राः सरितस्तीर्थानि जलदा नदाः ।
आयान्तु तव शान्त्यर्थं दुरितक्षयकारकाः ।।
सुरास्त्वामभिषिञ्चन्तु ब्रह्म-विष्णु-महेश्वराः ।
वासुदेवो जगन्नाथस्तथा संकर्षणो विभुः ।।
प्रद्युम्नश्चानिरुद्धश्च भवन्तु विजयाय ते ।
आखंडलोऽग्निर्भगवान् यमो वै निर्ऋतिस्तथा ।।
वरुणः पवनश्चैव धनाध्यक्षस्तथा शिवः ।
ब्रह्मणा सहिताः सर्वे दिक्पालाः पान्तु ते सदा ।।
कीर्तिर्लक्ष्मीर्धृतिर्मेधा पुष्टिः श्रद्धा क्रिया मतिः ।
बुद्धिर्लज्जा वपुः शांतिः कान्तिस्तुष्टिश्च मातरः ।।
एतास्त्वामभिषिञ्चन्तु देवपत्न्यः समागताः ।
आदित्यश्चन्द्रमा भौमो बुध-जीव-सितार्कजाः ।।
ग्रहास्त्वामभिषिञ्चन्तु राहुः केतुश्च तर्पिताः ।
देव दानव गंधर्वा यक्षराक्षस पन्नगाः ।।



नागझर येथील शुद्धिसमारंभ.

ऋषयो मुनयो गावो देव मातर एवच ।
देव पत्न्यो द्रुमा नागा दैत्याश्चाप्सरसां गणाः ॥
अस्त्राणि सर्व शस्त्राणि राजानो वाहनानिच ।
औषधानि च रत्नानि कालस्यावयवाश्च ये ॥
सरितः सागराः शैलास्तीर्थानि जलदा नदाः ।
एते त्वामभिषिंचन्तु सर्व कामार्थ सिद्धये ॥
ॐ शान्तिरस्तु । पुष्टिरस्तु । तुष्टिरस्तु ॥

हे मंत्र ऐकून सर्वांचीं अंतःकरणें गहिंवरून गेलीं. वैदिक मंत्रांत केवढें अमोघ सामर्थ्य आहे, ह्याची अंधुक तरी कल्पना प्रत्येकास आल्याविना राहिली नाहीं. मंत्रोदक स्नान झाल्यानंतर पुरुषांच्या कपाळीं गोपिचंदनाचे टिळे व सुवासिनी आणि कुमारिकांच्या कपाळीं कुंकुमतिलक लावण्यांत आले. टिळा लावण्याचें काम मडगांवचे सुप्रसिद्ध वैद्य श्री. पुंडलीक वामन विर्जिनकर यांनीं केलें. व दैवज्ञ ब्राह्मण कुलांतील सौ. पार्वतीबाई अथवा मुक्ताबाई धनंजय नागेशकर ह्यांनीं स्त्रियांचीं भालप्रदेशें कुंकुमानें चर्चित केलीं. त्यामुळें गावड्यांच्या चेहेऱ्यांत एक प्रकारचा नवीनपणाच आला. त्यांचीं तीं मुखकमलें पूर्वीपेक्षांहि अधिक प्रफुल्लीत व सतेज दिसूं लागलीं. ह्यांच्यापैकींच कांहीं खिरस्ती गावडे बाजूला हा चमत्कार पहात उभे राहिले होते. पण त्यांच्यांत व शुद्धीला बसलेल्या गावड्यांत आत जमीनअस्मानाचें अंतर दिसून येऊं लागलें. त्यांचीं तोंडें परधर्माच्या दडपणानें काळवंडलेलीं होतीं, तर ह्यांचीं तोंडें स्वधर्मसंपादणीच्या शुद्ध सात्विक आनंदानें शोभायमान झालेलीं होतीं. हा तरी चमत्कारच नव्हे तर काय! नंतर सर्वांना पंचगव्य देण्यांत आलें. इकडे वेदमूर्ति शास्त्रीबुवांनीं अग्निनारायणाची हविर्द्रव्यासह यथासांग पूजा केली. होमकुंडांत अग्नि धडाडून चेतविला होता. आपल्या अमित ज्वालांनीं जणूं काय आज जगांतील सर्व पाप दहन करण्याचीच मनीषा त्यानें धरली आहे असें भासमान होत होतें. अग्निनारायणाची सर्वांकडून प्रदक्षणापूर्वक पूजा करविण्यांत आली. नंतर त्यांस गोपूजन व विभूतिपूजन करण्यास सांगण्यांत आलें. मग शिक्षोपनिषदांतील मंत्र म्हणून शास्त्रीबुवांनीं शास्त्रोक्त पद्धतीनें विधि समाप्त केला.

ह्या सुमारास कल्पनेच्या बाहेर प्रेक्षक मंडळी जमा झाली होती व ती अत्यंत उत्सुकतेनें हें अपूर्व दृश्य टक लावून पहात होती. फोटोग्राफर लोकांची मात्र निरनिराळ्या अंगांनीं फोटो घेण्याची सारखी धांदल उडाली होती. विधिसमाप्ति नंतर श्रीमारुतिरायाचीं चित्रें वाटण्यांत येऊन ब्र. आनंदमूर्तींनीं करवीर मठाधिपती श्रीमच्छंकराचार्य (डॉ० कूर्तकोटी) यांचा संदेश वाचून दाखविला. श्रीशंकराचार्यांचा ह्या कार्यास आशीर्वाद आहे हें पाहून सर्वांसच आनंद झाला. नंतर समाजोद्धाराची जिवंत तळमळ असणारे गोमांतकाचे भूषणभूत वे० शा० सं० वामन रामचंद्र नाईक करंडे शास्त्री ह्यांनीं प्रेमाश्रु ढाळीत ढाळीत अत्यंत हृदयस्पर्शी असें भाषण केलें. त्याचप्रमाणें श्री. विर्जिनकर वैद्य, श्री. ज. वि. कामत, श्री. बाळापंत पै कुमट व ब्र. आनंदमूर्ति ह्यांचीं समयाला अनुरूप अशीं भाषणें झालीं. श्री. दा. व्यं. रायतुरकर ह्यांनीं 'एकतागान' गाईलें व त्याच्याहि प्रती वाटण्यांत आल्या. ह्यानंतर वेदमूर्ती शास्त्रीबुवांनीं "तुम्ही सर्वजण-

आतां हिंदू झालांत " हें गावड्यांना अतिशय आनंद देणारे शब्द उच्चारिले, व ब्र. आनंदमूर्ती 'धर्माच्या कारितां' व 'सदा सर्वदा' हे श्लोक सर्वांकडून म्हणून घेऊन शुद्धि समारंभ समाप्त झाल्या घोषित केलें.

झालें ! हिंदुधर्माचें द्वार सताड मोकळें झालें. आज किती तरी दिवस ज्याच्या सिध्यर्थ एक रात्री अहोरात्र खटपट चालली होती, तें शुद्धिकार्य पहिल्याच म्हटलेल्या स्थळीं वरीलप्रमाणें परमेश कृपेनें व पुण्यश्लोक पूर्वजांच्या आशीर्वादानें निर्विघ्नपणें पार पडलें. गोमांतकाचा गतेतिहास व च परिस्थिति लक्षांत घेतां अशी कांहीं घटना घडून येऊं शकेल असे कोणाच्या ध्यानीमनींहि नव्ह साहजिकच ह्या अभूतपूर्व प्रसंगाचें तें मनोहर दृश्य आपापल्या अंतःकरणसंपुटांत साठवीत होंव मंडळी घरोघर गेली. ह्या प्रसंगीं उपस्थित राहण्याचें भाग्य ज्यांच्या ज्यांच्या पदरीं होतें ती ती मंड आजन्मांत हा शुद्धि समारंभ विसरणें शक्य नाहीं. 'भारत' वृत्तपत्रकर्त्यांनीं म्हटल्याप्रमा 'चिंबल मुक्कामीं त्या दिवशींच्या सकाळच्या प्रहरीं आम्हीं आनंदमय अंतःकरणानें अवलोकिले पवित्र दृश्य आमच्या मनःपटलावर वज्रलेप झालें आहे. तें विस्तृत होमकुंड, त्यांतून निघणा त्या शुद्धिकारक ज्वाला त्या होमकुंडाजवळ एका खुर्चीवर टांगलेली ती श्रीमद्‌कुरकर महाराजांची तेजर व भव्य तसबीर; त्या होमकुंडाच्या एका बाजूला बसून शुद्धि मंत्राचा घोष करणारा तो शास्त्रीसमूह दुसऱ्या बाजूने उल्हासित अंतःकरणानें शास्त्र्यांच्या आज्ञेनुरुप हालचाल करणारा तो शुद्धिकांक्षी बालर पुरुष युक्त ६५० ( शुद्धीकृतांचा चिंबल येथील आंकडा ६५० नसून ८०० होता. सं. दा. गावड्यांचा अफाट जमाव, गावड्यांच्या स्त्रियांना सौभाग्य दर्शक कुंकुमानें मंडित करणारी ती महिला, होम डाच्या सरळ रेषेंत रोंवलेल्या त्या कर्दळी, कर्दळींच्या ह्या रांगजवळच उभ्या असलेल्या त्या गोमाता, होमकुंडाच तिन्ही बाजूंनीं अभिमानयुक्त व उल्हासपूर्वक उभा राहून एकमतानें शुद्धिकार्यांत भाग घेणारा एकोप्यानें शुद्धिकार्याला पाठबळ देणारा तो सर्व पक्षीय, सर्व दर्जाय व सर्व वर्णीय असंख्य हिंदुसमाज शुद्धिकार्यानिमित्त स्वामी आनंदमूर्ति ह्यांच्या प्रेमळ व भक्तिरसपूर्ण नेतृत्वाखालीं झालेलें तें हिंदुपाहुण्यां व नवहिंदूचें संमिश्र व कर्ण मधुर भजन, शुद्धिकार्याला प्रोत्साहन देणारीं तीं भाषणें, फोटोग्राफर लोकां फोटो घेण्याची ती तत्परता, मोटारींची ये जा वगैरे वगैरे गोष्टी आमच्या मनांतून तर असोच पण र अपूर्वकार्याला हजर असलेल्या कोणाच्याहि आठवणींतून बुजून जाणें संभवनीय नाहीं अशी आमच निश्चिती आहे." असो.

चिंबलच्या शुद्धिसमारंभ ह्याप्रमाणें यशस्वीपणें पार पडल्यानंतर ह्याच दिवशीं दोन प्रहरीं नागा ( कुडका ) येथें शुद्धिसमारंभ ठरविलेला असल्यामुळें मंडळी तिकडे गेली. सकाळचा समारंभ थाटा पार पडल्याची हकीगत गांवोगांव व घरोघर पसरली. त्यामुळें पुष्कळांच्या मनांतील संशयाचीं व भीतीं काहूरें नष्ट होऊन निदान दुपारचा समारंभ तरी पहाण्याची संधी दवडूं नये म्हणून शेंकडोंशें लो मोठ्या उत्कंठेनें नागझर येथें जमले होते. चिंबलप्रमाणेंच येथेंहि सर्व विधी यथास्थितपणें उरकण्यांत आल ह्या समारंभ पार पडण्यास येथील क्षत्रीय भंडारी ज्ञातीचे तरुण व उत्साही गृहस्थ श्री. पांडुरंग सुका वायंगणक व श्री. जगन्नाथ वेरेनेकर ( पूर्वीचे जोकीजुजे ) ह्यांनीं अत्यंत परिश्रम घेतले, हें त्यांस निःसंशय भूषणाव

आहे. येथें एकंदर ३५० लोक शुद्ध करुन घेण्यांत आले. म्हणजे सकाळचे चिबल येथील ८०० व नागझरचे ३५० मिळून ११५० लोक आज हिंदुधर्मांत प्रविष्ट केले गेले आणि म्हणूनच हा हिंदुसमाजाचा भाग्योदय सूचित करणारा सुवर्ण दिन होय ! विचित्र योगायोगाची गोष्ट अशी कीं, ज्या तिसवाडी महालांत चारशें वर्षांपूर्वी पहिल्याच धडाक्याला जवळ जवळ हजार दीडहजार लोकांचें खिस्तीकरण करण्यांत आलें होतें, त्याच तिसवाडी महालांत आजहि अपूर्व दैवी सुकृतानें पहिल्याच धडाक्याला अकराशें पन्नास लोकांचें हिंदुकरण करण्यांत आलें ! तथापि धर्मांतराचें स्थान व प्रारंभींचा आंकडा जरी ह्याप्रमाणें तुल्यबल झाले असले तरी दोन्ही घटनेंत महदंतर मात्र आहे. कारण एका कार्याच्या मागें सत्ता, सामर्थ्य, पैसा यांचा भरपूर पाठिंबा होता, तर दुसऱ्याला वरील सर्व गोष्टींचा अभाव हीच काय ती साधन सामुग्री हातार्शी होती ! एवढेंच नव्हे तर परकीय कडव्या राज्ययंत्रामुळें दुसऱ्या कार्यांत अधिकच दुर्घटता आली होती. व त्यामुळें तें असंख्य आपत्तिमूलकच झालेलें होतें हें विसरुन चालावयाचें नाहीं. आणि ही जाणीव सर्व जनतेला असल्यामुळेंच शुद्धिकार्याचें शुभवृत्त जेव्हां सर्वत्र पसरलें तेव्हां घरोघर आश्रमीय मंडळींच्या चातुर्याचें धडाडीचे व धाडसाचें साहजिकच स्वाभिमानपूर्वक कौतुक करण्यांत आलें."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं काणापूर येथें श्रीमंत घेवे यांच्या भाटांतील सुंदरपणें शृंगारलेल्या मंडपांत वाचकांच्या परिचयाच्या झालेल्या वितोरिन (विठ्ठल) प्रभृति गावड्यांचा शुद्धिसमारंभ थाटानें साजरा करण्यांत आला. दोन वाड्यावरील मिळून १०० लोक शुद्ध करुन घेण्यांत आले. येथेंहि वरीच प्रेक्षक मंडळी उपस्थित होती. येथील शुद्धिकार्य उरकून बेऊन मंडळी पणजीस परत आली व घडलेलें सर्व वृत्त आश्रमांत यथातथ्यपणें कळविण्यांत आलें.

इकडे श्रीमन्महाराज मसुरास तार कचेरी नसल्यामुळें कऱ्हाड येथें आश्रमावर उत्कट प्रेम करणारे गृहस्थ श्री. नारायणराव भावे ह्यांच्याकडे येऊन राहिले होते. अपेक्षित तार आली व 'शुद्धीचा पहिला बार उडाला' ही आनंददायक बातमी कऱ्हाडांत सर्वत्र पसरली. कऱ्हाडकरांचें आश्रमावर पहिल्यापासूनच विशेष प्रेम त्यांतून हें नूतन व आश्चर्यकारक काम आश्रमानें कांहीं गाजावाजा न करितां यशस्वीपणें पार पाडलें हें ऐकून सर्वांनाच धन्यता वाटली. ह्याच दिवशीं श्रीमन्महाराजांनीं ठिकठिकाणच्या वृत्तपत्रकर्त्यांना व पुढाऱ्यांना तारा केल्या. दिवसरात्र तारा करतां करतां तार मास्तर अगदीं थकून गेले. ह्यावेळीं श्री. नारायणराव भावे ह्यांनीं फारच बहुमोल परिश्रम घेतले. ह्या आनंददायक शुद्धि वार्तेनें उभा महाराष्ट्र हर्षरोमांचित झाला. प्रमुख प्रमुख नगरोपनगरांतून अभिनंदनपर सभांचा धमा सुरु झाला. आश्रमाच्या विशेष परिचय असलेल्या कित्येक स्थळीं आनंदोत्सव साजरे करण्यांत आले. सर्व वर्तमानपत्रांत याच विषयाला प्रमुख स्थान देण्यांत आलें. त्यांतल्यात्यांतहि केसरी, श्रद्धानंद, संदेश, वसंत, संग्रामप्रभृतींनीं, तर ह्यावेळीं अत्यंत महत्वपूर्ण अशी लोकजागृतीची कामगिरी बजाविली. ज्याच्या त्याच्या मनीं मुखीं 'गोव्याची शुद्धि' हा एकचएक विषय होऊन बसला ! 'हिंदुधर्माचा जयजयकार' विश्वतोमुख झाला !!

आतां हिंदू झालांत " हें गावड्यांना अतिशय आनंद देणारे शब्द उच्चारिले, व ब्र. आनंदमूर्तींनी 'धर्माच्या कारितां' व 'सदा सर्वदा' हे श्लोक सर्वांकडून म्हणून घेऊन शुद्धि समारंभ समाप्त झाल्याचें घोषित केलें.

झालें ! हिंदुधर्माचें द्वार सताड मोकळें झालें. आज किती तरी दिवस ज्याच्या सिध्यर्थ एकसारखी अहोरात्र खटपट चालली होती, तें शुद्धिकार्य पहिल्याच म्हटविलेल्या स्थळीं वरीलप्रमाणें परमेश्वर कृपेनें व पुण्यश्लोक पूर्वजांच्या आशीर्वादानें निर्विघ्नपणें पार पडलें. गोमांतकाचा गतेतिहास व चालू परिस्थिति लक्षांत घेतां अशी कांहीं घटना घडून येऊं शकेल असें कोणाच्या ध्यानींमनींहि नव्हतें साहजिकच ह्या अभूतपूर्व प्रसंगाचें तें मनोहर दृश्य आपापल्या अंतःकरणसंपुटांत साठवीत साठवीत मंडळी घरोघर गेली. ह्या प्रसंगीं उपस्थित राहण्याचें भाग्य ज्यांच्या ज्यांच्या पदरीं होतें ती ती मंडळी आजन्मांत हा शुद्धि समारंभ विसरणें शक्य नाहीं. 'भारत' वृत्तपत्रकर्त्यांनीं म्हटल्याप्रमाणें, 'चिंवल मुक्कामीं त्या दिवशींच्या सकाळच्या प्रहरीं आम्हीं आनंदमय अंतःकरणानें अवलोकिलेलें पवित्र दृश्य आमच्या मनःपटलावर वज्रलेप झालें आहे. तें विस्तृत होमकुंड, त्यांतून निघणाऱ्या त्या शुद्धिकारक ज्वाला त्या होमकुंडाजवळ एका खुर्चीवर टांगलेली ती श्रीमसूरकर महाराजांची तेजस्वी व भव्य तसबीर; त्या होमकुंडाच्या एका बाजूला बसून शुद्धि मंत्राचा घोष करणारा तो शास्त्रीसमूह व दुसऱ्या बाजूनें उल्हासित अंतःकरणानें शास्त्र्यांच्या आज्ञेनुरूप हालचाल करणारा तो शुद्धिकांक्षी बाल्स्त्री-पुरुष युक्त ६५० (शुद्धीकृतांचा चिंवल येथील आंकडा ६५० नसून ८०० होता. सं. दा ) गावड्यांचा अफाट जमाव, गावड्यांच्या स्त्रियांना सौभाग्य दर्शक कुंकुमानें मंडित करणारी ती महिला, होमकुंडाच्या सरळ रेषेंत रोवलेल्या त्या कर्दळी, कर्दळींच्या ह्या ह्याजवळच उभ्या असलेल्या त्या गोमाता, होमकुंडाच्या तिन्ही बाजूंनीं अभिमानयुक्त व उल्हासपूर्वक उभा राहून एकमतानें शुद्धिकार्यांत भाग घेणारा व एकोप्यानें शुद्धिकार्याला पाठबळ देणारा तो सर्व पक्षीय, सर्व दर्जीय व सर्व वर्णीय असंख्य हिंदुसमाज, शुद्धिकार्यानिमित्त स्वामी आनंदमूर्ति ह्यांच्या प्रेमळ व भक्तिरसपूर्ण नेतृत्वाखालीं झालेलें तें हिंदुपाहुण्यांचें व नवहिंदूंचें संमिश्र व कर्ण मधुर भजन, शुद्धिकार्याला प्रोत्साहन देणारीं तीं भाषणें, फोटोग्राफर लोकांची फोटो घेण्याची ती तत्परता, मोटारींची ये जा वगैरे वगैरे गोष्टी आमच्या मनांतून तर असोच पण त्या अपूर्वकार्याला हजर असलेल्या कोणाच्याहि आठवणींतून बुजून जाणें संभवनीय नाहीं अशी आमची निश्चिती आहे." असो.

चिंवलच्या शुद्धिसमारंभ ह्याप्रमाणें यशस्वीपणें पार पडल्यानंतर ह्याच दिवशीं दोन प्रहरीं नागाळर (कुडका) येथें शुद्धिसमारंभ ठरविलेला असल्यामुळें मंडळी तिकडे गेली. सकाळचा समारंभ थाटानें पार पडल्याची हकीगत गांवोगांव व घरोघर पसरली. त्यामुळें पुष्कळांच्या मनांतील संशयाचीं व भीतीचीं काहूरें नष्ट होऊन निदान दुपारचा समारंभ तरी पहाण्याची संधी दवडूं नये म्हणून शेंकडोंशें लोक मोठ्या उत्कंठेनें नागाळर येथें जमले होते. चिंवलप्रमाणेंच येथेंहि सर्व विधी यथास्थितपणें उरकण्यांत आला. हा समारंभ पार पडण्यात येथील स्थानीय भंडारी ज्ञातीचे तरुण व उत्साही गृहस्थ श्री. पांडुरंग मुका वायंगणकर व श्री. जगन्नाथ वेरेनेकर ( पूर्वीचे जोकीमुजे ) ह्यांनीं अत्यंत परिश्रम घेतले, हें त्यांस निःसंशय भूषणावह

आहे. येथें एकंदर ३५० लोक शुद्ध करून घेण्यांत आले. ह्मणजे सकाळचे चिखल येथील ८०० व रागडरचे ३५० मिळून ११५० लोक आज हिंदुधर्मांत प्रविष्ट केले गेले आणि ह्मणूनच हा हिंदुसमाजाचा भाग्योदय सूचित करणारा सुवर्ण दिन होय! विचित्र योगायोगाची गोष्ट अशी कीं, ज्या तिसवाडी महालांत चारशें वर्षांपूर्वी पहिल्याच घडाक्याला जवळ जवळ हजार दीडहजार लोकांचें खिस्तीकरण करण्यांत आलें होतें, त्याच तिसवाडी महालांत आजहि अपूर्व दैवी सुकृतानें पहिल्याच घडाक्याला अकराशें पन्नास लोकांचें हिंदुकरण करण्यांत आलें! तथापि धर्मांतराचें स्थान व प्रारंभीचा आंकडा जरी ह्याप्रमाणें तुल्यबल झालें असले तरी दोन्ही घटनेंत महदंतर मात्र आहे. कारण एका कार्याच्या मागें सत्ता, सामर्थ्य, पैसा यांचा भरपूर पाठिंबा होता, तर दुसऱ्याला वरील सर्व गोष्टींचा अभाव हीच काय ती साधन सामुग्री ह्यादाशीं होती! एवढेंच नव्हे तर परकीय कडव्या राज्ययंत्रामुळें दुसऱ्या कार्यांत अधिकच दुर्घटता आली होती. व त्यामुळें तें असंख्य आपत्तिमूलकच झालेलें होतें हें विसरून चालावयाचें नाहीं. आणि ही जाणीव सर्व जनतेला असल्यामुळेंच शुद्धिकार्याचें शुभवृत्त जेव्हां सर्वत्र पसरलें तेव्हां घरोघर आश्रमीय मंडळींच्या चातुर्याचें धडाडीचें व धाडसाचें साहजिकच स्वाभिमानपूर्वक कौतुक करण्यांत आलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कालापूर येथें श्रीमंत देवे यांच्या माटांतील सुंदरपणें शृंगारलेल्या मंडपांत वाचकांच्या परिचयाच्या झालेल्या वितोरिन ( विठल ) प्रभृति गावड्यांचा शुद्धिसमारंभ थाटानें साजरा करण्यांत आला. दोन वाड्यावरील मिळून १०० लोक शुद्ध करून घेण्यांत आले. येथेंहि बरीच प्रेक्षक मंडळी उपस्थित होती. येथील शुद्धिकार्य उरकून घेऊन मंडळी पणजीस परत आली व घडलेलें सर्व वृत्त आश्रमांत यथासांगपणें कळविण्यांत आलें.

इकडे श्रीमन्महाराज मसुरास तार कचेरी नसल्यामुळें कन्हाड येथें आश्रमावर उत्कट प्रेम करणारे गृहस्थ श्री. नारायणराव मावे ह्यांच्याकडे येऊन राहिले होते. अपेक्षित तार आली व 'शुद्धीचा पहिला बार उडाला' ही आनंददायक बातमी कन्हाडांत सर्वत्र पसरली. कन्हाडकरांचें आश्रमावर पहिल्यापासूनच विशेष प्रेम त्यांतून हें नूतन व आश्चर्यकारक काम आश्रमानें कांहीं गाजावाजा न करितां यशस्वीपणें पार पाडलें हें ऐकून सर्वांनाच धन्यता वाटली. ह्याच दिवशीं श्रीमन्महाराजांनीं ठिकठिकाणच्या वृत्तपत्रकर्त्यांना व पुढाऱ्यांना तारा केल्या. दिवसरात्र तारा करतां करतां तार मास्तर अगदीं थकून गेले. ह्यावेळीं श्री. नारायणराव मावे ह्यांनीं फारच बहुमोल परिश्रम घेतले. ह्या आनंददायक शुद्धि वार्तेनें उभा महाराष्ट्र हर्षरोमांचित झाला. प्रमुख प्रमुख नगरोपनगरांतून अभिनंदनपर समांवर सभा सुरु झाल्या. आश्रमाच्या विशेष परिचय असलेल्या कित्येक स्थळीं आनंदोत्सव साजरे करण्यांत आले. सर्व वर्तमानपत्रांत याच विषयाला प्रमुख स्थान देण्यांत आलें. त्यांतल्यात्यांतहि केसरी, श्रद्धानंद, संदेश, वल्वंत, संग्रामप्रभृतींनीं, तर ह्यावेळीं अत्यंत महत्वपूर्ण अशी लोकजागृतीची कामगिरी बजाविली. ज्याच्या त्याच्या मनीं मुखीं 'गोमंतकाची शुद्धि' हा एकचएक विषय होऊन बसला! 'हिंदुधर्माचा जयजयकार' विश्वतोमुख झाला!!

महाराष्ट्राबाहेर हें वृत्त समजण्याला जरा अवधी लागला. पण जेव्हां तें समजलें तेव्हां सर्वांना आनंदाचें भरतें आल्याविना राहिलें नाहीं. अखिल भारतीय शुद्धिसभेनें तावडतोब तारेनें २५० रु. पाठवून आश्रमाचें हार्दिक अभिनंदन केलें. त्याचप्रमाणें कित्येक दूरदूरच्या ठिकाणाहून तारा व पत्रें सारखीं येत होतीं. ह्याचवेळीं आश्रमाचे प्रतिनिधी ब्र. क्षीरसागर दिल्ली येथें पंडित मालवीयजींच्या बंगल्यावर श्रीमान् तात्याराव केळकर, डॉ. मुंजे, श्री. बापूजी अणे व पंडित मदन मोहन मालवीय ह्या हिंदुस्थानच्या थोर संमाननीय व वंदनीय पुढाऱ्यांबरोबर प्रस्तुत चळवळीविषयीं वाटाघाट करीत होते. इतक्यांत मसूरहून गावड्यांच्या शुद्धिसंबंधींची तार श्रीमान् तात्याराव ह्यांना आली. त्याबरोबर अर्थातच सर्वांना मनस्वी आनंद झाला. ह्याच संधीत पंजाबचे सिंह पू. श्रीलाला लजपतराय तेथें बंगल्यावर आले. सर्वांचा मिळून कायतो विचार निश्चित झाला व दुसऱ्यादिवशीं "मी आतां बाकीची सर्व व्यवस्था करतों तुम्हीं निश्चितपणें परत जा. आम्हीं सर्वजण तुमच्या पाठीमागे उभे आहोंत, कसलीहि चिंता करूं नका" असें अत्यंत प्रेमळपणानें श्री. तात्यारावांनीं सांगितलें. श्री. तात्यारावांचा तो मनाचा थोरपणा पाहून क्षीरसागर यांस त्यावेळीं गहिंवर आल्यावांचून राहिला नाहीं. तदनंतर पंडित मालवीयजी आदि सर्व पुढाऱ्यांचा आशिर्वाद घेऊन क्षीरसागर दिल्लीहून परत फिरले. वाटेंत त्यांनीं अखिल भारतीय शुद्धिसभेचे कार्यवाह श्री. चिदानंद संन्यासी ह्यांची भेट घेण्याचा दोन तीनदां प्रयत्न केला. पण ते बाहेरगांवीं गेल्यामुळें त्यांची लौकर गांठ पडण्याचा संभव दिसेना. तेव्हां अखिल भारतीय शुद्धिसभेच्या उपमंत्र्यांची गांठ घेऊन त्यांना प्रस्तुत कार्याविषयीं माहिती देण्यांत आली व त्यांनीहि स्वामी चिदानंद येतांच आश्रमाला सक्रिय पाठिंबा देण्याचें आश्वासन दिलें. त्या प्रमाणें २५० रुपये तारेनें गेल्याचें वर म्हटलेंच आहे.

इकडे गोमांतकांत एक हजारावर खिस्ती लोकांनीं हिंदुधर्मांत प्रवेश केला हें वृत्त अकल्पितपणें कानीं येतांच खिस्ती वृत्तपत्रकारांनीं एकच कोल्हेकुई आरंभली. पणजीच्या दियार्यु दा नोयूति ( Diario da Noite ) म्हणजे ' रात्रीचे दैनिक ' किंवा रात्रींचर ह्या वृत्तपत्रानें त्या सर्वांचा पुढकार घेतला होता. शुद्धिचळवळ कोठून तरी ठार व्हावी ह्या हेतूनें वाटेल ती खोडसाळ विधानें व सत्यापलाप करून सरकारला धोक्याच्या सूचना देण्याचा त्यानें सारखा सपाटा चालविला. सरकारला मुख्य धास्ति राजयंत्र उलथून पाडण्याची. साहजिकच बाल्शेविझम्, अराजक, क्रांतीकारक, अशी भूतें उठावदार पद्धतीनें सरकारच्या मनापुढें नाचविली म्हणजे आपला कार्यभाग उरकला असें जाणून रात्रींचरानें ' मसूर आश्रमीय लोक हे राजकारणी असून त्यांचा अराजकांशीं व क्रांतीकारकांशीं संबंध आहे. व ते गोमांतकांत धर्म प्रसाराच्या निमित्तानें आपल्या मताचा प्रसार करीत आहेत. त्यांचे येथील हिंदु पुढाऱ्यांशीं संगनमत झालेलें आहे. येथील हिंदु लोकांची गेल्या आर्धी अमलामुळें त्यांचे पुढारी प्रांतीच्या अर्ध्यांपाठ्यासाठीं भांडत असतातच. त्यांतून ह्या शुद्धिकृत हजारों गावड्यांची भर पडली म्हणजे मग त्यांच्या मागणीला आशंकें स्वरूप आल्याविना रहाणार नाहीं; व ज्या असंख्य पोर्तुगीज वीरांनीं हा प्रांत व हे लोक मिळविण्याकरितां आपलें रक्त सांडलें त्या प्रांतांतून त्यांना चंबू-गबाळें घेऊन लौकरच ' पलायन ' करावें, लागेल म्हणून सरकारनें वेळींच सावध होऊन या परप्रांतीय प्रचारकांचा व



मिशनरी लोक आपल्या ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याकरितां क्रोडों रुपये खर्च करीत आहेत, मुसलमानांचे हजारों मौलवी, ते आपला धर्म सच्चा समजत असल्यामुळे, न्यायानें अगर अन्यायानें, छलबलानें हिंदूंना बाटवून आपल्या धर्मांत ओढीत आहेत. आपला हिंदु धर्म श्रेष्ठ व उत्तम असून आपण धर्मरक्षणाकरितां काय करीत आहोंत ?

—भारतभूषण पंडित मदनमोहन मालवीय.




"आतांपर्यंत महाराष्ट्रांत व्यापक व सांघिक शुद्धीकरणाची फारशी कल्पना नव्हती. पण नुकतेंच गोवें प्रांतांत असें शुद्धीकरण मोठ्या प्रमाणावर झालें त्यामुळें अशा चळवळीची आणि तिच्या परिणामाची किंचित् कल्पना लोकांना आली आहे. आजपर्यंत हिंदी ख्रिस्त्यांना परत हिंदु धर्मांत घ्यावें ही कल्पना सुचलीच नव्हती."

—श्रीमान् नरसिंह चिंतामण केळकर,
अध्यक्ष-अखिल भारतीय हिंदु महासभा, जबलपूर.

त्यांच्या येथील साह्यकारांचा शोध घेऊन ही चळवळ तावडतोब नष्ट करून टाकावी. " अशा आशयाचें भरमसाट लिखाण प्रसिद्ध करण्यास प्रारंभ झाला.

ह्याच सुमारास नागझर येथील एक शुद्धीकृत व्यक्ति मरण-पावली. हिंदुकरणानंतरचा हा पहिलाच मृत्यु होता; त्यामुळें प्रेताला हिंदुरिवाजाप्रमाणें और्ध्वदेहिक संस्कार करणें प्राप्त होतें ; पण शुद्धीकरणाला पुराणमतवादी ब्राह्मणवर्गाची संमती नव्हती. डॉ. कुर्तकोटींच्या आज्ञापत्रानें, त्याचें समाधान झालें नाहीं. एका अंगाला सरकारची धास्ती तर दुसऱ्या अंगाला शिरोळकर शंकराचार्य वाळींत टाकतील, दंड करतील, ही धास्ती ! ही अडचण शुद्धीपूर्वीच दृष्टोपत्तीस आल्यामुळें आश्रमानें ब्रिटीश हिंदुस्थानांतून गावड्यांचे सर्व संस्कार करण्यासाठीं तीन चार भिक्षुकांना अगोदरच बोलावून घेतलें होतें. तथापि ह्याचवेळीं गोमांतकांतील श्री. सीताराम भट फडके ह्यांनीं आश्रमीय मंडळींच्या शब्दाला मान्यता दिली, व मोठ्या धाडसानें ते नागझरला जाऊन अंत्येष्टिसंस्कार उरकून आले. ह्याप्रमाणें शुद्धीकर्त्यांचें कार्य केल्याबद्दल त्यांना पुष्कळांच्या रोषास व निंदेस अगदीं सुरवातीला बळी पडावें लागलें ; पण तें सर्व त्यांनीं मोठ्या आनंदानें सहन केलें; पण एवढ्यानेंच भागलें नाहीं. सरकारी कायद्याप्रमाणें अंत्येष्टि विधीपूर्वी डॉक्टराचें सर्टिफिकेट घ्यावें लागतें व तें तर कोणीहि देईना; कारण शुद्धिचळवळीशीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध हा विनाशमूलकच होणार अशी प्रत्येकाला धास्ती वाटत होती. अशा वेळीं पणजींतील सुप्रसिद्ध डॉक्तर आ. गो. बोरकर ह्यांनीं मोठ्या निर्भयपणें सर्टिफिकेट दिलें. तदनंतर प्रेत कोठें पुरावें असा प्रश्न आला. गावड्यांचा पुढारी जगन्नाथ वेसनेकर ( गुजे ) ह्यांनीं एका देवज्ञ जमीनदाराकडून जागा विकत घेऊन तेथें प्रेतसंस्कार केला. पण पाद्र्यांनीं व खिस्त्यांनीं त्या जमीनदाराला खाऊं का गिळूं असें करून भेडसाविलें. साहजिकच जागा देण्यासंबंधीं केलेला करार त्यानें मोडून टाकला. पुढें रायबंदर येथील जमीनदार श्रीमान् विष्णुपंत गोविंद नाईक पानवेलकर ह्यांच्याकडे जाऊन जगन्नाथानें जागेची मागणी केली, व ती त्यांनीं मोठ्या आनंदानें दिली ही गोष्ट निराळी. पण वरील प्रसंगाचाहि अवास्तव फायदा घेऊन 'रात्रिचरानें' असें प्रसिद्ध केलें कीं, " नागझर येथील प्रेतसंस्कार सरकारी अधिकाऱ्यांच्या आशीर्वादानें व रस्त्यावरच्या जागेंतच झाला. प्रेत रस्त्याजवळच म्हणजे अयोग्य स्थळीं पुरलें गेलें. आधीं मृत मनुष्य हिंदु का खिस्ती हा वाद निघाल्यामुळें प्रेत बराच वेळ तसेंच पडून राहिलें व त्यामुळें त्या घरच्या मंडळीला फारच वाईट वाटलें." त्यांतील हेतु इतकाच कीं, सरकारी अधिकाऱ्यांना शुद्धिकार्यांत खोट दिसावयास चिथवावें व प्रेतसंस्काराची अनास्था पाहून गावडे लोकांनीं भिऊन शुद्धिकार्य बंद करावें. वृत्तपत्रांच्या ह्या हाकाटीमुळें सरकारी परवानगीशिवाय प्रेतसंस्कार केला असें म्हणून खिस्त्यांनीं गावड्यांवर मामलेदार कचेरींत फिर्यादी करण्यास कमी केलें नाहीं. पण गावड्यांनीं ' सरकार जेथें आम्हांस नेमून देईल ती जागा आम्ही उपयोगांत आणीत जाऊं ' असें नम्रपूर्वक कळविल्यावर त्यांना सोडून देण्यांत आलें. त्याचप्रमाणें एका खुनाच्या कटाचाहि संबंध शुद्धिकार्याशीं जोडून दाखविण्याचा उपद्व्याप करण्यांत आला. अशा अनेकविध प्रकारें 'शुद्धि हें कांहींतरी भयंकर गौडबंगाल आहे ' असें दाखविण्याचा उपक्रम खिस्ती वर्तमानपत्रांनीं अट्टाहासपूर्वक चालविला होता. खिस्ती वृत्तपत्रांच्या ह्या दुष्टपणाच्या हाकाटीला भारतपत्रानें पोर्तुगीज

मार्फत आणि हिंदुपत्रानें मराठींतून पुरवण्या काढून खडेतोड उत्तरें देण्याचें अभिनंदनीय कार्य पुढें केलें.

गोमांतकांतील मुख्य पाद्रीसाहेबांच्या ( Arch Bishop ) कानांवरहि हें शुद्धि-वृत्त गेलें व खिस्ती वृत्तपत्रांनीं त्याला दिलेलें लालभडक स्वरुप पाहून त्यांचें डोकेंहि भणाणून गेलें. रात्रिचराप्रमाणें त्यांनाहि वाटूं लागलें कीं, पोर्तुगीज सरकारनें जो विवाहमर्यादेचा कायदा गोमांतकाला हट्टानें लागू केला, त्यामुळेंच हा भयंकर घोटाळा उपस्थित झाला आहे. पोर्तुगीज राज्यांतील गावडेआदि खिस्तीजातींची कांहेंशीं लग्नवयोमर्यादा पूर्वी हिंदुप्रजाजनांच्या मुलामुलींच्या लग्नवयोमर्यादेप्रमाणेंच म्हणजे १४-१२ अशी होती. परंतु मध्यंतरीं सर्व खिश्चनांच्या लग्नाची वयोमर्यादा नवीन कायद्याअन्वयें वीस व सोळ अशी करण्यांत आली होती. आणि म्हणून ते ताड्कन् उठले व तडक गव्हर्नरजनरल साहेबांना भेटावयास जाऊन त्यांनीं आपली तक्रार मांडली. गव्हर्नर जनरल ( सि. पेद्रो द अमोरिम् ) हे न्यायी स्वभावाचे व शांतवृत्तीचे गृहस्थ असल्यामुळें त्यांनीं पाद्रीसाहेबांस स्पष्ट सांगितलें, कीं, लोकसत्तेच्या ( Republic ) कायद्याप्रमाणें कोणी कोणताहि धर्म स्वीकारो त्यांत त्यांना हात घालतां यावयाचा नाहीं. पण वैवाहिक कायद्यामुळें जर गावडे खिश्चन जातींत असंतोष पसरला असेल तर मात्र अवश्य तो कायदा पोर्तुगालहून बदलून आणण्याची खटपट ते अवश्य करतील. आणि त्याप्रमाणें त्यांनीं ताबडतोब तार करुन वयोमर्यादेचा कायदा आठ दिवसांचे आंत बदलून आणला व तशी सर्वत्र दौंडी पिटविण्यांत आली. पण गावडे लोकांनीं हिंदुधर्म स्वीकारला हा अशा कांहीं आगांतुक कारणामुळें नसल्यानें कायदा बदलूनहि कांहीं उपयोग झाला नाहीं तो नाहींच.

पण आर्चबिशप शुद्धिकार्यासंबंधीं गव्हर्नरसाहेबांना आज भेटावयास गेले, हा एकाच गोष्टीचे पुष्कळांच्या मनांत अनेकविध स्वरुपाचे तर्कवितर्क सुरु झाले व ' आतां कांहीं तरी विलक्षण प्रकार घडणार ' ह्या समजुतीनें भीतीची दाट छाया सर्वत्र पसरली आणि जेव्हां आश्रमीय मंडळी कालापुरची शुद्धि करुन आली, तेव्हां ज्यांचे त्यांचे कडून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें, ' आतां शुद्धि बंद ठेवा. ब्र. गणपतीबुआ, शास्त्रीबुआ व आनंदमूर्ति यांनीं येथून आतां निघून जावें. येथें क्षणभरहि थांबूं नये ' अशा सूचना होऊं लागल्या. सायंकाळीं श्री. शेवलकर वकिलांच्या घरीं एकंदर गोष्टींचा विचार करण्याकरतां कांहीं शिष्टांना त्यांनीं बोलाविलें होतें. तेव्हां मध्यंतरींच्या काळांत पाळें व ताळगांव येथील कार्यक्रम निश्चित करण्यासाठीं मंडळी तिकडे गेली. पाळें येथें गेल्यावर सर्वांना भेटून व दुसऱ्या दिवशींची तयारी करण्यास सांगून सत्यनारायणासाठीं तेथें आश्रमीय प्रचारक श्री. तात्यासाहेब कान्हेरे ह्यांस ठेवून मंडळी ताळगांव येथें गेली. ताळगांवांत गावड्यांची वस्ती नागाळ, वांध, मरडावर, ओल्टेल व करंजाळे ह्या पांच वाड्यांतून आहे. आश्रमीय प्रचारक श्री. नाना कोंडोलीकर ह्यांनीं तेथें जाऊन श्री. घोडेकर ह्यांच्या सहाय्यानें प्रतिज्ञालेख मागेंच लिहून घेतले होते, शुद्धिसमारंभ दुसऱ्या दिवशीं नागाळ येथेंच करण्याचें ठरलें. कारण, आसपासच्या चारहि वाड्यांचे भाटकर खिश्चन होते व गावड्यांच्या मागणीप्रमाणें नागाळीचे भाटकर श्री. घोडेकर ह्यांनीं कोणाचीहि क्षिति न बाळगतां निर्भयपणें आपल्या वाट्यांत शुद्धीकरणास अनुज्ञा दिली होती. तेव्हां शास्त्रीबुवा व गणपतीबुवा ह्यांना नागाळी येथें ठेवून

श्री. दादा मयूरकर व श्री. लवंदे पणजीस सायंकाळच्या बैठकीसाठीं निघून आले. बैठकीस दहा बारा प्रतिष्ठित मंडळी उपस्थित होती. त्यांतील सात लोकांचें एक कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें. तें येणें प्रमाणें:–१ श्री. शिवाजीपंत महाले, २ श्री. शिवा फटूपे आंले, ३ श्री. विठ्ठलराव सुंकठणकर, ४ श्री. शेलगांवकर वकील, ५ श्री. दिपा हुमाणी, ६ श्री. व्यंकटेश सू. सरदेसाई व ७ श्री. कमळोबा म. रा. देशपांडे. ह्या मंडळानें रोज जमावें व शुद्धीकरणाला जे कायदेशीर अडथळे होत असतील त्यांचा यथास्थितपणें विचार करून सल्ला द्यावा आणि हस्तपत्रकें काढून समाजाला वरचेवर माहिती पुरवावी, असें ठरविण्यांत आलें. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं भारतकार व हिंदुकार ह्यांस बोलावून आणून त्यांस पोर्तुगीज व मराठींतून पुरवण्या काढण्यास सांगण्यांत आलें.

बैठकीचें काम संपून मंडळी घरोघर गेली. मध्य रात्रीच्या सुमारास एकाएकीं श्री. कान्हेरे एकटेच पाळ्यांहून सायकलवरून आले, व 'पूर्वीच्या हिंदु गावड्यांनीं कांहीं तंटा उपस्थित केल्यामुळें खिस्ती गावडे बिथरले आहेत' असें सांगितलें. तेव्हां पाळ्याचे भाटकर श्रीमंत धेंपे ह्यांच्या साह्यानें प्रस्तुत संकट निवारतां येईल, हें जाणून प्रथम त्यांच्याकडे जाण्याचें ठरविण्यांत आलें. परंतु आर्च बिशप गव्हर्नर जनरलच्या भेटावयास गेल्यापासून सर्व वातावरण भीतियुक्त झालें होतें आणि 'सरकार आतां लष्करी कायदा (मार्शल लॉ) पुकारणार व दडपशाहीचें सत्र जिकडेतिकडे सुरू होणार' असे ध्वनि सर्वत्र उमटत असल्यामुळें, श्रीमंत धेंपे वरील गोष्टीला कदाचित् मान्यता देणार नाहींत, हें लक्षांत घेऊन त्यांच्याकडे पणजीचे सर्वमान्य पुढारी श्री. दादाराव वैद्य ह्यांना पाठवून वरील कार्यभाग उरकून घेणें शक्य होईल, असा विचार झाला. त्याप्रमाणें श्री. कान्हेरे व श्री. रघुनाथराव भेंडारे ह्यांना बरोबर घेऊन सकाळीं पाळ्याकडे जाण्याविषयीं श्री. दादाराव वैद्य ह्यांस सांगण्यांत आलें व दादा मयूरकर लवंदे प्रभृति मंडळी ताळगांवकडे शुद्धिसमारंभासाठीं निघून गेली, तों त्यांना वाटेंतच वे. शास्त्रीबुवा भेटले व त्यांनीं 'ताळगांवची शुद्धि आटोपूनच आम्ही आलों. गांवांतील सर्व प्रतिष्ठित मंडळी समारंभास उपस्थित होती,' असें शुभवृत्त सांगितलें. तेव्हां सर्व मंडळींना आनंद झाला व लगेच सर्वजण पाळें गांवाकडे निघून आले. पाळेगांव बराच मोठा व येथें शुद्ध झालेल्या गांवड्यांची आप्तेष्टमंडळीहि बरीच होती. त्यांतून गांवचा पुढारी जुजे मनवेल हा शुद्धीला प्रथम पासूनच अनुकूल नसल्यामुळें पाळें येथील शुद्धीकडे सर्वांचें लक्ष लागलें होतें. मनवेल ह्याची समजूत घालण्याचा आतांपर्यंत पुष्कळ वेळां प्रयत्न करण्यांत आला होता. तोंडावर तो 'हो हो' म्हणे व पुनश्च 'ये रे माझ्या मागल्या' अशी त्याची अवस्था होई. निश्चित केल्याप्रमाणें आज शुद्धि तर करावयाचीच असा निर्धार आश्रमीय मंडळींनीं केला होता. त्याप्रमाणें प्रथम श्री. लवंदे यांस श्री. धेंपे ह्यांच्या घरीं श्री. दादाराव वैद्यांचें काम कोठपर्यंत आलें हें पाहण्यासाठीं पाठविण्यांत आलें., इकडे दादा मयूरकर मनवेल ह्यास घेऊन त्याची समजूत घालीत बसले. कांहीं वेळानें जुजे मनवेलनें आपलीं मुलें क्षौरास पाठविलीं तेव्हां वे. शास्त्रीबुवा, गणपतीबुवा ह्यांनीं गावड्यांच्या प्रायश्चित्तविधीला प्रारंभ केला. कांहीं जणांचें क्षौर इत्यादि झालेलें पाहून बाकीच्यांचाहि धीर चेपला व आस्ते आस्ते सर्व मंडळी क्षौरास बसली. कांहींचें क्षौर चाललें आहे, कांहीं स्नानें करीत आहेत, इकडे होमकुंड पेटविलें जात आहे, अशा वेळीं श्री. दादाराव वैद्य आदिक मंडळी श्री. धेंपे यांस भेटून आली. जुजे मनवेल ह्याची समजूत पटून तोहि क्षौरास बसला व

यथाक्रमानें शुद्धिसमारंभ यशस्वीपणें पार पडला. श्री. दादाराव वैद्य, आनंदमूर्ती व लवंदे ह्यांचीं समयोचित व्याख्यानें झालीं व परमेश्वरी लीलेचें कौतुक करीत करीत मंडळी घरोघर गेली.

आश्रमीय मंडळी मुक्कामासाठीं कालापूर येथें आली. येथून जवळच असलेल्या बांधार नांवाच्या वाड्यावर वे. मू. शास्त्रीबुआ व गणपतीबुआ ह्यांनीं १७० लोक रात्रीं शुद्ध करुन घेतले. कालापूर येथील कांहीं मंडळीहि शुद्ध झाली. ह्याच रात्रीं श्री. लवंदे ह्यांनीं समस्त नवहिंदूंचा वोस ( सभा ) कालापूर येथें भरविला; त्यांत चिंबल, नागझर, कालापूर, ताळगांव, बांधार, पाळें इत्यादि स्थळचे गावडे उपस्थित होते. हिंदुधर्मप्रवेशानंतर हा पहिलाच वोस भरला असल्यामुळें सर्वांनीं त्यांत उत्साहानें भाग घेतला. प्रथम परमेश्वराची मनोभावें प्रार्थना करण्यांत आली. नंतर श्री. विठ्ठल सुर्लीकर ( वितोरीन ) ह्यांनीं, ज्या सद्गुरु विनायक महाराज मसूरकर ह्यांच्या कृपाप्रसादानें गावडे लोकांस स्वधर्ममातेची भेट झाली, त्याचे धन्यवाद गाईले. श्री. सखाराम दिवकर ( जुजे दियश ) ह्यांनीं आवेशयुक्त आणि कळकळीचें भाषण करुन पुष्टी दिल्यावर, चिंबल येथील गावड्यांचे पुढारी श्री. सांतु नार्वेकर ( सांतान कारनेर ) ह्यांनीं, गावड्यांच्या हिंदुधर्मप्रवेशास श्रीमज्जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य ( डॉ. कुर्तकोटी ) मठ करवीर ह्यांनीं अनुमतीदर्शक आज्ञापत्र पाठवून शुभ आशिर्वाद दिले ह्या बद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन केलें. तेव्हां त्याला श्री. केशव कुंकळकर ( कायतान पेरेर ) ह्यांनीं अनुमोदन दिल्यावर सर्वांनीं उभे राहून श्रीमन्महाराज व श्रीमच्छंकराचार्य ह्यांचे टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत अभिनंदन केलें. नंतर श्री. जगन्नाथ हडकोर्णकर ( ज्याकी आन्द्राद ) ह्यांनीं गावड्यांना हिंदु भाटकर, हिंदुसमाज व हिंदूंचीं वृत्तपत्रें ह्या सर्वांनीं प्रेमळपणें पाठिंबा दिल्याबद्दल त्यांचे आभार मानले व त्याला श्री. यशवंत सुर्लीकर ( विंसेंत मेगुर्ल्योव ) ह्यांनीं अनुमोदन दिलं. ह्यानंतर विठ्ठल सुर्लीकर ह्यांनीं खिस्ती वृत्तपत्रकर्त्यांनीं ' लांचलुचपत घेऊन किंवा धाकदपटशानें गावडे हिंदु होत आहेत अशी केलेली हाकाटी निरर्थकच कशी आहे हें सांगितलें. तेव्हां सखाराम दिवकर ह्यांनीं शुद्धि चळवळी विरुद्ध प्रयत्न चालविणाऱ्या खिस्ती वृत्तपत्रकारांचा व पाद्रीलोकांचा निषेध केला. अंतीं श्री. लवंदे ह्यांनीं 'कोणीहि घाबरूं नये. शांतपणें आपआपले व्यवहार करीत रहावें. देवावर भरंवसा ठेवावा ' असें आश्वासन पूर्वक त्यांस कळविलें. तदनंतर हिंदुधर्माचा प्रचंड जयजयकार करण्यांत आला व वोस समाप्त झाला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ब्र. गणपतिबुवा व भालचंद्रबुवा ह्यांनीं धुळापी येथें १०० लोक शुद्ध करुन घेतले. ह्यापूर्वी कांहीं दिवस बांधार कालापूर ताळगांव इत्यादि भागांत शुद्धिकार्यानिमित्त सायकलवरुन फिरत असतांना ब्र. गणपतीबुआ ह्यांस एका रस्त्यावर कांहीं दहाबारा खिश्चन तरुणांनीं आडविलें. एकानें त्यांचा दंड घेतला, दुसऱ्यानें झोळी हिसकावली व तिसरा सायकल घेऊन पळून गेला ! ह्या गोष्टी इतक्या एकसमयावच्छेदेंकरुन झाल्या, कीं, गणपतीबुआंना ह्या हल्ल्याची प्रथम नीटशी कल्पनाहि आली नाहीं. पण क्षणा दोन क्षणांतच त्यांना परिस्थितीची बरोबर जाणीव झाली. गणपतीबुआंना त्या सर्वांनाहि पाणी पाजण्याचें सामर्थ्य होतें; परंतु चळवळीला तिच्या मुळावर घाव घालणारें असें शांतताभंगकारक स्वरूप देण्याच्या शत्रुपक्षाच्या प्रयत्नांना तसें शक्तिप्रदर्शन करणें हें साहसकारीच होईल, म्हणून अशा ह्या प्रसंगीं कार्यकर्त्यांनीं अगदीं संपूर्ण शांतता बाळगावी अशी आश्रमाची सक्त आज्ञा असल्यामुळें गणपतीबुआ शांत राहिले व ती गोष्ट त्यांनीं हंसण्यावारीच नेली. नंतर कांहीं वेळ ते त्या मुलांशीं थट्टामस्करी





तिसवाडी महालांतील गावडे पुढारी व कांहीं शुद्धीकृत स्त्रिया.



ताळगांव येथील शुद्धीकृत गावडे, प्राथम पाठशालेय विद्यार्थी व पंच.

करीत बोलत राहिले तेव्हां थोडया अवकाशानें मुलांनीं सायकल व दंड आणून दिला व गणपतीबुवा पुनश्च आपला मार्ग आक्रमित झाले.

माधवबुवा, शास्त्रीबुवा, लवंदे, दादा आदि मंडळी ओडशेल नावशीकडे गेली होती. गांवांतील लोकांना पूर्वीपासून सूचना न मिळाल्यामुळें बहुतेक लोक बाहेर शेतीधंद्यावर गेलेले होते. तरीहि पण (५०) पन्नासेक लोक मिळाले व त्यांना शुद्ध करून घेण्यांत आलें. बाकीच्यांना रात्रीं नावशी येथें शुद्धीस जमण्यास सांगितलें. माधवबुवा व शास्त्रीबुवा ह्यांस नावशीकडे पाठवून दादा, लवंदे व सगुणाकामत पणजीकडे येण्यास निघाले. तोंच श्री. शांताराम गोवेकर मास्तर स्पेशल मोटार करून आले व त्यांनीं "आश्रमीय मंडळीस पकडण्याविषयींचें वारंट सुटलें आहे असें समजतें, तरी आज रात्रीं बांबोळीच्या डोंगरावर जमून पुढील विचार करण्यासाठीं श्री. शंखवाळकरांनीं तुम्हांस तांतडीनें बोलाविलें आहे" असा निरोप सांगितला. तेव्हां मंडळी तशीच आलेल्या रस्त्यानें शुद्धि करावयाचें ठरलेल्या जागीं म्हणजे नावशीकडे वळली. इकडे ओडशेल येथें शेतावर व मार्मगोव्याला कामावर गेलेली मंडळी आपआपल्या घरीं परत आली. तों घराचें सर्व स्वरूप त्यांना पालटलेलें दिसलें. जिकडे तिकडे झाडसारवीमुळें स्वच्छता झालेली असून घरांतील बायकांच्या कपाळीं कुंकुमतिलक, तर मुलांबाळांचें व वृद्धांचें क्षौर होऊन ते अगदीं '.कोंकणें' बनलेले! अर्थातच शुद्धीकरणाचा दिवस त्यांस न कळल्यामुळें, सर्वांच्या समवेत त्यांना हिंदू होतां आलें नाहीं, म्हणून त्यांना वाईट वाटलें. पण त्याच रात्रीं सर्वांना नावशीस बोलाविल्याचें त्यांस समजाविल्यावर त्यांना आनंद झाला. जेवणखाण धाईघाईनें उरकून घेण्यांत आलें; पण रोजच्या त्यांच्या जेवणांत व आजच्या जेवणांत एक महत्त्वपूर्ण घटना झाली, ती येथें सांगितल्याविना चालावयाचें नाहीं. वर सांगितलेंच आहे, कीं, कामधंद्यावर गेलेल्या माणसांव्यतिरिक्त बाकीचीं माणसें हिंदू होऊन बसलीं होतीं, अर्थातच कामावरील मंडळी घरीं आली तेव्हां ती ख्रिस्तीच राहिलेली असल्यामुळें त्यांना शुद्ध झालेल्या घरांत जेवावयास कोठें वाढावयाचें, हा नाजूक प्रश्न उपस्थित झाला व आनंदाची आणि अभिमानाची गोष्ट आहे कीं, त्यावेळीं बायकोनें आपल्या नवऱ्याला व मुलालाहि घरांत जेऊं न घालतां ओसरीवर वाढलें. क्षुद्र म्हणून गणल्या गेलेल्या ह्या जातीची ही उज्ज्वल धार्मिक वृत्ति पाहून कोणाचें अंतःकरण भडभडून येणार नाहीं? वरील प्रकारें ओडशेल येथें जेवणें खाणें चाललीं आहेत तोंच दादा, लवंदे प्रभृति मंडळी नावशीस जाण्यासाठीं आली. गावड्यांना ओसरीवर जेवतांना पाहून त्यांना सानंदाश्चर्य वाटलें. नंतर पन्नास एक माणसांचें शुद्धीकरण करून दादाप्रभृति मंडळी नावशीस गेली. ठरल्याप्रमाणे नावशी येथें जमलेल्या मंडळींचें शुद्धीकरण झाले. ह्या इकडील शुद्धिसमारंभ घडवून आणण्याचें कामीं श्री. घोडेकर, श्री. दांडे, श्री. वैकुंठ कामत, व श्री. सगुणकामत ह्यांचें चांगलें साह्य झालें. नावशीचा समारंभ आटोपून श्री. दादा, व लवंदे बांबोळीच्या डोंगरावर पणजीच्या मंडळीस भेटण्यासाठीं निघून गेले. पणजीहून श्री सुर्लकरणकर, आर्लेकर, म्हाम्ब्रे, कामत ही मंडळी आली. कुळापीहून गणपतीबुवा आणि चिंबलहून तात्यासाहेब कान्हेरे आले. ख्रिस्ती वृत्तपत्रांनीं भयंकर हैदोस घातल्यामुळें पणजीच्या वातावरणांत सारख्या नवीन नवीन कंड्या पिकतच होत्या. त्यांतच 'आश्रमीय मंडळीला पकडण्यासाठीं वारंट निघणार' ह्या एका बातमीची आणखी भर पडली व पुढील शुद्धिकार्यच आतां बंद ठेवावें

म्हणजे झालें, असें ठरवून उपरोक्त पणजीच्या शिष्ट मंडळींनीं आश्रमीयांना जनसंसर्गापासून अगदीं एकीकडे अशा यांबोळीच्या डोंगरावर रात्रीं ११ वाजतां बोलावून घेतलें होतें; परंतु शुद्धिकार्य तर बंद ठेवणें शक्य नव्हतें कारण गांवांतून जे शुद्ध झाले त्यांचे आप्तेष्टसंबंध सर्वत्र पसरलेले होते. ह्यांची व्यवस्था लावणें अर्थात्‌च अपरिहार्य होतें. बरें, पकडापकडीचा प्रसंग येणार हें प्रथमपासूनच गृहीत धरलेलें होतें. ह्या प्रसंगाला सर्वांनीं धैर्यानें तोंडच देणें युक्त होय, मग जें परमेश्वरी नेमानेमाप्रमाणें व्हावयाचें असेल तें होवो. ह्या व अशाच स्वरूपाची पुष्कळशी बोलाचाली होउन मंडळी घरोघर निघून गेली. अर्थात्‌च शुद्धिकार्य चालू ठेवण्याचें दादांचें धोरण ह्यावेळीं पणजीच्या मंडळीला आवडलें नाहीं. पणजीची मंडळी खिन्न अंतःकरणानें परत निघाली. परत जातांना एका गृहस्थांनीं श्री' लवंदे ह्यांना "अरे तूं आमच्या बरोबर घरीं चल, तुला आतां पकडतील" असें सांगितलें. पण 'कार्य सोडून पळणें हें माझें ब्रीद नाहीं. ह्या धर्मकार्यासाठीं मला वाटेल ते हाल किंवा संकटें सोसावीं लागलीं तरी चालतील. माझी सर्वांला तयारी आहे' असें बाणेदारपणाचें उत्तर श्री. लवंदे ह्यांनीं दिलें व मंडळी निघून गेली.

इकडे पणजी शहरांत आश्रमासंबंधीची सर्व माहिती गोळा करण्यासंबंधीं सरकारी हुकूम निघाला. मग काय कडव्यांना एकच उत आला. ह्या वेळीं आश्रमीय मंडळीचे प्रयत्न करमळी नांवाच्या गांवीं चाललेले होते. हा गांव बराच मोठा होता. शुद्धीकरणाचा वणवा सर्वत्र भडकत चाललेला पाहून खिस्ती लोक व पाद्री मंडळी विरुद्ध दिशेनें अविश्रांत श्रम करूं लागली. उघड उघड सामना सुरू झाला. मनुष्यबळ, द्रव्यबळ, सत्तेचा पाठिंबा या गोष्टींमुळें त्यांच्याशीं टक्कर देणें असामान्य होतें. रात्रिंचर दैनिकानेंहि 'करमळीला शुद्धि होणारच नाहीं,' असा आपला अभिप्राय छातीठोकपणें दिला. शुद्धिशत्रु खिस्ती लोकांनींहि नाना प्रकारच्या भीतीमुळें कंड्या पिकवून शुद्धदलोकांचा बुद्धिभेद केला व गांवांत तट पाडले. साहजिकच शुद्धीकरणाची केलेली तयारी चार सहा वेळां व्यर्थ गेली. परंतु आश्रमानें आपला धीर सोडला नाहीं. येथील गावड्यांचा पुढारी उबाल्द हा शुद्धीकरणास सर्व तऱ्हेनें अनुकूल होता, व 'नागझरच्या शेवटल्या सभेला तुह्मीच मला प्रतिनिधि पाठवून आपण हिंदु होण्यास तयार आहों, असें कळविण्यास सांगितलें, एवढेंच नव्हे तर ५०–६० जणांनीं प्रतिज्ञालेखाहि लिहून दिले आहेत व तुह्मीच आतां माघार घेतां हें चांगलें नाहीं.' असें तो आपल्या लोकांना वारंवार ह्मणत असे. अखेरीस 'तुह्मी कोणीहि शुद्ध झालां किंवा न झालां, तरी मी आश्रमाला शब्द दिला आहे, तो खोटा करणार नाहीं. मग वाटेल तें होवो,' असा आपला निर्धार त्यानें सर्व लोकांस कळविला. त्याप्रमाणें एक दिवस निश्चितहि करण्यांत आला. पणजींतील वृत्तपत्रकारांनीं हा दिवस प्रसिद्ध केला. करमळीवर सर्वांचे डोळे लागून राहिले. उबाल्द हा तर शुद्ध होणारच, पण त्याबरोबर बाकीचीहि मंडळी एकदम शुद्ध झाली पाहिजे ह्मणून अगदीं सर्वांकडून निकराचा प्रयत्न करण्यांत आला. गांवांतील उत्साही मंडळी श्री. नाईक, थोटे, हुमटकर, पुरुषोत्तमशेट आदिकांनींहि असेल नसेल तेवढें सर्व बळ वेंचून प्रयत्नांची अगदीं पराकाष्ठा केली! लवंदे, श्री. रघुनाथराव भंडारे, श्री. बाळकृष्ण विठ्ठल प्रभु म्हावेलकर यांनीं दूर गांवाला जाउन गावड्यांचे एक वजनदार मातकरहि मोठ्या परिश्रमानें आणले; पण पाद्यांच्या भुजावणीनें जें घोडें एकदां

विथरलें तें विथरलेंच. सर्व प्रयत्न हरले व अंतीं एकटा उवाल्दच शूर वीराप्रमाणें आपल्या स्वें जात-गोताला व घरच्या मंडळींनाहि सोडून शुद्धिविधीस बसला ! उवाल्दचें हें प्रशंसनीय धैर्य गावड्यांच्या इतिहासांत निःसंशय चिरस्मरणीय होईल. नित्याप्रमाणें शुद्धिविधि पार पाडण्यांत आला. मध्यंतरीं एक प्रतिष्ठित खिश्चन गृहस्थ ( जे. पी. असलेले ) तेथें येऊन आपल्या अधिकारांत समारंभांत मोडता घालूं लागले, पण त्यांना श्री. लवंदे ह्यांनीं वेळींच चोख उत्तर देऊन गप्प बसविण्यास कमी केलें नाहीं. अशा प्रकारें एकट्या उवाल्दचाच शुद्धिसमारंभ यशस्वी रीतीनें पार पडला. उवाल्दचें नांव कृष्णा असें ठेवण्यांत आलें.

ह्याप्रमाणें इकडे काम चाललें होतें तें संपवून शास्त्रीबुवा व गणपतबुवा हे फोंडें महालांत काम करण्यासाठीं निघून गेले. चिंचलच्या शुद्धीपूर्वी कांहीं दिवस ते माशेल, सावईवेरें कुंडई, केरी, बोरी फोंडा, वेलींग, प्रियोळ इ. ठिकाणीं जाऊन शुद्धिकार्याविषयींच्या प्रयत्नांची माहिती व दिशा आश्रमपरिचित मंडळीस सांगून आलेच होते. परंतु आतां शुद्धिकार्याला प्रत्यक्ष तोंड पडल्यामुळें महत्त्वाचा कार्यभाग उरकल्यासारखाच झाला होता. ' शुद्ध होतां येते. एवढेंच नव्हे तर, हजारों आपलेच भाईबंद शुद्ध झाले सुद्धां; ' ह्या वार्तेनें सर्व गावडेसमाजाच्या मनावरील भीतीचें भयंकर दडपण एकदम नष्ट झालें होतें. आतां त्यांच्या वाड्यावर जाऊन सर्वांना एकत्र करावयाचें व शुद्धिविधि उरकून घ्यावयाचा एवढाच कार्यभाग अवशिष्ट राहिला होता. शेंकडों वर्षांच्या दुर्भेद्य असणाऱ्या बंधाऱ्याला पाट फोडून त्याचा स्वच्छ निर्मळ व पवित्र प्रवाह वाहता कसा करावयाचा ह्या प्रमुख प्रश्नाची सोडवणूक झाल्या-नंतर आतां किरकोळ तत्तत्स्थानीय अडचणींचाच तेवढा विचार कर्तव्य होता. असो.

कामगिरीवर जातांना वे. मू. शास्त्रीबुवांनीं माशेल येथें विद्वद्वर्य श्री. करंडे शास्त्री ह्यांची गांठ घेतली. चिंचलच्या शुद्धिसमारंभाचे दिवशीं त्यांनीं आपला मनोदय साश्रुपूर्ण नयनांनीं व सद्गदित कंठानें कसा व्यक्त केला, हें मागें कथन केलेंच आहे. पुढील कार्याविषयींचें बोलणेंचालणें झाल्यावर त्यांनीं एक पत्र लिहून शास्त्रीबुवांचे जवळ दिलें. तें असें:—

श्री. माशेल फाल्गुन शु ॥ १२ रवौ

कृ. सप्रेम आशिर्वाद उपरी अद्यावधी क्षेम असो विशेष:—

मुद्दाम पत्राचें कारण, हल्लीं हें पत्र घेऊन जाणारे हे शास्त्रीबुवा येथें सध्या चालू झालेल्या शुद्धिकरणाच्या चळवळींतील एक प्रमुख कार्यकर्ते आहेत. आपल्या स्वतःच्या गांवांतील व आसपासच्या वेरे, वळवई, वाघुर्मे वगैरे गांवांतील ख्रिस्तांव गावड्यांना हिंदु करून घेण्याच्या कामीं आपलें साहाय्य मागण्यासाठीं हे मुद्दाम आपणापर्यंत जातांना, आपली त्यांची प्रबळ ओळख नसल्यावरून माझ्या जवळ ते आपणांस एक पत्र मागत आहेत म्हणून हें पत्र आपणास लिहितों. वस्तुतः हीं कामें आमचीं आम्हींच करावयाचीं असें असतां परप्रांतस्थ लोक जर आपल्या वेळेचा व पैशाचा स्वार्थत्याग करून आमचीं कामें करावयास तयार झाले तर त्यांना हें धर्माभिमानाचें काम असल्यावरून होईल तेवढी मदत करणें हें आपलें कर्तव्य आहे, हें आपणास मी लिहावयास नकोच. विशेष माहिती हे भेटींत सांगतीलच. कळावा लोभ टेवावा हे आशीर्वाद. आपला,

रामचंद्र वामन नायक करंडे.

वरील पत्र घेतल्यानंतर शास्त्रीबुवा पुढें गेले व त्यांनीं टिकटिकाणच्या लोकांच्या गांठी भेटी घेतल्या. लौकरच श्री. ल्वंदे, दादा, माधवबुवा प्रभृति मंडळींनीं त्यांस केरीस गांठलें. केरी येथील गावड्यांचा प्रमुख मनवेल ह्यास श्री. दादा मसूरकर त्यांच्या घरीं जाऊन भेटले. व त्यास आपली मंडळी बोलावून 'कोंकणें ' होण्याचा विचार ठरविण्याविषयीं सांगितलें. ठरल्याप्रमाणें दुसरे दिवशीं मनवेल हा आपल्या सांतु, दाईद, वाघलो व गुस्त्यांव ह्या चार मित्रांसह श्री. दादाराव वैद्य त्यांच्या घरीं आला. ह्या वेळीं सर्व गोष्टींचा खल यथास्थितपणें करण्यांत. आला व सर्वांचें समाधान दादा मसूरकरांनीं केल्यानंतर त्यांनीं श्री. दत्तु अण्णा वैद्य यांचेंहि मत घेतलें. त्यांचा पाठिंबा मिळतांच त्यांस आनंद झाला, व त्यांनीं 'आमच्या बारा वाड्यांवरहि आम्ही फिरतों व सर्व माऊंदास शुद्धीची सूचना देऊन सात मार्चला येथें जमतों ' असें अभिवचन दिलें. त्याप्रमाणें तारीख ७ मार्च या दिवशीं केरी येथें श्री. दादाराव वैद्य ह्यांचे घरीं आले, करमाळें, आंबड, खेडें, मागीलवाडा, कोनें, धोणशी, भरडी, पाचमी, प्रियोळ, कुंकळयें, खांडेपार, ह्या बारा वाड्यांवरील सर्व प्रमुख गावडे व इतर कांहीं गावडे मिळून जवळ जवळ २०० शें मंडळी जमा झाली.

श्री. दादा मसूरकर व ल्वंदे त्यांच्याशीं विचारविनिमय करीत आहेत तोंच पणजीहून श्री. शंखवाळकर वकील श्री. व्यंकटेशराव देसाई, श्री. आंग्ले, श्री. ज. वि. कामत, श्री. रघुनाथ मांडारे आदिक मंडळी आली त्यांच्या बरोबरहि प्रश्नोत्तरें झाल्यावर शुद्धीचा दिवस निश्चित करण्याचें ठरलें. इतक्यांत श्री. उपेंद्र तळावलीकर, श्री. शिवरामराव सरदेसाई श्री. गावपेंकर श्री. केरकर देसाई आदिक मंडळी आली. गावडे मंडळींची शुद्धीस अनुमती मिळतांच वास्तविक " शुभस्य शीघ्रम् " या न्यायानें शुद्धिसमारंभ लांबणीवर टाकावयास नको होता, असें आश्रमीयांचें ह्मणणें होतें; पण अंत्रुजमहालांतील हा पहिलाच समारंभ तेव्हां तो मोठ्या थाटामानें व जाहीर रीत्या व्हावा, अशी बहुतेकांत इच्छा झाल्यामुळें रंगपंचमीचा शुभ मुहूर्त ह्मणून तोच दिवस मुक्रर करण्यांत आला. वस्तुत: सरकारचें निश्चित धोरण अद्यापि बाहेर आलेलें नव्हतें. खिस्ती वृत्तपत्रकार व पाद्री आपआपल्यापरीनें चळवळीला भयंकर स्वरूप देण्यासाठीं जिवाचें रान करीतच होते. अशा अवस्थेंत शुद्धिसमारंभ कांहीं दिवस पुढें ढकलून थाटामाटानें व तोहि सर्वत्र जाहीर करून साजरा करण्याची कल्पना अर्थातच अनिष्ट, अनुचित व आत्मघातकी होती व दुर्दैवानें ती तशीच ठरल्याचें पुढें सर्वांच्याच प्रत्ययास आलें !

रंगपंचमीच्या दिवशीं ( ता. ११ मार्च ) केरी येथील श्रीविजयादुर्गेच्या मंदिरांत करावयाच्या ठरलेल्या शुद्धिसमारंभाचीं निमंत्रणपत्रकें सर्वत्र पाठविण्यांत आलीं. अर्थातच अंत्रुज महालांतील तीन हजार शुद्धीस सिद्ध झाले असून पहिला समारंभ केरीस रंगपंचमीस साजरा होणार ही वार्ता हां हां ह्मणतां गावडे सर्वत्र पसरली, व तिनें विरुद्ध पक्षीय मंडळीला खडबडून जागृत केलें. प्रत्येक वाड्यावरील प्रमुख प्रमुख गावड्यास तातडतोब कुर्टी येथील पाद्रीनें हस्तक पाठवून चर्चमध्यें बोलावून घेतलें व 'तुम्ही हिंदु होणार काय?' असा रोखठोक प्रश्न विचारला. गावड्यांनींहि निर्भयपणें होकारार्थी उत्तर दिलें. तेव्हां " तुम्ही हिंदु झालां तर, तुमचे भयंकर हालहाल होतील व तुम्ही तुमच्या चर्चच्या संपत्तीवरील मालकी हक्कालाहि मुकाल, हें लक्षांत ठेवा," असें त्यांस दरडावून सांगण्यांत आलें; पण गावडे आपल्या धमकीला भीक घालीत नाहींत, हे पाहून पाद्री साहेबांनीं त्यांना तंबी



श्रीमंत रावराजे वासुदेव आत्माराम देशप्रभु
अथवा काकाराव पेडणेकर, पेडणें (गोवा).



भिषग्वर्य रामचंद्र पांडुरंग अथवा
दादाराव वैद्य, केरी–गोवा.



श्रीमंत रामचंद्र पुंडलीक अथवा
लोलीबाबा कॅंकरे, कालापूर (गोवा).



श्री. श्रीधर जनार्दन कामत शंखवाळकर
हायकोर्ट वकील, पणजी (गोवा).

होते ते त्यांनीं मध्यंतरींच वाटेवर मोठी चपळाई करून श्री. रघुनाथराव भंडारी ह्यांच्या स्वाधीन केले. इकडे वाटेंत जेथेंजेथें गावडे भेटले त्यांना त्यांना धाकदपटशा देऊन घरोघर पिटाळून लावण्यांत आलें व कांहीं शिपाई गावडयांना शुद्ध न होण्याबद्दल तांकीद करण्यासाठीं खेडयापाडयावर पाठवून देण्यांत आले. नंतर हें अधिकारीमंडळ थेट देवळापाशीं आलें. तेथें आश्रमीय मंडळींचा त्यानें शोध घेतला, पण आश्रमीयांपैकीं तेथें कोणीच न मिळाल्यावर जमलेल्या मंडळीस उद्देशून सांगण्यांत आलें कीं, "कोणासहि हिंदू होतां येणार नाहीं; हिंदु झाल तर कैद करून हद्दपार केले जाल व आग्वादच्या किल्ल्यांत ( तुरुंगांत ) कोंडून ठेऊं. जर येथें शुद्धि होईल तर लांडी घालून (निमो पाठवून) हेंच देऊळ नव्हे तर इतरांहि सर्व देवळें भ्रष्ट केलीं जातील !" कमांडर सील्व्ह यांचा तो थयथयाट पा... १५४१ सालच्या पाद्रीशाहीच्या काळाचें भयंकर चित्र लोकांच्या डोळ्यासमोर चटकन उभें राहि... व त्यांची एकच गाळण उडून पळापळी झाली. कांहीं मंडळी देवळांत जाऊन लपली. पुजाऱ्या... देवद्वार घट्ट लावून घेतलें. अधिकारी लोक तेथें आले व दरवाजा उघडण्याविषयीं आज्ञा करूं लाग... पण पुजाऱ्यानें ' देवस्थानसमितीच्या आज्ञेवांचून देऊळ उघडणार नाहीं, ' असें ठणठणीत उत्तर दिलें; ते... झाला एवढा पराक्रम पुरे झाला, या विजयी मुद्रेनें ही शुद्धिविध्वंसक मंडळी परत फिरली व वाटेवर भे... त्यास यथेच्छ तंबी देतदेत फोंडयास आली.

इकडे श्री. दादा लवंदे शास्त्रीबुवा आनंदमूर्ति इत्यादि मंडळी रविवारीं सकाळीं सावईस येऊन पोहोंचली होती. आह्निक कर्मे आटोपल्यावर गांवांतील गावडे मंडळीस बोलावण्यांत आ... वे. शास्त्रीबुवा येथें पूर्वी येऊन गेल्यामुळें पुष्कळांच्या परिचयाचे झाले होते. कांहीं वेळ शुद्धिविषयक गो... चालत आहेत, तोंच दोन व्यक्ति केरीकडून आल्या, व त्यांनीं ' गणपतीबुवांना पकडले, व तुमचा ... चालला आहे ' असें सांगितलें. आणखी थोडया वेळानें ' सावध रहा, कमांडर आपणांस हुडकत ... आहे,' अशी बोटभर चिठ्ठी घेऊन एक मनुष्य आला. या वार्तेनें ग्रामस्थ मंडळीस फारच वा... वाटलें. पण असे हे प्रसंग यावयाचेच अशी वे. शास्त्रीबुवांनीं सर्वांची समजूत घातली. ' साव... असे तों आश्रमीय मंडळीच्या केंसालासुद्धां कोणीहि धक्का लावूं शकणार नाहीं. आम्ही त्यांच्याकरि... प्राणहि देऊं ' असे प्रशंसनीय उद्गार श्री. नवाथे व श्री. शेटये यांनीं काढले ! नवाथे व शेटये ह्यां... तें निःसीम प्रेम पाहून आश्रमीयांच्या डोळ्यांत चटकन अश्रु उभे राहिले व ... साह्यकारी दिल्याबद्दल त्यांनीं मनातल्या मनांत परमेश्वराचे धन्यवाद गाइले. नंतर एका अंगाला जा... पुढील गोष्टीविषयीं वाटाघाट करण्यात आली. अपेक्षेप्रमाणें धरपकडीला प्रारंभ तर झालाच, तिला ... शूराप्रमाणें तोंड देणेंच उचित होय. तरी ताबडतोब कार्यक्षेत्रीं जाऊन पडणेंच श्रेयस्कर होईल, अ... ठरवून मंडळी सावईकरांच्या निरोप घेऊन रातोरात खांडोळ्यास गेली. तेथें पाटलाच्या घरीं ... वयोमर्यादेचा कायदा बदलून आणल्याविषयीं सर्वत्र दवंडी पिटविण्याचा हुकूम त्यांस पाहावयास मिळाल... तेथून पाटलाला बरोबर घेऊन सर्व मंडळी कुंभारजुवें येथें आली व नेहमींप्रमाणें श्री. फटबा मांड... यांच्या घरीं मुक्काम केला. तदनंतर श्री. फटबा व पाटील हे पणजीस एकंदर माहिती गो... करण्याकरितां गेले.

इकडे दुसऱ्या दिवशीं गणपतीबुवांना फोंड्याहून आगबोटीनें, ( वाफरनें ) पणजीस आणण्यांत आलें. च वेळीचे सुप्रसिद्ध भिषग्वर्य श्री. दादाराव वैद्य यांसहि पोलीस चौकीवर बोलावून नेण्यांत येऊन १ ठेण्यांत आले व बाकीची आश्रमीय मंडळीहि आतां लवकरच पकडली जाणार, हें सर्वांना श्चितपणें समजून चुकलें. आतां या गोष्टी कोणत्या थराला जाणार याविषयीं प्रत्येकजण आपआपल्या ठायीं युक्त अंतःकरणानें विचार करीत होता.

इतक्यांत श्री. फटवा मांद्रेकर यांच्याकडून आश्रमीय मंडळी कुंभारजुव्यास आल्याचें ळलें, तेव्हां श्री. त्र्यंबकरावराव देसाई, श्री. शंखवाळकर, श्री. लोलीयाबा केंकरे व श्री. जं. वि. कामत मंडळी कुंभारजुव्यास आली व पुढें काय करावयाचें याविषयीं खल झाला. त्यांत श्री. दादांनीं ास जाऊन ब्रिटीश सरकारांतून ' मसूर आश्रम ही संस्था राजकीय चळवळ करणारी नसून केवळ धार्मिक पाची आहे,' अशा आशयाचा दाखला घेऊन यावा, म्हणजे तो सरकारी दृष्ट्या फार उपयुक्त ल, असें ठरलें. तदनंतर श्री. दादा आक्षी मार्गें मसूरास, पणजीची मंडळी पणजीस व श्री. लवंदे शास्त्रीबुवा वगैरे मंडळी रात्रौ चिंबल येथें ठरलेल्या पहिल्या सत्यनारायणाला उपस्थित होण्यासाठीं न गेली. याच दिवशीं कालापूर येथें ३०।४० मंडळींची शुद्धि ठरली असल्यामुळें ती उरकून साठीं वे० शास्त्रीबुवा प्रथम कालापूरला गेले व तिकडून चिंबलला निघून आले. ल येथें सत्यनारायणाची पूर्व तयारी होऊन मंडळी आश्रमीयांची मार्गप्रतिक्षाच त बसली होती; इतक्यांत श्री. लवंदे व आनंदमूर्ति कुंभारजुव्यांहून आले. चिंबलचा नारायण पूर्वीच प्रसिद्ध झाला होता व ह्याच टिकाणीं ' कार्यकर्त्यांची धरपकड होणार ' अशी निश्चित र्मी लागली होती. तरीसुद्धां तिची क्षिती न बाळगतां ही मंडळी आलेली पाहून गावड्यांस द कौतुक वाटलें. पूजासमारंभ यथाविधि करण्यांत आला. पूजेनंतर शास्त्रीबुवांनीं आपल्या ळ व अस्खलित वाणीनें सत्यनारायणाची कथा सांगितली. तदनंतर शुद्धीकृत लोकांपैकीं १०–१२ ले लोक कामधंद्यावर गेल्यामुळें शुद्धिविधीस अंतरले होते, त्यांचें शुद्धीकरण करण्यांत आलें. प्रसंगीं एक मुसलमान स्वयंस्फूर्तीनें पुढें आला व ' मलाहि शुद्ध करून घ्या,' अशी त्यानें विनंति ा. त्याचा साद्यंत कुल वृत्तांत समजावून घेऊन त्याचीहि शुद्धि यथाविधि करण्यांत आली. तर श्री० रामभाऊ लवंदे यांनीं सर्व मंडळीस उद्देशून अत्यंत स्फूर्तिदायक असें भाषण केलें. १ त्यांनीं केरीचा खेदजनक व संतापकारक वृत्तांत कथन केला. तद्वतच ब्र. गणपतीबुवा व श्री. दादा यांस पकडण्यांत आलें असून बाकीची आश्रमीय मंडळीहि लवकरच पकडली जाईल; आणखी कोणावर ह्या गदापर्वाची धाड येईल याचा कांहीं नियम नाहीं; पण कोणीहि घाबरण्याचें कारण नाहीं. खंडांतील सर्व हिंदुजनता आपल्या पाठीमागें आहे. ज्या आश्रमीय मंडळींनीं आपणास हिंदुधर्मांत प्रवेश करून न आपल्यावर महदुपकार केले त्यांच्यावर कमीजास्त प्रसंग आल्यास आपण त्यांच्यासाठीं मरावयास सिद्ध े पाहिजे ! अशाप्रकारचें त्यांचें परिणामकारक भाषण झाल्यावर अर्धा तासपर्यंत सर्वांनीं अत्यंत करुण र असें भजन केलें. नंतर आरती होऊन प्रसाद वाटण्यांत आला. (३०००) तीन हजारांवर प्रसादाचे

झाले ! सत्यनारायणाच्या जन्मदिवसापासूनहि इतकी मंडळी कोठें पूजा–कथेसाठीं जमल्याचें ाच्या ऐकिवांत नसेल !! काय तो अपूर्व उत्साह !! प्रत्येकाचें मुख आनंदानें झळकत होतें. प्रसाद

मिळाल्यावर सर्वजणांनीं एकस्वरानें 'हिंदु धर्मकी जय !' असा प्रचंड जयघोष केला, व मंडळी हर्ष-निर्भरतेनें घरोघर जाऊं लागली.

पण या जगांत सुख व दुःख हीं जणूं पाठीला पाठ लावूनच जन्मास आलेलीं असतात. एका पाश्चात्य कवीनें म्हटल्याप्रमाणें प्रत्यक्ष सुखाच्या मंदिरांत प्रच्छन्न दुःख सार्वभौम राजसिंहासनावर विराजमान झालेलें असतें. * सुख व दुःख हीं इतकीं संमिश्र आहेत, कीं, एकाचा स्वीकार करणें म्हणजेच दुसऱ्यास अगोदर जागा करून ठेवून आमंत्रण करण्यासारखें असतें. शास्त्रीय दृष्टांतच द्यावयाचा तर पृथ्वी आपल्या पूर्वस्वरूपांतून निवत निवत गेली म्हणूनच ती सूक्ष्मजीवांना निवासक्षम—राहण्यास योग्य अशी झाली. पण पृथ्वीच्या ह्या थंड होत जाण्याच्या क्रिये मुळेच उद्भवणारे धरणीकंपाचेहि प्रचंड धक्के सहन करणें मनुष्याला भाग आहे. साहजिकच निर्भेळ सौख्याची प्राप्ति ह्या जगांत कोणास होणार ? 'भरतें तें रितें व रितें तें भरतें' असें हें सुखदुःखांचें रहाटगाडगें निया चक्रनेमिक्रम सदोदित चालावयाचाच. तसें नसतें तर स्वर्गलोक व मृत्युलोक ह्यांत अंतर तें काय राहिलें असतें ?

गरीब बिचाऱ्या गावड्यांनाहि ह्या अनुभव लौकरच अनुभवण्यास मिळाला. प्रसन्न अंतःकरणानें जो तो आपापल्या घरीं गेला व इकडे शास्त्रीबुवा आनंदमूर्ति लवंदे इत्यादि मंडळी श्री. केशवराव कामत ह्यांच्या घरीं विश्रांतीसाठीं म्हणून गेली. तेथें गेल्यावर आनंदमूर्ति श्री. लवंदे ह्यांस थट्टेच्या स्वरांत विचारूं लागले " कायहो ! कुठें आहेत तुमचे पोलीस नी बिलीस ? आज आम्हांला पकडणार, पकडणार म्हणून उगाच जिकडेतिकडे बोंबाबोंब उठविली आहे झालें ! " अंतराळांतून कांहीं गंधर्व 'तथास्तु' 'तथास्तु' असें म्हणत नित्य जात असतात व आपण जें जें कांहीं इच्छूं, त्याला त्यांच्या त्यांचें 'तथास्तु' असें उत्तर मिळत असतें; म्हणून अनिष्ट विचार कधीं करूं नये, असें वृद्ध मंडळी सांगत असतात. त्याचें उत्कृष्ट प्रत्यंतर ह्यावेळीं आलें. मंडळींचीं ह्याप्रमाणें बोलणीं चाललीं आहेत तोंच एक युरोपियन सार्जंट 'भट कुठें आहेत ?' असें जोरजोरानें विचारीत 'दत्त' म्हणून पुढें उभा ठाकला ! 'ह्याला धर' 'त्याला पकड' अशी दंगल त्यानें जराशी उडविली. तेव्हां लवंदे त्यास उत्तर देण्यास पुढें होत आहेत तोंच एक युरोपियन कॅप्टन बारा सोल्जरांची तुकडी घेऊन तेथें आला. पोलिसांनीं घराला वेढा दिला. कॅप्टन घराबाहेरच उभा राहिला. सार्जंट त्यास 'ह्या पळाला' 'तो पळाला' अशा थापा ठोकीत बाहेर पडला व गावड्यांना त्यांच्या झोंपड्यांत घुसून बाहेर ओढण्याचा प्रयत्न करूं लागला. त्याबरोबर जिकडे तिकडे एकच हलकल्लोळ माजला. बायकामुलें मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागलीं. 'अपराधी ह्या काय प्रकार तुम्हीं मांडला आहे ?' असें लवंद्यांनीं त्या तुकडीच्या नायकास विचारलें तेव्हां 'भट कोठें आहेत ! आम्हांस भट पाहिजेत' असें त्यानें उत्तर दिलें. 'मग तुम्ही गरीब गावड्यांना उगाच कां छळत आहां ! मी तुम्हांला काय पाहिजे तें सर्व सांगतों. येथून कोणीहि पळून जात नाहीं. तुम्हांला पाहिजे असेल तर आम्ही सर्व लोक

* And joy whose hand is ever at his lips biding adiew; and aching pleasure nigh, turning to poison while the bee-mouth sips: Ay, in the very Temple of delight veiled melancholy has her Sovern Shrine.

तुमच्या बरोबर येतों ' असें लवंद्यांनीं म्हटल्यानंतर कॅप्टननें सार्जंटास बोलावून घेतलें. नंतर त्यांनी सर्व गावड्यांना मोठ्यानें ' भिऊं नका, भिऊं नका ' असें सांगितल्यावर उभयतांमध्यें खालील प्रश्नोत्तरें झालीं—

नायक—येथें आज सभा भरली होती काय ?

लंवदे—नाहीं.

प्रश्न—तर मग येथें काय होतें ?

उत्तर—सत्यनारायणाची पूजा—एक धार्मिक उत्सव.

प्रश्न— किती लोक जमले होते?

उत्तर— दोन तीन हजार असावेत.

प्रश्न— ते आतां कोठें गेले?

उत्तर— आपआपल्या घरीं.

प्रश्न— पणजीहून कोण कोण आले होते?

उत्तर— कोणी नाहीं.

प्रश्न— तुम्ही येथें कशासाठीं आलां?

उत्तर— गावड्यांच्या सत्यनारायणासाठीं.

प्रश्न— एवढ्या रात्रीं हा उत्सव कसा?

उत्तर— हा उत्सव नेहमीं रात्रींच करण्याचा प्रघात आहे. ( ह्यानंतर त्यांस पूजा झालेली तळी-वरील जागा, केलेली पूजा इत्यादि गोष्टी दाखवून समजावून सांगण्यांत आलें. मग पुनश्च प्रश्नोत्तरें झालीं. )

प्रश्न— भट कोठें आहेत?

उत्तर— भट येथें नाहींत. भटांचें काय कारण?

प्रश्न— ह्याच घरांत भट आहेत, असें आम्हास समजलें आहे. जर तुम्हीं सांगणार नाहीं, तर तुम्हा सर्वांस तुरुंगांत चलावें लागेल.

उत्तर— आनंदानें!

प्रश्न— काय? शुद्धि करणारे लोक येथें नाहींत?

उत्तर— त्यांना तुम्ही भट म्हणतां होय? इतका वेळ मला स्पष्ट कां विचारलें नाहीं? आणि ह्या लोकांना पकडण्याकरितां इतक्या जामानिम्याची जरूर नव्हती. एकाद्या साध्या पोलिसाकडून हें काम झालें असतें. तुम्हांला ते पाहिजे असतील तर त्यांना मी घेऊन येतों.

असें म्हणून लवंदे घरांत गेले. तेथें शास्त्रीबुवा, आनंदमूर्ति, सांतू नार्वेकर, केशव कुंडईकर, विठ्ठल, गोपाळ परिट इत्यादि मंडळी पुढील गोष्टीविषयीं बोलत बसलीहोती. श्री. लवंद्यांनीं थोडक्यांत सर्व वृत्त सांगीतलें व आनंदमूर्तींना व शास्त्रीबुवांना ते बाहेर घेऊन आले. नंतर तेत्या कॅप्टनला म्हणाले "हे सामान्य लोक नाहींत. हे पाहा ते शुद्धि करणारे स्वामी! हे फार थोर आहेत. ब्रिटिश हिंदुस्थानांतील सर्व हिंदु मंडळी त्यांना पूज्य मानतात. तुम्हांला तुमच्या मिशनरींच्या विषयींहि जितका प्रेमादर नसेल

तितका आम्हांस ह्यांच्या विषयीं वाटतो. आम्हीं सर्व त्यांना पूज्य मानतों." तो नायक हें लवंदांचें भाषण ऐकतांना वेदमूर्ति शास्त्रीबुवा व आनंदमूर्ति ह्यांजकडे सारखा टक लावून पाहात होता. नंतर तो मोठया आदबीनें म्हणाला कीं 'मला ह्यांना पकडून नेण्याचा हुकूम झाला आहे. आश्रमापैकीं येथें आणखी कोण कोण आहेत?' 'कोणी नाहीं' असें कळल्यावर कॅप्टननें उभयतांस मोटारींत बसावयास सांगितलें. लवंदांनीं विचारलें 'मीहि येऊं काय?" 'नाहीं, तुमचें समन्स मज जवळ नाहीं. जरूर पडल्यास उद्यां तुम्हांस बोलावून घेऊं."

इतक्यांत श्री. लवंदे ह्यांनीं "मंडळीचे फराळ व्हावयाचे आहेत तरी ते झाल्यानंतर त्यांना घेऊन जावें" असें कॅप्टन ह्यांस सांगितलें. त्यांनींहि मान्यता दिली. त्याप्रमाणें व्यवस्था झाल्यावर कॅप्टन लवंदांस म्हणाले 'मी कायद्याला अनुसरून घरांत न शिरतां बाहेरच बसलों आहें व येथेंच तुम्ही हे स्वामी माझ्या स्वाधीन केले आहेत. नाहीं तर उद्यां कांहीं भलतेंच प्रसिद्ध कराल.' असें म्हणून त्यानें गांवांतील दोन खिश्चन ह्या गोष्टीला साक्षीदार ह्मणून तयार केले. त्यांपैकीं सेबास्तियांव नांवाच्या साक्षीदारानें श्री. लवंदे ह्यांसहि पकडून घेऊन जाण्याविषयीं कॅप्टन ह्यांस सांगितलें, पण त्यांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. श्री. लवंदांनींहि 'तुह्मी या बाबतींत निश्चिंत असा. तुमच्या सभ्य वागणुकीबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. पण तुह्मी ह्या स्वामींना कोणत्या अपराधाकरितां पकडून घेऊन जात आहां? हें मला सांगाल काय?" असें विचारलें.

कॅप्टनः—ह्या स्वामींनी गांवडयांना जुलूम जबरदस्ती करून शुद्ध करून घेतलें, अशा आमचेकडे तक्रारी आल्यावरून आह्मी त्यांस पकडीत आहों.

लवंदेः— कॅप्टनसाहेब, ही गोष्ट निवळ खोटी आहे. मी ह्या मंडळींबरोबर बहुतेक शुद्धिसमारंभांना प्रत्यक्ष उपस्थित होतों. पण ह्या गावडयांनाच विचारा ह्मणजे ते काय सांगतात तें पहा."

तेव्हां कॅप्टननें गावडयांना उद्देशून तसें विचारावयास सांगितल्यावर श्री. लवंदे ह्यांनीं गावडयांस प्रश्न टाकला कीं "कॅप्टन विचारतात ह्या स्वामींनीं तुह्माला पैसे देऊन किंवा जुलूम जबरदस्तीनें शुद्ध करून घेतलें काय?

गावडे-( एकसुरांत ) नाहीं, नाहीं.

प्रश्न- तर मग तुह्मी हिंदु कसे झालां?

गावडे- 'आमका खुषी! आमी फोर्सान जालों नाय.,

लवंदे- ऐका कॅप्टन साहेब! ऐका.

कॅप्टन- पण तो माझा प्रश्न नाहीं. सरकारांत पुढें रीतसर चौकशी होईलच. असें ह्मणून ते कॅप्टन उठले व त्यांनीं शास्त्रीबुवांस व आनंदमूर्ति मोटारींत बसावयास सांगितलें. शास्त्रीबुवा व आनंदमूर्ति मोटारीकडे निघाले, ह्याचा अर्थ गावडयांस समजण्यास वेळ लागला नाहीं. सर्वजणांनीं एकदम त्यांच्याजवळ धांवत येऊन लोटांगणें घातलीं. सर्वत्र शोकाचा एकच ध्वनि उमटला आनंदमूर्ति व शास्त्रीबुवांचे वाटेवर सर्वजण दुःखाकुलतेनें गडबड लोळूं लागले. लवंदे ह्यांनीं आतांपर्यंत महत्प्रयासानें दाबून ठेवलेल्या शोकाचा वेग दुप्पट जोरानें उसळी मारून बाहेर आला व त्यांनींहि घट्ट

मिठी मारून ' तुमच्या मागें कार्य करतां करतां मीहि, लवकरच तुह्मांला नेत आहेत त्या स्थानीं खात्रीनें येईन," असें सांगितलें.

सर्व वातावरण दुःखानें भरून गेलें. तेव्हां शास्त्रीबुवा व आनंदमूर्ती यांनीं सद्गदित स्वरानें सर्वांना चार धीराच्या गोष्टी सांगितल्या, व " असे प्रसंग यावयाचेच तुमच्या ह्या अलोट प्रेमापुढें तुरुंगवासच काय पण प्रत्यक्ष मृत्यूहि आह्मांस कस्पटासमान आहे. तुमच्या ह्या प्रेमावरून आमच्यासारखे हजारों देह ओवाळून टाकले तरी ते कमीच पडतील. देवाधर्मावर असेंच निस्सीम प्रेम ठेवा. वाटेल तो प्रसंग आला, वाटेल त्या हाल अपेष्टा सहन कराव्या लागल्या तरी त्या शांतपणें सहन करा. मात्र कोणींहि अत्याचाराला प्रवृत्त होऊं नका. "ह्या धरपकडीमुळें चिडून जाऊन तुह्मी यदाकदाचित् कोठें जर मारहाण केलीत तर सर्व चळवळ चिरडून टाकली जाईल असें महाराजांनीं सांगितलें आहे, हें लक्षांत ठेवा. आह्मी गेलों, तर दुसरीं माणसें काम करावयास मागें आहेतच व आणखीहि येतील. श्री. सद्गुरु-महाराजांच्या कृपेनें तुह्मांस लाभलेला हा धर्म तुह्मी कांहीं केल्या सोडूं नका. भिऊं नका. संकटांना धैर्यानें तोंड द्या. श्री सद्गुरु महाराजांच्या चरणांवर निष्ठा ठेवा. तुमच्या प्रत्येक संकटांतून तुह्मांला ते पार पाडतील. तुह्मी कसलीहि काळजी करूं नका. परमेश्वराला तुमची काळजी निःसंशय आहे " असें ह्मणून त्यांनीं मोटारींत पाऊल ठेवलें व क्षणार्धांत मोटार सर्वांच्या दृष्टीआड झाली!

मध्यरात्र केव्हांच उलटून गेली होती. कृष्णपक्षामुळें ' लिम्पतीव तमोऽङ्गानि, वर्षतीवाञ्जनं नमः ' असेंच जणूं वाटत होतें. शुद्धीकृतांचे; प्राणसर्वस्व असणारे कार्यकर्ते ह्याचवेळीं उचलून नेले गेल्यामुळें हा काळाकुट्ट अंधार अधिकच भेसूर व भयप्रद वाटूं लागला. थोडयाच तासांपूर्वी जे गावडे आनंदभरानें नाचत व गात होते तेच गावडे आतां अगदीं काळवंडून गेले होते. दुःख-शोकानें जणूं बाहेरच्या काळ्याकुट्ट रात्रीशीं संगनमत करून त्यांचीं अंतःकरणेंहि अंधकारानें व्याप्त करून सोडलीं, अंतर्बाह्य सर्वत्र अंधकाराचें भीषण साम्राज्य पसरलें !

तामडतोब सर्व गावडे श्री भगवतीच्या स्थळीवर एकत्र झाले व शास्त्रिबुवा आनंदमूर्ति, व गणपती बुवांसाठीं सर्वांनीं गव्हर्नरजनरलच्या बंगल्यावर असेंच जाऊन धरणें धरून बसावयाचें, असें निश्चित करण्यांत आलें. आसपासच्या गावड्यांनाहि हें वृत्त रातोरात कळविण्यांत आलें व सर्व मंडळी चिंवल्हून तशीच राजवाड्याकडे निघून गेली. अगदीं सकाळच्या प्रहरींच शेंकडोंशें गावडे लोकांनीं गव्हर्नर-जनरलचा राहाता वाडा वेढून टाकला व " तिसवाडी महालांतील शुद्धीकृत गावडे सरकारास भेटूं इच्छित आहेत. आम्ही स्वखुषीनें हिंदु झालों आहों. तरी आमच्यासाठीं पकडलेल्या आश्रमीय मंडळीस सरकारनें सोडून द्यावें " असा निरोप आंत पाठविण्यांत आला. तेव्हां ग. ज. पेद्रो द अमोरिम् ह्यांनीहि ' पणजींत राजवाड्यावर येऊन भेटा ' असें गावड्यांत कळविलें. तेव्हां जवळजवळ हजार गावड्यांचा तो अफाट समुदाय एक शिस्तीनें व शांतपणें पणजीस निघून आला. दुपारीं एक दीडच्या सुमारास गव्हर्नर जनरल ह्यांनीं सर्व ह्मणणें ऐकून घेतलें व त्यांस शांतपणें उत्तर दिलें कीं " तुह्मी हिंदु व्हा किंवा मुसल्मान व्हा कोणताहि धर्म स्वीकारण्यास तुह्मांस सरकारी कायद्याची आडकाठी नाहीं. आतां आश्रमाचे लोक कोणत्या आरोपाकरितां पकडले आहेत त्याचा मी शोध घेतों व योग्य न्याय करतों ! " असें आश्वासन मिळाल्यामुळें मंडळी परत फिरली.

मोठमोठया लोकांचींहि मनें ह्या वेळेच्या सरकारी दडपशाहीनें हादरून व गांगरून गेलीं असतां ह्या अडाणी गावडे लोकांनीं जमून आपलें दुखणें थेट व्हाइसरायाच्या वेशीवर, नव्हे प्रत्यक्ष कानावर घालण्यांत–टांगण्यांत जें अपूर्व धाडस व जें अलौकिक धर्मप्रेम व्यक्त केलें तें कोणाला कौतुकास्पद वाटणार नाहीं ? कोणाला आश्चर्यचकित करून सोडणार नाहीं ?

गेल्या रात्रीं पणजीशहरांत आनंदमूर्ति, व शास्त्रीबुवा यांना पकडले गेल्याचें वृत्त सर्वांस विदित झालेंच होतें. त्यामुळें हिंदुसमाजांत सर्वत्र भयमूलक उदासीनतेची दाट छाया पसरली होती. सर्वत्र सामसूम वाटत होतें. आतां पहिल्याच इतिहासाची पुनरावृत्ति होणार ह्या दृढ समजुतीनें जो तो आपले सर्व व्यवहार अगदीं मागें पुढें पहात, तरवारीच्या धारेवर चालल्याप्रमाणे करीत होता. यदृच्छेनेंहि रस्त्यावरून जाणारा पोलीस त्यावेळीं छातींत धमकी भरविण्यास कारणीभूत होत होता. यावेळीं साहजिकच शुद्धीचळवळ, शुद्धिकृत लोक व आश्रमीय मंडळी या सरकारी वक्रदृष्टीस कारणीभूत असणाऱ्या गोष्टींचा संबंध टाळण्याची दक्षता मोठ्या चातुर्यानें ठेविली जात होती. ह्याच दिवशीं रात्रीं नऊदहा वाजतां ह्मणजे एकतीस तासानंतर श्री. दादाराव वैद्य ह्यांना त्यांची जबानी घेऊन व ' कांहीं दिवस सरकारी अनुज्ञेवांचून पणजीच्या बाहेर जाऊं नये ' असें बजावून सोडून देण्यांत आलें. श्री. दादारावांचें तुरुंगवासांतील वृत्त ऐकून तर सर्वांच्या मनाला अधिकच जोराचा धक्का बसला. भीतीनें जनमनांतील आपलें स्थान अधिकच दृढमूल झालें. ही बंदी पुढें पंचवीस सवीस दिवस चालू राहिली. त्या मुदतींतहि २–४ वेळां त्यांस पोलीस कचेरींत जबानी देण्यासाठीं जावें लागलेंच व एकदांतर त्यांच्या जबानीच्या विरुद्ध थोडासा मजकूर, पुनश्च एकदा ख्रिस्ती बनलेल्या गावड्याकडून वदविण्यांत आला. पण दादारावांनीं आपली बाजू सिद्ध करून दाखविल्यानंतर त्यांची बंधनमुक्तता करण्यांत आली.

इकडे ब्रिटीश हिंदुस्थानांत आश्रमीय मंडळींची धरपकड तारेनें कळविण्यांत आली. तात्पडतोब म्हसूरहून पुणें, मुंबई, नाशिककडे पुढाऱ्यांना भेटण्यासाठीं मनुष्यें पाठवून देण्यांत आलीं. श्रीमन्महाराज यावेळीं मोंगलाईंतील गुलबर्ग्यास गेले होते. आश्रमाची एक शाखा तिकडे धर्म प्रसाराचें कार्य करीत होती. गोव्यांतील शुद्धिमुळें तेथें आश्रमाला मुसलमानांकडून उघड त्रास देण्यांत येऊं लागला. ह्यावेळीं त्यांच्या छळाला न जुमानतां तेथेंच काम करीत रहाणें ह्मणजे दोन विरोधी सत्तांना एकदम तोंड देण्याचा आत्मघातकी प्रयत्न करणें होय; हें जाणून मोंगलाईंतील शाखा तात्पडतोब ब्रिटीश सीमेंत आणण्यासाठीं ह्मणून श्रीमन्महाराज तांतडीनें गुलबर्ग्यास गेले होते. गुलबर्ग्यास जाऊन पोहोंचल्यावर दोन तीन तासांतच धरपकड झाल्याचें वृत्त त्यांना कळलें. त्याबरोबर दिल्ली, मुंबई, पुणें, रत्नागिरी, नाशिक आदिक स्थळोस्थळीं प्रमुख पुढाऱ्यांस, हिंदुसभास व आश्रमप्रेमी मंडळीस "अपेक्षेप्रमाणें दडपशाहीच्या धोरणास प्रारंभ झाला. शास्त्रीबुवा, आनंदमूर्ति गणपतीबुवा, ह्यांस बंदिवासांत टाकिलें आहे. प्रकरण फारच हात घाईवर आलें आहे. प्रत्येक हिंदूनें ह्यावेळीं चळवळीस पाठिंबा दिला पाहिजे. लोकमत निकडीनें जागृत करा. प्रयत्नांत यत्किंचितहि कमतरता आणूं देऊं नका. चळवळ पुढें रेटण्यास आर्थिक सहाय्याची फारच आवश्यकता आहे " अशा अर्थाच्या निकडीच्या ( अर्जंट ) तारा करण्यांत आल्या.

करण्यासाठीं एक शिष्ट मंडळ पाठवावयाचें निश्चित केलें. प्रांतिक कायदे मंडळाप्रमाणेंच दिल्लीच वरिष्ठ कायदे-मंडळाचे (Legislative Assembly) व राज्यसमितीचे ( Council of State समासद ह्यांनींहि गोवा सरकाराकडे तारा केल्या व नंतर एक अर्ज पाठविला.

ह्याप्रमाणें जिकडून तिकडून तारांचा व निषेधपर पत्रांचा सारखा भडिमार झाल्यामुळें गोवें सरक हतबुद्ध झालें. शुद्धिकार्य करणारी आश्रमीय मंडळी सामान्य प्रतीची नसून त्यांना समस्त हिंदुजनते व तिच्या मोठमोठ्या पुढाऱ्यांचें विलक्षण पाठबळ आहे, हें त्यास स्पष्टपणें कळून चुकलें. तेव्हां "आश्रमी लोकांना कैदेंत टाकिण्यांत आलेलें नाहीं. येथील ज्या लोकांना हिंदुधर्मांत जाण्याची इच्छा नाहीं त्यांच वर धाकदपटशाचा व जुलूम जबरदस्तीचा प्रयोग करणाऱ्या लोकांशीं वरील मंडळीचा संबंध असल्या कळल्यावरून व हें कार्य लोकसत्तेच्या कायद्याला व धर्मस्वातंत्र्याला विरोधी असल्यामुळें त्यांना फ पोलीसच्या स्वाधीन करण्यांत आलें आहे" अशा अर्थाचें कांहीं तरी गुळमुळीत उत्तर तारेनें मसुराश्र श्रीशंकराचार्य, अखिलभारतीय शुद्धिसभा दिल्ली, महाराष्ट्रहिंदुसभा पुणें, प्रांतिक कायदे मंडळ मुंबई वरिष्ठकायदेमंडळ दिल्ली इत्यादि ठिकाणीं देण्यांत आलें. पण हें प्रकरण ताणून धरल्यास गोष्टी भलत्याच विकोपाला जातील हें लक्षांत घेऊन गोवा सरकारनें आश्रमीय मंडळीची तत्काळ बंध-मुक्तता केली. पण पुन्हां 'गोमांतकांत पाऊल टाकाल तर जन्मभर कारागृहवासाची शिक्षा मिळेल' अशी तोंडी भरपूर तंबी देऊन नंतर त्यांना कॅसलरॉक येथें ब्रिटिश सीमेंत आणून सोडण्यांत आलें. तेथून मंडळी पुढें लोंढ्यास श्रीमन्महाराजांचे मुक्कामावर गेली. साहजिकच हें शुभवृत्त तारेनें सर्वत्र कळविण्यांत आलें, व ज्यांच्या ज्यांच्या बहुमोल सहाय्यामुळें ही सुटका इतक्या लौकर अनपेक्षित पद्धतीनें घडून आली, त्या त्या सर्वांचे आश्र मानें अंतःकरणपूर्वक आभार मानले. ह्या आभारप्रदर्शनासबरोबर अर्थातच पुढील लढा अधिक नेटानें व उत्साहानें प्रारंभित करण्याचा आपला कृतनिश्चय आश्रमानें कळविला व तत्सिद्ध्यर्थ सर्वांचा असाच हार्दिक पाठिंबा लाभण्याविषयीं सर्वांना नम्रपूर्वक प्रार्थना केली.

ह्या पूर्वींच लंडन येथील ब्रिटिश पार्लमेंटचे समासद, भाई शापुरजी सकलातवाला ह्यांच्या कानावर प्रस्तुत गोष्ट गेली होती. तेव्हां त्यांनींहि मोठ्या तत्परतेनें ह्या प्रकरणासंबंधीं पुढें पार्लमेंटच्या बैठकींत प्रश्न विचारले. त्याबद्दल त्यांचें हार्दिक अभिनंदन करणारी तार आश्रमाकडून अर्थातच गेली. भाई सकलातवाला ह्यांचीं पार्लमेंटांत झालेलीं प्रश्नोत्तरें, स्टेटकौन्सिल व दिल्लीच्या वरिष्ठ कायदे मंडळांमधील हिंदुसभासदांचा गोवेसरकारास गेलेला विनंती अर्ज, मुंबई प्रांतिक कायदेमंडळ व मुंबई नगरपालिकेचे समासद ह्यांची तार, श्रीमच्छंकराचार्य, डॉ. सावरकर व कांहीं हिंदुसभा ह्यांच्या तारा, पत्रे, व गोवेसरकारचें उत्तर इत्यादि ह्या धरपकडीसंबंधींचे कागदपत्र पुढें परिशिष्टांत सादर केले आहेत ते अवश्य पहावेत. असो.

कार्यकर्त्यांची ही हकालपट्टी झाल्यावर शुद्धिविरोधी खिस्ती पत्रें व पाद्री भाटकर अर्थातच स्वस्थ बसले नाहींत. तसें स्वस्थ बसणें त्यांच्या स्वभावाविरुद्धच असल्यामुळें त्यांनीं शुद्धिचळवळ मुळांतच खुडली जावी, ह्या दृष्टीनें आपले घोर व अविश्रांत प्रयत्न पुढें चालूच ठेविले. मुंबईच्या टाइम्स पत्रानेंहि आपल्या ह्या धर्मबांधवांची साथ केली व शुद्धिचळवळीला 'राजकीय' स्वरुप देण्याचा भरमसाट प्रयत्न चालविला. स्थानिक खिस्ती पत्रकर्त्यांनीं ज्याप्रमाणें मागें शुद्धिचळवळीस पाठिंबा देण्यासाठीं

झालेल्या ब्रिटिश हिंदुस्थानांतील भाषणांतून कांहीं तुटकतुटक वाक्यें घेऊन त्यांतून राज्यक्रांतिकारक ध्वनि उमटवून दाखविला होता, तद्वतच टाइम्सनेंहि शुद्धिकार्यात साह्य व प्रोत्साहन मिळविण्यासाठीं, आश्रमाकडून पाठविल्या गेलेल्या लालशाईत छापलेल्या पत्रांतून शुद्धिचळवळीचा ' गुप्तहेतु ' प्रकाशांत आणण्याचें श्रेय घेतलें । हें पत्र असें:—

॥ ॐ ॥

श्रीब्रह्मचर्याश्रम, मसूर, सातारा.

शके १८४९ फाल्गुन शुा ९ बुधवार ता. २१–२–१९२८

यांस सप्रेम कृ. सा. न. वि. वि.

श्रीयुत

" सकळ जन तरावे, वंशही उद्धरावे ।
स्वजन जन करावे, रामरूपीं भरावे ॥

सत्यसंकल्प श्री भगवंताच्या प्रेरणेनें व आपणा सर्वांच्या प्रेमळ प्रोत्साहक सहानुभूतीनें गोमांतकांतील शुद्धीच्या महत् बिकट कार्याला हात घातला, आणि कळविण्यास अत्यंत आनंद वाटतो, कीं, त्या परमेश्वराच्या प्रसादानें, आपल्या सर्वांच्या सदिच्छेनें गेल्या फाल्गुन शु॥ ६ ला (ता. २६–२–१९२८ या दिनीं) कार्याला सुरवात होऊन आतांपर्यंत ७०० खिस्ती कुटुंबें पावन करुन सुमारें २००० धर्मभ्रष्ट लोक आपल्या हिंदुधर्मात घेतले. शुद्धीचें काम पुढें चालूच आहे. हिंदुस्थानांत खिस्ती धर्म प्रसाराला मूळ प्रारंभ झाल्यापासून गेल्या सव्वाचारशेंहून अधिक वर्षांत जी गोष्ट केवळ दुःसाध्य ह्मणून घडून आली नाहीं, ती आपल्या सर्वांच्या पूर्वपुण्याईनें आज एवढ्या मोठ्या प्रमाणांत प्रत्यक्ष घडून आली आहे. आपल्या थोर पूर्वजांच्या महा तपश्चर्येचें हें फळ असून या अभूतपूर्व यशाचें महत्त्व हिंदुधर्माच्या अभिनवाई इतिहासांत केवळ सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखें आहे. हें आपल्याला सांगावयाला नकोच.

पण हें कार्य एवढ्यावरच संपलें नाहीं. गोमांतक हें स्वतंत्र परराज्य असल्यामुळें या शुद्धीकृत मंडळींवर या पुढें निरनिराळ्या अनेक आपत्ति येण्याचा पुष्कळच संभव आहे, त्यांचें निवारण होण्याची व्यवस्था आपल्याला केली पाहिजे आणि दुसरे लाखों लोक अद्यापिहि हिंदुधर्माच्या बाहेर प्रद्यापर्यंत खितपत आहेत तेहि सर्व आपल्याला त्वरित हिंदु करुन घेतले पाहिजेत. या दोनीहि गोष्टी आपण दृष्टिआड करुन मागावयाचें नाहीं. यास्तव हा उपक्रम असाच उत्साहानें, धैर्यानें व नेटानें सतत पुढें चालू ठेवणें अत्यंत आवश्यक आहे आणि त्या दृष्टीनें कार्याचा पुढील भार व उत्तरदायित्व अर्थातच फार मोठें आहे. तरी या शुद्धीभूतमंडळीच्या अभिनंदनार्थ या वेळीं आपण—

[ १ ] गांवोगांव जंगी सार्वजनिक सभा भरवून; आणि ( २ ) अग्रलेख, स्वतंत्रलेख, शुद्धिसमारंभाचा प्रत्यक्ष वर्मानें ठिकठिकाणच्या अभिनंदनसभांचे वृत्तांत, भावनोद्दीपक वार्तामुद्रण, इत्यादि सर्व प्रकारें स्वतंत्र शुद्धिविषयक लिखाणांनीं आपल्या नियत कालिकांचे अंक समग्र वा शक्य तितके अधिक भरुन काढून लेखन–व्याख्यान–प्रवचनंद्वारा आपल्या संपूर्ण शक्तींना समग्र समाजांत प्रचंड जागृती उसळून सोडावी. अखिल हिंदु-

नेतेचा असा प्रचंड पाठिंबा असल्याचा प्रोत्साहनपर संदेश पोंहोचल्यानें शुद्धिभूतांच्या अनेक आपत्ति हलक्या होण्यास आणि इतर वृथा कचरत असलेल्या आपल्या धर्मभ्रष्ट बांधवांना हिंदु होण्यास अपरिमित साहाय्य होणार आहे.

सूज्ञांस बहुत काय लिहिणें ? यापुढें शुद्धिकार्याचें वृत्त आम्ही वेळोवेळीं कळवीत जाऊंच तथापि कार्याची यातायात कल्पनातीत अनावर असल्यामुळें आपणच आमच्याकडून तें वृत्त वेळोवेळीं मिळवित जावें, म्हणजे ठीक होईल.

कळावें. लोभाची अखंड वृद्धी ठेउन उपरोक्त कार्यास आपण यत्किंचितहि विलंब लावूं नये. हीच प्रमाची नम्र विज्ञप्ति आहे."

आपला नम्र,

शं. घों. क्षीरसागर व्यवस्थापक.

श्री. ब्रह्मचर्याश्रम. मसूर. जि. सातारा.

अधिकोत्तर:– सभांतून पसार झालेले अभिनंदनाचे ठराव व नियतकालिकांतील गौरव आमच्याकडे पाठवावेत. म्हणजे अखिल हिंदुजनतेचे ते संदेश व तो प्रेमपान्हा त्या पुनरागत हिंदूमध्यें प्रसृत करण्याची व्यवस्था करू. कळावें.

—व्यवस्थापक.

* × × · ×

वरील 'लाल पत्रा'चा टीकेसे प्रभृति शुद्धिविरोधी वृत्तपत्रांनीं वाटेल तसा विपर्यास केला व त्यांतून राज्यक्रांति, बोल्शेविझम गुप्तकट आदि कित्येक आकल्पिक गोष्टींची निर्मिति केली. ह्या पत्रांतील 'सूज्ञांस बहुत काय लिहिणें,' ह्या वाक्याचा 'तुमचें आमचें पूर्वी ठरलें आहे त्यापेक्षां जास्त काय लिहावें !' असा अर्थ करण्यांत आला होता. ह्या एकाच गोष्टीवरून प्रस्तुत पत्राच्या विपर्यासाची व तो करणाऱ्यांच्या बुद्धि चापल्याची यथार्थ कल्पना कोणालाहि करता येईल. अशा प्रकारची अंतर्बाह्य शत्रूंची ही कावकाव, पोलिस खात्याच्याहि पथ्यावर आयतीच पडली व आश्रमीय कार्यकर्त्यांना सीमापार करून टाकल्यावर, शुद्धिचळवळ नामशेष करून टाकण्याचे प्रयत्न जारीनें करण्यांत आले. ज्यांचा ज्यांचा शुद्धिचळवळीशीं संबंध आहे असा वास लागला, त्या प्रत्येकाला पोलीसचौकीवर बोलावून नेण्यांत येऊन त्याची कसून जबानी घेण्यांत आली. गावडयांच्या हालांना तर सीमाच नव्हती. प्रत्येक दिवशीं कित्येकांना चौकीवर बोलावून नेण्यांत येई. त्याला सायंकाळपर्यंत तिष्ठत ठेवीत, व नंतर उलटसुलट वाटेल तसले प्रश्न विचारून त्यास भांबावून टाकण्यांत येई; पण सानंदाची गोष्ट ही कीं, पोलिसाच्या दटावणीची, आमिषाची किंवा भयाचीहि क्षिती न बाळगतां त्यांच्यापैकीं प्रत्येकानें 'आम्ही स्वखुषीनें हिंदु झालों' असेंच उत्तर प्रत्येक वेळेला दिलें. ह्या चौकीवरील जबान्यांच्या छळणुकीप्रमाणेंच विवाह नोंदणीच्या वेळीं अडविणें, प्रेतविधीच्या जागेस हरकत घेणे, ख्रिस्ती जमीनदारांकरवीं त्यांच्या जमिनी काढून घेणें, त्यांच्या वस्तींत फिरून धाकदपटशा दाखविणें इत्यादि प्रकारच्या कित्येक अनन्वित गोष्टींनाहि ऊगर्दी ऊत आला होता. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे लष्करी कायद्यानुसार दडपशाहीचें युग गोव्यांत सुरू झालें होतें — [illegible] व केव्हां वळी पडेल ह्याचा नियम नव्हता.

अशा या भयंकर वेळीं शुद्धीकर्तांना धीर देणें व त्यांच्या अडीअडचणी मध्यें महलत देऊन निवारण करणें अत्यंत अगत्याचें होतें. खेरीज या अन्यायमूलक छळणुकीनें चिडून जाऊन ते लोक अत्याचारालीं बेफामपणें प्रवृत्त न होतील अशीहि दक्षता ठेवणें भाग होतें. एखाद्या गावड्यानेंहि जरी संतापाच्या भरांत त्यावेळीं कोठें दंगा व मारामारी केली तरी चळवळीला दंग्याचें व बंडाचें एकदम स्वरूप देणें पोलीसखात्याला अशक्य नव्हतें आणि मग चळवळ राजरोसपणें ठार करण्यास सरकारला काय उशीर होता ?

साहजिकच सर्वत्र शांतता राहील व सर्वांचीं संकटें निरस्त होतील, अशी व्यवस्था करणें आवश्यक होतें; पण आश्रमाला तर इतउत्तर गोव्यांत उघडपणें वास्तव्य करणें अशक्य झालें होतें. कारण आश्रमीय लोक दिसले कीं, त्यांना धरून सीमापार करण्यांत यावें, असा सरकारी हुकूमच निघाला होता. तेव्हां कांहीं तरी करून आश्रमीय मंडळी गोव्यांतच राहूं शकतील अशी युक्ति योजणें अपरिहार्य होतें. विचार करतां करतां एक युक्ति निघाली. आश्रमांतील श्री. दादा मसूरकर हे उत्तम ज्योतिषी आहेत. पुण्याच्या ज्योतिषसम्मेलनांत त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. शुद्धी होण्यापूर्वी पांच सहा दिवस त्यांनीं वर्तविलेलें भविष्य अगदीं सत्य ठरल्याचें सर्वांच्याच प्रत्ययास आलें होतें. तेव्हां त्यांनीं पणजी येथें 'ज्योतिषकार्यालय' नांवाची संस्था काढावी व तेथूनच आश्रमीय मंडळीनीं सर्व कामें करावीं असें ठरलें. आश्रमीय ब्रह्मचारी विद्यार्थ्यांप्रमाणेंच कांहीं गृहस्थाश्रमी भिक्षुक मंडळी व प्रचारकहि त्यांच्या साहाय्याला देण्यांत आले. पण या संस्थेला पणजींत जागा कशी मिळावयाची हा मोठाच प्रश्न होता. आश्रमाशीं संबंध ठेवणें म्हणजे सरकारी रोषाला निमंत्रण करणें होय, हें उघड झालें होतें. मग आपण होऊन आपल्या पायांवर दगड ओढून घेण्यास कोण प्रवृत्त होणार ? अर्थात लोकांचीं दारें आश्रमाला बंद होणें साहजिक होतें. परंतु हीं घरें अशा प्रकारें बंद होण्यास केवळ भीतीच कारणीभूत होती, असेंच केवळ नव्हे, तर कांहीं ठिकाणीं मुत्सद्देगिरीसाठींहि तशी गोष्ट करण्यांत आली. म्हणजे या वेळीं बाह्यतः चळवळीशीं आपला कांहीं संबंध नाहीं असें दाखवून आश्रमाच्या साहाय्यार्थ आपलें घर पुढें मागें उपयोगी पडावयासाठीं राखून ठेवावें अशी चातुर्याची कल्पना येथें होती. या नमुन्याचा एक प्रसंग येथें सांगतां येण्यासारखा आहे.

लष्करी कायद्याच्या अमलानें लोकांची धावीं ह्याप्रमाणें दणाणलीं असतांच आश्रमाचे एक प्रचारक श्री. नानाराव कोठेलीकर बाहेरगांवाहून पणजीला आले होते. त्यांना पणजींतील वातावरणाची कल्पना तितकीशी आलेली नव्हती. ते नित्याप्रमाणें आश्रमाच्या ठराविक स्थळीं वसतीसाठीं म्हणून गेले. तेव्हां त्या घरच्या मालकानें रागाचा एकदम मोठा आविर्भाव आणून श्री. नानांना तसेंच घराबाहेर जाण्यास सांगितलें. खिन्न अंतःकरणानें ते घराबाहेर पडले. पण विचार करतां करतां या निष्ठुर वर्तनाचा उमज त्यांना लवकरच पडला व 'आपलें कोणत्याहि घरांत जाणें म्हणजे त्या मालकावर संकट वाढून नेणें होय,' हें ध्यानांत घेऊन त्यांनीं इतरत्र वस्तीस जाण्याचा आपल्या मनाशीं केलेला बेत रहित केला. तरी पण पणजीसारख्या राजधानीच्या मोठ्या शहरांत सर्व रात्र भटकत कशी घालवावयाची ? त्यांतूनहि आश्रमीय लोक दिसले कीं, तत्काळ पकडावे असा सरकारी हुकूम झाला असल्यामुळें मोठीच पंचाईत होती. तेव्हां त्यांना सहजासहजीं एक युक्ति सुचली व एक तिकीट काढून ते नाटकाला जाऊन बसले. कर्मधर्मसंयोगानें तेथें

एका परिचित गृहस्थांची गांठ पडली व त्यांनीं नानांची पणजी बाहेरील इष्ट त्या स्थळीं रातोरात रवानगी केली. असो.

वरीलसारख्या अवस्थेंत 'ज्योतिपकार्यालय' कोठें उघडावें हा प्रश्नच येऊन पडला. पण परमेश्वरकृपेनें तो लवकरच सुटला. पणजींतील एक तरुण श्रीमंत गृहस्थ श्री. यशवंतराव रवंदे हे मोठ्या धडाडीनें पुढें आले व आपल्या आप्त इष्ट सुहृदांच्या कोणाच्याहि म्हणण्याकडे यत्किंचितसुद्धां लक्ष न देतां त्यांनीं आपल्या प्रशस्त वाड्यांत 'ज्योतिपकार्यालय' काढण्यास अनुज्ञा दिली. त्याचें हें अभिनंदनीय धाडस अर्थातच कित्येकांकडून उपहासिलें गेलें. पण श्री. यशवंतरावांनीं कोणाचीहि क्षिति न बाळगतां आश्रमीय मंडळींना आपल्या वाड्यात आश्रय दिला. ह्या क्षणापासून श्री. यशवंतरावांचा, त्यांचे चुलत बंधु श्री. रामभाऊ रवंदे ह्यांच्याप्रमाणेंच शुद्धिचळवळीशीं अगदीं अभेद्य असा संबंध जडला व ते आश्रमाशीं पूर्ण समरस झाले.

पण ह्याप्रमाणें पणजी शहरांत जागा मिळूनच सर्व कार्यभाग होण्यासारखा नव्हता. गावड्यांना लग्न नोंदणींत सरकारी कामगारांचा मनस्वी त्रास होत होता. तेव्हांपासून दडपशाहीचें धोरण थोडेंसे शमेपर्यंत कांहीं निकडीचे विवाह व लहानसहान शुद्धीकरणें जर गोव्या लगतच्या ब्रिटिश सीमेंत उरकून घेतां येतील तर बराचसा त्रास वाचेल, हें लक्षांत घेऊन चार अंगाला चार स्थळें नियुक्त करण्यांत आलीं व त्याला अनुसरूनच प्रथम लोंढा व सुकरवाळ (दोडामार्ग) येथें आश्रमाच्या शाखा उघडण्यांत आल्या. तेथें एक महंत, लग्नादि संस्कार विधि जाणणारा एक भिक्षुक, आणि एक दोन साधे स्वयंसेवक अशी मंडळी ठेवण्यांत आली. साहजिकच ह्या व्यवस्थेचा बऱ्याच गावड्यांनीं उपयोग करून घेतला.

ह्याच सुमारास पणजी येथें श्रीमहालक्ष्मीच्या मंदिरांत समस्त हिंदु नागरिकांची एक प्रचंड जाहीर सभा कालापूर येथील सुप्रसिद्ध पुढारी व कायदे मंडळाचे माजी समासद श्रीयुत रामचंद्र पुं. अथवा लोलीबाबा केंकरे ह्यांच्या अध्यक्षते खालीं भरली. सभेस सर्व प्रांतांतील शेंकडोंशें लोक उपस्थित होते. पक्षोपपक्ष व मतमतांतरें एका अंगाला ठेवून सर्व शातीचे व सर्व दर्जाचे हिंदु लोक एकत्र येण्याचा हा पहिलाच प्रसंग होता, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. तिसवाडी महालाचे मामलेदार व श्री. कुंजप्रभृति कांहीं ख्रिस्ती गृहस्थ उपस्थित होते. डॉ. बोरकर, श्री. गणपतराव सामंत, श्री. विर्डिकर वैद्य, श्री. व्यंकटेशराव देसाई, श्री. ज. ना. कामत, श्री. महादेव शेट काकुले, इत्यादि वक्त्यांची स्फूर्तिदायक भाषणें झालीं. सभेला सहानुभूतिदर्शक असे संदेशहि पुष्कळांकडून आले होते. कालापूरचे श्री. विठ्ठल सुर्लीकर ह्यानेंहि नवहिंदूंचा पोलिसांकडून होत असलेला निष्कारण छळ साद्यंत वर्णन करून सांगितला. शुद्धीच्या तत्वाला मान्यता व पाठिंबा देणें, प्रचलित राज्यपद्धतीशीं लोकांची निष्ठा व्यक्त करणें, शुद्धिसहाय्यक मंडळाची ड्यायकौट पेरणेकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं रीतसर स्थापना करणें, गव्हर्नर जनरलची कांहीं शिष्ट प्रमुखांनीं मुलाखत देणें, इत्यादि ठराव सभेंत पसार करण्यात आले.

राजनिष्ठेचा ठराव मान्य करावयाचा तर त्यास राज्यपद्धतीच्या रोपाला—निष्कारण कां असेना बळी पडलेल्या व्यक्तींचे अभिनंदन कसें करावें, व सरकारी दडपशाहीचा निषेध कसा करावा असा एक



श्रीमंत यशवंतराव पांडुरंग प्रभु लंवदे, पणजी-गोवा.



दे. भ. डॉ. गोविंद पुंडलीक हेगडे देसाई, संपादक 'भारत' केपें-गोवा.

मोठा पेंच सभासंचालकांना पडला होता. त्यामुळें शुद्धिकरणानिमित्त तुरुंगवास घडलेल्या व्यक्तींच्या अभिनंदनाचा ठराव व रीतसर चौकशी केल्याविना कार्यकर्त्यांची धमकी देऊन झालेली हद्दपारी ह्या कृत्यांच्या निषेधाचा ठराव हे सभेपुढें येऊं दिले गेले नाहींत, ह्या गोष्टीचें अर्थातच कित्येकांना सखेदाश्चर्य वाटल्याविना राहिलें नाहीं. पण पणजीच्या सभेला ही गोष्ट जरी उपेक्षणीय वाटली तरी ब्रिटिश सभांमधून मात्र ह्या गोष्टीवर प्रामुख्यानें भर देण्यांत आला. धमकीपूर्ण हद्दपारीचा प्रश्न तेथें अटके पेक्षांहि अधिक विचारणीय ठरला. कारण कोणताहि आरोप शाबीत न होतां ब्रिटिश प्रजाजनांना एकाएकीं उच्चलून सीमापार करणें, हें कृत्य धडधडीत अन्यायमूलक, ह्मणून संतापजनक होतें. ह्या प्रश्न केवळ एकट्या मसुराश्रमापुरताच नसून सर्व ब्रिटिश प्रजाजनांच्या न्याय्य हक्कावर तो गदा आणित होता, साहजिकच महाराष्ट्र हिंदुसभेच्या विद्यमानें पुण्यास श्री. ग. वि. केतकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सभेनें असा ठणठणीत ठराव केला, कीं, " गोव्यांतील गावडे खिस्ती लोकांच्या शुद्धीकरणाचे बाबतींत पोर्तुगीज रिपब्लिकचें धार्मिक स्वातंत्र्याचें धोरण पाळण्याचें आश्वासन गव्हर्नरांनीं दिल्याबद्दल ही हिंदूंची सभा त्यांचे आभार मानते. पण आनंदमूर्तीप्रभृति तिघां प्रचारकांविरुद्ध कोणताहि आरोप सिद्ध झाला नसतां त्यांना पोलिसांच्या कागाळ्यावर विश्वास ठेवून अटकेंत टेवणें, त्रास देणें, आणि हद्दपार करून 'पुन्हां परत पोर्तुगीज मुलखांत याल तर जन्मभर तुरुंगांत ठेवूं ' अशी धमकी देणें ही अधिकाऱ्यांची कृत्यें रिपब्लिक धर्मस्वातंत्र्याचें धोरणास विरुद्ध व सर्वस्वीं अरेरावीचीं आहेत. ह्या प्रचारकांना पकडल्यानें उत्पन्न झालेला हिंदुसमाजांतील क्षोभ, त्यांच्या हद्दपारीनें अधिकच झाला आहे आणि गव्हर्नरांनीं खालच्या अधिकाऱ्यांवर विश्वास न ठेवतां ह्या प्रचारकांविरुद्ध पुढें आलेल्या आरोपांची नीट चवकशी करून न्याय दिल्याशिवाय त्यांचें धर्मस्वातंत्र्याचें आश्वासन पोकळच ठरेल असें या सभेचें मत आहे. " मुंबईहून डॉ. सावरकरांनींहि वरील आशयाचीच तार गव्हर्नरजनरल यांस केली. ही परिशिष्टांत दिलीच आहे. असो.

पणजीच्या सभेंत ठरल्याप्रमाणें तारिख २० मार्चला दुपारीं शिष्टमंडळ गव्हर्नरांची मुलाखत घेण्यासाठीं गेलें. शिष्टमंडळांत श्री. रा. पु. केंकरे, श्री. शिवाजी सरदेसाई, श्री शंखवाळकर वकील, श्री. महादेव शेट काकुले, डॉ. साखरदांडे, श्री. जयवंतराव सरदेसाई, श्री. खळू बळवंतराव, श्री. बा. म. नाईक, श्री. वि. रा. नायक व ज. वि. कामत, हे गृहस्थ होते. अध्यक्षांनीं भेटीचा हेतु विदित केल्यावर गव्हर्नरांनीं शिष्टमंडळास उद्देशून खालील आशयाचें उत्तर दिलें, " सभ्य गृहस्थहो, जे कोणी माझ्या जवळ आले आणि ज्यांचा माझ्याशीं परिचय झाला त्या सर्वांना सांगितलेल्या गोष्टीचा पुनरुच्चार करण्याची आवश्यकता नाहीं. कायद्यानें प्रस्थापित झालेल्या सरकारला धार्मिक प्रश्नांशीं कोणतेंहि कर्तव्य नाहीं. आणि त्या सरकाराचा प्रतिनिधि जो गव्हर्नर त्याला सर्व धर्मांना पूर्ण स्वातंत्र्य देण्याच्या तत्वाचा पुरस्कारच करावयाचा असतो. कायद्याचा निर्बंध ह्मणून, अधिकारी या नात्यानें आणि सुशिक्षित मनुष्य या नात्यानें ह्या स्वातंत्र्याचें संरक्षण करण्याबद्दल मी पूर्ण दक्ष असतों. माझे सर्व प्रयत्न ह्याच दिशेनें होत असतात. उद्यां कांहीं अथवा सर्व खिस्ती हिंदु झाले, किंवा उलट कांहीं अथवा सर्व हिंदु खिस्ती झाले तर त्या गोष्टीशीं मला कांहीं एक कर्तव्य नाहीं. आणि कर्तव्य असणें योग्यहि नाहीं. धर्म हा वैयक्तिक अंतःकरण प्रवृत्तीचा



अंत्रुज महालांतील नवहिंदूंचे पुढारी.



श्री. शंकरराव नाईक शंखवाळकर, प्रियोळ (गोवा).



श्री. केशव नारायण गाळकर, फोंडा (गोवा)



ह. भ. प. चंद्रपुरीदास, माशेल (गोवा).



श्री. गोपाळ गावडा, अंत्युज महाल (गोवा).



श्री. पां. चा. घोरकर, चोरी (गोवा).

त्यांनाहि ह्या पूर्वीच ह्याविषयीं जाब विचारण्यांत आला होता. पण, " माझा आश्रमाशीं संबंध आहे व मी हिंदु आहें, त्याअर्थी ह्या आमच्या हिंदुबांधूंना साह्य करणें हा माझा धर्मच आहे व तो प्राणाचीहि क्षिती न बाळगतां मी आचरणारच. " असें मोठ्या निर्भय वृत्तीनें रोखठोक व सणसणीत उत्तर देण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. खिस्तीवृत्तपत्रांचा स्वच्छंदी नाच स्वैरपणें चाल्लाच होता. त्यांचा खरपूस समाचार घेण्याचें काम भारत व हिंदु या वृत्तपत्रांनीं चालविलेंच होतें; परंतु तेवढ्यानेंहि काम भागत नसल्यामुळें शुद्धिसाहाय्यक मंडळानें, मंडळाचे उपाध्यक्ष माजी नामदार श्री. व्यंकटेशराव देसाई यांच्या संपादकत्वाखालीं 'प्रकाश' नांवाचें एक पोर्तुगीज अर्ध साप्ताहिक काढलें. शुद्धिशत्रु खिस्ती पत्रांस रोखठोक व सडेतोड उत्तरें देऊन प्रकाशानें ह्या वेळीं फारच प्रशंसनीय कामगिरी बजावली.

ह्याप्रमाणें गोष्टी चालल्या असतां इकडे आश्रमाचें कार्य ज्योतिषकार्यालयातर्फे अत्यंत सावधगिरीनें चांगलें चाल्लेंच होतें. साक्षरता व धर्मप्रसार ह्या दृष्टीनें चिंबल येथें एक पाठशाळा मागें स्थापन केलेली होती. त्याच धर्तीवर अन्यत्रहि शाळा काढण्याचे प्रयत्न चालले होते. मध्यंतरीं पुण्याच्या हिंदुसभेच्या विनंतीवरून गोव्यांतील परिस्थितीचें ज्ञान जनतेस करून देण्यासाठीं श्री. लवंदे, श्री. शांताराम पु. गोवेकर मास्तर व चिंबलचे धडाडीचे पुढारी श्री. सांतु नार्वेकर व भिकारो कुंकळ्ळकर ह्यांस म. क्षीरसागरांसमवेत पुण्याच्या शिवाजीमंदिरांतील सभेस पाठविण्यांत आलें. महाराष्ट्रांत टिकटिकाणीं मागणी केल्याप्रमाणें कित्येक स्वयंसेवक गोमांतकांत काम करण्यासाठीं उत्सुकतेनें आश्रमाकडे येत, त्यांची निवडानिवड करून त्यांना पणजीच्या ज्योतिषकार्यालयांत पाठवून देण्यांत येत असे. हे स्वयंसेवक आश्रमीय मंडळीच्या देखरेखीखालीं निरलसपणें काम करीत राहिले होते. शुद्धिकार्य बंद पाडावयाचें नाहीं, हा तर आश्रमाचा निर्धार होता.

ह्या फोंडे महालांत धाकदपटशानें चळवळ मारून टाकण्याचे प्रयत्न झाले, तेथेंच हनुमंत जयंतीच्या शुभ मुहूर्तावर पुन्हां खिंडार पाडावें, असें आश्रमानें निश्चित केलें व त्या दृष्टीनें कसोशीचे प्रयत्न सुरु झाले. श्री. लवंदे ह्यांनीं प्रियोळास जाऊन तेथील उत्साही व कार्यप्रेमी सद्गृहस्थ श्री. शंकरराव नाईक, व श्री. दत्तात्रय रघुनाथ वायकर ह्यांच्या समवेत गावडयांचा पुढारी आगुस्तीन ह्याची गांठ घेतली व त्यास सर्व परिस्थिति समजावून सांगून, आपल्या जातभाईंस शुद्धीकरणाच्या विधीसाठीं बोलावून आणण्यास सांगितलें. " रंगपंचमीच्या दिवशीं झालेल्या प्रकारानें सर्वांचीं मनें भयभीत झालीं आहेत. तरी पण मी जाऊन सर्वांना विचारून येतों " असें सांगून आगुस्तीन निघून गेला. त्याचा रात्रीं ९।१० वाजले तरी कांहीं त्याचा येण्याचा मागमूस दिसेना, तेव्हां पणजीस जाऊन प्रथम श्री. दादा वैद्य व श्री. साने शास्त्री ह्यांस घेऊन येण्याचें ठरवून श्री. लवंदे पणजीस निघाले. वाणास्तरीपर्यंत त्यांस मोटारीनें येतां आलें. पण तरीपलीकडे इतक्या अपरात्रीं मोटार मिळणें शक्य नव्हतें व तेथून पणजी तर कांहीं नजीक नव्हती. इकडे आठ दहा मैल पणजीस चालत जाऊन परत प्रियोळला यावयाचें तर आजचा दिवस निघून जाणार. मग उद्यांची हनुमानजयंती सुनी घालवावयाची नाहीं हा निश्चयहि ढासळणार, तेव्हां काय करावें अशा चिंतेंत असतांना, श्री. लवंदे ह्यांस एकाएकीं एक मोटार येत असल्याचें दिसून आलें. परमेश्वरी लीलेचें ते कौतुक करीत आहेत तोंच मोटार आली; पण ती सर्व्हिसची नव्हती, खाजगी मालकीची होती. तथापि जगन्मित्रत्व संपादण्याचें

यांनाहि ह्या पूर्वीच ह्याविषयीं लाब विचारण्यांत आला होता. पण, " माझा आश्रमाशीं संबंध आहे व मी हिंदु आहें, त्याअर्थीं ह्या आमच्या हिंदुबांधूंना साह्य करणें हा माझा धर्मच आहे व तो प्राणाचीहि क्षिती न बाळगतां मी आचरणारच. " असें मोठ्या निर्भय वृत्तीनें रोखठोक व खणखणीत उत्तर देण्यास यांनीं कधीं केलें नाहीं. खिस्तीवृत्तपत्राचा स्वच्छंदी नाच स्वैरपणें चाललाच होता. त्याचा खरपूस समाचार घेण्याचें काम भारत व हिंदु या वृत्तपत्रांनीं चालविलेंच होतें; परंतु देवदयानेंहि काम भागत नसल्यामुळें शुद्धिसाहाय्यक मंडळानें, मंडळाचे उपाध्यक्ष माजी नामदार श्री. व्यंकटेशराव देसाई यांच्या संपादकत्वाखालीं ' प्रकाश ' नांवाचें एक पोर्तुगीज अर्ध साप्ताहिक काढलें. शुद्धिशत्रु खिस्ती पत्रास रोखठोक व सडेतोड उत्तरें देऊन प्रकाशानें ह्या वेळीं फारच प्रशंसनीय कामगिरी बजावली.

ह्याप्रमाणें गोष्टी चालल्या असता इकडे आश्रमाचें कार्य ज्योतिषकार्यालयातर्फे अत्यंत सावधगिरीनें चांगलें चाललेंच होतें. साक्षरता व धर्मप्रसार ह्या दृष्टीनें चिंबलयेथें एक पाठशाळा मागें स्थापन केलीच होती. त्याच धर्तीवर अन्यत्रहि शाळा काढण्याचे प्रयत्न चालले होते. मध्यंतरीं पुण्याच्या हिंदुसभेच्या विनंतीवरुन गोव्यातील परिस्थितीचें ज्ञान जनतेस करुन देण्यासाठीं श्री. लवंदे, श्री. शांताराम पुं. गोवेंकर मास्तर व चिंबलचे धडाडीचे पुढारी श्री. सातु नार्वेकर व भिकारो कुंकळकर यांस द. क्षीरसागरांसमवेत पुण्याच्या शिवाजीमंदिरातील सभेस पाठविण्यांत आलें. महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं मागणी केल्याप्रमाणें कित्येक स्वयंसेवक गोमांतकांत काम करण्यासाठीं उत्सुकतेनें आश्रमाकडे येत, त्यांची निवडानिवड करुन त्यांना पणजीच्या ज्योतिषकार्यालयांत पाठवून देण्यांत येत असे. हे स्वयंसेवक आश्रमीय मंडळीच्या देखरेखीखालीं निरलसपणें काम करीत राहिले होते. शुद्धिकार्य दद पाडावयाचें नाहीं, हा तर आश्रमाचा निर्धार होता.

ज्या फोंडे महालांत धाकदपटशानें चळवळ मारुन टाकण्याचे प्रयत्न झाले, तेथेंच हनुमंत जयंतीच्या शुभ मुहूर्तावर पुन्हां खिंडार पाडावें, असें आश्रमानें निश्चित केलें व त्या दृष्टीनें कसोशीचे प्रयत्न सुरु झाले. श्री. लवंदे ह्यांनीं प्रियोळास जाऊन तेथील उत्साही व कार्यप्रेमी सद्गृहस्थ श्री. शंकरराव नाईक, व श्री. दत्तात्रय रघुनाथ रायकर ह्यांच्या समवेत गावड्यांचा पुढारी आगुस्तीन ह्याची गांठ घेतली व त्यास सर्व परिस्थिति समजावून सांगून, आपल्या जातभाईंस शुद्धीकरणाच्या विधीसाठीं बोलावून आणण्यास सांगितलें. " रंगपंचमीच्या दिवशीं झालेल्या प्रकारानें सर्वांचीं मनें भयभित झालीं आहेत. तरी पण मी जाऊन सर्वांना विचारुन येतों " असें सांगून आगुस्तीन निघून गेला. त्याचा रात्रीं ९।१० वाजले तरी कांहीं त्याचा येण्याचा मागमूस दिसेना, तेव्हा पणजीस जाऊन प्रथम श्री. दादा व श्री. साने शास्त्री ह्यास घेऊन येण्याचें ठरवून श्री. लवंदे पणजीस निघाले. बाणास्तरीपर्यंत त्यास मोटारीनें येता आलें. पण तरीपलीकडे इतक्या अपरात्रीं मोटार मिळणें शक्य नव्हतें व तेथून पणजी अंतर कांहीं नजीक नव्हती. इकडे आठ दहा मैल पणजीस चालत जाऊन परत प्रियोळला यावयाचें तर आजचा दिवस निघून जाणार. मग उद्याची हनुमानजयंती सुनी घालवावयाची नाहीं हा निश्चयहि टासळणार, तेव्हां काय करावें अशा चिंतेंत असतांना, श्री. लवंदे ह्यांस एकाएकीं एक मोटार येत असल्याचें दिसून आलें. परमेश्वरी लीलेचे ते कौतुक करीत आहेत तोंच मोटार आली; पण ती सर्व्हिसची नव्हती. खाजगी मालकीची होती. तथापि जगन्मित्रत्व संपादण्याचें

ांनाहि ह्या पूर्वीच ह्याविषयीं नाव विचारण्यांत आला होता. पण, " माझा आश्रमाशीं संबंध आहे मी हिंदु आहें, त्याअर्थी ह्या आमच्या हिंदुसाधूंना साह्य करणें हा माझा धर्मच आहे व तो प्राणाचीहि उती न पाळगतां मी आचरणारच." असें मोठ्या निर्भय वृत्तीनें रोखठोक व सणसणीत उत्तर देण्यास ांनीं कमी केलें नाहीं. खिस्तीवृत्तपत्रांचा स्वच्छंदी नाच स्वैरपणें चालूच होता. त्यांचा सरपूस माचार घेण्याचें काम भारत व हिंदु या वृत्तपत्रांनीं चालविलेंच होतें; परंतु तेवढ्यानेंहि काम भागत सल्यामुळें शुद्धिसाहाय्यक मंडळानें, मंडळाचे उपाध्यक्ष माजी नामदार श्री. व्यंकटेशराव देसाई यांच्या पादकत्वाखालीं 'प्रकाश' नांवाचें एक पोर्तुगीज अर्ध साप्ताहिक काढलें. शुद्धिशत्रु खिस्ती पत्रांस खठोक व सडेतोड उत्तरें देऊन प्रकाशानें ह्या वेळीं फारच प्रशंसनीय कामगिरी बजावली.

ह्याप्रमाणें गोष्टी चालल्या असतां इकडे आश्रमाचें कार्य ज्योतिषकार्यालयातर्फे अत्यंत सावध- ारीनें चांगलें चाललेंच होतें. साक्षरता व धर्मप्रसार ह्या दृष्टीनें चिंबल येथें एक पाठशाळा मागें स्थापन लेलि होती. त्याच धर्तीवर अन्यत्रहि शाळा काढण्याचे प्रयत्न चालले होते. मध्यंतरीं पुण्याच्या दुसभेच्या विनंतीवरून गोव्यांतील परिस्थितीचें ज्ञान जनतेस करून देण्यासाठीं श्री. लवंदे, श्री. ांताराम पुं. गोवेकर मास्तर व चिंबलचे घडाडीचे पुढारी श्री. सांतु नार्वेकर व भिकारो कुंकळकर यांस . क्षीरसागरांसमवेत पुण्याच्या शिवाजीमंदिरांतील सभेस पाठविण्यांत आलें. महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं ागणी केल्याप्रमाणें कित्येक स्वयंसेवक गोमांतकांत काम करण्यासाठीं उत्सुकतेनें आश्रमाकडे येत, त्यांची नवडानिवड करून त्यांना पणजीच्या ज्योतिषकार्यालयांत पाठवून देण्यांत येत असे. हे स्वयंसेवक आश्र- ीय मंडळीच्या देखरेखीखालीं निरलसपणें काम करीत राहिले होते. शुद्धिकार्य बंद पाडावयाचें नाहीं, ा तर आश्रमाचा निर्धार होता.

ज्या फोंडे महालांत धाकदपटशानें चळवळ मारून टाकण्याचे प्रयत्न झाले, तेथेंच हनुमंत यंतीच्या शुभ मुहूर्तावर पुन्हां खिंडार पाडावें, असें आश्रमानें निश्चित केलें व त्या दृष्टीनें कसोशीचे यत्न सुरू झाले. श्री. लवंदे ह्यांनीं प्रियोळास जाऊन तेथील उत्साही व कार्यप्रेमी सद्गृहस्थ श्री. करराव नाईक, व श्री. दत्तात्रय रघुनाथ रायकर ह्यांच्या समवेत गावड्यांचा पुढारी आगुस्तीन ह्याची ांठ घेतली व त्यास सर्व परिस्थिति समजावून सांगून, आपल्या जातभाईस शुद्धीकरणाच्या विधीसाठीं ोलावून आणण्यास सांगितलें. "रंगपंचमीच्या दिवशीं झालेल्या प्रकारानें सर्वांचीं मनें भयभीत ालीं आहेत. तरी पण मी जाऊन सर्वांना विचारून येतों" असें सांगून आगुस्तीन निघून गेला. त्याचा ात्रीं९।१० वाजले तरी कांहीं त्याचा येण्याचा मागमूस दिसेना, तेव्हां पणजीस जाऊन प्रथम श्री. दादा वे ा. साने शास्त्री ह्यांस घेऊन येण्याचें ठरवून श्री. लवंदे पणजीस निघाले. वाणास्तरीपर्यंत त्यांस मोटारीनें तां आलें. पण तरीपलीकडे इतक्या अपरात्रीं मोटार मिळणें शक्य नव्हतें व तेथून पणजी र कांहीं नजीक नव्हती. इकडे आठ दहा मैल पणजीस चालत जाऊन परत प्रियोळला यावयाचें र आजचा दिवस निघून जाणार. मग उद्यांची हनुमानजयंती सुनी घालवावयाची नाहीं हा निश्च- हि ढासळणार, तेव्हां काय करावें अशा चिंतेंत असतांना, श्री. लवंदे ह्यांस एकाएकीं क मोटार येत असल्याचें दिसून आलें. परमेश्वरी लीलेचें ते कौतुक करीत आहेत तोंच मोटार ाली; पण ती सर्व्हिसची नव्हती. खाजगी मालकीची होती. तथापि जगन्मित्रत्व संपादण्याचें

सूत्र जिव्हेपाशींच असतें व श्री. लवंदे ह्यांस जात्याच तशी ईश्वरी देणगी असल्यामुळें, त्यांनीं त्या मोटारवाल्यास आपलासा करुन त्याच मोटारीनें रात्रौ १ वाजतां पणजी गांटली. आकस्मितपणें मिळालेलें हें साहाय्य पाहून श्री. लवंदे ह्यांनीं परमेश्वराचे धन्यवाद गाइले. 'प्रसादचिह्नानि पुरःफलानि' ह्या न्यायानें प्रस्तुत झालेल्या शुभशकुनामुळें त्यांना दुप्पट उत्साह आला. श्री. दादा, व साने शास्त्री, ह्यांच्या सह ते तसेच रातोरात प्रियोळ येथें आले. श्री. लवंदे इकडे पणजीस आले तेव्हां आगुस्तीन रात्रीं बारा वाजतां श्री. शंकरराव नाईक यांच्या घरीं येऊन 'शुद्धीला कोणीहि तयार होत नाहीं' असें सांगून आपल्या घरीं निघून गेला. श्री. नाइकांनीं तसें वृत्त कांनीं घालतांच दादाप्रभृति मंडळी तशीच आगुस्तीन ह्याच्या घरीं गेली. तो शांतपणें घोरत पडला होता. त्याला उठविण्यांत आलें. दादांना पहातांच आगुस्तीन ह्यास मनस्वी आनंद झाला केरीस शुद्धीकरण फिसकटून जिकडेतिकडे धरपकड झाल्यानंतर आश्रमीय सर्व लोक स्वस्थानीं गेले असतील, अशी पुष्कळांप्रमाणेंच त्याची कल्पना झालेली होती; पण दादांना साक्षात् आपल्या समोर उभे असलेले पाहून त्याला मोठा आनंद झाला. इतर स्थानांपेक्षांहि फोंडे महालांत धाकदपटशाचा उपयोग विशेषपणें करण्यांत आल्यामुळें बाकीची मंडळी शुद्धीकरणास कचरत आहेत, असें आगुस्तीन ह्यानें सांगितलें. दादांनीं त्याला एका अंगाला घेऊन त्याच्याशीं पुष्कळ वादाघाट केली व अंतीं सांगितलें कीं, "बाकीचे कोणी शुद्ध न झाले तर न झाले, पण तूं तरी हनुमान जयंतीला शुद्ध होण्याची ही अपूर्व संधि व्यर्थ घालवूं नको. सरकार बहुधा कांहीं त्रास देणार नाहीं, त्यांतून दिलाच तर तो, तूं धर्मासाठीं सहन नाहीं का करणार? नाहींतरी तुम्हांला सध्या काय कमी हालअपेष्टा भोगाव्या लागतात? तूं धाडस करुन पुढें झालास म्हणजे बाकीच्या सर्वांना जोर येईल. तुझा संसार आतां झालाच आहे, तेव्हां बाकीचा सर्व विचार सोडून दे. धर्मासाठीं मेलास तर तुझें नांव सर्वत्र गाजेल व त्यांतच तुला भूषण आहे. आम्ही आज तुला एकट्यालाच शुद्ध केल्याविना येथून हालणार नाहीं. करमळीला एकटा उबाल्दच आपल्या बायकामुलांनासुद्धां सोडून धडाडीनें पुढें नाहीं कां झाला? तसाच तूंहि हो," आगुस्तीनला दादांचें ह्मणणें पटलें व त्यानें आपल्या शुद्धीकरणास मान्यता दिली. तदनंतर तो म्हणाला 'एवींतेवीं मीं शुद्ध होणारच, तेव्हां ही गोष्ट मी माझ्या वडील भावास विचारतों' तेव्हां सर्वजण त्याच्या भावाचे घरीं गेले. बोलणें चालणें झाल्यानंतर तो व त्याच्या जांवयाचें एक कुटुंब आनंदानें शुद्ध होण्यास सिद्ध झालें. तेथून दीड मैलावरच 'आकार' नांवाचा एक वाडा आहे. तेथें आगुस्तीनचा 'जिवश्च कंठश्च' मित्र आलेश गावडा राहात होता. केरी प्रकरणापूर्वी आगुस्तीन व आलेश ह्या उभयतांनीं अगदीं खांद्याला खांदा लावून शुद्धीकरणानिमित्त बरेंच परिश्रम घेतले होते, तेव्हां आगुस्तीन दादांना म्हणाला, "ह्या शुद्धीच्या कामीं जेथें आलेश तेथें मी असा आमचा जिव्हाळ्याचा संबंध आहे. म्हणून आम्हाला जरी बायकामुलांना घेऊन दूर जावें लागलें, तरी हरकत नाही. पण शुद्धीचा पहिला होम त्याच वाड्यावर घातला पाहिजे. आलेश गावडा तर आपल्या कुटुंबासह सिद्ध होईलच. पण तेथें आणखी ७।८ कुटुंबें आहेत व परमेश्वरकृपेनें त्यांना आमचा विचार पटेल तर आह्मी सर्व मिळून शंभर एक माणसें शुद्ध होऊं. नाहीं तर आमच्या कुटुंबांतील तीस पस्तीस होतील तेवढीं पुरे आहेतच." आगुस्तीनच्या म्हणण्याप्रमाणें मंडळी आकार वाड्यावर आली. आलेश गावडा अर्थातच तत्काळ शुद्धीस सिद्ध झाला व आगुस्तीन व आलेशाचा निर्धार पाहून बाकीच्या सर्व मंडळींनींहि मान्यता दिली.

इतक्या गोष्टी होत आहेत तोंच पहांट झाली. हनुमज्जयंतीचा दिवस उजाडला. आगुस्तीनचें कुटुंब, आलेशचें कुटुंब व आकार वाड्यांतील इतर घरें मिळून जवळ जवळ १०० लोक शुद्धीकरणास बसले. श्री. शंकरराव नाईक व श्री. दत्ता रायकर हे होमाचें सामान घेऊन आले. या उभयतांनीं गेली सारी रात्र फारच परिश्रम घेतले. रंगपंचमीस छलबलानें बंद झालेलें होमकुंड पुन्हा प्रज्वलित केलें गेलें. येथून खेडे नांवाच्या वाड्यावर ही शुभवार्ता कळविण्यांत आली. त्यांच्या प्रमुखांनीं येऊन वाटाघाट केली व ते शुद्धीकरणास सिद्ध झाले. आकार वाड्यावरील शुद्धिविधि आटोपून मंडळी खेडे वाड्यावर गेली. तेथील लोकांसहि यथाविधि हिंदुधर्माची दीक्षा देण्यांत आली. ह्याप्रमाणें आगुस्तीन ( गोपाळ ) पासून प्रारंभ होऊन मारुतीच्या शेपटाप्रमाणें वाढत वाढत जवळजवळ २००।२२५ माणसें ह्या दिवशीं शुद्ध झालीं ! शुद्ध होऊन घरीं आल्यानंतर गावड्यांनीं आपआपलीं घरेंदारें झाडूनसारवून अगदीं स्वच्छ केलीं, पूर्वीचीं मातीचीं भांडीं फेकून दिलीं व तांब्या पितळेचीं भांडीं देखील होमकुंडांत घालून त्यांच्यावरचोंहि ' ख्रिस्तीता ' चें पुट नष्ट करून टाकलें.

हनुमानजयंतीच्या दिवशीं फोंडे महालांत शुद्धीचा वार उडविण्याचा हा सत्यसंकल्प श्रीमारुतिरायांच्या कृपाप्रसादानें ह्याप्रमाणें सिद्धीस गेलेला पाहून आश्रमीय मंडळीस ईश्वरीलीलेचें सानंद कौतुक वाटलें. नंतर सर्वांचा निरोप घेऊन व वाटेमध्यें श्रीमहालसादेवी व श्रीमंगेश यांचें दर्शन घेऊन दादाप्रभृति मंडळी पणजीस परत आली. येतांना मंडळींनीं आपल्याबरोबर आगुस्तीनलाहि घेतलें होतें. आगुस्तीनचा तो आतां ' गोपाळ ' गावडा झाला होता ! वाटेंत त्याच्या एका ओळखीच्या मुसलमानानें त्याला विचारलें " अरे गुस्त्यांव, तूं मिशा कां काढल्या आहेस ? " तेव्हां त्यानें झट्‌कन् उत्तर दिलें कीं, " गुस्तांव मरून जाऊन गुस्तांवचा आज ' गोपाळ ' बनला आहे ! " असो. शुद्धीकरणाचें हें वृत्त पोलिसांस लवकरच समजलें व आश्रमीय मंडळीचा शोध सुरू झाला.

इकडे ह्याच दिवशीं कर्मळी येथेंहि शुद्धिसमारंभ आकस्मिकपणें ठरला. कर्मळी येथील शुद्धीकरणाचे प्रयत्न आतांपर्यंत शुद्धिविरोधकांनीं कसे हाणून पाडले हें मागें कथन केलेंच आहे; पण भक्तोद्धारक प्रभु रामचंद्रांना आपल्या भक्तांचा हा उपमर्द सहन झाला नाहीं. खळांनीं गांजलेल्या आपल्या भक्तांचा उद्धार करण्यासाठीं धांवून जाण्यास त्यांनीं आपल्या एकनिष्ठ भक्त मारुतिरायास आज्ञा केली. त्यावरोवर श्रीसमर्थांनीं वर्णिल्याप्रमाणें—

" अद्भुत वेश आवेशें, कोपला रण कर्कशू । धर्मसंस्थापनेसाठीं, दास तो उठिला बळें ।। "
मारुतिरायांनीं आपली ध्यानमग्नता सोडून भक्तजनसंरक्षणार्थ धांवणें केलें. त्यामुळें अशक्यप्राय झालेल्या फोंडे महालांतील शुद्धीला ज्याप्रमाणें आज मोठेंच तोंड पडलें, त्याच प्रमाणें करमळी येथील भिजत पडलेला हा अवघड प्रश्नहि आज सुटण्याचा योगायोग आला.

ब्रह्मपुरी येथें श्रीराम नवमीचा उत्सव कर्मळीच्या श्रीराम जयंत्युत्सवमंडळाकडून मोठ्या थाटानें साजरा करण्यांत येत असे. रामजन्माचा उत्सव झाल्यानंतर तेथून कर्मळी व धुळापी गांवापर्यंत प्रभुरामरायाची पालखी निघे व त्यांत येथील ख्रिस्ती गावडेहि भाग घेत; परंतु यंदां या लोकांना पालखीच्या मिरवणुकींत भाग घेऊं द्यावयाचाच नाहीं, असें रामजयंत्युत्सवाच्या उत्साही व कार्यप्रेमी लोकांनीं ठरवलें;

पण त्याबरोबरच तिसवाडींतील शुद्ध झालेल्या गावड्यांना आग्रहपूर्वक बोलावून घेण्यास मात्र ते विसरले नाहींत. आपलेच जातभाई हिंदु झाल्यामुळें आज उघडपणें हिंदुसमाजांत वावरत आहेत; एवढेंच नव्हे तर रामाच्या पालखीला मधून मधून खांदाहि देत आहेत, हें दृश्य पाहून खिरती गावड्यांच्या पोटांत कालवाकालव सुरू झाली व पुष्कळांना आपल्या ह्या लोंबकळणाऱ्या स्थितीचा एकदम संताप व तिरस्कार आला. त्यासरशीं त्यांनीं आपली जमात भरवली व 'वाटेल तें होवो; पण आतां हिंदु झाल्याविना रहावयाचें नाहीं' असें त्यांनीं एकमतानें निश्चित केलें. परमेश्वरी कृपेनें ह्याप्रमाणें कर्मळीचा प्रश्न तडकाफडकी सोडविला गेला. हनुमज्जयंतीचा दिवस निश्चित करण्यांत आला. ह्या वेळीं दादा व लवंदे तिकडे फोंडयांतील शुद्धीकडे गुंतलेले होते. तेव्हां आश्रमांतील दुसरी दोन प्रचारक मंडळी घेऊन शुद्धिसाहाय्यक मंडळाचे उपाध्यक्ष श्री. व्यंकटेशराव देसाई, श्री. शेखवाळकर वकील व श्री. ज. वि. कामत हे शुद्धीकरणार्थ कर्मळीस उपस्थित झाले. अकरा वाजतां शुद्धिसंस्कारास प्रारंभ झाला. सायंकाळीं ५ वाजण्याच्या सुमारास दादा, लवंदे, व ब्र. माधवबुवा पणजीहून आले. सरकारी धरपकडीला न जुमानतां आश्रमीय मंडळी सर्वत्र वावरतांना पाहून पुष्कळांनीं त्यांच्या धाडसाचें कौतुक केलें. दादा प्रभृति मंडळी कर्मळीस दीड दोन तास थांबली व शुद्धिविधि झाल्यानंतर आश्रमांतील स्वयंसेवक श्री. बंडोपंत फडके व श्री. महालक्ष्मे शास्त्री ह्यांस आवश्यक गोष्टी सांगून कालापूर येथें ठरविलेल्या वेळीं निघून गेली. लोकांचा माधवबुवांस कर्मळीस ठेवून घेण्याचा आग्रह चालला होता; परंतु कालापुरास शुद्धीकरणार्थ त्यांची आवश्यकता असल्यामुळें दादा त्यांस कालापुरास घेऊन गेले. रात्रीं ८।९ वाजेपर्यंत कर्मळीचें शुद्धिसत्र निर्वेधपणें चाललें होतें. ९ वाजण्याच्या सुमारास कॅप्टन् फिलिप् एक सार्जंट व ५।६ पोलीस ह्यांस बरोबर घेऊन शुद्धिमंडपांत घुसला. पोलिसांनीं न्हाव्याला व कांहीं प्रेक्षकांना मारहाण केली. तदनंतर शुद्धिविधि करीत असलेले आश्रमाचे प्रचारक श्री. महालक्ष्मे शास्त्री ह्यांच्याहि गळ्याला हात घालून त्यांस जोरानें फरफटविण्यांत आलें. दुसरे प्रचारक श्री. बंडोपंत हे एका घरांत जेवीत होते त्यांनाहि तेथून ओढून काढण्यांत आलें. गावड्यांना सपाटून धांकदपटशा दाखविण्यांत आला. गांवचे पाटील श्री. नाईक प्रभृतींनीं कॅप्टनला पुष्कळ प्रश्न विचारले, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं व दोघांहि आश्रमप्रचारकांना कैद करून पणजीस आणण्यांत आलें व दुसऱ्या दिवशीं त्यांना पोर्तुगीज हद्दीबाहेर घालवून दिलें गेलें !

कर्मळीप्रमाणेंच कालापुरांतहि आश्रमीय मंडळीचा शोध घेण्यासाठीं दोन पोलीस पाठविण्यांत आले, पण पोलीस येण्यापूर्वीच कर्मळीस घडलेला प्रकार एका जासुदानें येऊन सांगितल्यामुळें पुढील धोके दों लक्षांत घेऊन कालापूरचें शुद्धिकार्य तात्पुरतें रहित करून मंडळीनें अन्यत्र कूच केलें. [ इकडे कर्मळीस नाईकांच्या वाड्यांत राहिलेल्या लोकांचें शुद्धीकरण कसें करावें,.ह्याचा विचार चालला होता. तेव्हां श्री ज. वि. कामत ह्यांनीं शास्त्री बनून 'शुद्धिसंस्कार' पुस्तकाच्या साहाय्यानें राहिलेल्यांचें शुद्धीकरण करावें असें ठरविलें व त्याप्रमाणें तें सर्व काम त्यांनीं पार पाडलें. एक दोन दिवसांनंतर कांहीं प्रमुख गावड्यांनीं कर्मळींत घडलेल्या पोलिसांच्या अत्याचाराविरुद्ध एक अर्ज केला व तो गव्हर्नर साहेबांजवळ जाऊन समक्ष सादर केला. तेव्हां त्यांनीं 'तुम्हांस झालेल्या त्रासाचा मी शोध घेतों; पण तुम्हाला परकीय शास्त्र्यांची

आवश्यकता काय आहे ? येथल्याच मट लोकांकडून तुम्ही आपलीं धर्मकृत्यें कां करून घेत नाहीं ? " अशा अर्थाचे भाषण करुन त्यांची बोळवण केली.

शुद्धि करणाऱ्या 'परकीय मट' लोकांच्या विषयीं साध्या पोलीसपासून तों थेट वरिष्ठ सत्ताधिकाऱ्यापर्यंत इतकी अप्रीति वसत असलेली पाहून, कोणालाहि सखेदाश्चर्य वाटेल; , पण अप्रिय असलेली शुद्धीकरणाची चळवळ बंद पाडण्यास ती एकच एक नामांकित तोड होती. शुद्धिकार्य बंद पाडण्यास तो एकच एक सुलभ उपाय होता; कारण स्थानिक मट शुद्धिकार्य करण्यास पुढें सरसावलेले नव्हते. बरें जरी ते पुढें झाले तरी ते ह्याच सत्तेखालीं नांदावयाचे असल्याकारणानें दटावणीनें व धाकदपटशानें त्यांना गप्प बसविणें कठिण जाणार नाहीं. अर्थात् " शुद्धीला आमचा विरोध नाहीं, पण शुद्धिकार्य करावयाचें तर बाहेरच्या लोकांकडून न करतां तें स्थानिक शास्त्र्यांकडून करा. तुम्हांला तें मिळत नसेल तर सरकारकडून तशी व्यवस्था करतां येईल, " अशा गोष्टी मोठ्या साळसूदपणें सांगण्यांस येऊं लागल्या. वस्तुतः गोमांतकावर, जरी पोर्तुगीज यांची राजसत्ता असली तरी धार्मिक बाबतींत गोमांतक हा हिंदुभारताचा एक अविभाज्य घटक आहे. त्यामुळें अर्थातच धार्मिक गोष्टींची दोन्हीं प्रांतांत होणारी देवघेव नष्ट करणें ह्मणजे हिंदु लोकांच्या धार्मिक भावना दुखविण्याचें महत्पाप करणें होय. पण ही गोष्ट लक्षांत न घेतां बाहेरच्या शास्त्र्यांना गोमांतकांत येण्याची मनाई करण्यांत गोवा सरकारचा अदूरदर्शीपणा होत होता. त्यांच्याच पावलावर पाऊल ठेवून जर ब्रिटिश हिंदुस्थानांतील हिंदूंनीं मोठी चळवळ करुन गोमांतकीयांना ब्रिटिश हद्दींत येण्यास मनाई केली, तर कोणता अनवस्था प्रसंग येईल, ही गोष्ट गोवें सरकारनें लक्षांत घ्यावयास पाहिजे होती. पण हें व्हावें कसें ?

ह्याच वेळीं जबलपूर येथें मान्यवर श्री. तात्याराव केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं 'अखिल भारतीय हिंदू महासभेचें' अकरावें अधिवेशन चालू होतें. आश्रमाचे दोन प्रतिनिधि सभेसाठीं पाठविण्यांत आले होते. हनुमानजयंतीला झालेली ८०० लोकांची शुद्धि व कार्यकर्त्यांची धरपकड तिकडे तारेनें कळविण्यांत आली. तारा आल्या त्या वेळीं 'अखिल भारतीय शुद्धिसंमेलनाची' बैठक श्रीमच्छंकराचार्यांच्या ( डॉ. कुर्तकोटी यांच्या ) अध्यक्षतेखालीं चालू होती. तारा सभेंत वाचून दाखविण्यांत आल्या व आश्रमीय प्रतिनिधींनीं सभेला तिकडील परिस्थिति समजाऊन सांगितली. गोव्यांतील चळवळीला सक्रिय पाठिंबा देण्याचा व हिंदूंच्या धार्मिक स्वातंत्र्यांत ढवळाढवळ न करण्याविषयीं गोवेंसरकारास विनंति करण्याचा ठराव एकमतानें पसार करण्यांत आला. श्रीमान् तात्यारावांनींहि हिंदुमहासभेच्या अध्यक्षपदावरून केलेल्या आपल्या भाषणांत गोव्यांतील शुद्धिचळवळीचा गौरवपूर्वक उल्लेख केला. ते म्हणाले—

" शुद्धीची चळवळ जवळ जवळ हिंदुस्थानच्या सर्व टोंकापर्यंत पोहोंचली आहे. तथापि हिंदिभाग व महाराष्ट्र ह्यांच्या बाहेर तिचा जोराचा प्रसार झालेला दिसत नाहीं. आतांपर्यंत महाराष्ट्रांत व्यापक व सांधिक शुद्धीकरणाची फारशी कल्पना नव्हती; पण नुकतेंच गोवें प्रांतांत असें शुद्धीकरण मोठ्याप्रमाणावर झालें; त्यामुळें अशा चळवळीची आणि तिच्या परिणामाची किंचित् कल्पना लोकांना आली आहे. आजपर्यंत हिंदी खिस्त्यांना परत हिंदुधर्मांत घ्यावें ही कल्पना सुचलीच नव्हती. हजारों



**श्री. रामकृष्ण गोपाळ भिडे**, उपसंपादक-'केसरी'.

( आश्रमीय कार्यकर्त्यांच्या धरपकडीनंतर गोमांतकांतील परिस्थिति समक्ष पाहण्यासाठीं 'केसरी'नें गोमांतकांत पाठविलेले प्रतिनिधी ).



विद्यानिधी **सिद्धेश्वर शास्त्री चित्राव**

अध्यक्ष, महाराष्ट्र हिंदुसभा-पुणें.



धर्मवीर सावरकर बंधुत्रय

बॅ. विनायकराव, डॉ. नारायणराव, श्री. गणेशपंत अथवा बाबाराव.

मार्गाविर्णे एकट्या व्यक्तीला कसें शक्य व्हावें ? गोमांतकाचा प्रश्न जबलपूर येथें सर्वांच्या मनीं मुखीं कसा झाला होता याचें श्रद्धानंदाच्या वार्ताहरानें १९ एप्रील १९२८ च्या अंकांत यथार्थतेनें वर्णन केलें आहे. तो म्हणतो "गेल्या महिन्यांत महाराष्ट्रीय पत्रांत गोव्यासंबंधीं विविध प्रकारची माहिती सविस्तर प्रसिद्ध झाली आहे; पण महाराष्ट्राबाहेर ती जवळ जवळ अज्ञात असल्यामुळें दोन्हीहि वक्त्यांनीं ( श्री. चित्रावशास्त्री व ब्र. क्षीरसागर ) ती संगतवार कथन केली. त्याचा इष्ट असाच परिणाम होऊन मंडपांत, तंबूंत, रस्त्यांत, बाजारांत, जेवतांना, स्टेशनवर, आगगाडींत, ह्याच एका गोष्टीची अगदीं खालचे लोकसुद्धां चर्चा करतांना आढळत. ब्र. क्षीरसागरांना तर कित्येक लोक 'गोवे महाराज' संबोधूं लागले ! " असो.

इकडे गोमांतकांत पोलिसांच्या दंडुकेशाहीमुळें मार्गें बंद पडलेल्या फोंडे महालांतील शुद्धीला श्री हनुमानजयंतीच्या शुभ मुहूर्तावर चांगलेंच तोंड पाहलेलें पाहून, बाकीच्या वाड्यांवरील गावडे मंडळींनींहि, ही संधि हातची न दवडण्याचा निश्चय केला व त्यामुळें शुद्धिकार्याला पुनश्च जोर चढला. तेव्हां गोपाळ गावडयानें (आगुस्तीन) निरनिराळ्या वाड्यांवर फिरून शुद्धीची वर्दी द्यावी व श्री. नाईकांनीं आश्रमांतील मंडळींच्या साह्यानें शुद्धिकार्य उरकून घ्यावें, असा क्रम आरंभण्यांत आला, व त्याप्रमाणें शुद्धिचक्र पुन्हां एकदां सुरू झालें. ह्या व्यवस्थेप्रमाणें, कुंकळ्ये, मंगेशी, कोने, गावठण, आंवाड करमळें, इत्यादि ठिकाणचे शेंकडोशें गावडे हिंदुधर्मांत समाविष्ट केले गेले. यावेळीं श्री. केशव नारायण गाळकर ह्या एका स्वयंसेवकानेंहि प्रस्तुत कामीं साह्य करण्याचें अभिवचन दिलें, व त्याप्रमाणें त्यानें पुढें उत्साहानें व धडाडीनें ठिकठिकाणच्या कामांत भाग घेतला हें त्यास निःसंशय भूषणावहच आहे.

फोंडे महालांतील या शुद्धिसत्रांत कांहीं कांहीं ठिकाणीं पोलीसांनीं बराच धुमाकूळ घातला. एप्रील ८ तारखेच्या दिवशीं सावई येथें सकाळीं तेथील श्री. गणेश रामू भट नवाथे, श्री. श्रीपाद पुंडलीक शेटे आदि उत्साही मंडळीच्या साह्यानें श्री. लवंदे ह्यांनीं १७५ लोक शुद्ध करून घेतले व आणखीहि कांहीं व्हावयाचे राहिले होते. आलें केरी इकडील शुद्धि आटोपून श्री. व्यं. वि. वैद्य, श्री. गाळकर तळावलीकर, मांडारे, विष्णुभट पाटील, रघुवीर कोलवाळकर आदि मंडळी मावईस आली. त्यांच्या पाठोपाठ एक पोलीसांची पार्टीहि 'परकीय शास्त्र्यांचा' शोध घेत घेत आली; पण परकीय शास्त्री यांच्या दृष्टिपथांत न येऊं शकल्यामुळें, सर्व मंडळींना पोलिस चौकीवर चलण्याविषयीं आज्ञा करण्यांत आली. तावडतोब एका शिष्ट गृहस्थानें 'पोलिसाचा हुकुम सर्वांनीं मानलाच पाहिजे' अशी आत्मघातकी सूचना प्रौढपणाचा आव आणून केलीच ! तथापि 'लेखी हुकुम असल्याविना आम्ही कोणीहि चौकीवर येत नाहीं' असा ठणठणीत जबाब इतर मंडळीकडून मिळाल्यावर पोलीस हात हालवीत परत गेला.

असाच प्रकार केरी गांवांतील करमाळें वाड्यावर झाला. ह्या वाड्यावर जवळ जवळ २०० शुद्धिकांक्षी गावडे होते, परंतु ह्या वाड्यावरचा एक नेटीव्ह ख्रिस्ती दारूचें दुकान घालून बसलेला होता, तो ह्यांच्या मार्गांत प्रत्यहीं विघ्नें आणीत होता. तेव्हां तेथील गावड्यांचा प्रमुख मनवेल ह्यास गोपाळानें पुष्कळ गोष्टी सांगून वाटेल तें झालें तरी तूं एकटा तरी शुद्धीस तयार हो असें आग्रहपूर्वक सांगितलें व त्याप्रमाणें त्यानें मान्यता दिल्यावर श्री. शंकरराव नाईकांनीं शुद्धीची सिद्धता केली. श्री. गाळकर श्री. तोटेकर शास्त्री व गोपाळ गावडा ह्यांस घेऊन श्री. नाईक करमळ्यास

गेले. श्री. भांडारेहि वाटेंत भेटले. शुद्धीची कुणकुण लागून दारुदुकानदारानें तावडतोब पोलिसांना बोलावून आणलेंच; परंतु उद्यांचा शुद्धीचा बेत पार.पांडार्वयेचाच, असा मंडळीनीं निर्धार केला. विजयदुर्गचे अग्निपेकी श्री. वे. गोविंदभट उपाध्ये अग्निहोत्री ह्यांच्या घरींच मंडळींनीं तळ दिला होता. दुसऱ्या दिवशी क्षौरादि विधीस प्रारंभ होतांच पोलीस आले व ' दाढी—जटावाले आश्रमीय लोक कोठें आहेत ते आमच्या स्वाधीन करा. ' अशी हाकाटी करूं लागले. श्री. नाईकांनीं त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला; पण तो निष्फळ ठरून सर्वांनाच फोंड्यास चौकीवर चलण्याविषयीं फर्माविण्यांत आलें! त्याप्रमाणें श्री. शंकरराव नाईक, डॉ. गोविंदराव वैद्य, गाळकर, उपाध्ये, तोटेकर, दोन क्षौर केलेले गावडे व न्हावी अशी मंडळी पोलीसांबरोबर निघाली. मंडळी गेल्यावर शुद्धिसमारंभ उरकून घेण्यांत आला. वाटेवर पोलीस अधिकारी तेनेंत साहेब भेटले त्यांनीं गावडे व न्हावी यांस सोडून देऊन बाकीच्यांना चौकीवर नेऊन बसविण्यास सांगितलें. तेथें सर्वांच्या जबान्या झाल्या. सायंकाळीं तीन वाजतां पुनः चौकीवर बोलावण्यांत आलें व सहा वाजतां तुम्ही आतां घरीं जा; पण पुन्हां कळवूं त्याप्रमाणें येथें हजर व्हा, असें बजावून सर्वांना सोडून देण्यांत आलें. पोलीसलीलाच ती! पण तिचा प्रतीकार कोण करणार ? नव्हे तिला नुसतें हंसणार तरी कोण ? परंतु पोलिसांच्या ह्या कृत्यामुळें त्यांच्या दटावणींतील फोलपणा मात्र सर्वांच्या प्रत्ययास आल्याविना राहिला नाहीं; त्यामुळें शुद्धिसत्र अखंडपणें चालूच राहिलें. श्री. बाबलभट तोटेकर, श्री. गणेश भट नवाथे, श्री. दत्ताराम भट अळवणी, श्री. गोविंद भट उपाध्ये, विष्णुभट पाटील आदिक स्थानिक शास्त्री मंडळीनें ह्यावेळीं शुद्धिकार्यांत आनंदानें व उत्साहानें भाग घेतला. शुद्धीचा वणवा सारखा पसरत चालला होता व त्याच्या ज्वाला तिसवाडी व अंत्रूज महालांप्रमाणेंच आसपासच्या महालांनाहि चाटून जाऊं लागल्या. भतग्राम महालांतील पाळी, व सुर्ले येथील लोकांनींहि आपली हिंदुधर्मप्रवेशाची इच्छा प्रदर्शित केली. त्याप्रमाणें ब्र नाथानीं तिकडे जाऊन सावईचे श्री. गणेश भटजी नवाथे, पाळी येथील कार्यप्रेमी दळवी घराणें व सुर्लेचे श्री. फोंडू जगनाथ सुर्लेकर ह्यांच्या बहुमोल साह्यानें शुद्धिसमारंभ पार पडला. खेरीज आत्माराम भट मराठे, दत्तात्रय रामचंद्र सुर्लेकर व गजानन महादेव पाध्ये नाटेकर ह्या गृहस्थांनींहि शुद्धिसमारंभांत प्रामुख्यानें भाग घेतला. स्थळोस्थळीं किरकोळ शुद्धीकरणें चाललींच होतीं. करमळीस चार कुटुंबें शुद्ध व्हावयाचीं राहिलीं होतीं, त्यांनीं रामजयंत्युत्सवाकडे कळविल्यावरून श्री. ज. वि. कामत ह्यांनीं त्यांना मंडळाच्या साहाय्यानें शुद्ध करुन घेतलें. तद्वतच अंत्रूजांतील करमळें बांगाळ, हाडकोली, वाणस्तार प्रियोळ आदि वाडयांवरील लोकांनाहि श्री. शंकरराव नाईक ह्यांनीं उपाध्ये, विष्णुभट पाटील ह्यांच्या साहाय्यानें शुद्ध करून घेतलें. पानवेल येथें मजतीर्थावर ३५ पस्तीस गावडे लोकांना श्री. खवंदे व नाना देशपांडे ह्यांनीं तेथील आश्रमप्रेमी कामत घराण्यांतील मंडळीच्या बहुमोल साहाय्यानें शुद्ध करून घेतलें.

पानवेल येथें लवकरच कामत घराण्यांतील उत्साही विद्यार्थी श्री. वासुदेव कामत वाघ ह्यांनीं शुद्धीकृत गावड्यांकरितां पांडुरंगविद्यालय नामक पाठशाळा आश्रमाच्या विनंतीवरून स्थापन केली करमळी, धुळापी वांधार ताळगांव व कालापूर माडयांत करंजाळ पाळें सावई आदिक ठिकाणींहि चित्रलप्रमाणेंच पाठशाळा स्थापन करण्यांत आल्या व त्यांतून साक्षरतेचें व धर्मसंस्कृतीचें शिक्षण देण्याचा उपक्रम



कालापूर येथील आश्रमीय पाठशाळा.



चिपळ येथील धर्मभास्कर भजनी मेळा.



चिपळ येथील आश्रमीय पाठशाळा.

प्रचलित करण्यांत आल्या, ह्या शाळांतून मुलांमुलींप्रमाणेंच प्रौढांकरतांहि रात्रीचे वर्ग काढण्यात आले; व तेथें भजन, सामुदायिक प्रार्थना, पुराण, वाचन, आदिक गोष्टी सुरु करण्यांत आल्या. तद्वतच निरनिराळे धार्मिक उत्सव व सत्यनारायणकथाहि ठिकठिकाणीं करण्यांत येत; नवहिंदूंच्या ह्या उत्सवांत सर्व हिंदुलोक मोठ्या आनंदानें व आस्थेनें भाग घेत; सत्यनारायणाच्या कथेला मंडळी हजारोंनीं जमत; म्हारदोळ येथें असाच एक मोठा समारंभ देवीस च्या दिवशीं साजरा करण्यांत आला, त्यावेळीं सांगें येथील आर्यविज्ञान मासिकाचे विद्वान् संपादक श्री. ज्योतिर्भूषण पाटणकर शास्त्री यांनीं अत्यंत सुश्राव्य व प्रासादिक असें प्रवचन कोंकणी भाषेतून केलें. ह्या अशा विविध प्रकारच्या कार्यक्रमामुळें शुद्धीकृत लोकांचा आनंद गगनांत मावेनासा होई असो.

शुद्धीकरण व पाठशाळांयांचें कार्य ह्याप्रमाणें एकीकडून चाललें असतांच शुद्धीकृतांची नोंदणी करुन त्यांना हिंदु नांवें देणें हें काम आश्रमीय प्रचारक श्री. नाना देशपांडे करीत व त्यांच्या विवाह नोंदणीला त्रास न होईल अशी खटपट रेजिस्त सिविलांत करणें हें काम श्री लवंदे करीत होते. एके दिवशीं वाडयांत नांवाच्या वाडयावर श्री. देशपांडे शुद्धीकृतांस ह्याप्रमाणें नांवें देत असतां एकाएकीं दुईस नांवाचा एक मास्तर आला व त्यानें लढालढी करुन नानाना पोलीसांच्या स्वाधीन केलें. थोडीशी मारहाण केल्यावर पोलिसांनीं नानांना पणजींत आणलें. तेथेंहि त्यांचा पोलिसांकडून छळ झाला. नंतर दुसऱ्या दिवशीं त्यांना कॅसलरॉकला पोर्तुगीज सीमेबाहेर नेऊन सोडण्यांत आलें. श्री. लवंदे ह्यांच्याहि पाठीमागचा पोलिसाचा ससेमिरा सुटला नव्हता.

ह्याप्रमाणें गोष्टी होतां होतां मे महिना संपत आला. जबलपूरच्या हिंदुमहासभेनें गोमांतक शुद्धिप्रकरणाची चौकशी करण्याकरितां नियुक्त केलेलें शिष्टमंडळ गोमांतकांत केव्हां येतें इकडे सर्वांचे डोळे लागून राहिले होते. अपरिहार्य कारणामुळें शिष्टमंडळाचा एक एक दिवस लांबणीवर पडत चालला होता. अखेरीस मेची २४ तारीख निश्चित झाल्याचें कळविण्यांत आलें. गोमांतकांत येण्यापूर्वी शिष्टमंडळाला मुंबईस असलेल्या पोर्तुगीज सरकारच्या वकिलास भेटण्याची आवश्यकता दिसली व त्याप्रमाणें श्री. तात्याराव केळकर व डॉ. मुंजे प्रभृतींनीं गोवेसरकारच्या वकीलाची मुंबईस गांठ घेतली. वकीलानें मंडळींशीं सन्मानपूर्वक वर्तन करुन अत्यंत मनमोकळेपणानें चर्चा केली व गव्हर्नर जनरलांचे मुख्य कार्यवाह श्री. आल्मेईद ह्यांना एक परिचयपत्रहि त्यानें दिलें. हें परिचयपत्र घेऊन शिष्टमंडळ पुण्याहून लोंढ्यास मेच्या २४ तारखेस आलें. शिष्टमंडळांत श्री. तात्याराव केळकर, डॉ. मुंजे, विद्यानिधि चित्राव शास्त्री, शिवणीचे जठार वकील, हैद्राबादचे धर्मवीर वामनराव नाईक, कऱ्हाडचे दानशूर पांडुआण्णा शिराळकर, डहाणूचे यंत्रशास्त्रज्ञ श्री. दत्तोपंत गोगटे, मुंबई प्रांतिक हिंदुसभेचे कार्यवाह श्री. नवरे, व केसरी कचेरींतील श्री. प. वि. महाजन हे सद्गृहस्थ होते. आश्रमाच्या वतीनें ब्र. क्षीरसागर हे शिष्टमंडळाबरोबर होते. लोंढ्यावर श्रीमन्महाराज एका आश्रमवासीसह अगोदरच येऊन राहिले होते. येथें शिष्टमंडळाचें आश्रमाकडून स्वागत करण्यांत आलें. भोजनोत्तर श्रीमन्महाराजांशीं शिष्टमंडळाची थोडीशी बोलाचाली झाली, व दुपारच्या गाडीनें शिष्टमंडळ गोमांतकांत गेलें. कॅसलरॉकपर्यंत श्रीमन्महाराज येऊन परत लोंढ्यास गेले.

गोमांतकांतून श्री. शंखवाळकर वकील, श्री. यशवंतराव सरदेसाई, श्री. ज. वि. कामत, श्री. भास्कर हेगडे देसाई आदिक सद्गृहस्थ सामोरे आले होते.

कॉलेम स्टेशनपासून पोर्तुगीज हद्द लागते. ह्याच स्टेशनावर प्रत्येकाची ' नाडीपरीक्षा ' पो. सरकारी डॉक्टरकडून होत असते. नित्याच्या शिरस्त्याप्रमाणे डॉक्टर महाशय आले व त्यांनी शिष्ट मंडळापैकीं श्रीमान् तात्याराव केळकरांची तेवढी नाडी तपासली व ते पुढें निघून गेले. तेव्हां विनोद प्रिय तात्याराव ह्या गोष्टीवर कोटीक्रम लढवून ह्मणाले " प्रस्तुतकालीं हिंदुसमाजांतील प्रत्येक व्यक्तीची एकच नाडी वहात आहे, हें जाणूनच डॉक्टरनें माझी नाडी तेवढी तपासली ! "

कॉलेमपासून प्रत्येक स्टेशनावर मंडळाच्या दर्शनास लोकांच्या झुंडीच्याझुंडी येत होत्या व शिष्ट-मंडळाचें धन्यतापूर्वक स्वागत करण्यांत येत होतें. मडगांव येथें तर अपार जनसंमर्द लोटला होता. हिंदुधर्माच्या जयजयकारानें सर्व वातावरण अगदीं दुमदुमून गेलें होतें. शिष्टमंडळाची मडगांवांतून फटाक्याच्या कडकडाटांत प्रचंड मिरवणूक काढण्यांत आली. मंडळी वाटेंत विठ्ठलमंदिरांत देवदर्शन घेऊन हळू हळू दामोदर विद्याभुवनांत आली व तेथें समस्त गोमांतकीयांच्या वतीनें मानपत्र समर्पण करण्याचा समारंभ श्री. केंकरे ह्यांच्या अध्यक्षतेखालीं मोठ्या थाटानें पार पडला. गोव्यांतील स्थळोस्थळींच्या निरनिराळ्या संस्थेच्या वतीनेंहि शिष्टमंडळाचा ह्याच वेळीं जाहीर सन्मान करण्यांत आला. मानपत्राला उत्तर देतांना माननीय श्री. ' तात्याराव केळकर ' म्हणाले; " व्यक्ती प्रमाणेंच धर्माला शरीर, मन व आत्मा हीं असतात. जिवंत राहावयाचें असेल तर त्या तिहींची योग्य काळजी घ्यावयास पाहिजे. त्यांतल्या-त्यांत शरीराचे रक्षणावर मनाचें व आत्म्याचें रक्षण अवलंबून असतें; तत्वज्ञान हा आत्मा तर संख्या-बल हें धर्माचें शरीरबल आहे, अर्थातच संख्याबल वर्धन करणारें शुद्धीकरण हें धर्माचें शरीर रक्षण करणारें साधन आहे. शुद्धिकार्याला राजकारणाचे हेतू चिकटविणें योग्य होणार नाहीं, हीच गोष्ट स्पष्ट करण्याकरितां व शुद्धिकार्यात व्यर्थ उपस्थित होत असणाऱ्या, अडीअडचणींचें निराकरण करण्याकरितां आम्ही गव्हर्नरसाहेबांची गांठ घेणार आहोंत, " तदनंतर डॉ. मुंजे ह्यांचें नित्याप्रमाणें दणदणीत भाषण झालें. श्री. चित्राव शास्त्री, श्री. वामनराव नाईक, श्री. जठार वकील व श्री. पांडु अण्णा शिराळकर ह्यांचीहि समयास अनुरूप अशीं भावनोद्दीपक भाषणें झालीं. शिष्टांच्या भाषणानंतर डंगुज महालांतील गावड्यांचा पुढारी गोपाळ ह्यानेंहि अत्यंत रसभरित व विनोदात्मक असें कोंकणी भाषेंत खालील आशयाचें भाषण करून श्रोतृवृंदाला प्रफुल्लित करून सोडलें. तो म्हणाला ' पुनः आपल्या धर्मांत येण्याचा हेतु आज ४०० वर्षांनीं सफल होत आहे, याबद्दल आम्हांला अत्यानंद होत आहे. ह्या उपकारासाठीं मसुरआश्रमाचे आम्ही अत्यंत आभारी आहोंत ! आम्ही हिंदुधर्मांत परत जाऊं नये म्हणून आमचीं मनें वळविण्याचे पाद्र्यांनीं व पोलीस अधिकाऱ्यांनीं शिकस्तीचे प्रयत्न केले. ' उन्नतावस्थेंत पोहोंचलेल्या खिस्ती धर्मांतून अवनत हिंदुधर्मांत जाऊन स्वतःची अधोगति करून कां घेतोस,' असा मला तिल्हदा-साहेबांनीं प्रश्न विचारला असतां मी उत्तर दिलें कीं, हिंदुधर्म अवनत असला तरी तो माझ्या वाडवडि-लांचा धर्म असल्यामुळें त्याचा स्वीकार करून त्याला उन्नतावस्थेस आणणें हें माझें कर्तव्य आहे !' ' ज्या धर्मांत मृत माणसाला निर्दयतेनें जाळतात, त्या धर्मांत परत जाऊन स्वतःची हानि करून कां घेतोस !' असें विचारलें असतां मीं उत्तर दिलें कीं, ' खिस्ती धर्मांत एका माणसाला पुरलेल्या खाड्यांतच

त्या माणसाला पुरतात ! याप्रमाणें कृमीकीटकांनीं बुजबुजलेल्या एकाच जागीं आपल्या जिवल्या णसास पुरुन तुम्ही असल्या हातानें त्याला नरकांत घालतां त्यापेक्षां माझा हिंदुधर्म कितीतरी ा !' 'हिंदुधर्मात उच्च नीच भाव फार असल्या कारणानें तुला कोणी पंक्तीत जेवावयास घेणार नाहीं. वा तुझ्याशीं कोणी सोयरीक करणार नाहीं, ' असें त्यानें म्हणतांच मी म्हणालों कीं, ख्रिस्ती धर्मांत तरी आह्मांला समानतेच्या नात्यानें कोठें वागवितात ? आज ४०० वर्षांत तुह्मीं आमच्याशीं तीशा सोयरिका केल्या ? आज तरी तुह्मी मुलगी आह्मांला देण्याची किंवा आमची मुलगी करून याची तुह्मी तयारी आहे काय ?' ह्या माझ्या प्रश्नाला त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. शेवटीं शुद्धि-धीच्या चेष्टा करण्यासाठीं तो मला ह्मणाला कीं, 'शुद्धिविधीच्या वेळीं तुह्मी एवढा अग्नि पेटवितां त्याच्या गानें ख्रिस्ती धर्माशीं असलेला तुमचा संबंध कसा नष्ट होऊं शकतो ?' मी ह्मणालों ' एक मेणबत्ती वून तुह्मी अगदीं जवळचें भावा बहिणीचें, नवराबायकोचें नातें देखील तोडूं शकतां ! मग ह्या होम-डांत ख्रिस्तीधर्माशीं असलेला संबंध जळून खाक होत असेल ह्यांत संशय कसला ! " ह्या भाषणानंतर . यशवंतराव देसाई ह्यांनीं समस्तांचे आभार मानल्यावर हा संस्मरणीय समारंभ समाप्त करण्यांत आला. ी श्री. सुकेरकरांच्या बंगल्यावर मुक्काम करण्यांत आला. दुसऱ्या दिवशीं सारस्वत समाज, हराळे समाज स्थानिक संस्थांना भेटी देऊन शिष्टमंडळ तिसवाडी महालांतील शुद्धीकृतांना दर्शन देण्यासाठीं गेलें. ठें येथील तीन चारशें गावडे स्वागतार्थ सामोरे आले व भजन करीत करीत त्यांनीं मंडळीला गांत नेलें. " रघुपति राघव राजाराम ! पतितपावन सीताराम !! " हें तुरावर व तालावर चाललेलें त्यांचें र भजन ऐकून शिष्टमंडळाला मनस्वी आनंद वाटला. देवळांत शिष्टांनीं सर्वांस हिंदुधर्माचा निर्भयतेचा श सांगितला. श्री. लवंदे ह्यांनीं कोंकणी भाषेंत तो संदेश सर्वांना विदित केला व पाद्यांच्या यांत पुनश्च अडकलेल्या जुने मनवेलला शिष्टांना प्रार्थना करून स्वधर्मांत स्वतःस मिळवून घेण्यास गेतलें. त्याप्रमाणें जुने मनवेलनें शिष्टांची क्षमा मागून आपल्याला आपल्या धर्मांत घेण्याविषयीं प्रार्थना यावर त्याचें शुद्धिकार्य पणजीस ठरविण्यांत आलें.

तदनंतर मंडळी पुढें काळापूर येथें गेली. तेथें तरवारीचे पट्टे खेळत खेळत शिष्टमंडळाची ी मिरवणूक काढण्यांत आली. गावड्यांचा तो अपूर्व उत्साह पाहून मंडळीला धन्यता वाटली. गतासाठीं उभारलेल्या खासमंडपांत शिष्टमंडळाचें आदरातिथ्य करण्यांत आलें. तेथें समयोचित भाषण रां. श्री. गोपाळराव नरीट, व विठ्ठल गावडा ह्यांनीं शुद्धिकार्यार्थ केलेल्या अविश्रांत परिश्रमा-ल त्यांचा शिष्टमंडळाकडून प्रेमपूर्वक गौरव करण्यांत आला. येथून मंडळी कालांपूरचे श्रीमंत ीनदार लोलाबाबा केंकरे ह्यांच्या घरीं आदरसत्कार स्वीकारुन ताळगांवाकडे गेली. ताळगांवला उत्साहसागराला तुफान भरती आल्याप्रमाणें झालें होतें. हजारों गावडे शिष्टमंड-ळाच्या स्वागतार्थ सामोरे आले. त्यांत उभारलेल्या विस्तीर्ण व शोभिवंत मंडपांत ळी वाजत गाजत मिरवत नेण्यांत आली. श्री. घोडेकर ह्यांनीं अत्यंत परिश्रम घेऊन ----ी व्यवस्था उत्तम प्रकारें ठेवली होती. उपहार वगैरे झाल्यावर मंडळी मंडपांत गेली.

प्रथम येथील आश्रमीय पाठशाळेंतील गावडयांच्या मुलांनीं स्वागतपर पद्य म्हटल्यानंतर श्री. खेंडे ह्यांनीं गावडयांच्या तर्फेचे मानपत्र वाचून दाखविलें तें असें:—" हिंदुमहासभेच्या शिष्टमंडळानीं ह्या ठिकाणीं येऊन आमच्या प्रफुल्लित अंतःकरणाला ऊत आणला ह्याबद्दल आम्ही राळगांवचे शुद्ध गावडे बंधू आपले अत्यंत ऋणी आहोंत ! आपल्या पुढील भेटीच्या वेळीं दोनलाख लोक शुद्ध झाले दिसतील ! ह्या आश्वासनापेक्षां आम्ही आपल्याला कोणत्या शब्दांनीं मान द्यावा, हेंच आम्हाला समजत नाहीं. आपण आजपर्यंत मुसलमान लोकांना हिंदू करून घेण्याचे पुष्कळ प्रसंग पाहिले असतील, पण ख्रिश्चन लोकांना हिंदू करून गावचेगांव घेतल्याचे उदाहरण हें आपल्या महासभेच्या इतिहासांत पहिले असावें व त्याबद्दल ब्रह्मचर्याश्रमानें आम्हांस ऋणी करून आपल्या ब्रिटीश हिंदुस्थानाशीं हा दुवा जोडून दिला. त्याबद्दल महासभेचे व ह्या शिष्टमंडळाचे आम्हीं कसे उतराई व्हावें हें समजत नाहीं. आपले व्यक्तिशः अधिकार व योग्यता फारच मोठी असल्यामुळें ह्या शिष्टमंडळांचा आदर करण्याची सुसंधि आम्हांस मिळाली, ह्याबद्दल प्रभु रामचंद्राचे-आम्हीं अत्यंत ऋणी आहोंत ! हें मानपत्र अर्पण करीत आहोंत हे विनंती. "

मानपत्र-समर्पणानंतर शिष्ट मंडळींचीं स्फूर्तिदायक भाषणें झालीं; व मंडळी पणजीस वस्तीस आली. ह्याच दिवशीं शुद्धिविरोधकांनीं " शिष्टमंडळी लवकरच तुरुंगांत जाणार, चिंबलचा कार्यक्रम रद्द झाला आहे " अशा नानाप्रकारच्या कंडया पिकविल्या, अर्थातच चिंबल येथें मंडळी आली तेव्हा सर्वत्र सामसूमच होतें. वस्तुतः सर्वस्थळांपेक्षां चिंबल येथें विशेषच आनंद व उत्साह दिसावयाचा, परंतु वरील सारखी माशी शिकल्यामुळें अथवा शिकविल्यामुळे चिंबलकर गावडे उदास अंतःकरणानें घरोघर बसून राहिले होते; परंतु अकल्पितपणें शिष्टमंडळ आलेलें पाहतांच सर्वत्र माणसें पिटाळून तसें कळविण्यांत आलें व हांहां म्हणतां श्रीभगवतीच्या तळीवरील मंडपांत हजारों गावडे जमा झाले मंडप वगैरे शृंगारून सर्व सिद्धता आगाऊ झालेलीच होती. गावडयांच्या धर्मभास्कर भजनीमेळ्याचें कर्णमधुर भजन लवकरच सर्वांना संतोषित करूं लागलें. मंडळींची जमवाजमव झाली व शिष्टमंडळीला भजन करीत करीत मंडपांत नेण्यात आलें. हिंदुधर्माचा प्रचंड जयजयकार हजारो मुखांतून एकसारखा होऊं लागला. शिष्टमंडळ स्थानापन्न झाल्यावर श्री. रामभाऊ खंदे ह्यांनीं समस्त गावडयांच्या तर्फे शिष्टमंडळास मानपत्र समर्पण केलें व नंतर शुद्धीचा साद्यंत इतिहास सांगितला. बोलतां बोलतां जेव्हां ते चिंबल येथील शुद्धीकरणानंतरच्या अभूतपूर्व कल्याणारादणाच्या उत्सवाची हकीगत व तदनंतर आश्रमीय कार्यकर्त्यांच्या धरपकडीमुळें गावडे लोकांची झालेली अत्यंत शोकाकुल मनःस्थिति वर्णन करूं लागले, तेव्हां त्यांना दुःखाचा आवेग आवरणें अशक्य झालें. सद्गदित कंठानें, साश्रुनयनांनीं व अस्फुट शब्दांनीं त्यांनीं आपला मनोदय कसाबसा व्यक्त केला; पण ती अंतःकरणाची भाषा सर्व अंतःकरणांना आपोआप समजली ! सर्व श्रोतृवृंद त्यांच्या भाषणाशीं एकतानता पावला असल्यामुळें सर्वांच्याच डोळ्यांत अश्रु उभे राहिले. " अपि ग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदयम् " ह्या भवभूतीनें केलेल्यां वर्णनाचा हृदयस्पर्शी देखावा त्यावेळीं साक्षात् अनुभविण्यास मिळाला. श्रीमान् तात्याराव केळकर म्हणजे कदापिहि भावनाविवश व्हावयाचे नाहींत अशी त्यांची ख्याति आहे. पण ह्या वेळीं भावनेनें त्यांच्यावर जय मिळविला. त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले. कंठ गहिंवरला, हुंदका आवरेना ! ह्याच अवस्थेंत ते बोलावयास उ



चिंबल येथें अ. भा. हिं. म. सभेच्या शिष्ट मंडळाचें आगमन.



अखिल भारतीय हिंदु महासभेच्या शिष्टमंडळाचें म्हापस्यास आगमन.

ले. पण तोंडांतून शब्दच फुटेना ! तात्यारावांची जेथें अशी अवस्था झाली, तेथें बाकीच्या भावना- न मंडळींची काय मनःस्थिति झाली असेल, ह्याची कल्पनाच करावी ! क्षणभरानें डोळे पुशित पुशित याराव म्हणाले "आजपर्यंत आनंदाचे प्रसंग मी पुष्कळ पाहिले आहेत, परंतु असला प्रसंग हा लाच आहे ! कोणी कोणास देऊं शकत नाहीं, अशी धर्माची जोड ह्या गावड्यांस मिळाली गून मला आनंद वाटत आहे. धर्माचा वियोग हा कोणत्याहि वियोगापेक्षां अधिक प्रद आहे. कोणाचा धर्म हिरावून घेणें ह्मणजे त्याचें सर्वस्व हिरावून घेणें आहे ! हासाची पुनरावृत्ति होते असें म्हणतात, तें खोटें नाहीं. रामदासांचें चरित्र आज मसुरकरांचे रीं आपणांस पाहतां येईल. ज्या स्थळीं पोर्तुगीजांनीं प्रथम बाटाबाटी केली, त्या स्थळीं पहिला : णसमारंभ व्हावा, हा योगायोग संस्मरणीयच आहे म्हणून येथें कांहीं तरी प्रचंड स्मारक उभा- असें मी सुचवितों. तदर्थ लागेल तें साहाय्य आम्ही बाहेरून पुरवूं. आतां जें मानपत्र आह्मांस दि लें, त्यावर वास्तविक आमचा अधिकार नाहीं. ज्यांनीं ह्या महाकार्यामागें स्वार्थत्यागपूर्वक ... परिश्रम घेतले, त्यांच्याकडेच हें मानपत्र गेलें पाहिजे व त्यांच्याकडे देण्यासाठींच म्हणून आह्मीं स्वीकार करीत आहों" श्री. तात्यारावांच्या वरील आशयाचें भाषण झाल्यावर डॉ. मुंजे श्री. शास्त्री, श्री. वामनराव नाईक, श्री. ... र वकील व श्री. पांडुअण्णा शिराळकर, ह्यांचीहि समया- भाषणें झालीं. डॉ. महाशयांनीं स्मारकाजवळ शरीरबल संवर्धनार्थ आखाडाहि काढण्यांत यावा असें ग्रहपूर्वक सांगितलें. धर्मवीर वामनराव नाईक व श्री. पांडुअण्णा शिराळकर ह्यांनीं प्रत्येकीं पांचशें यांची उदार देणगी स्मारकाला देण्याचें ह्याच वेळीं घोषित केलें. श्री. ज. वि. कामत ह्यांनीं कर्णीतून वरील सर्व भाषणांचा सारांश गांवड्यांस निवेदन केला. नंतर गांवड्यांच्या वतीनें शिष्ट- ळीचे आभार मानतांना ब्र. क्षीरसागर ह्मणाले:—

मागें जें उत्तर दिलें गेलें होतें व जें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालें होतें तेंच ह्या वेळीं वाचून आल्यावर गव्हर्नरसाहेब ह्मणाले " सरकारचें आणि माझें स्व...चें धोरण ह्याहून निराळें असणें नव्हतें. धार्मिक बाबतींत पूर्ण ताटस्थ्य राखण्याची वृत्ति मी कशी बाळगली आहे ह्याची साक्ष ४० वर्षांची कारकीर्दच देईल ! !" ' मग हिंदुप्रचारकांना सीमापार करण्यास काय कारण घडलें ' असें तात्यारावांनीं विचारिलें. तेव्हां गव्हर्नर साहेब ह्मणाले " ह्या विषयासंबंधीं तक्रारी आल्या आणि त्यांना अनुसरुन शोध चालला होता; व नित्याप्रमाणें तो गुप्तपणें चालला होता. हक्कांस बाधा झाल्याबद्दल त्यांनीं अथवा एकाद्या गोमांतकीय हिंदूनें तक्रार केली असती तर साहेबांनीं चौकशी करण्यास लावलें असतें, आणि ती संपेपर्यंत गुप्त राखण्यांत आली अ " प्रचारकांविरुद्ध कांहींच गुन्हा शाबीत झाला नाहीं तर त्यांना शुद्धिकार्य करण्याकरितां पुनः येईल काय ? " असा तात्यारावांनीं प्रश्न केला. तेव्हां गव्हर्नर साहेब ह्मणाले "पोर्तुगीज कायदे राज्यकारभाराची पद्धति ह्यांच्या मर्यादा सांभाळून धार्मिककार्य करण्यासाठीं ब्रह्मचर्याश्रमांतील मं जर गोव्यांत यावयाचें असेल तर प्रथम त्यांनीं गव्हर्नरांची अथवा योग्य अधिकाऱ्याची गांठ आश्रमाचे लोक परकी असल्यानें त्यांना येथील परिस्थितीचें अज्ञान असणें संभवनीय आहे. अधिकारी त्यांना योग्य ती माहिती पुरवूं शकतीलच, आणखी सल्लामसलतहि देतील. पण हें सर्व अथ धार्मिक तटस्थपणा भंग न होईल अशा रीतीनेंच आणि गोव्यांतील भिन्न भिन्न धर्मीयांत जो एकोपा तो कायम रहावा ह्याच हेतूनें करण्यांत येईल." ह्याप्रमाणें गव्हर्नर साहेबांशीं संभाषण झाल्यावर शिष्ट जनरल सेक्रेटरी डॉ. कार्लोस आल्मेईद ह्यांच्याशींहि बराच वेळ संभाषण करुन मुक्कामीं परत आले.

ह्यानंतर करमळीचा कार्यक्रम आंखला होता, तिकडे मंडळी सायंकाळीं साडेचार वाजतां नि मोटारींतून करमळीकडे जात असतांना वाटेवरच लोकमान्य टिळकांचे कनिष्ठ चिरंजीव श्री. श्रीधरपंत मांबुर्डा स्टेशनवर आगगाडी खालीं उडी घेऊन आत्महत्त्या केल्याचें दुःखदवृत्त पुण्याहून आलेल्या तारे समजलें. लोकांचा उत्साहभंग न व्हावा म्हणून श्री. तात्यारावांनीं पुढील कार्यक्रम उरकून घेण्य अनुज्ञा दिली. पानवेल येथें ' पांडुरंग विद्यालयांत ' शिष्टाचें स्वागत गावड्यांनीं केलें. श्री. देव वामन कामत बाघ यांच्या नेतृत्वाखालीं गावड्यांनीं विद्यालय व त्याच्या आसपासचा प्रदेश चांग शृंगारला होता. गावड्यांच्या कल्याणासाठीं अहर्निश झटणाऱ्या त्या कामतांच्या सर्व कुटुंबियांवर विद्याल विद्यार्थ्यांचें तद्वतच त्या विद्यार्थ्यांच्या आईबापांचेंहि अकृत्रिम प्रेम पाहून सर्वांना समाधान वाटलें. मंडळी थेट करमळीत गेली. दर्शनोत्सुक गावड्यांचा प्रचंड जमाव शिष्टमंडळीची मोठ्या आतु वाट पहातच होता. मंडळाच्या स्वागतासाठीं मुद्दाम विस्तीर्ण मंडप उभारला होता. गुढ्या पताका लावून रस्ते शृंगारण्यांत आले होते. मोटारी येऊन थडकतांच स्वागतार्थ उपस्थित असले लोकांनीं हिंदुधर्माच्या प्रचंड जयजयकारांत व फटाक्यांच्या कडकडाटांत शिष्टमंडळाचें स्वागत कासारपालच्या हिंदु बँडच्या सुस्वर आवाजांत मोठ्या थाटानें मिरवत मिरवत मंडळी सभास्थानीं अ प्रथम भगव्या झेंड्यांचा वंदनविधि उरकण्यांत आला. मुलांमुलींनीं ईशस्तुतिपर पदें ह्मटलीं. डॉ. महाशयांना ह्याच वेळीं एक कवितेंत गुंफलेली विनंती करण्यांत आली ती अशीः—

Republica
esa é neutra
ria religiosa;
sso, não so'
representante
sta Colonia,
mbem como
educado, sou
e escrupuloso
ntir a todos
a liberdade
."



"कायद्यानें प्रस्थापित झालेल्या सरकारला धार्मिक प्रश्नांशी कोणतेंहि कर्तव्य नाहीं आणि त्या सरकारचा प्रतिनिधि जो गव्हर्नर त्याला सर्व धर्मांना पूर्ण स्वातंत्र्य देण्याच्या तत्वाचा पुरस्कार करावयाचा असतो. कायद्याचा निर्बंध म्हणून अधिकारी या नात्यानें व सुशिक्षित मनुष्य या नात्यानेंहि प्रस्तुत स्वातंत्र्याचें संरक्षण करण्याविषयीं मी पूर्ण दक्ष असतो. धार्मिक बाबतींत पूर्ण ताटस्थ्य राखण्याची वृत्ति मी कशी बाळगली आहे ह्याची साक्ष माझी ४० वर्षांची कारकीर्दच देईल"



RESIDENCIA DO GOVERNO,
NOVA-GOA.

Pedro Amorim
Governador G.
Geral

—पेद्रो फ्रांसिस्क मासानु द अमोरिम.
पोर्तुगीज-हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल.

चाल [ हे प्रभो विभो अगाध ]

हे धर्मवीरा हिंदुबंधु तुजं विनवीं ।
निज धर्म पताका उभवीं ॥ ध्रु० ॥
प्रिय धर्मावरचा घाला । पाहुनी जीव घाबरला ।
पेटाळुनी लावीं त्याला । तव पराक्रमाला दावीं ॥ १ ॥
हा इकडे खिस्तीधर्म । तो तिकडुनी ये इस्लाम ।
यामुळें हिंदु हो नरम । नवजीव त्याला देई ॥ २ ॥
परधर्मीयांचे घाले । सोसुनी त्रस्त बहु झाले ।
हे हिंदुबांधव सगळे । तूं होई यांचा वाली ॥ ३ ॥

ह्यानंतर प्रो० वैकुंठ शंकर नाईक ह्यांनीं सर्वांचें स्वागत केल्यावर सभेचे नियोजित अध्यक्ष भारदस्त श्री० हेगडे देसाई ह्यांनीं भाषण केलें. त्यांत त्यांनीं करमळीगांवचा पूर्वेतिहास, गोव्यांतील चळवळींतील करमळीचें प्रमुखस्थान, गोव्याला भूषणभूत असलेले कै. शंकरराव नाइक व त्यांचे चिरंजीव ह्यांची सार्वजनिक हितपरता, करमळीचें बिकट शुद्धिकार्य, मसूर आश्रमांतील प्रचारकांनीं शुद्धिकार्यार्थ सोसलेले हाल, कै. नायकांचे चिरंजीव, घुमटकर, थोटे, पुरुषोत्तमशेट प्रभृति स्थानिक मंडळींनीं सोसलेली झीज, श्री. अनंत शंकर नायक यानें शुद्धिकार्यार्थ पाटीलकीवर मारलेली लाथ, कृष्णा काणकोणकराची धडाडी इत्यादि गोष्टींचा निर्देश केला. व शिष्टमंडळाच्या जयजयकारांत आपलें भाषण संपविलें. नंद नंतर श्री. हेगडे देसाई ह्यांनीं करमळीचा पूर्वेतिहास वर्णन करतांना सांगितलेल्या " शेणलें गोरूं करमळें तळ्यांत" ह्या करमळीला अनुलक्षून असलेल्या गोमांतकांतील प्रचलित म्हणीवर विनोदपूर्ण श्ले करून, स्वागताला उत्तर देतांना श्री.तात्याराव केळकर म्हणाले "ख्रिस्तीधर्मरूपी तळ्यांत सांडलेला गावड्यांचा समाज करमळींतील पाण्याच्या प्रसिद्ध तळ्यांत हरवलेल्या गुरांप्रमाणें न मरतां ४०० वर्षांचा दीर्घ काल लोटला असतांहि, आपल्या शुद्धभावनेनें जिवंत राहूं शकला, म्हणूनच तो आम्हांस लाभूं शकला." ह्याच प्रमाणें डॉ० मुंजे, चित्राव शास्त्री प्रभृतींचीं सर्वांना आश्वासित करणारीं भाषणें झालीं व त्यांचा अनुवाद कोंकणींतून श्री. ज. वि. कामत ह्यांनीं केला. नंतर श्री. लवंदे ह्यांनीं मंडळाचे आभार मानले नंतर गोव्यांतील पहिलेच हिंदु बँडवाले श्री. नाईक ह्यांना त्यांच्या निरपेक्ष कामगिरीबद्दल सुवर्ण पदक अर्पण करण्यांत आलें व अल्पाहार वगैरे होऊन मंडळी पणजीस ठरलेल्या सभेसाठीं निघून आली शिष्टमंडळ सभास्थानीं आलें. तेव्हां श्रीमहालक्ष्मीचें देऊळ हजारो लोकांनीं फुलून गेलें होतें पणजीचे मान्यवर पुढारी श्री. दादाराव वैद्य यांची अध्यक्षस्थानीं योजना झाल्यावर त्यांच्या विनंतीवरून श्री. तात्याराव केळकर टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत बोलावयास उठले. ह्या वेळचें तात्यारावांचें भाषण सर्व दृष्टींनीं अपूर्व असेंच झालें असल्याकारणानें जरा विस्तारपूर्वक येथें त्याचा उल्लेख करणें भाग आहे.

"आतांपर्यंत शुद्धीकृत लोकांसमोर आम्ही अनेक स्थळीं बोललों, पण येथील लोकसमुदाय राजधानींतील अर्थात् सुसंस्कृत आहे. येथें गावडे नसल्यानें शुद्धीकरण झालें नसेल, पण राजधानी या दृष्टीनें हेंच स्थळ बोलण्यास अधिक योग्य असें मला वाटतें. बाहेरगांवीं आम्ही काय बोललों

राजकर्त्यांना कळले नसेल; पण येथें कांहींतरी तशी योजना असावी आणि नसल्यास आमचें बोलणें कोणत्यातरी रीतीनें सरकारच्या कानांवर जावें, अशी आमची इच्छा आहे गोमांतक हा हिंदुस्थानचा अविभाज्य घटक असल्यामुळें हिंदुस्थानांतील कोणत्याहि चळवळीचे वारा येथें वाहात यावा यांत नवल नाहीं. येथील लोक स्वराज्यांत आहेत. स्वतःच्या सत्तेखाली आहेत. आम्हांप्रमाणें परतंत्र नाहींत. तथापि धर्म, भाषा, वंश ह्या गोष्टी उभयतांस समान आहेत. चारशे वर्षांपूर्वी येथील हिंदूंना पोर्तुगीज लोकांनीं जुलूम जबरदस्ती व अनन्वित छळ करून बाटविलें. प्रत्येकाचा धर्म प्रत्येकाला प्रिय असल्यामुळें, उगाच सुखासुखी कोण बाटणार ? त्यांना त्यांच्या इच्छेविरुद्ध बाटविण्यांत आलें असलें पाहिजे आणि ही गोष्ट पुष्कळ पोर्तुगीज ग्रंथकारांनीहि मान्य केली आहे. अर्थात् शेंकडा नव्याण्णव लोक तरी छळाबळानें बाटविले गेले आहेत. आपल्या धर्मीयांची लोकसंख्या वाढविणें हें राजकारणाच्या दृष्टीनें आवश्यक असेल, पण जुलमानें आपला धर्म दुसऱ्यावर लादणें हें ईश्वराच्या घरीं पाप ठरल्यावांचून राहणार नाहीं व त्याचें प्रत्यंतरहि आज येत आहे. आज काळानेंच त्यांच्यावर सूड घेतला आहे. ज्या सत्तेनें पूर्वी धर्मछळ केला, ती सत्ताच आज रिपब्लिक झाली आहे. म्हणजे लोकमतानुवर्ती बनून धर्माचा राजकारणाशीं कांहीं संबंध नसावा असें प्रतिपादन करूं लागली आहे. येथील उदारमतवादी अधिकाऱ्यांनीं धार्मिक बाबतींत आपण पूर्ण तटस्थच राहणार, असेंच आज आम्हांस सांगितलें. साहजिकच झालेली गोष्ट फिरवून दाखविणें किंवा गेलेलें परत मिळविणें ह्यांतच परमेश्वराचें 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम्' सामर्थ्य व्यक्त होत आहे. ईश्वरानें गावड्यांना स्वधर्मांप्रत परत येण्याची ही संधीच दिली. सरकारची धार्मिक बाबतींत तटस्थता आणि बाटलेल्या लोकांस शुद्ध करून घेण्यास पुढे आलेले कार्यकर्ते, असा हा योगायोग जमून आला. नाहींतर 'तीर्थ आहे पण मठ नाहीं, व मठ आहे पण तीर्थ नाहीं' अशीच गोष्ट होत असते. ह्या अनुकूल संधीचा हिंदूंनीं पुरेपूर लाभ घेतला नाहीं तर त्यांच्यासारखे दुर्दैवी तेच ! अधिकाऱ्यांनीं ताटस्थ्य दर्शविलें असलें तरी मधल्या कोणत्या तरी कोठावळ्यांचीं पोटें दुखत असल्याचा मला बळकट संशय येतो. नाहींतर शुद्धिकार्यांत विघ्न उत्पन्न होण्याचें कांहींच कारण नव्हतें पोटदुखी झालेले हे कोठावळे शुद्धिकार्य करणाऱ्या आम्हांवर अनेक प्रकारचे आरोप करीत असतात हिंदूंची संख्या वाढवून त्यांच्या मताच्या बळावर आम्हांस कौंसिलांत जागा मिळविणें आहे, असें कोणी म्हणतात. पण गोव्यामध्यें तशी जागा मिळणें शक्य नसतां येथील चळवळीस पाठिंबा देण्याकरितां आम्ही येथें आलों हेंच आमच्या विचारशुद्धतेचें गमक आहे. मनांत राजकीय हेतु धरून संस्थानिकांचा नायनाट करण्याच्या हेतूनें आम्ही येथें जमलों आहों म्हणावें, तर आम्ही जें करणार तें येथें आधींच होऊन चुकलें आहे. पोर्तुगालच्या स्वातंत्र्य देवीनें एकतंत्री राजसत्तेचा मुगूट आपल्या पायांखालीं पूर्वीच तुडवून टाकला असल्यामुळें ह्याहून अधिक तें आम्हीं काय करणार ? स्वरूपतः तरी आमच्यापेक्षां येथील सत्ता लोकमतानुवर्ती असल्यामुळें बादशाही अमलांतील आम्हां लोकांना येथील सत्तेंत परिवर्तन करावेंसें कसें वाटणार ? साम्राज्यशाहीस कंटाळलेले आम्ही येथें साम्राज्य स्थापन करण्याकरितां आलों आहों, ही गोष्ट शक्य तरी आहे काय? मसुराश्रमांतील लोकांविषयीं म्हणाल तर त्यांना कौंसिलांत निश्चित जावयाचें नाहीं. ह्या ब्रह्मचाऱ्यांजवळ पैसा नाहीं, जमीन नाहीं, दिवसा उमे भ्रमतांना दोन पावलांखालीं आणि रात्रीं निजल्यावर, कुशीखालीं असलेली हीच ह्यांची जमीन ! कर्तव्य-



दानशूर देशभक्त श्री. पांडुरंग केशव शिराळकर, कऱ्हाड (सातारा).

[चिंबल येथील 'हनुमान-जयस्तंभा'ला त्यांनीं ५०० रु. देण्याचें अभिवचन दिलें आहे].



धर्मवीर वामनराव नाईक, हैद्राबाद.
(निंबल येथील 'हनुमान जयस्तंभा'स त्यांनी ५०० रुपये देण्याचे अभिवचन दिले आहे.)



दे. शापुरजी सकलातवाला.
ब्रिटिश पार्लमेंटचे हिंदी सभासद.

निष्ठेखेरिज त्यना, ना स्वार्थ ना संसार ! आमिष दाखवून, जुलुम जबरदस्ती करतील ह्मणावें तर हातांत द्रव्य नाहीं, सत्ता नाहीं. फारच झालें तर तोंडानें शाप देतील ! पण शाप देतील ते देत नाहींत, अशी माझी निश्चिती आहे. त्यांनीं गावड्यांना हिंदुधर्मांत आणलें हाच काय तो त्यांचा अक्षम्य अपराध ! व त्या करतांच त्यांना शासन होत आहे ! राज्यांत धर्मस्वातंत्र्य आहे असा तोंडानें डंका वाजवायाचा, व कृतीनें मात्र धर्मप्रचारकांना बंदिवास द्यावयाचा हें आश्चर्य नव्हे काय ? ह्यावरून अधिकाऱ्यांच्या पोटांत कांहींतरी असावें ह्यांत शंका नाहीं. मग ते एकदां उघड सांगून कां टाकीत नाहींत ? आश्रमाच्या ब्रह्मचाऱ्यांच्या पोटांत कांहींहि राजकीय हेतु नाहीं, हें मी प्रतिज्ञेवर सांगतों, आणि ह्याच्याकरितां पाहिजेतर, मी, डॉ. मुंजे किंवा हिंदुमहासभा तारण रहाण्यास सिद्ध आहों. आम्हीं आज दुपारीं गव्हर्नर साहेबांना भेटलों. त्यांनीं आम्हाला वाटेल तेव्हां आपल्याला येऊन भेटण्याची मोकळीक दिली, हें त्यांचें सौजन्य वाखाणण्यासारखें आहे; पण ह्यांत एकच गोष्ट गौण आहे, कीं, आम्ही येथें फक्त तीनच दिवस रहाणार आहों ! आम्हीं बोल्शेविक असून गोवा प्रांतांत चळवळ करण्यामध्यें बोल्शेविझमचा प्रसार करणें हा आमचा हेतू आहे, असें सांगण्यांत येतें; पण हेंहि खोटें आहे. असला तर मांडवलशाहीकडे आमचा थोडासा कल आहे असा आमच्यावर आमच्या तिकडे आरोप करण्यांत येतो. तेव्हां आम्हीं बोल्शेविझमचा प्रसार करूं हें शक्य नाहीं. आणखी आरोप असा आहे कीं, गोवा प्रांत महाराष्ट्राला जोडण्याकरितां ही आमची खटपट चाललेली आहे. पण रिपब्लिक उपभोगीत असलेला एखादा टीचभर प्रांत महाराष्ट्राला जोडून आम्हाला काय मिळणार ? चळवळ करावयाला आमच्याकडे काय कमी प्रदेश आहे ? असें असतांहि हिंदुमहासभा आपलें शिष्टमंडळ गोमांतकांत पाठविते ह्याचा अर्थ ह्या प्रांतांत राजकीय बाबतींत पोर्तुगीजांची सत्ता असली तरी धार्मिक सामाजिक व भाषेच्या बाबतींत अखिल हिंदुजनतेची गोमांतकावर सत्ता आहे. गोमांतकांत धर्माला स्वातंत्र्य, मग भाषेला कां नाहीं ? भाषा हें एक धर्माचें साधन आहे. मग साध्याला स्वातंत्र्य आणि साधनाला मात्र स्वातंत्र्य नाहीं, हें विचित्र नाहीं काय ? ज्याला पोर्तुगीज भाषा येत नाहीं त्याला मताधिकार नाहीं, हा अन्याय नाहीं काय ? आपणाला रिपब्लिक बसल्या स्थळीं मिळालें, झोपेंतून जागें होऊन आपण लोकशाहींत समाविष्ट झालां. पण ह्मणून जर राज्यकर्ते म्हणतील कीं, आम्हीं उदारपणें स्वराज्य दिलें, आतां धर्माची आशा सोडा, तर तें बरोबर होणार नाहीं. राज्यकर्त्यांना धर्माचा अभिमान नसला तरी प्रजेला तो खास आहे. रिपब्लिकसाठीं सरकार धर्माची किंमत मागत असलें तर ती गोष्ट कदापि होणार नाहीं. स्वराज्य शब्दांतील ' स्व ' मध्यें स्वदेशाबरोबर स्वधर्म, स्वभाषा, स्वसमाज, स्वसंस्कृति ह्यांचाहि अंतर्भाव होतो. आणि आम्हीं स्वराज्य मागतों त्यावेळीं ह्या सर्व गोष्टींतील स्वातंत्र्य मागत असतों. लोकसत्तेच्या अधिकाराच्या उपकारांसाठीं ह्या गोष्टी गमावून बसावयाच्या कीं काय ? प्रसिद्ध आयरिश देशभक्त ग्रॅटन ह्यांनीं म्हटल्याप्रमाणें कोणाचे कितीहि डोईजड उपकार झाले असले तरी त्याचे पायीं पुरुषांत आपली सदसद्विवेक बुद्धि, स्त्रीस आपलें पातिव्रत्य व राष्ट्रांस आपलें स्वातंत्र्य गमावण्यास तयार हो असें ह्मणणें ह्यासारखा अधमपणा जगांत दुसरा कोणताहि नाहीं.

स्वतःचा स्वाभिमान विकून कोणीहि मनुष्य उपकाराबद्दल कृतज्ञता दर्शविणार नाहीं. * एकाद्या स्त्रीचा जीव वांचविला म्हणून ती आपल्या जीवाकरितां पातिव्रत्याचें मोल देण्यास कदापिहि मान्यता देणार नाहीं. त्याचप्रमाणें आम्हीं तुम्हास अधिकारांत अधिक राजकीय अधिकार दिले, म्हणून तुम्ही आतां स्वधर्म, स्वभाषा, स्वसंस्कृति ह्यावरील सत्ता गमाविण्यास सिद्ध व्हा, असें कोणी म्हणेल तर मी म्हणेन "जळो तुझें राष्ट्रीय स्वातंत्र्य ! स्वराज्याबरोबर धर्मील बाबतींतहि आम्हांला स्वातंत्र्य मिळत असलें तर तें आम्हांस पाहिजे. नुसत्या अळणी स्वराज्यास कोण विचारतो ?"

वरीलप्रमाणें तात्यासाहेबांचें आवेशपूर्ण व वक्तृत्वपूर्ण असें ओजस्वी भाषण झाल्यावर डॉ. मुंजे श्री. चित्रावशास्त्री ह्यांचींहि स्फूर्तिदायक भाषणें झालीं. डॉ. मुंजे म्हणाले " येथें येऊन पोर्तुगीज सरकारच्या राज्यकारभारांत ढवळाढवळ करण्याचा आमचा बिलकूल विचार नाहीं, उलट येथील सरकारचे राजकीय कायदे पाळा असेंच माझें येथील लोकांस सांगणें आहे. पण त्याबरोबर मी असेंहि म्हणतो कीं, सरकारच्या राजकीय क्षेत्रांत आम्हीं ढवळाढवळ करीत नाहीं, त्याचप्रमाणें येथील सरकारनेंहि महाराष्ट्रीय ह्या नात्यानें आमचें जें साम्राज्य तुमच्यावर चालत आहे ह्यांत ढवळाढवळ करतां कामा नये. स्वराज्यप्राप्तीचे दोन मार्ग आहेत. एक सुखाचा व एक दुःखाचा. परसत्ता, परधर्म व परसंस्कृति ह्या तिहींत जित लोकांनीं जेत्यांशीं एकजीव होऊन जाणें हा सुखाचा मार्ग व ह्या तिहींशीं सत्त्व व स्वाभिमान रक्षून झगडणें हा दुःखाचा मार्ग. परंतु इतिहासकार ह्याच दुसऱ्या दुःखाच्या मार्गाला धन्यवाद देत असून पहिल्या लाजिरवाण्या मार्गाबद्दल नाकें मुरडित असतात. चारशें वर्षांपूर्वी येथें एकहि खिस्ती नव्हता. खिस्तीधर्माचा अभिनिवेश धरणाऱ्या आमच्या पाद्र्यांनीं आपल्या मागील कांहीं पिढ्या तपासून पाहिल्या तर त्यांना एकेकाळीं आपण ब्राह्मण होतों असें आढळून येईल ! त्यांच्या आज्यापणज्यांच्या नामावळींत एखादा बाळकृष्ण शिवराम मुंजे त्यांना खात्रीनें दिसून येईल. अडाणी गावडे चारशें वर्षांनंतर हिंदुधर्मांत आले आणि शहाणे व 'बुद्धिमान् म्हणविणारे ब्राह्मण खिस्ती धर्माशीं एकरूप होऊन राहतांना कांहींच विषाद मानित नाहींत, हा शहाणपणा कीं, वेडेपणा ? "

ह्यानंतर श्री. चित्राव शास्त्री ह्यांनीं हिंदुधर्म व हिंदुसमाज जगावयाचा तर सर्वांनीं क्षत्रिय कसें बनलें पाहिजे ही गोष्ट उठावदार पद्धतीनें श्रोत्यांना पटवून दिली. शास्त्रीबुवांच्या भाषणानंतर, एका पाद्री साहेबांनीं कोकणींतून भाषण केलें, त्यांत त्यांनीं सन्माननीय पाहुण्यांचा गौरव केला व खिस्ती आणि हिंदु ह्या दोन्ही धर्मांतील उच्चतत्वें एकवटून एक अत्यंत व्यापक उदार नवधर्म निर्माण करण्याची आवश्यकता आहे, असें सांगितलें. किंवा सर्व जगांतील धर्मियांची एक धर्मपरिषद् बोलावून तींत प्रस्तुत हिंदुधर्माचें सर्व श्रेष्ठत्व ठरलें तर तोच सर्व जगाचा धर्म मानला जावा, असें ते म्हणाले. ह्याचवेळीं मागें पुणें येथील जाहीर सभेंत केलेल्या दोन विधानाबद्दल श्री. चित्रावशास्त्री ह्यांस खुलासा करण्याबद्दल श्री. वि. स.

* " A nation's lieberty could not be meted and parcelled out in gratitude. No man could be grateful at the expense of his conscience, no women at the expense of her honour, no nation at the expense of its liberty."



विद्यानिधी श्री सिद्धेश्वर शास्त्री चित्राव यांच्या हस्तें झालेला पणजी येथील शुद्धिसमारंभ.



राघवेंद्र श्री रामभुवनांतील जपयज्ञाच्या दिवशीं घेतलेलें छायाचित्र.

पुरवठणकर ह्यांनी विनंति केली. " हिंदुमहासभेचें अधिवेशन गोव्यांत भरावें अशा उद्देशानें देथें चिटणीस शोधीत असतां, कोणींहि ती जबाबदारी अंगावर घेण्यास तयार होईना व आनंदमूर्तीस येथें आठदहादां मार खावा लागला," ह्या शास्त्रीबुवांच्या विधानें गोमांतकीय लोकांना स्याड ठरविणारीं अतएव बदनामीकारक असल्यामुळें त्यांचा त्यांनीं स्पष्ट खुलासा करावा अशी त्यांची मागणी होती. शास्त्रीबुवांना खालीं बसवून डॉ. मुंजे ह्यांनीं उत्तर दिलें कीं " चित्रावशास्त्री यांचीं विधानें गैर-समजुतीमुळें झालीं असतील त्याबद्दल मी आपली क्षमा मागतों. त्यांचीं विधानें खोटीं आहेत तर तसें आपण विधायक कार्यानें सिद्ध करून दाखवा. शरीरसामर्थ्य क्रमशः आणि पुढील वर्षी सुरतेस हिंदुसभेचें अधिवेशन भरणार आहे तेथें गोमांतकाच्या वतीनें आमंत्रण देण्यासाठीं या " डॉ. मुंजे महाशयांसारख्या सन्माननीय अतिथीला ह्यावेळीं स्वतःचे कान हातांत पकडून क्षमा मागण्यास लावण्याचा मुद्दाम उकरून काढलेला हा प्रसंग पुष्कळांस साहजिकच अप्रस्तुत, असभ्य, व उपमर्दकारक वाटल्याविना राहिला नाहीं. असो. हारतुरे आभार प्रदर्शन वगैरे झाल्यावर ह्या मोठ्या व महत्त्वपूर्ण अशा सभेचें काम संपलें. नंतर शिष्टमंडळ श्री. यशवंतराव लवंदे ह्यांच्या वाड्यांतील आश्रमीय ज्योतिष-कार्यालयांत पानसुपारीसाठीं आलें. तेथें घरगुती थाटाचा लहानसा स्वागतसमारंभ करण्यांत आला. श्री. यशवंतराव ह्यांच्या परिचयाचे व त्यांच्या वाड्याच्या आसपासचे कित्येक उच्चवर्णीय खिस्ती स्त्रीपुरुष शिष्टमंडळास ( विशेषतः डॉ. मुंजे ह्यांना ) पहाण्यासाठीं मोठ्या कुतूहलानें मुद्दाम वाड्यांत आले होते. शिष्टमंडळ रात्रीं येथेंच वस्तीला राहिलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ( २७ मे ) श्रीमहालक्ष्मीच्या मंदिरात पुजे मनवेल व त्याचें कुटुंब हें एकदां हिंदू होऊन धाकटपणानें पुन्हा खिस्ती झाले होते. त्यांना व दुसऱ्या कांहीं गावड्यांना हिंदुधर्माची दीक्षा देण्याचा समारंभ विधानिधि चित्रावशास्त्री ह्यांच्या हस्तें करण्यांत आला. शुद्धिसमा-रंभाला शिष्टमंडळ, व कित्येक ग्रामस्थ उपस्थित होते. पणजी हें गोवेसरकारच्या राजधानीचें शहर असल्यामुळें इतरत्र झालेल्या शुद्धीपेक्षांहि येथील शुद्धीला अर्थातच विशेष महत्त्व होतें.

शुद्धिसमारंभानंतर शिष्टमंडळानें सरकारचे मुख्य कार्यमंत्री सि. दो. कार्लुश आल्वोई ह्यांची खाजगी मुलाखत घेतली. नंतर येथील संत रोहिदास हराळे समाजास भेट देऊन मंडळी पेडण्यास निघाली. तथापि कोल्वाळ तरीपलीकडे पेडणेकरांनीं पाठविलेल्या मोटारी शिष्ट मंडळास यावयास ठरविलेल्या वेळेपेक्षां बराच उशीर झाल्यामुळें परत गेल्याचें समजलें. तेव्हां एक मनुष्य पेडण्यांस पाठविण्यांत आला. व मंडळी कोल्वाळ नदीच्या तीरावर नारळीच्या बागेंत स्नान नाहीं, जेवणखाण नाहीं, अशा अवस्थेंत मोटारींची वाट पहात बसली; पण सायंकाळ पर्यंत मोटारीचा पत्ताच नाहीं! तेव्हां निरुपायानें मंडळी पेडण्याचा कार्यक्रम रहित करून, ह्यापशास परत आली. वस्तुतः पेडणेकर मंडळी संध्याकाळपर्यंत मोठ्या आतुरतेनें शिष्टमंडळाच्या स्वागतार्थ वाट पहात देवीच्या मंदिरांत थांबलेली होती; परंतु त्यांना कोल्वाळ वरुन गेलेला निरोप मिळालाच नाहीं, असें पुढें समजलें! अर्थातच शिष्टमंडळाचें दर्शन आपल्या गांवाला न होऊं शकल्यामुळें पेडणेकर निराश व दुःखित झाले.

शिष्टमंडळ ह्यापसें येथें आल्यावर त्याची प्रचंड मिरवणूक काढण्यांत आली. सार्वजनिक कामांत ह्यापसेकर मंडळीची मोठी ख्याती आहे. ज्ञानप्रसारक संघाचे शुभ्र खादीचा पोषाख केलेले पन्नास

साठ लाठीधर स्वयंसेवक, रंगेनें व शिस्तीनें मिरवणुकींत चालले होते. शिष्टमंडळाचा व हिंदुधर्माचा मधूनमधून जयजयकार होत होता. वाटेंत इराळे समाजानें मंडळाचें स्वागत केलें. श्री. मारुती मंदिरांत अल्पाहार घेऊन मंडळी सभास्थानीं गेली. सभामंडपांत लोकांची चिकार गर्दी जमली होती. वैद्य रामा भिवा मोरजकर ह्यांनीं शिष्टांचा परिचय करून. दिल्यावर म्हापशाचे सन्मान्य पुढारी श्री. रवळूदेट खलप ह्यांनीं अध्यक्षस्थान मंडित केलें व नंतर श्री. तात्याराव केळकर, डॉ. मुंजे, चित्राव शास्त्री, जठार वकील, व ब्र. क्षीरसागर ह्यांचीं समयोचित व उद्बोधक भाषणें झालीं. आभार प्रदर्शन होऊन सभा विसर्जन झाली व मंडळी पुढील कार्यक्रमासाठीं मोटारीनें डिचोलीस गेली.

कर्मधर्मसंयोगानें डिचोलीच्या वाटेवर मोटारीचा विलक्षण अपघात झाल्यामुळें सर्वच मंडळी डिचोलीच्या समारंभास वेळेवर उपस्थित होऊं शकली नाहीं. हा मोटारीचा अपघात फारच विलक्षण स्वरूपाचा होता. मोटार वाटेवरील एक मोठा–थोरला चढाव चढत होती. इतक्यांत एकाएकीं मध्यावरच मोटार, पावर घेत नाहींशी झाली. व अर्थात्च ती चढावावरूनच खालीं घसरावयास लागली. ड्रायव्हरनें ब्रेक लावण्याचा प्रयत्न केला, तोंच ब्रेक खाड्कन् तुटून गेली. मोटार उतारा वरून सारखी जोरानें खालीं येऊं लागली. ड्रायव्हरचा धीर सुटला व तो ओरडूं लागला. मोटारींतील मंडळींना ओढवलेल्या भयंकर संकटाची जाणीव होऊन, जो तो ' देवा, देवा, ' असे निर्वाणीचे उद्गार काढूं लागला. मोटार उतारा वरून भयंकर वेगानें खालीं येऊं लागल्यामुळें तींतून बाहेर उडी टाकणेंहि शक्य नव्हतें. क्षणार्धांतच रस्त्याच्या काठावरील दगडी भिंतीवर मोटार खाड्कन् आपटली व भिंतीच्या विरुद्ध दिशेला गती मिळून दोन तीन पुरुष उंची वरून धाड्कन् खाड्यांत खालीं पडली. मोटारीचा चक्काचूर झाला. पण परमेश्वरी कृपेनें कोणीहि माणूस दगावला नाहीं ! मोटार ड्रायव्हरलें बरीच दुखापत होऊन तो दोनतीन दिवस बेशुद्ध होता. तद्वतच डहाणूचे यंत्रशास्त्रज्ञ श्री. दत्तोपंत गोगटे ह्यांनाहि बराच मार बसला. बाकीच्या कोणाला म्हणण्यासारखी दुखापत झाली नाहीं, या भयंकर अपघातांतून आपण जिवंतराहून बाहेर कसे पडलों ह्या गोष्टींचे प्रत्येकाला आश्चर्य वाटलें, " अरक्षितं तिष्ठति दैवरक्षितम् ! " हा सिद्धांत प्रत्येकास साक्षात् अनुभवास मिळाला. असो.

डिचोलीस मंडळीची मोठ्या थाटानें मिरवणूक काढण्यांत आली. येथील मंदस्थान ध्वजापताकांनीं व देशभक्तांच्या छायाचित्रांनीं शृंगारण्यांत आलें होतें. मठाबाहेर भगवा झेंडा हवेत फडफडत होता. मिरवणूक मठांत येऊन पोहोंचल्यावर श्री. सुंदराव रामकृष्ण सामंत ह्यांनीं शिष्टमंडळाचा जनतेला परिचय करून दिला. नंतर श्री. तात्याराव केळकरांच्या अध्यक्षतेखालींच सभेला प्रारंभ होऊन स्वांचीं धर्माभिवनोद्दीपक भाषणें झालीं. डिचोलीकरांतर्फें श्री. वामनराव पालेकर ह्यांनीं शिष्टमंडळाचे आभार मानले, व मंडळी पुनश्च मिरवत मिरवत श्री. महांबरे ह्यांच्या वाड्यावर वस्तीसाठीं आली.

मोटारीच्या भयंकर अपघातामुळें पुढील सर्व कार्यक्रम रहित करून परत फिरावें, अशी बिल्कांची सूचना होती; परंतु थोडक्याकरितां लोकांची निराशा नको म्हणून पूर्वी आखल्याप्रमाणेंच कार्यक्रम निश्चित करण्यांत आले व संकाळीं पिळगांववरून मंडळी पुढे निघाली. फक्त श्री. तात्याराव केळकर ह्यांना कमांडर–इन–चीफ साहेबाना पणजीस भेटण्याची आवश्यकता असल्यावरून ते परस्पर

पणजीस गेले, व बाकीची डॉ. मुंजे प्रभृति मंडळी जुन्या गोव्यास उरली. तेथील चर्च बनविलेलें पूर्वीचें विस्तीर्ण व भव्य शंकराचें देऊळ मंडळींनीं पाहिलें व नंतर म्हाडदोलचा समारंभ आटोपून मंडळी केरी येथें गेली; तेथें विजयादुर्गेच्या मंदिरांत, करमळें, पिसगाळ, आर्ले, वाडी, पोदण, व खोर्ली ह्या निरनिराळ्या वाड्यांवरील एकंदर १६८ लोकांना शुद्ध करून घेण्यांत आलें. शुद्धिविधि उपाध्ये व पायील ह्यांनीं केला. श्रीशंकरराव नाईक शंखवाळकर, दत्तात्रेय रायकर, गाळकर, तळावलीकर, नारायण कासार, आदिक मंडळीच्या खटपटीनें शुद्धीचा हा समारंभ झाला. गोपाळ गावड्याप्रमाणेंच येथील गावड्यांचा पुढारी रामा गावडा ह्याच्याहि गळ्यांत हार घालून डॉ. मुंजे ह्यांनीं सत्कार केला. चित्राव शास्त्रीबुवांनीं शुद्धीकृतांस उपदेश केला. श्री. ज. वि. कामत व तळावलीकर ह्यांनीं आभार प्रदर्शनात्मक छोटेंसें भाषण केलें. मंडळी देवदर्शन घेऊन बोरीस गेली. केरीप्रमाणेंच खांडेपार येथील मुर्डीवाड्यावर १५० लोकांचा शुद्धिसमारंभ श्री. शंकरराव नाईक व श्री. दत्तात्रय रायकर ह्यांनीं ग्रामस्थांच्या साह्यानें आजच ठरविला होता व तो त्याप्रमाणें तोटेकर शास्त्रयांकरवीं पारहि पडला. उशीर बराच झाल्यामुळें शिष्टमंडळास खांडेपार येथें जाण्याचें रहित करावें लागलें.

शिष्टमंडळ दुपारीं ३॥ वाजतां बोरीस पोंचलें. भट्टप्रभु समाजांतील प्रसिद्ध श्रीमान् गृहस्थ श्री. रघुनाथराव शांबा प्रभु सावरकर ह्यांच्या येथें मुक्काम करण्यांत आला होता. भोजनोत्तर सायंकाळीं मंडळी नवदुर्गेच्या मंदिरांत गेली. रस्ता ध्वजापताकांनीं शृंगारला होता. मंदिरांत पोंचतांच सुस्वर चौघडा सुरू झाला व २१ गर्नाल्सची सलामी देऊन बोरीकारांनीं शिष्टमंडळाचें सन्मानपूर्वक स्वागत केलें. स्वागताध्यक्ष श्री. पांडुरंग शेवणी बोरकर ह्यांनीं शिष्टमंडळाचें स्वागत करून आपलें भाषण श्रीमन्महाराजांचा जयजयकार करीत संपविलें. श्री. तळावलीकर ह्यांनीं शिष्टांचा परिचय करून दिल्यावर प्रो. कृष्णा दत्ताराम बोरकर ह्यांनीं शिष्टमंडळास मानपत्र अर्पण केलें. गोपाळ गावड्यानेंहि आपल्या समाजाच्या प्रस्तुतच्या अडचणी निवेदन करणारें व त्या निवारण करण्याविषयीं विनंती करणारें भाषण केलें.

तदनंतर डॉ. मुंजे महाशय ह्मणाले—"आपणांवर पोर्तुगीजांच्या राजकीय साम्राज्याप्रमाणेंच श्रीशिवाजीमहाराजांच्या महाराष्ट्राचें धार्मिक साम्राज्य आहे, हें आपण विसरून चालणार नाहीं. जसे आपण पोर्तुगीज साम्राज्याचे कायदे पाळतां त्याचप्रमाणें महाराष्ट्राचे धार्मिक कायदेहि आपण पाळले पाहिजेत, व ते पाळतांना कोणाचीहि क्षिती बाळगतां कामा नये. आज आह्मी अखिल हिंदुस्थानचे हिंदु २२ कोटी असून मुसल्मान अवघे ६–७ कोटी व ख्रिश्चन ५०–६० लक्षच काय ते आहेत; परंतु आह्मी हिंदु संघटित न होऊं तर आमच्यांतील ७ कोटी अस्पृश्य मुसलमान होतील व त्यांची संख्या ७ नीं वाढून १४ कोटी होईल व आमची ७ नीं कमी होऊन १५ कोटीवर येईल. ७ कोटी जर २२ कोटींना जुमानीत नाहींत तर आतांच वर्णिलेल्या प्रसंगीं आह्मां हिंदूंची धडगत कशी लागेल! ह्याकरितां ही अस्पृश्यता काढून टाका, एकी करा व सुसंघटित व्हा, हाच तुह्माला हिंदुमहासभेचा संदेश आहे." इतकें सांगून, श्री. गोपाळ गावड्यानें केलेल्या विनंतीस उद्देशून त्यांनीं सांगितलें, कीं, "ब्रह्मचर्याश्रमाची एक शाखा इकडे स्थापन केली जाईल व तिच्याकडून गावडे समाज सर्व दृष्टींनीं लायक करण्याचे प्रयत्न करण्यांत येतील. कांहीं काळजी करूं नका.' नंतर बोरी ग्रामस्थांतर्फे श्री. कृ. द. बोरकर स्वयंसेवकांतर्फे श्री. बाळकृष्ण म. बोरकर व भट्ट प्रभुसमाजातर्फे श्री. विठ्ठल वि. गांवकर ह्यांनीं

शिष्टमंडळास हारतुरे अर्पण केले व सभा विसर्जन झाली. देवाल्याच्या अग्रशाळेंत १९ गावड्यांचा शुद्धि-समारंभ स्थानिक मंडळीनें ठरविला होता. शुद्धिविधि विष्णूभट पाटील ह्यांनीं केला. विधी झाल्यावर श्री. चित्रावशास्त्र्यांनीं गावड्यांस उपदेश केला, व ग्रामस्थांचा निरोप घेऊन मंडळी मडगांवास निघाली. शुद्धिचळवळीपासून फोंडे महालांत लष्करी कायद्याचा अंमल जारीनें चालू होता, व शिष्टमंडळाला फोंड्याचे पोलीस कांहीं तरी अपशकुन करतीलच करतील, अशी सर्वांस धास्ती वाटत होती, पण तसें कांहीं घडलें नाहीं; एवढेंच नव्हे तर ज्या आश्रमीय लोकांवर पोलिसशाहीचा इतका रोष होता ते आश्रमीय लोकहि यावेळीं उघडपणें सर्वत्र वावरतांना पाहून सर्वांना सानंदाश्चर्य वाटलें.

ह्याप्रमाणें फोंडेमहालांतील सर्व कार्यक्रम निर्विघ्नपणें पार पाडून शिष्टमंडळ रात्रीं मडगांवास येऊन पोहोंचलें. तिकडून श्री. तात्यारावहि कमांडरइन चीफ साहेबांची मुलाखत घेऊन पणजीहून मडगांवास आले. निरनिराळ्या ठिकाणाहून स्थानिक पुढारीहि मडगांवास जमले होते. उपहारानंतर अर्थातच सर्वांची एकत्र बैठक झाली, व भावी कार्यासंबंधीं पुष्कळशी बोलाचाली होऊन सकाळीं शिष्टमंडळ आपला गोमांतकांतलि दौरा संपवून आगगाडीनें लोंढ्यास निघून आलें. बरोबर गोमांतकांतून हिंदुकार श्री. दं. व्यं. पै, श्री. ज. वि. कामत, श्री. शंखवाळकर वकील व श्रीयुत लवंदे ही मंडळी लोंढ्यापर्यंत आली होती. श्रीमारुतीच्या मंदिरांत श्रीमन्महाराज आश्रमीय शाखेसह आलेलेच होते. पुण्याच्या गाडीला तासभरच काय तो अवकाश होता, तोंपर्यंत मंडळींनीं स्नानभोजनादि कर्में आटोपून घेतलीं. साहजिकच ह्या अल्पावधींत श्रीमन्महाराज, शिष्टमंडळ व गोमांतकीय शिष्ट ह्यांची एकत्र बैठक होऊं शकली नाहीं. शिष्टमंडळाचा दुसऱ्या दिवशीं पुण्यास कार्यक्रम जाहीर झाला होता, तेव्हां त्यांना जाणें प्राप्तच होतें; तद्वतच आतांपर्यंत शिष्टमंडळीशीं श्रीमन्महाराजांचें कांहींच बोलणें झालें नसल्यामुळें त्यांच्याबरोबर जाणें श्रीमन्महाराजांना अपरिहार्य होतें. म्हणून गोमांतकीय शिष्टांना बेळगावीं आश्रमाच्या मुक्कामावर तार करतांच येण्याविषयीं विनंति करून श्रीमन्महाराज शिष्टमंडळासमवेत लोंढ्याहून गेले, बेळगांवें व कराड येथें आश्रमीय मंडळी शिष्टमंडळीच्या दर्शनार्थ स्टेशनवर आली होती. आगगाडींत श्रीमन्महाराजानीं एकंदर कार्याविषयीं चर्चा करून शिष्टमंडळाचा कराडस्टेशनवर प्रेमळपणें निरोप घेतला. ह्याप्रमाणें ता. २९ मेला, शिष्टमंडळाच्या गोमांतकांतील दौऱ्याचा कार्यक्रम चांगल्याप्रकारें पार पडला.

श्रीमन्महाराज लौकरच बेळगांवास परत आले व गोमांतकीय पुढाऱ्यांना बेळगांवास वाटाघाटी साठीं ठरल्याप्रमाणें येण्याविषयीं कळविलें; पण भारतकार श्री. हेगडे देसाई व श्री. लवंदे ह्यांच्या व्यतिरिक्त दुसरे कोणीहि आले नाहींत. हिंदूकार श्री. दत्तात्रय व्यंकटेश पै, ह्यांनीं खालीलप्रमाणें पत्र लिहून आपला न येण्याचें कारण कळविलें. तें पत्र असें:—

"आपलें कृपापत्र मिळालें. श्री. श्रीधर ज. कामत शंखवाळकर हे काणकोणला गेले आहेत. ते उद्यां पणजीस जातील, श्री. ज. वि. कामत हे येथें आमच्या घरीं तापानें आजारी आहेत, आणखी आठदिवस तरी ते घराबाहेर पडूं शकणार नाहींत. गोमांतकीय हिंदुसभेची स्थापना झाल्याशिवाय पुढील कार्यासंबंधीं निश्चित धोरण काय असावें तें कोणीहि जबाबदार गोमांतकीय प्रतिनिधित्वानें सांगूं शकणार नाहीं, असें माझें नम्र मत आहे. ह्यासाठीं मी एकटा येऊन कांहीं निष्पन्न होणें संभवनीय नाहीं. कळावें. कृ. लो. अ. ही. वि. "



श्री. ना. भा. नाईक, सं. भारत मित्र, (रिवण)



श्री. जगन्नाथ जनार्दन प्रभु चिमुलकर, नेरुल(गोवा).



ह. भ. प. दिगंबरदास.



श्री. वासुदेव प्रभु देसाई.



श्री. विजयनाथ केणी (कुंकळ्ळी)

शिष्टमंडळ गोमांतकांत गेऊन गेल्यामुळें चळवळीवर इष्ट तोच परिणाम झाला. आपल्या हिताहिताचा जागृतपणें विचार करून आपल्या न्याय्य हक्कांच्या संरक्षणासाठीं भरतखंडांतील बावीस कोटी हिंदुजनता धांवून येण्यास तयार आहे हें पाहून नवहिंदूंनाच काय, पण गोमांतकीय सर्वहिंदुजनतेलाहि नवचैतन्य व नवउल्हास आल्याविना राहिला नाहीं. शुद्धिविरोधी दिवाभीतांना चांगलीच थप्पड बसल्या सारखें झालें. तद्वतच सरकारालाहि धर्मस्वातंत्र्यावर गदा आणण्याच्या आपल्या दडपशाहीच्या धोरणास आळा घालण्याचा विचार करणें भाग पडलें.

ह्याप्रमाणें शुद्धिचळवळीविषयीं पोर्तुगीज सरकारचा झालेला किंवा करून दिलेला गैरसमज निरस्त करण्याचा अभिनंदनीय उपक्रम अखिल भारतीय हिंदुमहासभेच्या विद्यमानें करण्यांत आल्यावर, आश्रमानेंहि आपलें ह्मणणें स्वतःच पोर्तुगीज सरकारच्या कानावर घालून आश्रमाला गोमांतकांत पूर्ववत् धर्मप्रसार करण्यास अनुज्ञा मिळवावी, असें निश्चित केलें व त्याला अनुसरून थोडक्याच दिवसांत ब्र. क्षीरसागर ह्यांना आश्रमाच्या वतीनें पोर्तुगीज सरकारचे ग. जनरल सी. पेद्रो फ्रांसिस्क मासानुद आसोरीम ह्यांची मुलाखत घेण्यासाठीं पाठवून देण्यांत आलें. ब्र. क्षीरसागर ह्यांनीं आपलें गोमांतकांतील गमन हेतूसहित पो. सरकारास तारेनें आगाऊ कळविलें. ग. ज. साहेबांच्या मुख्य मंत्र्याकडून मुलाखतीचा दिवस निश्चित करण्यांत आला. पोर्तुगीज भाषेच्या अनभिज्ञतेमुळें कोणी तरी स्थानिक सद्गृहस्थ बरोबर घेण्याची आवश्यकता दिसून आल्यावरून ब्र. क्षीरसागर ह्यांनीं हायकोर्ट वकील श्री. शंखवाळकर, प्रकाशकार माजी नामदार श्री. व्यंकटेशराव सरदेसाई व श्री. विठ्ठलराव सुखठणकर ह्यांना तसें विचारलें; पण अपरिहार्य कारणामुळें ते येऊं शकले नाहींत. इतक्यांत सुचवून ठेवल्याप्रमाणें मडगांवचे प्रो.: व्यंकटराव नाईक हे पणजीस आले. हे मराठी–पोर्तुगीज वर्तमानपत्राचे पहिले मालक व चालक होते. मडगांवांत हिंदुसाठीं वाचनालयाची स्थापना पहिल्यानें ह्यांनींच केली. तद्वतच हिंदूंची सार्वजनिक सभा स्थापण्याच्या कामांतहि त्यांची प्रामुख्यानें खटपट होती. वकिलाची सनद आरंभीं मिळाली त्यापैकींच हे आहेत. बहुतेक सार्वजनिक कामांत त्यांचा भाग असतो. आश्रमकार्यास त्यांनीं पहिल्यापासून अगदीं मनोभावानें साहाय्य केलें व अद्यापिहि ते करीत आहेत. सरकारी दरबारांतहि त्यांची चांगली ओळख आहे. साहजिकच त्यांना बरोबर घेऊन क्षीरसागर ता. ९ आगस्ट गुरुवारीं दुपारीं तीन वाजतां मुलाखतीसाठीं गेले. प्रो. व्यंकटराव नाईक यांनीं क्षीरसागर व आश्रमकार्य ह्यांचा परिचय करून दिल्यावर त्यास "तुह्मी आतां जा' मी एकटाच ह्यांचे ( क्षीरसागरां ) जवळ बोलतों" असें गव्हर्नर साहेबांनीं सांगितलें. व्यंकटराव बाहेर निघून गेले. नंतर क्षीरसागर ह्यांस गव्हर्नरजनरलांनीं अगदीं आपल्या जवळच्या खुर्चीवर बसविलें व त्यांच्या आंगाखांद्यावरून लाडिवाळपणें हात फिरवून'मी तुमचा मित्र आहें व तुम्ही माझे मित्र आहां' ( I am your friend and you are my friend ) असे प्रेमोद्गार काढले ! क्षीरसागरांनींहि ' हेंच आपलें मित्रत्व आम्हांस सदैव पाहिजे आहे ' असें त्यांस विनम्रपूर्वक कळविल्यावर आश्रमविषयक औपचारिक स्वरूपाच्या पुष्कळशा गोष्टींबद्दल संभाषण झालें. ही बोलाचाली अगदीं घरगुती पद्धतीनें व विनोद–पूर्णतेनें चालली होती. आश्रमीय खडतर व सुखविन्मुख जीवनाविषयीं सांगत असतांना, त्यांनीं क्षीरसागरांना, प्रो. व्यंकटरावांनीं सुवर्णसंपुटांत सुंदरपणें जडविलेलें एक वाक्रस, त्यांत प्रथम नजर केलें होतें, तें ( कदाचित परीक्षा पहाण्यासाठीं ) बक्षीस देऊं केलें. " आह्मां गोसाव्यांना तें काय करावयाचें ? आह्मांला त्याचा काय उप-

योग ? " असें अनपेक्षित उत्तर मिळतांच त्यांनीं आनंदानें क्षीरसागर ह्यांची पाठ थोपटली. तदनंतर आपणाबरोबर खासगी स्वरूपाचा पत्रव्यवहार ठेवण्यासंबंधीं त्यांनीं क्षीरसागर ह्यांना सांगितलें, व स्वतःचें आपलें संपूर्ण नांव व पत्ता लिहून क्षीरसागर यांच्या स्वाधीन केला. तद्वतच क्षीरसागर ह्यांनीं मागितलेला त्यांचा फोटोहि देण्याचें आनंदानें मान्य केलें.

भाषा भिन्नत्वामुळें हा संवाद दोघांनाहि जरि थोडा हास्यदायक होत असला, तरी तेथें त्यासमयीं 'षट्कर्णी' न व्हावेत असा गव्हर्नर साहेबांचा कटाक्ष होता, व म्हणूनच त्यांनीं प्रो. नाईकांस प्रथमच काढून लावलें होतें. गव्हर्नर साहेबांस इंग्रजी बेताबाताचेंच येत होतें; पण त्यांची ती पोर्तुगिज किंवा फ्रेंच दोन्हीहि भाषा क्षीरसागर ह्यांस येत नसल्यामुळें ह्या मोडक्या तोडक्या इंग्रजीमधूनच उभयतांचा संवाद चालला होता. गव्हर्नर साहेबांना क्षीरसागरांचा इंग्रजी भाषेंतील पुष्कळसा आशय समजूं शके; पण क्षीरसागरांना त्यांची पोर्तुगीजप्रधान इंग्रजी भाषा समजणें कठीण जाई. तेव्हां गव्हर्नर साहेबांनीं पोर्तुगीज–इंग्रजी कोश आणवून त्यावरून किंवा मधून मधून 'नेत्र पल्लवी, करपल्लवी' चा उपयोग करून एकमेकांचा आशय एकमेक समजून घेण्याचा यशस्वी प्रयत्न करीत होते. हा संवाद चालू असतां चार शतकांपूर्वी वास्को डि गामा हा झामोरीनशीं कसा बोलला असेल, ह्याचें स्पष्ट चित्र क्षीरसागरांच्या अंतःचक्षूंसमोर उभे राहिल्याविना राहिलें नाहीं. वरील स्वरूपांत पण अगदीं हंसत खेळत जवळ जवळ पाऊण तास संवाद झाला. मग श्री. विठ्ठलराव सुखठणकर ह्यांस 'दुभाषी' पणाचें काम करण्यासाठीं म्हणून बोलावण्यांत आलें व पुढील सर्व संभाषण त्यांच्या मध्यस्थीनें करण्यांत आलें.

आश्रमाकडून होणारी धर्मजागृति व शरीर मन बुद्धि यांचा यथायोग्य विकास करण्यासाठीं आश्रमाकडून होत असलेला धार्मिक वाङ्मयाचा प्रसार, ह्या गोष्टी ऐकून घेऊन त्यांनीं संतोष व्यक्त केला व धर्मप्रसारासाठीं वाटलें जाणारें सर्व वाङ्मय त्यांनीं मागून घेतलें. त्या पुस्तकांतील मारुतिरायांचा फोटो त्यांनीं निरखून पाहिला व विशेषतः त्यांच्या भालप्रदेशावरील उभ्या नामाविषयीं त्यांनीं प्रश्न विचारले. क्षीरसागर त्याचा यौगिक अर्थ समजावून सांगत असतांनाच धर्माधर्मांच्याहि पुष्कळ गोष्टी त्यांनीं काढल्या, व त्या विषयीं बरीच चर्चा केली. धर्माशिवाय कोणाचेंहि खरेंखुरें अंतःसमाधान होऊं शकणार नाहीं आणि म्हणूनच आश्रमानें धर्मप्रसाराचें हें पवित्र कार्य अंगीकृत केलें आहे, असे चर्चेच्या शेवटीं क्षीरसागरांनीं म्हटल्यावर त्यांनीं थट्टेनें विचारिलें 'मग त्या गावड्यांप्रमाणें मलाहि तुम्हीं आपल्या धर्मांत घ्याल कीं नाहीं !' तेव्हां क्षीरसागर म्हणाले, "गावड्यांना जुलूम जबरदस्तीनें बाटविलें होतें.त्यामुळें ते खऱ्या सुखासमाधानाला आंचवले होते. त्यांचें खरें मनःसमाधान करणारा त्यांचा पूर्वीचा धर्म त्यांना आश्रमानें दिला व ते सुखी झाले.पण आपली गोष्ट तशी नाहीं; आपण म्हणतां 'मला माझ्या खिस्ती धर्मांत सुखसमाधान आहे' मग आपणाला शुद्ध कशाकरितां करावयाचें ? प्रत्येकानें आपआपला धर्म सुखासमाधानानें पाळावा व दुसऱ्यांस पाळूं द्यावा यांतच जगाचें कल्याण आहे. सर्व जगानें शांतिसमाधानानें नांदावें हीच आमची मनीषा आहे." हें उत्तर ऐकून त्यांस विशेषच आनंद झाला. व 'जरि मला माझ्या खिस्ती धर्माचा अभिमान वाटतो तरी तुमचाहि सहवास मला तितकाच प्रियकर व आनंददायक वाटत आहे !' असे त्यांनीं प्रेमोद्गार काढले. ह्याप्रमाणे आणखीहि कहीं संभाषण झाल्यावर क्षीरसागर ह्यांनीं आश्रमाचें गोमांतकांतील कार्य शुद्ध धार्मिक स्वरूपाचें कसें आहे, शुद्धीकृत लोकांस पाठशाळा द्वारें साक्षरता व धर्मप्रसार करून त्यांची उन्नति घडवून आणण्यासाठीं आश्रमानें कसकसे



पाळी (साखळी महाल) येथील शुद्धीकृत गावडे ग्रामस्थ पुढारी.



पाळी ( साखळी महाल ) येथील अपपत्र.

प्रयत्न चालविले आहेत, ह्या शाळांना औद्योगिक विभागाची जोड देण्याची योजना आश्रमानें कशी आंखली आहे, व या सर्व उपक्रमाचें पर्यवसान गोंव्याच्या लोकसत्तेच्या वळकटींतच कसें होईल; स्वतंत्रता, समता व बंधुता, हीं लोकसत्तेचीं उज्ज्वल तत्त्वें त्या लोकांच्या हाडींमासीं खिळून त्या योगें लोकसत्ता यशस्वी व चिरायु कशी होईल, इत्यादि गोष्टी व्यवस्थित पद्धतीनें समजावून सांगितल्या, आणि एकंदील कार्य करण्यांत आश्रमाचा ह्याविना कोणताहि अन्य हेतु नसल्यामुळें आश्रमीय प्रचारकांत धर्म प्रसाराच्या ह्या अत्यावश्यक व लोकसत्तेला अत्यंत उपकारक होत असलेल्या कामीं गोंव्यांत होत असणारे व्यर्थ अडथळे, त्रास व हद्दपारी गव्हर्नरसाहेबांनीं दूर करुन गेल्या ४०० वर्षांत कोणाच्याहि पदरीं न पडलेलें यश व अखिल हिंदुजनतेचा दुवा मिळवून घ्यावा, अशी नम्रतापूर्वक विनंति केली. ह्याच वेळीं ब्र. क्षीरसागर ह्यांनीं 'आश्रमाचें कार्य धार्मिक स्वरुपाचेंच असून आश्रमीय विद्यार्थी हे कुलशीलवान् कसे आहेत' ह्या संबंधींचें कऱ्हाडच्या पहिल्या वर्गाच्या मामलेदारांनीं सरकारी रीत्या आश्रमास दिलेलें प्रशस्तीपत्र ( certificate ) गव्हर्नरसाहेबांस सादर केलें. ( परिशिष्टांत तें दिलें आहे. ) तेव्हां "आश्रमानें येथें येऊन पुनरपि आपलें धर्मप्रसाराचें कार्य निःशंकपणें हातीं घ्यावें. फक्त पहिल्यांदा पकडलेल्या तिघांचा प्रश्न तूर्त घसाला लावूं नका. पुढेंमागें तोहि सुटेल. काळजी करूं नका," अशा आशयाचें आश्वासन गव्हर्नर जनरल साहेबांनीं दिलें व त्याबद्दल क्षीरसागर ह्यांनीं त्यांचें हार्दिक अभिनंदन केलें. 'आतां आश्रमाविषयीं आपल्या मनांत कोणताहि गैरसमज राहिला नाहीं' असें उत्तर त्यांनीं पुन्हां पुन्हां क्षीरसागरांनीं विचारलेल्या प्रश्नांना दिलें. तेव्हां समाधान पावून व अंतःकरण पूर्वक आभार मानून क्षीरसागर ह्यांनीं गव्हर्नर जनरल साहेबांचा निरोप घेतला.

वरील मुलाखत दीड तासावर चालली होती. प्रो. व्यंकटराव नाईक दहा पंधरा मिनिटांत बाहेर आले, व मागून तास सव्वातास झाला तरी क्षीरसागर ह्यांचा पत्ता नाहीं, हें पाहून बाहेरील मंडळी किंचित् साशंक व भीतियुक्त झाल्याविना राहिली नाहीं. पण लवकरच क्षीरसागर गव्हर्नर जनरल साहेबांच्या खोलींतून सस्मित आलेले पाहून सर्वांना समाधान वाटलें. व 'आश्रमाला गोंव्यांत येऊन आपलें काम करण्याची अनुज्ञा गव्हर्नरानें दिली, हें ऐकून तर सर्वांचे चेहरे आनंदानें प्रफुल्लित झाले. क्षीरसागरांबरोबर त्यांनीं केलेले प्रेमळपणाचें व लाडिवाळपणाचें वर्तन ऐकून पुष्कळांस सानंद कौतुक वाटलें. गव्हर्नर सी. मासानुद आमोरीम हे खरोखरच प्रजाहितत्पर, शांतताप्रिय न्यायी व उदार मनाचे कसे आहेत, ह्याची सर्वांस साक्ष पटली.

गव्हर्नर जनरल साहेबांप्रमाणेच क्षीरसागर ह्यांनीं मुरगांव येथें जाऊन इंग्रजांच्या वकिलाची ( ब्रिटिश कौंसल) मुलाखत घेतली. श्री. चित्रावशास्त्री ह्यांनीं त्यांस मागें तार करुन गोमांतकांतील ब्रिटिश प्रजाजनांच्या धरपकडीसंबंधीं प्रश्न विचारला होता. पण 'ह्या गोष्टींत आपणाला तूर्त हात घालावासा वाटत नाहीं' असें त्यांनीं उत्तर दिलें होतें. क्षीरसागर ह्यांनीं ह्यावेळीं त्यांची समक्ष गांठ घेतली व कऱ्हाड मॅजिस्ट्रेटचें सर्टिफिकेट त्यांच्या स्वाधीन करुन 'आतां ब्रिटिश प्रजाजनांच्या न्याय्य हक्कांचें संरक्षण करा' अशी मागणी केली. तेव्हां त्यांनीं "कऱ्हाड मॅजिस्ट्रेटच्या सर्टिफिकेटाच्या आधारें आपण रेवदीच गोष्ट पोर्तुगाल सरकारला कळवूं शकूं. हा दाखला रजिस्टर करुन घ्या. म्हणजे असें होणार नाहीं" असें सांगितलें. त्याप्रमाणें तो दाखला दोन्हीं ठिकाणीं रजिस्टर करुन घेण्यांत आला. आश्रमावरील निर्बंध ह्याप्रमाणें दूर केला. गेल्यावर नामदतोब एक आश्रमाची शाखा ब. वासुदेव महाराजांच्या नेतृत्वा-

खालीं गोमांतकांत पाठविण्यांत आली. प्रथमदर्शनींच कोलेम स्टेशनवर त्या शाळेला तेथील सर्कारी डॉक्टरनें सर्व आश्रमीयांची प्रकृति बरोबर नसल्याचें सांगून पुढें जाऊं न देण्याचा हुकूम आपल्या अधिकारांत फर्माविला ! सूर्यापेक्षां सूर्यकिरणानें तापलेली वाळूच अधिक तापदायक कशी होते, ह्याची प्रतीति येथें आली. ' भारत ' कार हेगडे देसाई ह्याचवेळीं अकस्मात् स्टेशनवर आले. त्यांनीं डॉक्टरची पुष्कळ समजूत घालण्याचा प्रयत्न केला. अंतीं निरुपायानें श्री. देसाई ह्यांनीं गव्हर्नरांस तारेनें कळविलें. मद्रासहूनहि गव्हर्नरसाहेबांकडे तार गेली, तेव्हां मंडळीला पोर्तुगीज सीमेंत निष्प्रतिबंधपणें वावरूं देण्याविषयीं सर्वत्र हुकूम सुटले व आश्रमीय शाखा पुनरपि गोमांतकांत येऊन दाखल झाली. डॉक्टर मात्र बिचारा ह्या अतिप्रसंगामुळें नोकरीस मुकला, त्याबद्दल वाईट वाटतें.

शुद्धीपूर्वी ज्याप्रमाणें ब्र. वासुदेव महाराजांच्या नेतृत्वाखालील आश्रमीय शाखा गोव्यांत धार्मिक जागृतीचें कार्य उत्कृष्टपणे करीत होती, त्याचप्रमाणें आतांहि सर्व कार्यक्रम दुप्पट उत्साहानें पुनश्च सुरू झाले. आश्रमीय शाखेनें विशेषतः ह्यावेळीं शुद्धीकृत लोकांचीं गांवें अगदीं खेडीपाडीसुद्धां घेतलीं. तेथील शुद्धीकृतांना धार्मिक विधि–निषेधांची व सणवार, उपासतापास व्रतवैकल्ये इत्यादि गोष्टींची माहिती करून देण्यांत आली. निरनिराळे धार्मिक उत्सव त्यांच्याकडून साजरे करून घेण्यांत आले. प्रत्येक स्थळीं रामनामाचा जप सार्वजनिक पद्धतीनें करून घेण्यांत आला. संकल्प केला जाई त्याचे दुप्पट तिप्पट जप सहज होऊन जात असे. हे दिवस पावसाळ्याचे होते. तरीहि पावसाच्या संतत धारेंत अविचलपणें व एकनिष्ठ मनानें हजारों स्त्री पुरुष व बाल–बालिका परमेश्वराच्या नामस्मरणांत तल्लीन होऊन जात. रात्रीं ब्र. वासुदेव महाराजांच्या कीर्तनाला अफाट गर्दी लोटत असे. ब्र. वासुदेव महाराजांचें तें कडकडीत वैराग्य, त्यांचें ते उत्कट धर्मकार्यप्रेम, त्यांची ती असामान्य लोकसेवातत्परता, त्यांचा तो निरलसपणा, त्यांची ती कडक शिस्त, पण त्या बरोबरच त्यांचा तो प्रेमळ शांत व निगर्वी स्वभाव, त्यांचा तो प्रचंड उत्साह त्यांची ती आदर्शभूत निःस्पृहता व बाणेदार वृत्ति, त्यांची ती श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या चरणांवरील एकांतिक निष्ठा, इत्यादि त्यांचे असामान्य असे अनेकविध गुण पाहून सर्व जनसमाजाला त्यांच्याविषयीं निःसीम प्रेमादर वाटत असे व त्यांच्या आधिपत्याखालीं प्रत्यहीं चाललेल्या सर्व आश्रमीय कार्यक्रमांत जनता सानंद, कौतुकानें व मोठ्या उल्हासानें भाग घेत असे.

ह्या सर्व कार्यक्रमाची सांगता म्हणून मुक्कामाच्या शेवटीं सर्व जातीच्या आबालवृद्ध गावडयांस मोठाल्या प्रमाणांत भंडारा करण्यांत येई. प्रसाद घेण्यासाठीं सर्व शुद्धीकृत लोक स्नान करून, सोवळ्यानें व ओलें नेसून येत असत. स्त्रियांच्या भालप्रदेशीं ठसठशीतपणें लावलेला तो सुंदर सौभाग्य कुंकुमतिलक, व पुरुषांच्या कपाळीं लावलेलें तें गोपिचंदनाचें नाम पाहून कोणालाहि सानंद कौतुक वाटे. त्यांचीं घरें दारेंहि अर्थात सडा–संमार्जनानें शुचिर्भूत केलेलीं व घरासमोरील तुळशी वृंदावनानीं मंडित केलेलीं दिसत. ज्यावेळीं आश्रमीय विद्यार्थी नित्यक्रमाप्रमाणें भिक्षा मागण्यासाठीं बाहेर निघत, त्यावेळीं प्रत्येक गांवडा त्यांना आपापल्या घरीं–झोपडीवर घेऊन जात असे. तेथें मुद्दाम सारवून व रांगोळी घालून ठेवलेल्या स्थानीं त्यांना उभे करून भिक्षा घालण्यांत येई. नंतर घरांतील बायकामुलांसह सर्व मंडळी ब्रह्मचाऱ्यांच्या पायांवर साश्रुनयनानें लोटांगणें घालीत. त्यांच्या निःसीम प्रेमाला पात्र होण्याचें भाग्य आपणास लाभल्याचें पाहून आश्रमीय मंडळीलाहि धन्यता वाटत असे. आश्रमा



सुर्ल साखळी महाल येथील शुद्धीकृत गावडे व ग्रामस्थ पुढारी.

रील ह्या सर्व लोकांचें इतकें उत्कट प्रेम पाहून कित्येक भावनाशून्य व्यक्तींनाहि प्रेमानंदाचें भरतें आल्या-
त्ना राहिलें नाहीं. धर्मपर्वणीच्या ह्या प्रेमगंगेंत स्वतःला पावन करून घेण्यांत ह्या वेळीं प्रत्येकास
ाटलेली धन्यता सर्वथैव अवर्णनीय अशीच आहे. वरीलप्रमाणें झालेल्या जपयज्ञांत कांहीं स्थळीं विशेष चम-
त्कारिक गोष्टी घडून आल्या; अशापैकींच एक गोष्ट येथें देत आहोंत. ब्रह्मचारी वासुदेव महाराजांनीं
आपल्या पत्रांत कळविल्याप्रमाणें 'मंगळवार मिति कार्तिक शुद्ध ३ शके १८५० च्या दिवशीं गुळेली
येथें आश्रमीय शाखेचा मुक्काम येऊन त्या दिवशीं तेथें जपास सुरवात झाली. गांव अगदींच लहान
असल्यामुळें ग्रामस्थांच्या आग्रहास्तव आजचाच मुक्काम करण्याचें (श्री. शांतादुर्गेच्या मंदिरांत) योजिलें.
सायंकाळपर्यंत जप होऊन मग कीर्तन झालें. नंतर गांवकर मंडळींनीं रात्रीं जपास सुरवात केली. कांहीं
वेळानें ती देवी नेहमीं ज्याचे अंगांत येत असे त्याचे अंगांत तें वारें येऊन तिनें सर्व गावकऱ्यांना असें
सांगितलें कीं, "असा योग फार पुण्याईच्या योगानें आलेला आहे. तरी तो तुम्हीं साधून घ्यावा
त्यावरितां गांवांतील सर्व माणसें लवकर बोलावून आणून जपास सुरवात करा!" अशा प्रकारची
देवीची आज्ञा झाल्यावर गांवकऱ्यांनीं सर्व मंडळी बोलावून आणून सर्व रात्रभर जप केला. त्या दिवशीं
देवीनें कोणाहि मोठ्या माणसास निजूं दिलें नाहीं. तिनें वारंवार स्वतः नामाचा जयजयकार करून
सर्वांना नामस्मरण भजन व प्रदक्षिणा करण्यास लावावें, असा क्रम चालला होता. जवळ जवळ सव्वाचार
लक्ष जप झाला. नंतर भंडारा करण्यांत आला. त्याच दिवशीं वरील मुदकामीं नुकलाच शुद्ध केलेल्या
गावड्यांची सत्यनारायणपूजा झाली. ह्याप्रमाणें सर्व कार्यक्रम संपवून आश्रमीय मंडळी पुढील गांवीं
निघाली, त्यावेळीं गांवांतील सर्व मंडळी भजन करीत पोंचवित आली. त्यांच्याबरोबर देवीहि वारें
येऊन गांवच्या सीमेपर्यंत पोंचविण्यास आली होती!" देवीचा साक्षात्कार वरील प्रमाणेंच आणखीहि
एक दोन ठिकाणीं घडून आला. वरील एका लहानशा गांवांत झालेल्या कार्यक्रमावरून इतर प्रत्येक
ठिकाणीं धर्मप्रेमाचें वारें कसें उसळून देण्यांत येत होतें ह्याची कोणासहि कल्पना करतां येईल. जन-
तेच्या धर्मप्रेमाला पूर आणून तिच्या आनंदाला पारावार नाहींसा करणाऱ्या ह्या कीर्तन, जपास, भंडारा
आदिक कार्यक्रमाप्रमाणेंच बहुधा प्रत्येक ठिकाणीं कमीत कमी दहा पांच लोकांचें तरी शुद्धीकरण होत
होतें. वांतें गांवीं मात्र एकंदर २८४ लोकांना एकदम शुद्ध करून घेण्याचा मोठा समारंभ याठानें कर-
ण्यांत आला. ह्या कामीं सावईचे श्री. नवाथे व येथील ग्रामस्थ श्री. कृष्णभट जोशी, बाबलभट जोशी
विनायक नारायण वांतेकर, पांडुरंग विठ्ठल वाके गांवकर इत्यादि मंडळींनीं फारच परिश्रम घेतले. असो.

वरील कार्याप्रमाणेंच शुद्धीकरतासाठीं आश्रमाकडून स्थळोस्थळीं स्थापन करण्यांत आलेल्या
पाठशाळांकडूनहि धर्मप्रसार व साक्षरता ह्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वपूर्ण अशी कामगिरी चाललेली होती.
चिंभल, ताळगांव, करमळी, धुळापी, कालापूर, बांबार, करंजाळ, माटवांत, पानवेल, ओटमोल, नावशी
पाल्यांत, नागझर, सावई, केरी, प्रियोळ, इत्यादि गावड्यांच्या प्रमुख प्रमुख स्थळीं पाठशाळा स्थापन
करण्यांत आल्या होत्या, व त्यांत जवळजवळ ५०० विद्यार्थी शिक्षण घेत होते. कित्येक स्थळीं प्रौढ
गावड्यांसाठीं रात्रीचे वर्गहि ठेवण्यांत आले होते व त्यांत जवळजवळ १०० गावडे शिक्षण घेत.
ह्या शाळांचा स्थानिक पूर्वहिंदूंचीं मुलें मुलीहि फायदा घेत. साक्षरतेच्या दृष्टीनें ही गोष्ट क..
परंतु ह्या शाळांचा उद्देश केवळ साक्षरतेच्या दृष्टीनें प्रयत्न करण्याचा नसून, साक्षरतेबरोबरच सर्वश्रेष्ठ

आर्यसंस्कृतीचीहि यथार्थपणें ओळख करून देत देत त्याप्रमाणें सर्वांना आचारप्रवण करविण्याचा असे. आणि ह्याच प्रयत्नांवर विशेषपणें भर दिला जाई. हें उद्दिष्ट साध्य करण्याच्या हेतूनें रात्रीच्या वेळीं सर्वांना एकत्र जमवून त्यांना भजनें शिकवलीं जात, रामायण महाभारतासारख्या ग्रंथातून सोप्या गोष्टी सांगितल्या जात. गांवोगांवी केवळ भजन शिकविण्यासाठींच दोन स्वतंत्र फिरते शिक्षक नेमलेले होते. प्रत्येक शनिवारीं सर्वांनीं शाळेंत जमून, भजन पूजन व आरती करावी, व त्या वेळीं सर्वांच्याकडून सामुदायिक प्रार्थनाहि ह्मणवून घ्यावी, असा प्रघात प्रचलित केला जात होता. श्रीसूर्यनारायण व बलभीम मारुतिराय ह्या देवतांच्या उपासना साष्टांग नमस्कारांच्या पद्धतीनें करवून घेण्यांत येत. धर्मप्रेम वृद्धिंगत करणारे निरनिराळे धार्मिक उत्सवहि सामुदायिक पद्धतीनें साजरे करून घेण्यांत येत. साक्षरतेबरोबरच ज्याप्रमाणें उपर्युक्त धार्मिक व नैतिक शिक्षणाकडे लक्ष पुरविलें जाई, त्याप्रमाणेंच नित्याच्या संसारालाहि थोडासा हातभार लावतां यावा, अशा प्रकारचे कांहीं घरगुती धंद्यांचें शिक्षण गावड्यांना साध्य करून देण्याचें आश्रमानें योजलें होतें व त्या कामावर सुप्रसिद्ध रसायन शास्त्रज्ञ श्री. स. वा. परांजपे (Chemist Tokyo) ह्यांची नेमणूक केली होती. ते नुकतेच औद्योगिक पहाणी करण्यासाठीं गोमांतकांत गेले होते. अत्यंत अल्प भांडवलावर लहानसहान धंदे यशस्वीपणें कसे पार पाडतां येतात, हें त्यांनीं कांहीं टिकाणीं सप्रयोग दाखवूनहि दिलें.

साहजिकच वरीलसारख्या सर्व प्रकारच्या चळवळीमुळें आश्रमीय पाठशाळा ह्मणजे गांवांतील सर्वांना विशेषत्वानें अभिमानाच्या व प्रिय अशा वस्तू होऊन बसल्या व तशा शाळा आपल्याहि गांवीं असाव्या अशी बलवत्तर इच्छा इतरांसहि होऊं लागली. 'प्रतापगडचें युद्ध' लिहिणारे, ग्वालेरचे सुप्रसिद्ध कॅप्टन श्री. ग. वि. मोडक तद्वतच पुण्याचे कै. हरिभाऊ लिमये ह्यांचे चिरंजीव श्री. दिनकराव लिमये हे उभयतां शुद्धिचळवळीचा इतिहास प्रत्यक्ष समजून घेण्यासाठीं गोमांतकांत आले होते. त्यावेळीं त्यांनीं चिंबल येथील आश्रमीय पाठशाळेस भेट देऊन तिच्या कार्याविषयीं अत्यंत संतोष व्यक्त केला. पुष्कळशा उपयुक्त सूचनाहि केल्या व 'ह्या लोकांची भूमिका तयार करण्यास हाच प्रयत्न हळहळू पण जोरानें व चिकाटीनें केल्यास फारच बरें होईल' असें आपलें मत शेरे बुकांत लिहून ठेविलें आहे. असो.

वरीलप्रमाणें नूतन लोकांचीं शुद्धीकरणें व झालेल्यांची शुद्धि पचविणें ह्या दोन्ही क्रिया आश्रमाकडून उत्कृष्टप्रकारें पार पाडल्या जात होत्या. सरकारची दृष्टी निवळल्यामुळेंच अर्थात् ह्या सर्व गोष्टी शक्य झाल्या व त्याबद्दल आश्रमानें पुन्हां एकदां तार करून ग. ज. सि. मासानुद आमोरिम ह्यांचे हार्दिक आभारहि मानले. परंतु अशा प्रकारें सरकारी विरोध नष्ट झाला तरी दुसऱ्या एका मत्सरी विरोधानें प्रस्तुतच्या शुद्धिकार्यांत आपलें ठाणें प्रथमपासून मांडलेलें होतें. त्याचा अल्पसा परिचय वाचकांना पुढील प्रकरणांत करून देऊन प्रस्तुत ग्रंथाचा उपसंहार करावयाचा आहे.





सावई येथील जपयज्ञ.



सावई येथील शुद्धीकृत गावडे व ग्रामस्थ पुढारी.

# प्रकरण ५ वें.

# मत्सरी विरोध.

" पुढारी झालें म्हणजे ' मुसरस्तत्र हन्यते ' या न्यायानें आघातहि सोसावे लागतात. "—लो. टिळक.

" जेव्हां लोक तुम्हांला शिव्या देतील, तुमचा छळ करतील, तुमच्यावर पाहिजे ते आळ घेतील, तेव्हां तुम्ही धन्य व्हाल. "—Bible.

विरोधावांचून कोणतेंहि सत्कृत्य तडीस जात नाहीं, हा अनुभविक सिद्धांत आहे. विघ्नें हीं यावयाचींच. विघ्नाविना सत्कार्याला तेज चढत नाहीं. विघ्न न येतां एखादी गोष्ट सिद्धीस गेली तर त्यांत पराक्रम व पुरुषार्थ तो काय ? संकटांना धीरोदात्तपणें तोंड देण्यांतच मनुष्याची खरी पारख होत असते. संकटांच्या भट्टींतून तावून सुलाखून निघाल्याविना कार्य सिद्धीला आवश्यक असणारा कणखरपणा कार्यकर्त्यास प्राप्त होत नाहीं. विरोधाशीं मनुष्याला आपल्या शक्तिसर्वस्वानें झगडावें लागतें. त्यामुळें साहजिकच त्याचे सद्गुण कसोटीस लागतात, व त्यांची वृद्धि होत जाते. चंदन जों जों जाळावें किंवा कांहीं सुवासिक द्रव्यें चिरडावीं–चूर्ण करावीं, तों तों त्यांचा सुगंध अधिकच दरवळत जातो. निघर्षण, छेदन, ताप, ताडन यानेंच सुवर्णाची परीक्षा होत असते. अर्थात् उन्नतीला विरोध, संकटें, छळ, ह्या गोष्टी आवश्यकच असतात. आणि म्हणूनच कोणत्याहि महत्कृत्याच्या संपादणींत विरोधी क्रिया सुरू झाली म्हणजे पराक्रमी पुरुष हताश न होतां आनंदच मानूं लागतात. लोकमान्य *टिळक* म्हणतात कीं—" कोणत्याहि कार्याला विरोध उत्पन्न झाल्याशिवाय मला बरें वाटत नाहीं. ज्या कार्यांत विरोधच नाहीं तें सिद्धीस नेण्यांत पुरुषार्थ तरी कसला ? "

गोमांतकीय शुद्धिकार्यांतहि अशीच एक विरोधी शक्ति निर्माण झाली. ती द्विविध स्वरूपाची होती. *पाद्र्यांच्या व ख्रिस्ती वृत्तपत्रांच्या चिथावणीवरून सरकारकडून झालेला विरोध*, हा एक प्रकार, व स्वजातीय मत्सरी निंदकांकडून झालेला विरोध, हा दुसरा प्रकार. त्यांपैकीं पहिल्या प्रकारच्या विरोधाचें स्वरूप कसें होतें व त्याचें निर्मूलन कसें करण्यांत आलें, हें गतप्रकरणीं दाखविण्यांत आलेंच आहे. प्रस्तुत प्रकरणीं दुसऱ्या प्रकारच्या विरोधाविषयीं अल्पसें विवेचन करावयाचें आहे.

सद्गुणी लोकांचा *उत्कर्ष* ज्यांना केव्हांहि सुखानें पहावत *नाहीं अशीं कांहीं दुष्ट प्रकृतीचीं* माणसें ह्या जगतांत सदासर्वकाळ असतातच. एखादा वीर पुरुष आपल्या अंगच्या अलौकिक गुणांमुळें जेव्हां धवल कीर्तिगिरीवर आरूढ होऊं लागतो, तेव्हां त्याचा उदयच होऊं नये म्हणून मत्सरग्रस्त दुष्ट माणसांची चांडाळचौकडी निर्माण होते व त्या सज्जनाला यश मिळूं न देण्याविषयीं तिचे सूक्ष्मासूक्ष्म मार्गानें अट्टाहासपूर्वक प्रयत्न सुरू होतात. सद्गुणी माणसांना लाठी ओढण्याचे

दोन मार्ग असतात. एक त्यांच्यापेक्षां अधिक कर्तृत्ववान् होण्याचा व दुसरा त्यांचें सुयश कलंकित करून त्यांचा लोकादराचा पारा निकृष्ट दशेंत आणून सोडण्याचा. साहाजिकपणेंच पहिल्या दुराराध्य व कष्टसाध्य मार्गाचा अवलंब करण्याचे परिश्रम न घेतां, मत्सरी जन दुसऱ्या अत्यंत सुसाध्य व सुगम अशा मार्गाचेंच ग्रहण करण्यास पुढें सरसावतात. मग द्वेष, असूया, कुत्सितपणा, कुटिलता इत्यादि आपल्या नित्याच्या जिवलग संवगड्यांना बरोबर घेऊन घटकाभर करमणुकीसाठीं उत्सुक असलेल्या सामान्य जनसमुहापुढें स्वतःच्या पांडित्याचें मोठें प्रदर्शन करून वाग्युद्धाच्या हिडिस तमाशाला ते प्रारंभ करतात. नंतर खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें करावें, पराचा म्हणण्यापेक्षां मनचाच कावळा करून भलतीं सलतीं नसतींच कुभांडें रचावीं, स्वतांची भ्रष्टता लपवून दुसऱ्यांस भ्रष्ट म्हणत सुटावें, स्वतांचा नामर्दपणा झांकण्यासाठीं रणशूराला भित्रा ठरवावा, किंवा समर्थांच्याच शब्दांत सांगावयाचें तर—

' मत्सरें सत्य मानेना । सत्याचें लटकें करी ।
वन्याचें ओखटें सांगे । मज नाहीं म्हणोनियां ॥
आपणूं भ्रष्टला आहे । भल्याला भ्रष्ट भावितो ।
आपणूं ठायिंचा लंडी । रणशूरासि हांसतो ॥ १ ॥

अशा पद्धतीच्या करामतीनें कांहीं काळ शिमगा खेळून, सवंग लोकप्रियता पदरांत पाडून घ्यावी व या विजयाभासानें उन्मत्त होऊन इतरांस तुच्छ लेखीत, हिंडण्यांत कृतकृत्यता मानीत रहावें असा त्यांच्या घरचा सुप्रसिद्ध दंडक, पुरातन काळापासून चालत आला आहे.

ह्या पूर्वापार पराक्रमाला अनुसरूनच आश्रमाला गावड्यांच्या शुद्धिकार्यांत मिळालेलें अपूर्व महद्यश पाहून वरील प्रकृतीच्या कांहीं जणांचें पित्त खवळलें व त्यांनीं आश्रमाला प्रथम प्रच्छन्नपणें व नंतर उघड उघड विरोध करण्यासाठीं चंग बांधला. ह्या पक्षाचे अध्वर्यु मडगांवच्या हिंदु पत्राचे संपादक श्री. दत्तात्रय व्यंकटेश पै हे आहेत. त्यांचें मुख्य म्हणणें असें कीं ' सध्यां जें गोमांतकांतील शुद्धिकार्य मसुराश्रमाच्या नांवावर विकलें जात आहे तसें तें विकलें जाऊं नये. ' कारण, गावड्यांच्या सांघिक शुद्धीचें रहस्य वा गमक " हिंदु जमीनदारांनीं शेतवाड्या पुरविण्याची, हिंदु वकिलांनीं कायद्याच्या अडचणी निवारण्याची, देवस्थानाच्या व्यवस्थापकांनीं देवालयांत प्रवेश देण्याची आणि गोमांतकीय यजमानांनीं आपल्या पुरोहितांस शुद्धिकृतांचीं धर्मकृत्यें केलीं असतां पौरोहित्यास न मुकण्याची हमी देणें, या चार गोष्टींत असून त्या चारहि गोष्टी मसूरचा ब्रह्मचर्याश्रमच काय पण सबंध हिंदुस्तानांतील ब्रह्मचाऱ्यांसहि शक्य होणार नाहींत. गोमांतकीय लोक हा शुद्धीकरणाचा प्रश्न १८९५ सालापासून सोडविण्यासाठीं झटत आहेत. त्यांनींच शुद्धीची सर्व पूर्वसिद्धता घडवून आणली व नंतर आश्रमाला पुढें केलें. पण आपलें हें निमित्तमात्रत्व विसरून जाऊन आश्रमानें स्वतःच्याच नांवाचा डांगोरा जगभर पिटला व शुद्धीच्या नांवाखालीं आपली पांढरी झोळी पिवळी करून घेतली. एवढेंच नव्हे, तर हें आपलें स्वार्थी धोरण छपविण्यासाठीं गोमांतकीय हिंदु हे भेकड, नादान, लांचखाऊ व शुद्धिविरोधक आहेत अशा उलट्या बोंबा मारल्या. आपली मदत कोणच्या कार्याकरितां घेतली आहे हें विसरून जाऊन ' कुंपणानें शेत खावें ' त्यांतलाच प्रकार आश्रमाकडून होऊं लागला. युद्धाकरितां कवच

ारण केलें तर तेंच आपण शरसंधान केलें असें म्हणूं लागले; व ह्या सर्व अतिक्रमणाला आळा ालून त्याचा प्रतिकार करणें आम्हांला भाग पडलें. ”

श्री. पै ह्यांचें म्हणणें थोडक्यांत वरील स्वरूपाचें आहे. त्यांचे आणखीहि कित्येक निरनिराळे भाक्षेप आहेतच—कारण आश्रमाच्या प्रत्येक कृतींत त्यांच्या दृष्टीला स्वार्थीपणा व लुच्चेपणा मोतप्रोत भरलेला आढळून येत असे—परंतु वरील आरोपांत या बहुतेकांचा ह्या ना त्या स्वरूपांत समावेश होऊं शकत असल्या कारणानें त्यांचाच विशेषतः येथें थोडक्यांत विचार करावयाचा आहे.

श्री. पै ह्यांचें म्हणणें असें, कीं १८९५ सालापासून शुद्धिकरणानिमित्त प्रयत्न चालू आहेत; परंतु त्यांनीं १८९५ पासूनच प्रारंभ कां करावा, हें आम्हांस समजत नाहीं. आमच्या अल्प समजुतीप्रमाणें १८९५ सालाच्या पूर्वींहि कित्येक प्रयत्न झालेले असल्याविषयीं इतिहास साक्ष देत आहे; पण ती गोष्ट सोडून दिली तरी ह्या १८९५ सालापासून गोमांतकांत शुद्धि-करणार्थ जे प्रयत्न केले गेले व ज्या योगें शुद्धिकार्याची पूर्वसिद्धता झाली, त्या प्रयत्नांचा पाढा श्री. पैनीं पुण्याच्या शिवाजी मंदिरांतील जाहीरसभेंत वाचून दाखविला तो विचारणीय आहे. ते म्हणाले—

“ १८९५ सालापासून शुद्धीचे प्रयत्न चालू आहेत. ह्यासाठीं गावडे लोकांनीं शृंगेरी मठाच्या श्रीमत् शंकराचार्यांना आपणांला शुद्ध करून घेण्याबद्दल विनंती केली होती, परंतु ती त्यांनीं मान्य केली नाहीं. ह्या शुद्धिकार्यामध्यें कांहीं सुशिक्षित, कांहीं अशिक्षित व पुरोहित ह्यां-कडून विशेष अडचणी येतात. सुशिक्षितांचे गैरसमज, लेख, व्याख्यान, युक्तिवाद ह्यांचे साहाय्यानें दूर करतां येतात. जुन्या पिढीच्या अशिक्षित लोकांची समजुत अलिकडल्या सुधारलेल्या तरुण पिढीनें हट्ट धरून काढली पाहिजे. पुरोहितांनीं शुद्धीकृतांचीं धर्मकृत्यें करण्याला तयारी दाखविली पाहिजे व धर्मपीठांनीं ह्या शुद्धीकृतांना हिंदुधर्मांत घेतल्याबद्दल, व त्यांना हिंदुधर्माचे सर्वाधिकार प्राप्त झाल्याबद्दल विश्वासपत्रें दिलीं पाहिजेत. ह्या दृष्टीनें आम्हीं द्विवेकर शास्त्री व चित्राव शास्त्री ह्यांचीं व्याख्यानें करविलीं. श्री. गजानन भास्कर वैद्य ह्यांनाहि बोलाविलें होतें. स्वामी श्रद्धानंदजींनीं गोमांतकांत येण्याचें आश्वासन दिलें होतें, पण तें घडलें नाहीं. तथापि जातिभेद न मानणाऱ्या आर्यसमाजामार्फत शुद्धिकार्य करण्याची तयारी गावडे लोकांची होणें शक्य नव्हतें. अशा तऱ्हेनें तेथील लोकांच्या पद्धतीनें सर्व गावडे लोकांचा समाज शुद्ध होऊन हिंदु धर्मांत येण्याला तयार झाला होता. ” ( केसरी ता. ३० अक्टोबर १९२८ )

श्री. पैनीं निवेदिलेल्या १८९५ पासूनच्या शुद्धिप्रयत्नाच्या वरील इतिहासाचा विचार करतां श्री. द्विवेकर शास्त्री व श्री. चित्राव शास्त्री ह्यांचीं व्याख्यानेंच तेवढी प्रयत्नांच्या जमेच्या बाजूला पडत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत आहे. आणि तेवढ्यानेंच त्यांच्या म्हणण्याप्रमाणें सर्व गावडे लोकांचा समाज शुद्ध होऊन ( ! ) हिंदुधर्मांत येण्याला तयार झाला होता असा निष्कर्ष काढणें भाग पडत आहे. बरें ते व्याख्यातेहि दुर्दैवानें गोमांतकीय नाहींत ! ह्या आपत्तीला काय करावें ? आणि त्या शास्त्रीद्वयाला तरी बोलावून आणलें होतें कां ते स्वतःच आले होते ?

गावडे लोकांच्या सामुदायिक शुद्धीचें रहस्य श्री. पैनीं चार गोष्टींत दाखविलें आहे. १ हिंदु जमीनदारांनीं शेतवाड्या पुरविण्याची. २ हिंदु वकिलांनीं कायद्याच्या अडचणी निवारण्याची,

३ देवस्थानच्या व्यवस्थापकांनीं देवालयांत प्रवेश देण्याची. ४ गोमांतकीय यजमानांनीं पुरोहितांस, शुद्धिकृतांचीं धर्मकृत्यें केलीं असतां पौरोहित्यास न मुकण्याची हमी देणें, या चारहि गोष्टी श्री. पैंच्या म्हणण्याप्रमाणें आश्रमापेक्षां निःसंशय गोमांतकीयांच्या स्वाधीनच्या होत्या; परंतु त्या तशा स्वाधीनच्या असतांहि १८९५ सालापासून त्या दृष्टीनें सतत प्रयत्न चालले असतांहि १९२८ सालापर्यंत शुद्धि कां होऊं शकली नाहीं, ह्याचा मोठाच अचंबा वाटतो. ह्यावर श्री. पै म्हणतील "आमची १८९५ पासून १९२८ पर्यंत सर्व जुळवाजुळव चालली होती. ती झाल्यावर किंवा चालली असतां आम्हीं आश्रमाला साहाय्यार्थ बोलाविलें." "वेळ पाहून हें भगव्या वेषाचें कवच तेथील लोकांनीं घेतलें व ख्रिस्ती झालेल्या गावड्यांना परत हिंदु धर्मांत घेतलें." पण गोमांतकीयांचें हें 'कवच' होण्यासाठीं आश्रमाला कोणी निमंत्रण केलें होतें? त्याचा त्यांनीं स्पष्ट खुलासा केला असता तर फार बरें झालें असतें. पहिल्या म्हणजे चिंबल येथील शुद्धिसमारंभाचीच वार्ताहि त्यांना तीन चार दिवसच कायती अगाऊ कळली होती. अशा अवस्थेंत "ह्या कार्यासाठीं (शुद्धि) हिंदु मिशनरी सोसायटीचे कै. वैद्य आणि स्वामी श्रद्धानंद ह्या उभयतांनीं येण्याचें कबूल केलें होतें. त्यांना आपला गोव्यांत जाण्याचा इरादा सफल करतां आला नाहीं. आणखी कोणाला बोलवावें व वाट पहात काल दवडावा त्यापेक्षां मसूरकरबुवा अनायासें आले आहेत, त्यांच्याबद्दल लोकांत बरी बुद्धी आहे तेव्हां त्याचाच फायदा कां न घ्या? अशा विचारानें तिसऱ्या वेळीं त्यांना विनंती केली, व डॉ. कुर्तकोटी शंकराचार्यांची संमती घेऊन त्यांनीं हें कार्य आरंभिलें. गोवें सरकारचें धोरण



कै. नाना देशपांडे, (कोडोली).



स्वर्गस्थ ज. श्रीधर गांधी.



श्री. गजाननराव वैद्य.



श्री. जठार वकील, शिवणी (मध्यप्रांत).



श्री. श्रीपाद शंकर नवरे (मुंबई).

३ देवस्थानच्या व्यवस्थापकांनीं देवालयांत प्रवेश देण्याची. ४ गोमांतकीय यजमानांनीं पुरोहितांस, शुद्धिकृतांचीं धर्मकृत्यें केलीं असतां पौरोहित्यास न मुकण्याची हमी देणें, या चारहि गोष्टी श्री. पैंच्या म्हणण्याप्रमाणें आश्रमापेक्षां निःसंशय गोमांतकीयांच्या स्वाधीनच्या होत्या; परंतु त्या तशा स्वाधीनच्या असतांहि १८९५ सालापासून त्या दृष्टीनें सतत प्रयत्न चालले असतांहि १९२८ सालापर्यंत शुद्धि कां होऊं शकली नाहीं, ह्याचा मोठाच अचंबा वाटतो. ह्यावर श्री. पै म्हणतील "आमची १८९५ पासून १९२८ पर्यंत सर्व जुळवाजुळव चालली होती. ती झाल्यावर किंवा चालली असतां आम्हीं आश्रमाला साहाय्यार्थ बोलाविलें." "वेळ पाहून हें भगव्या वेषाचें कवच तेथील लोकांनीं घेतलें व ख्रिस्ती झालेल्या गावड्यांना परत हिंदु धर्मांत घेतलें." पण गोमांतकीयांचें हें 'कवच' होण्यासाठीं आश्रमाला कोणी निमंत्रण केलें होतें? त्याचा त्यांनीं स्पष्ट खुलासा केला असता तर फार बरें झालें असतें. पहिल्या म्हणजे चिंबल येथील शुद्धिसमारंभाचीच वार्ताहि त्यांना तीन चार दिवसच कायती अगाऊ कळली होती. अशा अवस्थेंत "ह्या कार्यासाठीं (शुद्धि) हिंदु मिशनरी सोसायटीचे कै. वैद्य आणि स्वामी श्रद्धानंद ह्या उभयतांनीं येण्याचें कबूल केलें होतें. त्यांना आपला गोव्यांत जाण्याचा इरादा सफल करतां आला नाहीं. आणखी कोणाला बोलवावें व वाट पहात काल दवडावा त्यापेक्षां मसूरकरबुवा अनायासें आले आहेत, त्यांच्याबद्दल लोकांत बरी बुद्धी आहे तेव्हां त्याचाच फायदा कां न घ्या? अशा विचारानें तिसऱ्या वेळीं त्यांना विनंती केली, व डॉ. कूर्तकोटी शंकराचार्यांची संमती घेऊन त्यांनीं हें कार्य आरंभिलें. गोवें सरकारचें धोरण काय होईल ह्याचा अदमास लागेना, ह्याकरितां बाहेरच्या व्यक्तीला पुढाकार घावा आणि त्याच्या जोडीनें मागें राहून सर्व कामें आपण करावीं" इत्यादि विविधवृत्ताला दिलेल्या मुलाखतींतील त्यांनीं केलेलीं विधानें कितपत सत्य व वस्तुस्थितीला धरून आहेत, हें सूज्ञांना तेव्हांच समजून येईल.

आश्रम गोमांतकांत गेला तो कोणाच्याहि निमंत्रणावरून नसून तो स्वयंस्फूर्तीनें व शुद्धिकार्याचें ध्येय दृष्टिसमोर ठेऊनच गेला, हें येथें स्पष्टपणें सांगितलेंच पाहिजे. मग 'आश्रम शुद्धिकार्यापूर्वी गोमांतकांत प्रवचन कीर्तनांतून वा जाहीर रीतीनें शुद्धिविषयक एक अवाक्षर काढीत नव्हता हें कसें?' असा विरोधकांचा प्रश्न आहे. पण धर्मवेड्या पोर्तुगीज सीमेंत अगाऊ जाहीर करून शुद्धिकार्याची कोंडी फुटणें शक्य कसें झालें असतें, हें त्यांच्या ध्यानांत येत नाहीं. 'इशारतीचें बोलों नये, बोलायाचें सांगों नये' किंवा 'आधीं केलें मग सांगितलें,' हें कार्यकौशल्य बोलघेवड्यांना कसें आवडूं शकेल? "गावड्यांचें घबाड पाहून आश्रमाच्या तोंडाला पाणी सुटलें व त्यानें आपलें पूर्वीचें शुद्धीला प्रतिगामी असणारें धोरण बदललें" असेंच ते म्हणणार. त्यांतूनहि त्यांनीं वर्तमानपत्रें वाचण्याची थोडी अधीक तसदी घेतली असती तर त्यांच्या विशाल दृष्टींतून १९२५ सालीं हजारों लोकांसमक्ष आश्रमानें वऱ्हाडांत उमरावती मुक्कामीं केलेल्या शुद्धीचें वृत्त निश्चयानें निसटून गेलें नसतें किंवा दासबोध मासिकांतील शुद्धिसंघटन विषयक विचारावरूनहि त्यांना आश्रम शुद्धिविरोधी होता का कसा होता हें प्रत्ययास आलें असतें.

आतां आश्रमाला कोणाहि स्थानिक माणसाचें साहाय्य मिळाल्याविना गोमांतकांतील शुद्धिकार्य झालें, असें आश्रमाला केव्हांहि वाटलें नाहीं व त्यानें तसें कधीहि म्हटलेंहि नाहीं. 'आश्रम



कै. नाना देशपांडे, (कोळोली).



स्वर्गस्थ म. श्रीधर गांधी.



श्री. गजाननराव वैद्य.



श्री. जठार वकील, शिवणी (मध्यप्रांत).



श्री. श्रीपाद शंकर नवरे (मुंबई).

स्वतःच्या नांवानेंच जगभर ढांगोरा पिटीत आहे '. अशी कंडी पिकवून गोमांतकीयांचें मन आश्रमाविरुद्ध कलुषित करण्याचा तो विरोधकांचा एक डाव होता; परंतु येथें हेंहि स्पष्ट सांगितलें पाहिजे कीं, त्या आश्रमसाहाय्यकर्त्या स्थानिक मंडळींत ह्या विरोधी कंपूपैकीं कोणीहि नव्हतें. ज्या स्थानिक मंडळींनीं आश्रमाला मनोभावें साहाय्य केलें होतें त्यांना आश्रम किती व कसा मानीत होता, हें त्यांचें त्यांनाच माहीत असल्या कारणानें त्यांच्या चित्तांत प्रारंभापासून आतांपर्यंत केव्हांहि चलबिचल होऊं शकली नाहीं. एकादें साधें कार्यहि दुसऱ्याच्या साहाय्याविना होत नाहीं. मग गोमांतक शुद्धीसारखें अभूतपूर्व काम कोणाच्याहि साहाय्याविना एकट्या आश्रमानेंच केलें असें म्हणण्या इतका आश्रम खात्रीनें विवेकभ्रष्ट झालेला नाहीं, हें त्यांना पूर्णपणें विदित होतें. आतां आश्रमाच्या नांवानें जिकडे तिकडे शुद्धिकार्याची प्रसिद्धी झाली हें स्वाभाविकच होतें. एखाद्या युद्धांत विजय मिळाला म्हणजे 'अमक्या राजाचा जय झाला,' 'अमक्या सेनापतीनें शत्रूचा पराभव केला' असें म्हणण्याचा प्रघातच आहे. अमक्या सेनापतीनें जय मिळविला म्हणजे, तो सैन्याच्या सहाय्याविना एकटाच जाऊन लढला व त्यानें जय मिळविला असें कोणीहि समजत नाहीं. आतां जेव्हां लढाईचा सविस्तर इतिहासच लिहिला जातो तेव्हां त्या त्या विजयी वीराचे ते ते पराक्रम नामनिर्देशासह स्वाभाविकपणेंच दिले जातात. आश्रमानेंहि तसा सविस्तर इतिहास लिहिण्याचें योजिलें होतें व त्यांत प्रत्येकाची कामगिरी येणारच होती. आश्रमाला स्वतःच्याच पोळीवर जर श्रेयाचें सर्व तूप ओढावयाचें असतें तर वृत्तपत्रांतून जाहीर पद्धतीनें व जेवढ्या जेवढ्या व्यक्तींचे पत्ते मिळूं शकले तेवढ्या तेवढ्या शेंकडोंशे व्यक्तींना गोमांतकांत व गोव्याबाहेर वैयक्तिक स्वरूपाचीं पत्रें पाठवून शुद्धिकार्याविषयीं त्यांनीं बजाविलेली समग्र कामगिरी आपापल्या छायाचित्रासह पाठवून देण्याविषयीं आग्रहपूर्वक पुन्हां पुन्हां विनविण्याचें त्याला काय प्रयोजन घडलें होतें, वा त्याचें काय अडलें होतें ? पण आश्रमाला स्वार्थसाधू, आपलपोटा, व श्रेयाला हपापलेला ठरविण्याच्या भरांत ह्या गोष्टीचा विचार शांतपणें व्हावा कसा ?

"श्रेय संपादणीच्या ह्या हावरेपणामुळें आश्रमाला सत्यासत्याची चाड राहिली नाहीं, आनंदमूर्तींनीं शुद्धिकार्यांत स्वतःस मार बसल्याची पदरचीच बोंब उठविली. एवढेंच नव्हे तर ते हद्दपार केले गेले असतांहि गोमांतकीयांकडून प्रतिज्ञालेखावर त्यांची सही करण्याविषयीं आश्रमीयांनीं अट्टाहास धरला. तद्वतच शुद्धीकृतांना शिक्षण देण्यासाठीं शंभर शिक्षक व शिक्षकिणी पाहिजेत व गोमांतकाची औद्योगिक दृष्ट्या पाहाणी करावयाची आहे अशा भपकेबाज जाहिराती आश्रमानें देऊन जनतेला भुरळ पाडण्याचा प्रयत्न केला" असेहि कांहीं आरोप विरोधकांकडून आश्रमावर करण्यांत आले आहेत.

आनंदमूर्तींच्या मारासंबंधीं मागें उल्लेख आलाच आहे. पाश्चात्यांसारख्या सुधारलेल्या व प्रगमनशील समाजांतहि परधर्मासहिष्णुतेमुळें श्रीमत् स्वामी विवेकानंदांचा जीव कसा व किती वेळां धोक्यांत आला होता, हें त्यांच्या चरित्रांत कोणासहि पहावयास मिळेल. मग ह्या प्रगमनशीलतेचा जेथें वाराहि खेळूं शकत नाहीं त्या अडाणी समाजाकडून आनंदमूर्तींवर हल्ले केले जावे त्यांत आश्चर्य तें काय ? धर्मासारख्या प्रत्येकास जिव्हाळ्याच्या वाटणाऱ्या प्रश्नांत धर्मप्रचारकांवर अडाणी परधर्मीयांकडून हल्ले होऊं शकतात ही गोष्ट संपादक म्हणवून घेणाऱ्या गृहस्थाला अविश्वसनीय व असत्य वाटली ह्याचें मात्र कोणालाहि नवलच वाटेल. शुद्धिकार्यांत प्रथमपासून अहर्निश

झटणारे श्री. विट्ठल सुर्लीकर व श्री. गोपाळराव परीट हे हल्ल्याच्या प्रसंगीं साक्षात् उपस्थित होते. एके रात्रीं अशाच प्रसंगीं आनंदमूर्तींना श्री. जिवाजीपंत महात्मे यांनीं आपल्या घरीं ठेऊन घेतलें होतें, पण ते आज साक्ष द्यावयाला जिवंत राहिले नाहींत ही दुःखाची गोष्ट आहे. विठ्ठल व गोपाळ परीट हे तर बोलून चालून आश्रमाचेच. तेव्हां त्यांच्या साक्षीला विरोधकांकडे किंमतच नाहीं. एकंदरींत आनंदमूर्तींनीं आपल्यावर हल्ले होतील त्या प्रसंगीं शहरांतील कांहीं प्रतिष्ठित शिष्टांना आगाऊच त्या स्थळीं तो प्रसंग पहाण्यासाठीं नेऊन ठेविलें नाहीं ही त्यांची अक्षम्य चूकच झाली म्हणावयाची!

प्रतिज्ञालेखावरील सहीसंबंधींहि असाच व्यर्थ गहजब करण्यांत आलेला आहे. वस्तुतः प्रतिज्ञालेखावर शुद्धिकांक्षी व्यक्ति व तिला साक्षीभूत असणारा मनुष्य, ह्या दोघांव्यतिरिक्त अन्य कोणाच्या सहीची आवश्यकता नसते. प्रचारकाची त्यावर सही येण्याचा कांहींच संबंध नसतो. असें असतां श्री. तळावलीकर ह्यांनीं प्रतिज्ञालेखावर स्वतःच्या सह्या केल्या. साहजिकच तत्रस्थ आश्रमीय प्रचारकांनीं त्यांना हाटकलें. तरीहि पण तळावलीकरांनीं तें जुमानलें नाहीं, एवढेंच नव्हे तर शुद्धीकृतांना ज्या शुद्धीकृत पत्रिका ( certificates ) द्यावयाच्या होत्या त्यांच्यावर सह्या करून ठेवल्या. आनंदमूर्ति हे शुद्धिविभागाचे त्या वेळचे अध्यक्ष नेमले असल्यामुळें शुद्धिकृत्य पत्रिकांवर त्यांचेंच नांव असावयाचें हें उघड होतें. आनंदमूर्ति गोमांतकांत साक्षात् काम करीत होते, तोंपर्यंत प्रश्नच नव्हता; पण त्यांना पुढें हद्दपारी झाली तेव्हां त्यांचें नांव घालून पत्रिका देण्याचें काम चालू ठेवण्यांत आलें होतें. श्री. तळावलीकर जेव्हां स्वतःच सह्या करूं लागले तेव्हां त्यांना वरील गोष्ट सांगण्यांत आली. त्याबरोबर आनंदमूर्तींची आम्हीं खोटी सही कशी करूं असा मोठा सत्यप्रतिज्ञेचा आव त्यांनीं आणला. वास्तविक आनंदमूर्तींच्या छापील सहीचीं पत्रकें ( फार्मस् ) पाठवून देईपर्यंत ही तात्पुरती व्यवस्था करण्यांत आली होती, त्यांत खोट्या सहीचा कांहीं संबंध नव्हता. एखाद्या गृहस्थाला फसविण्यासाठीं जर त्यांची सही कोणी केली तर तो गुन्हा ठरेल. त्या गृहस्थाची अनुज्ञा असतांना किंवा त्याला त्यांत ठकविण्याचा हेतु नसतांना त्यांची केलेली सही ही कायदेशीर दृष्ट्या गैरवाजवी होऊं शकत नाहीं. त्या गृहस्थाची सही केलेला रबर-स्टँप कागदावर उमटविणारा मनुष्य किंवा छापखान्यांतील मुद्रक हाहि ‘ खोटी सही करणारा ’ म्हणून गुन्हेगार ठरला असता. परंतु ही गोष्ट लक्षांत न घेतां श्री. तळावलीकरांनीं बरेंच आकांडतांडव केलें. हें वृत्त समग्रपणें तत्रस्थ आश्रमप्रचारकानें मसुरास कळविलें, तेव्हां आश्रमानें शोध घेतला. प्रस्तुत प्रकरणीं शुद्धिसाहाय्यक मंडळाचाहि सल्ला घेण्यांत आलेला नव्हता असें आश्रमास समजलें. हा बेशिस्त प्रकार साहजिकच कोणास रुचला नाहीं. परंतु इतक्यांत श्री. तळवलीकरांचें स्वतःचेंच पत्र आलें. त्यांत त्यांनीं “ आपला माझा परिचय–नव्हे ओळखहि नसतां मी आपल्या आश्रमातर्फे तयार झालेल्या कागदपत्रांचा केलेला उपयोग–व तोहि आपली आज्ञा नसतांना–कळवून, आपली क्षमा मागण्यासाठींच हें पत्र आज मी लिहित आहें ” असें स्पष्टपणें लिहिलें असल्यामुळें, तें प्रकरण तसेंच सोडून देण्यांत आलें, व त्यांचा आश्रमाच्या कार्यपद्धतीविषयीं कांहीं गैरसमज झाला असल्यास त्यांनीं गोव्याच्या सरहद्दीवरील सुकीरवाळ येथील आश्रमशाखेंत त्यावेळचे शुद्धिविभागाचे अध्यक्ष ब्र. गणपतिबुवा यांस जाऊन भेटावें–कारण गोव्यांत जाण्यास ब्र. गणपतिबुवांना प्रतिबंध होता–म्हणजे झालें. असें त्यांस कळविण्यांत आलें. ह्यावर त्यांनीं १४ जुलईच्या पत्रांत लिहिलें,

कीं, " आपणास गेल्या दीड महिन्यामागें मी एक पत्र पाठविलें होतें. त्याचें उत्तर ह्मणून ब्रह्मचर्याश्रमांतून मला एक पत्र पाठविण्यांत येऊन आपण नसल्याचें कळविलें व कांहीं खुलासा करून घेण्यासाठीं मला सुर्कीरवाळ मुक्कामीं ब्र. गणपतिबुवांस भेटण्याची सल्ला देण्यांत आली. मी त्यांस भेटलों नाहीं व माझे झालेले गैरसमज दूर करून घेण्याइतकेंहि त्या गैरसमजांनीं मला अजून सतावलेलें नाहीं. " येथवर सर्व गोष्टी जरी ठीक झाल्या तरी लवकरच श्री. तळावलीकरांना त्या गैरसमजांनीं पुरेपूर सतावून सोडलें, व त्यांनीं वरील गोष्टींनाच विपर्यस्त स्वरूप देऊन आश्रमाविरुद्ध मोहीम सुरू केली.

वास्तविकपणें शिस्त हा गुण कार्यसिद्धीचा प्राण आहे, व म्हणूनच आश्रमाचा त्यावर विशेष भर होता. " कोणत्याहि चळवळींत पुढाऱ्याचें काम बेजबाबदार माणसांनीं हातीं घेतलें म्हणजे मात्र धडगत नाहीं, " असें सुप्रसिद्ध आयरिश पुढारी पार्नेल ह्याचें म्हणणें असे. पण ही एकशिस्त पद्धति विरोधी पक्षाला रुचावी कशी ! " संस्थेच्या कार्यांत सुसंगति आणि कार्यपद्धतींत शिस्त हीं अनिवार्यपणें असावीं लागतात. संस्थेच्या एखाद्या घटकानें उठावें आणि आपणांस पाहिजे तें संस्थेच्या नांवानें बहकत व करीत सुटावें आणि जो ह्या बेजबाबदार कृत्यांला जुमानीत नाहीं, त्यालाच उलट बेशिस्त म्हणावें, हा कांहीं शिस्तीचा अर्थ नव्हे. ' प्रत्येक काम आपण अत्यंत शिस्तवार करूं या ' असें एखाद्यानें म्हटलें कीं, आमच्यांतले कित्येक लोक लगेच असें उत्तर करतात कीं, " तुम्हीं शिस्त ठरवित बसलां तर काम पद्रांत पडावयाचें दुरावेल. याकरितां तुम्हीं शिस्तीबिस्तीच्या बाता न मारतां जें कांहीं साधतां येईल तें साधून घ्या. " परंतु त्या लोकांची ही विचारसरणी उथळ बुद्धीची अतएव अत्यंत चुकीची असते. बेशिस्तपणें एकादें कार्य घडून येत असलें तरी तेंच शिस्तीनें केलें असतां कितीतरी कमी श्रमांत, कमी खर्चांत आणि कमी वेळांत होत असतें. सबब शिस्त ठरण्यास चार दिवस जास्ती लागले तरी हरकत नाहीं, पण बेशिस्तपणें एका दिवसांत होणारें कामहि न झालेलें पुरवलें, असें मानण्यापर्यंत आमची मजल गेली पाहिजे. कारण शिस्त ठरविण्यासाठीं नुकसान होतें, असें वाटतें तें साफ खोटें असतें आणि कदाचित् खरोखरच थोडें नुकसान झालें, तरी तें सव्याजच नव्हे दामदुप्पटीनें भरून येत असतें, यांत मुळींच शंका नाहीं, " अशी शिस्तीची श्रेष्ठ थोरवी जे हिंदुकार मुक्तकंठानें आपल्या लेखांत प्रतिपादन करतात, तेच हिंदुकार वरील घडलेल्या बेशिस्त प्रकाराचें समर्थन करून आश्रमाच्या पदरीं खोटेपणा बांधण्यास धांवधांवून पुढें सरसावतात, ह्या गोष्टींतील रहस्य त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाला आकलन होऊं शकणार ?

गोमांतकांत शुद्धिचक्र सुरू होऊन शेंकडो हजारों गावडे हिंदुधर्मांत जेव्हां प्रवेश करूं लागले, तेव्हां त्यांच्यांत उत्सव, भजन, पुराण, प्रवचनादि द्वारा सतत धर्मजागृती ठेवणें व त्यांच्यांत साक्षरता प्रसार करणें, शुद्धि पचविण्याचे दृष्टीनें अत्यंत आवश्यक होतें. खेरीज त्या शुद्धीमुळें चिडून गेलेले पाद्री व ख्रिस्ती लोक ह्या वेळीं थैमान घालून नानाविध मार्गांनीं गावड्यांस फोडण्याचा अट्टाहास करीत होते. अशा समयीं त्या गावड्यांस धीर देऊन विरोधकांच्या आक्रमणांचा प्रतिकार करण्यासाठीं गावड्यांच्या प्रत्येक वाड्यावर निदान एक एक मनुष्य तरी ठेवण्याची आवश्यकता होती; व ह्या दृष्टीनें आश्रमानें प्रत्येक वाड्यावर पाठशाळेच्या स्वरूपांत एकएक केंद्र उभारण्याचें

ठरवून शंभर शिक्षक व शिक्षकिणींची मागणी केली होती. कार्यक्षेत्राच्या मानानें ही योजना अत्यावश्यक कशी होती, ही गोष्ट पर्यकपंडितांना कशी पटावी? पण त्यांना ती जरी न पटली तरी कार्यदृष्टीनें तशी व्यवस्था करणें प्राप्तच होतें व आश्रमानें शक्त्यनुसार तशीं केंद्रें स्थळोस्थळीं उभारलींच आणि त्याचें मुख्य केंद्र "ज्योतिषकार्यालय" ह्या नांवानें पणजी येथें ठेवण्यांत आलें. आश्रमाच्या ह्याच ज्योतिषकार्यालयाला 'गोवा सरकारला फसवून स्वतःला पळ काढतां यावा यासाठीं आश्रमानें उभारलेलें हें कुभांड आहे,' असें हिंदुकारांनीं नामाभिधान दिलें आहे. म्हणजे सरकारच्या वक्र दृष्टींतून निसटून त्या धरपकडीच्या भयंकर वेळीं मोठ्या चातुर्यानें आश्रम काम करीत राहिला, त्या कृत्याला हे सरकार-हितैषी व राजनिष्ठ संपादक "फसवेगिरी" म्हणून संबोधणार!! पण असें करण्यांत त्यांनीं उघडउघड पोर्तुगीज सरकारच्या मनांत आश्रमासंबंधीं संशयाचें जाळें निर्माण करण्याचें निंद्य कर्म केलें असें कोणी ह्मटल्यास यांत त्याचा काय दोष? असो.

आश्रमीय पाठशाळांकडून कशी उत्कृष्टपणें कामगिरी बजावली जात होती हें मागें कथन केलें आहे. चळवळीच्या दृष्टीनें विचार करतां ह्या पाठशाळा शुद्धीकृतांप्रमाणेंच शुद्धच लोकांसाठीं काढणेंहि उचित होतें. पण तीहि गोष्ट सोडून दिली तरी शुद्धीकृतांच्या संख्येच्या मानानें विचार करितां केवळ साक्षरतेसाठींच किती तरी स्वयंसेवक तेथें राहावयास पाहिजे होते. त्याखेरीज विद्वान् व स्वार्थत्यागी अशा श्रद्धाभक्तिसमन्वित धर्मोपदेशकांची आवश्यकता होती ती निराळीच. पण घरांत बसून नुसती नालस्ती करण्याचेंच व्रत ज्यांनीं स्वीकारलें त्यांना ही दृष्टी यावी कशी?

ह्या वरील पाठशाळांनाच एक औद्योगिक विभाग जोडण्याचेंहि आश्रमानें ठरविलें होतें, कीं ज्यायोगें लहान घरगुती धंद्यांचें ज्ञान घेऊन गावड्यांना आपल्या गरिबांच्या संसाराला थोडें फार साहाय्य करता येईल. ह्या दृष्टीनें कोणते कोणते धंदे तेथें प्रचलित करतां येतील हें पाहण्याकरितां म्हणून आश्रमानें जपानहून जाऊन आलेले सुप्रसिद्ध रसायन शास्त्रज्ञ श्री. स. वा. परांजपे यांस गोमांतकांत पाठविलें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. ही योजना गोव्याचे माजी ग० ज० पेद्रोद अमोरिम ह्यांना तद्वतच कित्येक विचारवंतांनाहि मान्य झाली होती. पण या योजनेंतहि विरोधकांच्या दूषित दृष्टीला आश्रमाचा स्वार्थसाधुपणा व फसवेगिरी आढळून आली, हें त्यांच्या ब्रीदास सर्वथैव साजेसेंच झालें.

विरोधी कंपूचें म्हणणें असें कीं, 'आश्रमानें ही जी सर्व लटपट चालविली आहे ती स्वतःच्या तुंबड्या भरण्यासाठीं होय. गावड्यांचें शुद्धिकार्य, ही सहज साध्य गोष्ट होती, आश्रम या गोष्टीचा उगाच बाऊ करून दाखवून जनतेकडून अवाच्या सवा पैसे उपटीत आहे. आश्रमानें शुद्धि म्हणजे एक व्यापारच मांडून आपली पांढरी झोळी पिंवळी करण्याचा सपाटा चालविला आहे.'

कोलंबसानें अमेरिका खंड शोधून काढल्यानंतर त्याच्या त्या दिव्य पराक्रमाला तुच्छ लेखणारे कांहीं हरीचे लाल त्या काळीं आढळले. तद्वतच सध्याच्या सुधारलेल्या युगांतहि त्या गोष्टीची पुनरावृत्ति झाली. जें शुद्धिकार्य गेल्या चारशें वर्षांत शक्य झालें नाहीं व ज्या शुद्धिकार्याविषयीं विरोधी पक्षाचे नेते श्री० हिंदुकार त्यांचें मतहि "गोमांतकीय हिंदूंच्या विकट परिस्थितीची



श्री. स. वा. परांजपे, केमिस्ट. (टोकियो–जपान).

( औद्योगिक शोधनेसाठी गोमांतकांत आपणाने पाठविलेले सुदरच ).

सुधारणा करण्याचा हिंदुकरण, हा जरी परिणामकारक व अनिवार्य असा उपाय असला तरी तो अमलांत आणणें हें मात्र बरेंच कठीण काम आहे. कारण तो हातांत घेऊन सिद्धीस नेण्यास अनेक प्रकारच्या अडचणी येणार आहेत," असेंच होतें, तेंच शुद्धिकार्य आश्रमानें यशःसिद्ध करून दाखविल्यावर तें एकदम 'सहज साध्यतेच्या' कोटींत ढकलण्यांत आलें ही एकच गोष्ट विरोधी पक्षियांच्या मत्सरग्रस्त व विवेकभ्रष्ट अंतःकरणाची उत्कृष्ट साक्ष देण्यास पुरेशी आहे.

आतां कार्यकर्त्यांवर द्रव्यनिधीचा अपव्यय वा अपहार केल्याचा आरोप, हा सदासर्वकाळ येतच असतो. त्या आरोपांतून कोणाचीच मुक्तता नसते. मग आश्रमावरहि तो करण्यांत आला त्यांत नवल तें काय? साहजिकच "शुद्धिकार्यार्थीत्यर्थ आश्रमाला सतरा अठरा हजार रु. खर्च आला ही निवळ थाप आहे. आश्रमाचा आठ दहा हजार रुपयांचा छापखाना आहे तो कोठून आला? तें कांहीं नाहीं. शुद्धीच्या नांवावर आश्रमानें आपले चांगलेच खिसे भरून घेतले" इत्यादि स्वरूपाचे निर्गल प्रलाप विरोधकांकडून करण्यांत येऊं लागले. तरीपण बरें कीं आश्रमानें गोमांतकांतून शुद्धिकार्यार्थीत्यर्थ एक कपर्दिकहि घेतलेली नव्हती! वस्तुतः आश्रमानें जो छापखाना घेतला तो १९२६ सालीं व शुद्धि झाली ती १९२८ सालीं; आणि त्यानंतर शुद्धिनिधी जमण्यास प्रारंभ झाला! ह्या क्षुल्लक गोष्टी सोडून दिल्या तरी विरोधकांचा मूळ आक्षेप असा आहे कीं, 'गोमांतकीयांनीं शुद्धि केली तिला पुरे ७०० रुपयेहि खर्च आला नाहीं. मग आश्रमाला इतका भयंकर खर्च येण्याचें कारणच काय?' ह्या प्रश्नांत दिग्दर्शित झालेले विरोधकांचें बुद्धिचातुर्य पाहून कौतुक करावें तेवढें थोडेंच होईल असें वाटतें! जेव्हां भोंवतालचा जुन्या वळणाचा हिंदु समाज शुद्धीकरणाला प्रतिकूल होता; प्रत्यक्ष गावडे लोकहि हिंदु होण्याचें नांव काढतांच चळचळ कांपत होते व 'सरकारचें धोरण ह्या प्रकरणीं काय होईल याची कोणत्याहि प्रकारची निश्चिती नव्हती,' अशा सर्वतोपरि प्रतिकूल समयीं चार शतकेंपर्यंत दुर्गम व अभेद्य असलेल्या तटाला खिंडार पाडण्याला जे परिश्रम व जो व्यय करावा लागला त्याची कल्पना, शुद्धिचक्र प्रवर्तित झाल्यानंतर सर्व बाजूनें अनुकूल झालेल्या वातावरणांत 'काम करतो' असें भासविणारांना कशी यावी? कोणताहि प्रयोग सिद्ध होईपर्यंतच त्याच्यावर अमित व्यय व परिश्रम घ्यावे लागतात. मागाहून तो प्रयोग एखादा अडाणीहि सहज करून दाखवूं शकतो; पण म्हणून तो अडाणी मनुष्य असें विचारूं लागला कीं 'बघा! बघा! मी हा प्रयोग इतक्या स्वल्पांत केला, मग तुला त्याच्यासाठीं एवढा खर्च येण्याचें कारण काय?' तर त्याच्या मूर्खपणाची कींव करण्यापलीकडे दुसरें काय उत्तर द्यावयाचें! अगदीं कर्ता सवरता व सुशिक्षित मुलगाच एखाद्या बापानें दत्तक घेतला आणि मग तो विचारूं लागला कीं, 'कांहो मुलाला तयार करण्यास एवढा खर्च कोठें लागतो?' तर त्याचें कोण समाधान करूं शकेल? वरील गोष्टहि अशाच नमुन्याची आहे.

आतां आश्रमाचा झालेला खर्च हा सत्य होता कीं असत्य होता तो श्रीमान् तात्याराव केळकरांनीं—ह्मणजे अ. भारतीय हिंदुमहासभेच्या अध्यक्षांनीं—व त्यांनीं नेमलेले हिशेबतपासनीस श्री. पांडुअण्णा शिराळकर ह्यांनीं पाहिलेंच आहे. १९२८ च्या ऑगस्टांत तो तपासला जाऊन श्रीमान् तात्यारावांनीं तो हिंदुमहासभेकडे पाठवूनहि दिला. आश्रमातर्फे तो प्रस्तुत अंकांत प्रसिद्ध करावयाचें ठरलें होतें त्याप्रमाणें तो परिशिष्टांत सादर केलेला आहे. त्या हिशेबानें विरोधकांचें

समाधान होऊन ते आश्रमावरील आरोप काढून घेतीलच असें नाहीं. तरी पण विरोधकांच्या हकाटी- मुळें संशयित झालेल्या कांहीं प्रामाणिक व्यक्तींचें समाधान त्या योगें निश्चयानें होऊं शकेल.

ह्या सार्वजनिक फंडासंबंधीं ज्या कांहीं निरनिराळ्या कल्पना जनसमूहांत असतात त्यांचें वर्गीकरण तात्विक मीमांसेसह श्री. स. वि. बापट ह्यांनीं केसरींतून उत्कृष्टपणें केलें आहे, तें येथें देणें अनाठायीं होणार नाहीं. ते म्हणतात "कोणत्याहि सार्वजनिक फंडासंबंधानें तीन प्रकारच्या वृति लोकांत दिसून येतात. (१) कांहीं लोक त्याकडे नेहमीं साशंक वृत्तीनें पहात असतात म्हणजे हे फंड ज्यांचे हातीं आहेत त्यांच्या हातून त्यांचा कांहींतरी दुरुपयोगच होत असला पाहिजे, ही गोष्ट त्यांनीं जवळ जवळ गृहीत धरल्यासारखीच असते. (२) दुसरे, कांहीं लोक अशा साशंक वृत्तीचे नसतात परंतु पैसा खर्च करण्याची सत्ता आपल्या हातीं नाहीं, इतर कोणाच्या हातीं आहे, ह्याचा त्यांना मनां- तून विषाद वाटत असतो. म्हणून ते अशा फंडाचा दुरुपयोग होत असल्याचा फक्त बहाणा करीत असतात. (३) तिसऱ्याहि एका प्रकारचे लोक असे असतात कीं, ते साशंक किंवा मत्सरी नसतात. पण फंडाचे चालक त्याचा जो कायदेशीर उपयोग करतात त्यापेक्षां त्याचा अधिक फायदेशीर व अधिक समाजोपयोगी व कार्यक्षम असा विनियोग करतां येईल अशी त्यांची कल्पना असते. म्हणून त्यांना अशा फंडाची माहिती असावी असें वाटत असतें, व ती मिळणें कठीण वाटल्यास त्यांची वृत्ति नाइलाजानें साशंक होते. ह्यापैकीं तिसऱ्या वर्गाचें समाधान करण्यास साधी युक्ति म्हटली म्हणजे फंडाचे हिशेब व अहवाल वरचेवर प्रसिद्ध करणें. तसें झाल्यास खर्च कोणत्या कार्यावर होतो व कोणत्या कार्यावर केला तर अधिक चांगलें होईल हें त्यांना समजतें व फंडाच्या चालकांना सुच- वितां येतें. पहिल्या वर्गातील म्हणजे स्वभावतः साशंकवृत्तीच्या लोकांचें समाधान करणें थोडी अधिक कठीण गोष्ट—कारण मनुष्याचा स्वभाव बदलत नसतो. तथापि वर सांगितल्याप्रमाणें फंडासं- बंधीं माहिती वरचेवर प्रसिद्ध झाल्यास त्यांच्या स्वभावावरहि परिणाम होतो व मग ते तो संशय उरला तरी मनांतले मनांत ठेवतात. असा संशय कोणास फारसा बाधत नाहीं. पण सगळ्यांत समाधान करावयाचें कठीण तें नंबर २ च्या वर्गाचें. येथें 'अज्ञः सुखमाराध्यः' ही म्हण लागू पडते. त्यांत शब्दाचा फरक इतकाच कीं 'ज्ञानलवदुर्विदग्ध' म्हणण्या ऐवजीं मत्सरी व निसर्गदुष्ट असे शब्द घातले म्हणजे झालें. जे संशयाचा केवळ बहाणा करतात त्यांचा संशय जाणार कसा? कारण मुळांत असतो तो संशय नसून मत्सर होय, व त्या मत्सराला दुष्ट बुद्धीची मदत असते. अशांचें समाधान फक्त एकाच गोष्टीनें व्हावयाचें. ती ही कीं, विद्यमान चालकांच्या हातून हे फंड निघून त्यांचे हातीं यावे; आणि मग त्यांनीं मात्र त्याचें काय वाटेल तें केलें तरी हरकत नाहीं." असो. वरील विवेचनांतील पहिल्या व तिसऱ्या वर्गाच्या समाधानासाठींच आमचा तो हिशोब उपयोगी पडेल. मधल्या म्हणजे मत्सरी व निसर्गदुष्ट अशा दुसऱ्या वर्गीयांचें समाधान ब्रह्मदेवहि करूं शक- णार नसल्यामुळें त्या भानगडींत आम्ही पडूं इच्छित नाहीं.

आतां विरोधी कंपूचा कळसरूपी असणारा मुख्य आरोप हा कीं, आश्रमानें दासबोध मासिकाच्या दुसऱ्या वर्षाच्या चवथ्या अंकांत गोमांतकीय हिंदूंवर लांचखाऊपणाचा भयंकर आरोप केला आहे, व त्यामुळें गोमांतकीय हिंदूंची सर्वत्र अक्षम्य बदनामी झाली आहे. दासबोध मासिकांतील तो भयंकर आक्षिप्त मजकूर असा—"पण त्यांतच नवी आपत्ति अशी कीं, शुद्धिशत्रु स्वार्थी पाद्र्यांनीं व श्रीमंत

ख्रिस्त्यांनीं पैसे चारून व इतर अनेक आडमार्गांनीं त्यांच्या कार्यकर्त्यांना गोमांतकीयांना तुडवीत तुडवीत चेतविलेल्या घातक दुरभिमानाच्या आगीमध्यें अपूर्व शुद्धिकार्यामुळें गोमातकांत घडून आलेली अभूतपूर्व एकी ठार मारण्याचा व दुष्ट दुही माजविण्याचा मोठा खटाटोप चालविला असल्याचें उघडकीस आलें आहे. शुद्धिशत्रूंचा हा भेदक उपव्याप कर्त्या उदयोन्मुख गोमांतकाचें व त्याबरोबरच हिंदु धर्माचें कित्येक पिढ्यांचें वाटोळें करणारा असल्यामुळें पवित्र शुद्धिकार्याच्या वातावरणांत उठलेले हे वादळी ढग नष्ट करण्याचें आणखी एक नवेंच काम आम्हांवर येऊन पडलें आहे."

निर्विकार मनानें वाचणाऱ्या कोणाहि वाचकाला वरील लिखाणांत गोमांतकीय हिंदूंची बदनामी करणारें एक अक्षरही कोठें आढळून येणार नाहीं. परंतु आश्रमाविरोधकांस तसें तें भासले व त्यांनीं गोमांतकीय हिंदुसभेच्या रचनामंडळाच्या अध्यक्षांकडून म्हणून एक आश्रमास खाजगी स्वरूपांत आव्हानपर पत्र पाठवून एतद्विषयीं खुलासा करण्यास सांगितलें. आश्रमानें तावडतोब उत्तर पाठविलें. त्यांतील महत्त्वाचा भाग असा—

"आमच्याकडे आजपर्यंत जो अनेकविध प्रकारचा कित्येकांचा पत्रव्यवहार झाला आहे, व अद्यापीहि होत आहे त्या वरूनच वरील मजकूर आम्हीं गेल्या अंकांत प्रसिद्ध केला आहे. तद्विषयक सकल वृत्तांत शक्य झाल्यास समग्रपणें वाचकांस सादर करण्याचें आश्वासनहि त्याच मुखपृष्ठावर देऊन ठेविलें आहे. परंतु आपणां मंडळीस ती गोष्ट सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें अप्रशस्त वाटत असल्यास आम्हीं तसें करूं इच्छिणार नाहीं. तथापि ही गोष्ट अशा पद्धतीनें हिंदु सभेकडून आपणावर कां ओढून घेतली जात आहे, हेंच आम्हांस समजत नाहीं. हिंदुसभा पाद्री लोकांच्या सत्यप्रीयतेविषयीं व नीतिमत्तेविषयीं निर्वाळा देऊं शकेल काय ? किंवा गोमांतकांतील सर्वच माणसें अत्यंत न्यायी, नीतिमान् आहेत व चोरीचहाडी लांडीलबाडी इत्यादि अवगुणांपासून अलिप्त आहेत असें छातिठोकपणें सांगूं शकेल काय? गोमांतकच कशाला ! सर्व हिंदुस्थानभर नव्हे जगभरहि एकच मासला आहे, आणि गतेतिहास त्याची साक्षहि देत आहे. अशी वस्तुस्थिति असतां हिंदुसभेला तशा स्वरूपाच्या कांहीं व्यक्तींच्या दुष्कृत्यांचा मोघम उल्लेख केला म्हणून वाईट वाटण्याचें कारण काय आहे, किंवा त्यांत तिला स्वतःला लांच्छनास्पद असें वाटण्यासारखें काय आहे, याचा आम्हांस उलगडाच होत नाहीं. तथापि आमचा कांहींच व कसलाहि आग्रह नाहीं. आपणास अशा कार्यविघातक व्यक्तींचीं कृष्णकृत्यें प्रकाशांत येणें या आणणें सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें अनिष्ट वाटत असल्यास आम्हीं तीहि उल्लेख न करतां आतांपर्यंतच्या धोरणाप्रमाणेंच शांतपणें सर्व गोष्टी सहन करीत राहूं; परंतु धर्मकार्याचा मार्ग सर्वैव निष्कंटक व निष्प्रतिबंधक होण्याची जबाबदारी मात्र सभेनें संपूर्णतेनें अंगिकारावी. आम्हीं आमचा मजकूर आपण म्हणतां तर सार्वजनिक कार्याच्या हिताच्या दृष्टीनें मागें घेण्यास केव्हांहि सिद्धच आहोत व आपणास इष्ट वाटत असल्यास दोन तीन वृत्तपत्रांत आम्हीं तसा खुलासाहि अवश्यमेव करूं." परंतु हें उत्तर हातांत पडण्याचीहि पुरी वाट न पाहतां मासिकांतील मजकुरासंबंधीं खुलासा करण्यासाठीं आश्रमाला वृत्तपत्रांतून जाहीर आव्हान देण्यांत आलें. अर्थातच विरोधकांचा दुष्ट हेतु लक्षांत घेऊन आश्रमानें आव्हानास उत्तर दिलें नाहीं.

गोमांतकांतील भारतानें ह्या आव्हानाविषयीं सखेदाश्चर्य प्रगट केलें. रत्नागिरीच्या 'बलवंता'नें दोन स्फुटें लिहून आपला एतद्विषयीं असा अभिप्राय व्यक्त केला कीं "महाराजांची मुलाखत (तीहि मासिकांतील मजकुराप्रमाणेंच बदनामीकारक आहे असें प्रतिपक्षियांचे म्हणणें आहे.) पुन्हां पुन्हां वाचूनहि त्यांत गोमांतकीय हिंदुकार्यकर्त्या मंडळींना बदनामीकारक असा कोणता मजकूर आहे, ह्याचें कोडें आम्हांस तरी अद्यापीहि उलगडत नाहीं. मुलाखतींत काय किंवा दासबोधाचें चौथ्या अंकाचें मुख-पृष्ठावर काय आश्रमातर्फे विधानें करण्यांत आलीं आहेत, तीं निःसंदिग्ध भाषेंत फक्त गोमांतकस्थ पाद्री आणि ख्रिस्ती मंडळीविषयीं. हीं विधानें, गोमांतकीय शुद्धीच्या योगानें ह्या मंडळीची साहजिक होणारी हानि लक्षांत घेतली म्हणजे मनुष्यस्वभावानुरूप त्यापैकीं कांहीं मंडळींना आश्रम छातिठोकपणें सांगतो त्याप्रमाणें लागूं पडणें मुळीच अशक्य नाहीं. बरें घटकाभर तीं सर्वस्वीं खोटीं आहेत असें धरलें तरी त्या संबंधीं पाद्री मंडळी काय तें पाहून घेईल. त्या चोगें गोमांतकीय हिंदुसभेला इतकी चीड येण्याचें काय कारण? आणि त्यांत गोमांतकीय हिंदूंची बदनामी तरी होते कशी? ह्या अर्थाचें ब्र. शंकरबुवा ह्यांनीं आश्रमाला प्रथम खाजगी रीतीनें केलेल्या आव्हानाला दिलेल्या उत्तरांत विचारलेले प्रश्न अवश्य विचार करण्यासारखे आहेत. तें कसें हि असो, आमच्या गोमांतकीय हिंदुसभेच्या कार्यकर्त्या मंडळींना आम्हीं असें निश्चितपणें कळवितों कीं महाराजांचे मुलाखतीनें किंवा दासबोधावरील मजकुरानें कोणाहि हिंदु मनुष्याचें मन गोमांतकाविषयीं यत्किंचितही कलुषित झालें नाहीं."

पुण्याच्या केसरीनेंहि दोन प्रासंगिक बोल लिहून प्रस्तुत प्रकरणीं आपलें मत व्यक्त केलें, तें असें—

"**गोमांतकीय हिंदु सभा व मसुराश्रमः**—मसुर येथील ब्रह्मचर्याश्रमातर्फे निघणाऱ्या दासबोध मासिकांत श्री. क्षीरसागर यांनीं व बलवंतपत्राला दिलेल्या मुलाखतींत श्री विनायकबुवा मसूरकर यांनीं अशा अर्थाचें एक विधान केलें कीं, गोमांतकांतील कांहीं पाद्र्यांनीं व श्रीमंत ख्रिस्त्यांनीं पैसे चारून अगर आड मार्गांनीं शुद्धिकार्यासंबंधीं व आश्रमासंबंधीं गैरसमज पसरविण्याचें व ऐक्य बिघडविण्याचें कार्य तेथें चालविलें आहे व त्या प्रयत्नास आमच्यापैकीं कांहीं मंडळी बळी पडण्याची भीति वाटते. ह्या विधानानें गोमांतकांतील हिंदूंची बदनामी होते व हीं विधानें शुद्धिकार्यास घातक आहेत आणि मसुरकर बुवांनीं तीं जाहीर सभेंत पुराव्यानिशीं सिद्ध करून दाखवावीं, अशी गोमांतकांत अलीकडे स्थापन झालेल्या हिंदुसभेच्या कार्यकर्त्यांनीं जोराची तक्रार केली आहे. ही गोमांतकीय हिंदुसभा स्थापन झाल्यापासून तिच्या कार्याचा प्रचार सभेचे प्रचारक मोठ्या उत्साहानें गांवोगांव करीत आहेत. सभेच्या या कार्याचें महत्त्व आह्मीं जाणतों व कार्यकर्त्यांच्या उत्साहाचेंहि कौतुक करतों. पण क्षीरसागर किंवा विनायकबुवा ह्यांच्या विधानानें गोमांतकीय हिंदूंची कशी बदनामी होते व शुद्धिकार्यास तें विधान विघातक कसें होतें हें मात्र आह्मांस कळत नाहीं. बारडोलीचा लढा चालू असतांना सरकारी अधिकारी सूक्ष्मासूक्ष्म मार्गांनीं राजीनामा दिलेल्या तलाठ्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न करीत आहेत अशा तऱ्हेची बातमी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली होती; पण ह्या बातमीनें आमची बदनामी झाली अशी त्या तलाठ्यांनीं ओरड केल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं. प्रतिपक्षाकडून फूट पाडण्याचे

यत्न प्रत्येक लक्ष्यांत होत असतात व ह्या प्रयत्नांचा यत्किंचित् सुगावा लागल्याबरोबर त्याबद्दल सावधगिरीचा इषारा देणें हें त्या लक्ष्यांत पडणाऱ्यांचें कर्तव्यच होय. मसुरकरबुवांच्या विधानांनीं झाली तर गोव्यांतील श्रीमंत ख्रिस्त्यांची व पाद्र्यांची बदनामी होईल आणि त्यांनीं मसुरकरबुवांना हे आरोप सिद्ध करण्याचें आव्हान केलें तर त्यांत आश्चर्य नाहीं; पण त्या विधानासंबंधें पाद्र्यांनीं कांहीं तक्रार करण्या ऐवजीं गोमांतकांतील हिंदूंनींच बदनामीची तक्रार करावी, हें आश्चर्य होय. कौन्सिलांत एकादें सरकारी बिल आलें असतां वर्तमानपत्रकर्ते नेहमीं इषारा देत असतात कीं, सरकार आपलें कार्य साधण्याकरितां नाना प्रकारच्या युक्त्या करतें व आमिषें दाखवितें, पण त्यांना आमदार मंडळींनीं बळी पडूं नये. अशा इषाऱ्यानें कौन्सिलची बदनामी झाली म्हणून ह्या वर्तमानपत्रांच्या निषेधार्थ कौन्सिलमध्यें एकादा ठराव आणला असल्याचें आम्हांस आठवत नाहीं.

मागें श्री. आनंदमूर्ती यांना कांहीं ख्रिस्ती लोकांनीं मार दिल्याच्या बातमीनेंहि अशीच गोमांतकीय लोकांची बदनामी झाल्याची तक्रार कांहीं गोमांतकीय हिंदूंनीं केली होती; कारण काय तर आनंदमूर्तींना ख्रिस्त्यांकडून मार बसतो व गोमांतकीय हिंदु त्याचा बंदोबस्त करीत नाहींत, असा त्या बातमींतून ध्वनि निघतो; पण आनंदमूर्तींना मारल्याच्या बातमींतून जर बदनामीचा हा सूक्ष्म ध्वनि निघत असेल तर पुढें आनंदमूर्तींना हद्दपार केल्यावरहि गोमांतकीय हिंदु त्या हद्दपारीचा प्रतिकार किंवा निराकरण करूं शकले नाहींत, हा त्या मानानें केवढा तरी ध्वनि निघाला आणि त्याबद्दल मात्र तक्रार ऐकूं आली नाहीं ! पण बदनामीच्या असल्या सूक्ष्म ध्वनीकडे कान लावून बसण्यापेक्षा जर मसुराश्रमानें सुरू केलेलें शुद्धिकार्य गो. हिं. सभेनें स्वतः जोमानें पुढें चालवून तें पूर्णतेस नेलें तर ह्या सर्व सूक्ष्म अगर ढोबळ बदनाम्यांचा आपोआप निरास होईल आणि मग एकटे मसुरकरबुवाच नव्हेत तर सर्व हिंदुसमाजहि ह्या लहान मोठ्या सर्व बदनाम्यांबद्दल गोमांतकीय हिंदुसभेची सपशेल माफी मागेल. हंसाची दुग्धजलभेद-कीर्ति जसा ब्रह्मदेवहि नाहींशी करूं शकत नाहीं तसेंच विनायकबुवांनीं व त्यांच्या आश्रमानें गोव्यांत शुद्धीला प्रथम धडाडीनें तोंड पाडलें हें त्यांचें श्रेय कोणीहि हरण करूं शकत नाहीं. उलट मसुरकरबुवा किती झाले तरी बाहेरचे; शुद्धीचें कार्य संपूर्ण व्हावयाचें तर तें गोमांतकीय हिंदूंच्याच प्रयत्नांनीं पूर्ण होईल हेंहि निश्चितच आहे. आणि पुढचें कार्य नेटानें झालें तर त्याबद्दल श्रेय यशस्वी गोमांतकीय हिंदूंनांच मिळेल. गोमांतकीय हिंदुसभेचें कार्य उत्साहानें चाललें असलें तरी अजून आश्रमाच्या प्रयत्नांची जरूरी नाहीं अशी खात्री होण्याइतकें तें नाहीं. तसें तें झालें तर सर्वांनाच आनंद होईल कारण आश्रमाच्या कार्यकर्त्यांना इकडे दुसरें किती तरी कार्य आहे. मग हिंदुसमाजहि मसुर आश्रमाला सांगेल कीं, तुह्मी आतां गोमांतकाकडे पाहण्याची किंवा त्याबद्दल शब्द काढण्याचीहि जरूरी नाहीं. गोमांतकीय हिंदुसभा प्रत्यक्ष कृतीनें तशी वेळ आणील तर उपरिनिर्दिष्ट क्षुद्र कुरबुरी उत्पन्न होण्याचें कारणच उरणार नाहीं. ”

परंतु केसरीचा वरीलप्रमाणें अभिप्राय प्रसिद्ध होतांच त्याला “ केसरीचा कुत्सित कल्लोळ ” ह्मणून लेखून केसरीकार “ वस्तुस्थितीचें पूर्ण ज्ञान, तर्कशुद्धता, निःपक्षपातीपणा, सत्यनिष्ठा व दूरदर्शित्व इत्यादि बाबतींत सारखे घसरत कसे चालले आहेत ” व “ ग्रामकेसरीलाहि लाजीं मान घालण्यास लावणारी भुंकारणी ” करून ते आपले “ बुद्धिदुर्भिक्ष ” कसें

प्रयत्न प्रत्येक लक्ष्यांत होत असतात व ह्या प्रयत्नांचा यत्किंचित् सुगावा लागल्याबरोबर त्याबद्दल सावधगिरीचा इषारा देणें हें त्या लक्ष्यांत पडणाऱ्यांचें कर्तव्यच होय. मसुरकरबुवांच्या विधानांनीं झाली तर गोव्यांतील श्रीमंत ख्रिस्त्यांची व पाद्र्यांची बदनामी होईल आणि त्यांनीं मसुरकरबुवांना हे आरोप सिद्ध करण्याचें आव्हान केलें तर त्यांत आश्चर्य नाहीं; पण त्या विधानासंबंधें पाद्र्यांनीं कांहीं तक्रार करण्या ऐवजीं गोमांतकांतील हिंदूंनींच बदनामीची तक्रार करावी, हें आश्चर्य होय. कौन्सिलांत एकादें सरकारी बिल आलें असतां वर्तमानपत्रकर्ते नेहमीं इषारा देत असतात कीं, सरकार आपलें कार्य साधण्याकरितां नाना प्रकारच्या युक्त्या करतें व आमिषें, दाखवितें, पण यांना आमदार मंडळींनीं बळी पडूं नये. अशा इषाऱ्यानें कौन्सिलची बदनामी झाली म्हणून ह्या वर्तमानपत्रांच्या निषेधार्थ कौन्सिलमध्यें एकादा ठराव आणला असल्याचें आम्हांस आठवत नाहीं.

मागें श्री. आनंदमूर्ती यांना कांहीं ख्रिस्ती लोकांनीं मार दिल्याच्या बातमीनेंहि अशीच गोमांतकीय लोकांची बदनामी झाल्याची तक्रार कांहीं गोमांतकीय हिंदूंनीं केली होती; कारण काय तर आनंद-मूर्तींना ख्रिस्त्यांकडून मार बसतो व गोमांतकीय हिंदु त्याचा बंदोबस्त करीत नाहींत, असा त्या बातमींतून ध्वनि निघतो; पण आनंदमूर्तींना मारल्याच्या बातमींतून जर बदनामीचा हा सूक्ष्म ध्वनि निघत असेल तर पुढें आनंदमूर्तींना हद्दपार केल्यावरहि गोमांतकीय हिंदु त्या हद्दपारीचा प्रतिकार किंवा निराकरण करूं शकले नाहींत, हा त्या मानानें केवढा तरी ध्वनि निघाला आणि त्याबद्दल मात्र तक्रार ऐकूं आली नाहीं ! पण बदनामीच्या असल्या सूक्ष्म ध्वनीकडे कान लावून बसण्यापेक्षां जर मसुराश्रमानें सुरू केलेलें शुद्धिकार्य गो. हिं. सभेनें स्वतः जोमानें पुढें चालवून तें पूर्णतेस नेलें तर ह्या सर्व सूक्ष्म अगर ढोबळ बदनाम्यांचा आपोआप निरास होईल आणि मग एकटे मसुरकरबुवाच नव्हेत तर सर्व हिंदुसमाजहि ह्या लहान मोठ्या सर्व बदनाम्यांबद्दल गोमांतकीय हिंदुसभेची सपशेल माफी मागेल. हंसाची दुग्धजलभेद–कीर्ति जसा ब्रह्मदेवहि नाहींशी करूं शकत नाहीं तसेंच विनायकबुवांनीं व त्यांच्या आश्रमानें गोव्यांत शुद्धीला प्रथम धडाडीनें तोंड लावलें हें त्यांचें श्रेय कोणीहि हरण करूं शकत नाहीं. उलट मसुरकरबुवा किती झाले तरी बाहेरचे; शुद्धीचें कार्य संपूर्ण व्हावयाचें तर तें गोमांतकीय हिंदूंच्याच प्रयत्नांनीं पूर्ण होईल हेंहि निश्चितच आहे. आणि पुढचें कार्य नेटानें झालें तर त्याबद्दल श्रेय यशस्वी गोमांतकीय हिंदूंनांच मिळेल. गोमांतकीय हिंदुसभेचें कार्य उत्साहानें चाललें असलें तरी अजून आश्रमाच्या प्रयत्नांची जरूरी नाहीं अशी खात्री होण्याइतकें तें नाहीं. तसें तें झालें तर सर्वांनाच आनंद होईल कारण आश्रमाच्या कार्यकर्त्यांना इकडे दुसरें किती तरी कार्य आहे. मग हिंदुसमाजहि मसुर आश्रमाला सांगेल कीं, तुझी आतां गोमांतकाकडे पाहण्याची किंवा त्याबद्दल शब्द काढण्याचीहि जरूरी नाहीं. गोमांतकीय हिंदुसभा प्रत्यक्ष कृतीनें तशी वेळ आणील तर उपरिनिर्दिष्ट क्षुद्र कुरबुरी उत्पन्न होण्याचें कारणच उरणार नाहीं. ”

परंतु केसरीचा वरीलप्रमाणें अभिप्राय प्रसिद्ध होतांच त्याला “ केसरीचा कुत्सित कल्लोळ ” म्हणून लेखून केसरीकार “ वस्तुस्थितीचें पूर्ण ज्ञान, तर्कशुद्धता, निःपक्षपातीपणा, सत्यनिष्ठा व दूरदर्शित्व इत्यादि बाबतींत सारखे घसरत कसे चालले आहेत ” व “ ग्रामकेसरीलाहि साजीं मान घालण्यास लावणारी भुंकारणी ” करून ते आपले “ बुद्धिदुर्भिक्ष ” कसें

चित्र कर्तव्य बजावीत होते. धाकदपटशा, जुलूम जबरदस्ती, लांचलुचपत, इत्यादि साधनांचा उपयोग साहजिकपणेंच चालला होता. शुद्धिकृतांना भजनपूजन करूं देऊं नये, त्यांच्याकरितां घातलेल्या शाळांना बंदी करावी, त्यांना तुळशीवृंदावनें घालूं देऊं नये, त्यांच्या जमिनी काढून शुद्ध न झालेल्यांस याव्या, कांहीं तरी कुरापती काढून त्यांना पोलिसांच्याकडून धमकी देण्यांत यावी, अशा अनेक गोष्टी सतत चालल्या होत्या. त्याप्रमाणें गावड्यांच्या पूर्व हिंदुसमाजांतहि नवहिंदूंना सोयरिक व अन्नव्यवहार करतां येऊं नये, फार काय त्यांना हिंदूच मानूं नये, ह्मणून तो पूर्व हिंदूंचा समाज कांहीं हस्तकांकडून बिथरविण्यांत येत होता. शिरोंने येथील जुवांव नांवाच्या एका खिश्चन गावड्याला शुद्धि बंद पाडण्यासाठीं व सर्व खिश्चनगावड्यांच्या वस्तींत फिरून हिंदू होऊं न देण्याबद्दल प्रयत्न करण्यासाठीं पाद्रांनीं २०० रुपये दिले असल्याचें समजलें. कालापूर (बांधार) येथील खिस्ती भाटकरानें अनेक वेळीं आपल्या भाटांत 'तुळशीवृंदावनें घालूं नका' असें सांगितलें असतां शुद्धीकृतांनीं त्याला न जुमानतां तुळशी घातल्या तेव्हां तो भाटकर चिडून गेला व त्यानें एका वृद्ध गावड्याला, त्यांची खोडकी जिरविण्यासाठीं, वश करून घेतलें. एके दिवशीं त्या गावड्यानें स्वतःच्या घरासमोरचा क्रॉस मोडला व नवहिंदु विरुद्ध पोलिसांत फिर्याद केली. तेव्हां बाळकृष्ण गायकर, कृष्ण सुर्लीकर, गोविंद सुरलीकर, काकुला रायकर व जुवांव ह्या पांच गावड्यांस क्रॉस मोडल्याच्या आरोपावरून नऊ दिवस तुरुंगांत ठेवण्यांत आलें. नाझगर येथें पुरलेलें नवहिंदूचें प्रेत रस्त्यावर पुरल्याचा आरोप करून त्यांच्यावर खटला भरविण्यांत आला. करंजाळ, दोन पावल येथील एका खिस्ती भाटकरबाईनें गावडे शुद्ध झाल्यापासून त्यांस परोपरीनें छळण्यास सुरवात केली. लग्नाचा मंडप मोडून टाकला, वाजंत्रें बंद केलीं, भजन करूं देईना, वाड्यावरील शाळा हुसकून लावूं लागली, भजन शिकविणाऱ्या मास्तरांना मारण्याचा घाट घातला. पाळें येथील नवहिंदु पांडुरंग मंगेशकर (पूर्वीचा पियेदाद कुयेला) ह्यावर तो खिस्ती असतांना पाद्रानें संमतीविना त्याच्यावर गांवांतील वार्षिक फेरत्याच्या (जत्रोत्सव) खर्चाचा बोजा घातला होता. पियेदाद आतां हिंदु होऊन पांडुरंग झाल्यामुळें त्यानें तो खर्च देण्याचें नाकारिलें. तेव्हां (करार मोडल्याबद्दल) मामलेदाराकडून त्याला ४० रु. दंड भरण्याविषयीं समन्स लावण्यांत आलें. धुळापी येथील गावडे शुद्ध झाल्यापासून त्यांस खिश्चन होण्याबद्दल गोवेंमठांतील पाद्री लोक सारखा उपदेश करीत होते; परंतु त्याचा कांहीं उपयोग होईना तेव्हां त्यांनीं तेथील आश्रमीय शाळेस ती पाद्रांच्या भाटांत असल्यामुळें प्रथम हरकत घेतली. नंतर आज पिढ्यानुपिढ्या त्या गावड्यांकडे वार्षिक खंडानें असलेलें माद्रीचें (Nuns) ठिकाण, त्यांनीं योग्य पद्धतीनें करार पाळला नाहीं ह्या सबबीवर काढून घेण्यांत आलें व एका खिश्चनाच्या स्वाधीन केलें. एक दिवस आश्रमीय प्रचारक श्री. नाना देशपांडे, विठू मोरजकर व जगन्नाथ हारडोणकर ह्या गावड्यांसमवेत नव हिंदूंना नांवें देण्याच्या वगैरे कामासाठीं हिंडत होते. माड्यांत येथील एका घरांत ते गावड्यांना घेऊन बसलें असतां एकाएकीं लुईस नांवाचा खिस्ती भाटकर ७।८ लोकांना घेऊन घरांत घुसला व तेथें बरीच मारहाण केली. नंतर त्यानें नाना व विठू मोरजकर ह्यांना पोलीसांच्या स्वाधीन केलें. जेव्हां अनेक गावड्यांना पोलीस चौकीवर नेऊन जबान्या घेण्यांत येत त्या वेळीं पाळ्याच्या जुजे मनवेलनें पाद्रीच्या चिथावणीवरून श्री. दादाराव वैद्य व आश्रम यांविषयीं खोटीच जबानी दिली. तद्वतच एकानें आपणांस हिंदु होण्यासाठीं आश्रमानें १५ रु. दिले असल्याचें सांगितलें. तेव्हां

प्रगट करीत आहेत, त्याबद्दल हिंदुकारांनीं कींव प्रदर्शित करणारे लेखांक लिहिले. एवढेंच नव्हे तर आश्रमानें " पाताळयंत्रीपणा " करून " केसरीकारांकडून त्या धर्तीचे बोल वदविले " व " इतरहि महाराष्ट्र वृत्तपत्रांना प्रस्तुत प्रकरणीं मुग्धता स्वीकारण्यास भाग पाडलें, " असा आपल बळकट संशय हिंदुकारांनीं व्यक्त केला. त्यांच्या मतें मुंबईचें विविधवृत्त व पुण्याचें ज्ञानप्रकाश हे दोनच निःपक्षपाती वृत्तपत्रें त्यांस उभ्या महाराष्ट्रांत आढळलीं ! बाकी केसरी, बलवंत, श्रद्धानंद स्वधर्म, संग्राम, सावधान प्रभृति सर्व वृत्तपत्रकार ' मसुरकरबुवांचे नीच तरफदार ' म्हणून गण गेले. गोमांतकांतील ' भारत ' कार तर बोलून चालून प्रतिपक्षाच्या मतें आश्रमाचे ' वेतनीय वकील, आश्रमानें मूठ दाबून त्यांना आपलेसें केलेलें. मग त्यांच्या शब्दाला विरोधकांकडे काडीची किंमत नसावी हें उघडच होतें. वास्तविक ज्या ' भारत ' कारांनीं ' हिंदुकारां ' पेक्षां गोमांतकाच राजकारणांत आठदहा पावसाळे अधिक घालविले आहेत व ज्यांनीं ' जनसेवा ही ईश्वरसेवा त्याविण दुसरा धर्म न ठावा ' ह्या एकाच एक उच्च ध्येयानें प्रेरित होऊन कोणाचीहि भाडभी न ठेवतां धीरोदात्तपणें अनेक चळवळींचा पुरस्कार केला; एवढेंच नव्हे तर ज्यांनीं सरकार लोकहितविरोधक प्रत्येक बाबतींत राष्ट्रीय बाण्यानें झुंज घेऊन स्वतःवर १८।२० वेळां खट दंड इत्यादि स्वरूपांत सरकारी अवकृपा ओढवून घेतली; परंतु एवढ्याहि जिवावरच्या संकटां कस्पटासमान लेखून ज्यांनीं आपलें लोकसेवेचें उग्र व्रत अद्यापिहि त्याच नेटानें व धडाई अखंड स्वार्थत्यागपूर्वक चालविलें आहे, त्या देशभक्तावर त्यानें आश्रमाचा सत्पक्ष स्वीकार ह्या गुन्ह्या ( ? ) करितां ' वेतनीय ' ' लांचखाऊ ' अशी लाखोली विरोधी कंपूकडून वाहि जावी, या गोष्टीवरूनच जनता काय तो योग्य बोध घेऊं शकेल. परंतु ज्या गोमांतकांत व सारखा श्रेष्ठ देशभक्त विरोधकांच्या म्हणण्याप्रमाणें आश्रमाच्या लांचलुचपतीला बळी पडणा आढळून येतो, तेथें शुद्धिशत्रु सत्तासामर्थ्यवान् पाद्री लोकांना किंवा श्रीमंत ख्रिस्त्यांना म पैसे चारून वा आडमार्गानें शुद्धिकार्याला विरोध करण्यासाठीं एखादा फाटकातुटका इसमहि ल शकत नाहीं, असें विरोधी कंपूचें आग्रहपूर्वक सांगणें आहे. एवढेंच नव्हे तर तसें कोणी नु म्हटलें तरी त्यांत सर्व गोमांतकीय हिंदुजनतेची अक्षम्य बदनामी होते–पण भारतकारांसारख आदरणीय व्यक्तीनें आश्रमाकडून लांच घेतला ह्या विधानानें मात्र गोमांतकीय हिंदुजनते बदनामी होत नाहीं, अशी विरोधी कंपूची तर्कशुद्ध ( ? ) विचारसरणी आहे. खेरीज त लांच घेणारा न जाणों असलाच तर त्या देणाऱ्या व घेणाऱ्याचें नांव, गांव व पत्ता आम्हां सांगा असें त्यांचें आव्हान आहे. जणुंकाय ज्या इसमांनीं लांच घेतला त्यांच्या जवळून पों पावत्या घेऊन लांच देणाऱ्यानें त्या आश्रमाकडे रजिस्टरनें पाठवूनच दिल्या असतील ! असो.

आतां शुद्धिशत्रु स्वार्थी पाद्र्यांनीं व श्रीमंत ख्रिस्त्यांनीं शुद्धिकार्यांत खो घालण्या कसकसा खटाटोप चालविला होता ह्याचें अल्पसें दिग्दर्शन येथें करणें अनाठायी होणार नाह शुद्धिचळवळ सुरू होतांच ख्रिस्ती वृत्तपत्रकारांनीं एकच कोल्हेकुई करून आश्रम व शुद्धि कार्य ह्यांविषयीं सर्वत्र कसें काहूर माजवून सोडलें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. त्यांच्याप्रमाणें पाद्री लोकहि कांहीं स्वस्थ बसले नाहींत, तर त्यांनीं खेडोपाडीं हिंडून गावड्यांना शुद्धिकार्यापा परावृत्त करण्याचा आटोकाट प्रयत्न चालविला. ख्रिस्ती भाटकर लोकहि त्यांना साह्य करून आप

विग्र कर्तव्य बजावीत होते. धाकदपटशा, जुलूम जबरदस्ती, लांचलुचपत, इत्यादि साधनांचा पयोग साहजिकपणेंच चालला होता. शुद्धिकृतांना भजनपूजन करूं देऊं नये, त्यांच्याकरितां ातलेल्या शाळांना बंदी करावी, त्यांना तुळशीवृंदावनें घालूं देऊं नये, त्यांच्या जमिनी काढून द्ध न झालेल्यांस द्याव्या, कांहीं तरी कुरापती काढून त्यांना पोलिसांच्याकडून धमकी देण्यांत यावी, ाशा अनेक गोष्टी सतत चालल्या होत्या. त्याप्रमाणें गावड्यांच्या पूर्व हिंदुसमाजांतहि नवहिंदूंना ोयरिक व अन्नव्यवहार करतां येऊं नये, फार काय त्यांना हिंदूच मानूं नये, म्हणून तो पूर्व हिंदूंचा ामाज कांहीं हस्तकांकडून बिथरविण्यांत येत होता. शिरोंन येथील जुवांव नांवाच्या एका ख्रिश्चन ावड्याला शुद्धि बंद पाडण्यासाठीं व सर्व ख्रिश्चनगावड्यांच्या वस्तींत फिरून हिंदू होऊं न देण्या-द्दल प्रयत्न करण्यासाठीं पाद्र्यांनीं २०० रुपये दिले असल्याचें समजलें. कालापूर ( बांधार ) थील ख्रिस्ती भाटकरानें अनेक वेळीं आपल्या भाटांत ‘ तुळशीवृंदावनें घालूं नका ’ असें ांगितलें असतां शुद्धीकृतांनीं त्याला न जुमानतां तुळशी घातल्या तेव्हां तो भाटकर चेहून गेला व त्यानें एका वृद्ध गावड्याला, त्यांची खोडकी जिरविण्यासाठीं, वश करून ेतलें. एके दिवशीं त्या गावड्यानें स्वतःच्या घरासमोरचा क्रॉस मोडला व नवहिंदु विरुद्ध ोलिसांत फिर्याद केली. तेव्हां बाळकृष्ण गायकर, कृष्ण सुर्लीकर, गोविंद सुर्लीकर, काकुला ायकर व जुवांव ह्या पांच गावड्यांस क्रॉस मोडल्याच्या आरोपावरून नऊ दिवस तुरुंगांत ठेवण्यांत ाालें. नाझगर येथें पुरलेलें नवहिंदूंचें प्रेत रस्त्यावर पुरल्याचा आरोप करून त्यांच्यावर खटला ारविण्यांत आला. करंजाळ, दोन पावल येथील एका ख्रिस्ती भाटकरबाईनें गावडे शुद्ध झाल्या-ासून त्यांस परोपरीनें छळण्यास सुरवात केली. लग्नाचा मंडप मोडून टाकला, वाजंत्रें बंद केलीं, भजन करूं देईना, वाड्यावरील शाळा हुसकून लावूं लागली, भजन शिकविणाऱ्या मास्तरांना मारण्याचा घाट घातला. पालें येथील नवहिंदु पांडुरंग मंगेशकर ( पूर्वीचा पियेदाद कुयेला ) ह्यावर तो ख्रिस्ती असतांना पाद्र्यानें संमतीविना त्याच्यावर गांवांतील वार्षिक फेस्त्याच्या ( जत्रोत्सव ) खर्चाचा बोजा घातला होता. पियेदाद आतां हिंदु होऊन पांडुरंग झाल्यामुळें त्यानें तो खर्च देण्याचें नाकारिलें. तेव्हां ( करार मोडल्याबद्दल ) मामलेदाराकडून त्याला ४० रु. दंड भरण्याविषयीं समन्स लावण्यांत आलें. धुळापी येथील गावडे शुद्ध झाल्यापासून त्यांस ख्रिश्चन होण्याबद्दल गोवेंमठांतील पाद्री लोक सारखा उपदेश करीत होते; परंतु त्याचा कांहीं उपयोग होईना तेव्हां त्यांनीं तेथील आश्रमीय शाळेस ती पाद्र्यांच्या भाटांत असल्यामुळें प्रथम हरकत घेतली. नंतर आज पिढ्यानुपिढ्या त्या गाव-ड्यांकडे वार्षिक खंडानें असलेलें मार्द्रीचें ( Nuns ) ठिकाण, त्यांनीं योग्य पद्धतीनें करार पाळला नाहीं ह्या सबबीवर काढून घेण्यांत आलें व एका ख्रिश्चनाच्या स्वाधीन केलें. एक दिवस आश्रमीय प्रचारक श्री. नाना देशपांडे, विठू मोरजकर व जगन्नाथ हारडोणकर ह्या गावड्यांसमवेत नव हिंदूंना नांवें देण्याच्या वगैरे कामासाठीं हिंडत होते. माड्यांत येथील एका घरांत ते गावड्यांना घेऊन बसले असतां एकाएकीं लुईस नांवाचा ख्रिस्ती भाटकर ७।८ लोकांना घेऊन घरांत घुसला व तेथें बरीच मारहाण केली. नंतर त्यानें नाना व विठू मोरजकर ह्यांना पोलीसांच्या स्वाधीन केलें. जेव्हां अनेक गावड्यांना पोलीस चौकीवर नेऊन जबान्या घेण्यांत येत त्या वेळीं पाळ्याच्या सुजे मनवेलनें पाद्रीच्या चिथावणीवरून श्री. दादाराव वैद्य व आश्रम यांविषयीं खोटीच जबानी दिली. तद्वतच एकानें आपणांस हिंदु होण्यासाठीं आश्रमानें १५ रु. दिले असल्याचें सांगितलें. तेव्हां

पोलीस अधिकाऱ्यांना संशय येऊन 'तुला एकट्यालाच तेवढे पैसे कसे दिले?' असा प्रश्न विचारतांच तो गडबडला व आपणांस तसें म्हणण्याविषयीं सांगण्यांत आलें होतें असें त्यानें मान्य केलें.

वरील सारखीं ख्रिस्त्यांच्या व पाद्र्यांच्या अत्याचारांचीं उदाहरणें लागेल तेवढीं देतां येण्यासारखीं आहेत. विरोधकांच्या माहितीसाठीं कांहीं नमुन्यादाखल म्हणून वर दिलीं आहेत. तथापि *ज्या पाद्री व श्रीमंत ख्रिस्त्यांविषयीं विरोधकांना एवढा प्रेमाचा पान्हा फुटला,* त्यांनीं त्यांच्याच 'हिंदू' चे मागील अंक जर चाळून पाहिले तर त्यांत त्यांस त्या लोकांच्या शुद्धिचळवळ हाणून पाडण्याच्या अनेक कारवाया, विस्तारपूर्वक लिहिलेल्या आढळतील. पण तेंच कशाला, प्रत्यक्ष 'हिंदु' कार श्री. पै यांनीं आश्रमास लिहिलेल्या पत्रांतूनहि वरील स्वरूपाच्याच गोष्टी कळविल्या आहेत. ता. ६–३–२८ च्या पत्रांत ते लिहितात–" आर्चबिशपनीं मिशनरी पाठवून, लोकांस हिंदुधर्मांत न जाण्याचा उपदेश करण्याचें कार्य आरंभिलें आहे, ही गोष्ट खरी आहे. काकोडेसारख्या, गावड्यांची वस्ती नसलेल्या गांवींहि पाद्री गेलेला आढळला; शुद्धीकृतांस परत ख्रिस्ती करण्याच्या इरायानें त्यांना धाक दाखविण्यांत येत असल्याची गोष्टहि खरी आहे" ता. २१–३–२८ च्या पत्रांत ते म्हणतात, "केरीचें शुद्धिकार्य आज झालें नाहीं. गावड्यांतून कांहीं जण बिथरले. त्यांच्यावर कांहीं बड्या ख्रिश्चनांनीं आमिष–धाकाचा प्रयोग केला" व हाच वृत्तांत त्यांनीं "ख्रिस्ती धेंडें व पोलीस" ह्या मथळ्याखालीं 'हिंदू' तून सविस्तर प्रसिद्ध केला आहे. म्हणजे पाद्री व श्रीमंत ख्रिस्ती ह्यांनीं पैसे चारून व इतर अनेक आड मार्गांनीं शुद्धिकार्याला खो घालण्याचा खटाटोप चालविला होता, हें त्यांच्या शब्दांतूनहि सिद्ध होत नाहीं काय? तथापि 'हिंदु' करांनीं तसें म्हटलें तरी चालेल. पण आश्रमानें मात्र तसें म्हणतां कामा नये. कारण त्यांत गोमांतकीय हिंदूंची अक्षम्य (!) बदनामी होते ! !

वस्तुतः दासबोध मासिकांतील लिखाणांतून गोमांतकीय हिंदुंवर लांच खाऊपणाचा आरोप केलेला नाहीं हें स्वतः 'हिंदु' कारहि जाणून होते. त्यांनीं मुंबईस विविध वृत्ताला दिलेल्या मुलाखतींत स्पष्ट म्हटलें आहे कीं, "दासबोध मासिकाच्या मुखपृष्ठावर ह्या बाबतींत अस्पष्ट, मोघम आणि व्यापक उल्लेख आहे. परंतु इतर जी माहिती प्रत्यक्ष बुवांच्या तोंडून किंवा त्यांच्या प्रेरणेनें प्रसिद्ध झाली आहे, तिच्यांतून त्यांचा कटाक्ष विशेषेंकरून हिंदु पत्राच्या चालकांवर आहे, असें निष्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं." अर्थात दासबोध मासिकांतील लिखाणांत समस्त गोमांतकीय हिंदुजनतेवर लाचखाऊपणाचा आरोप केलेला नाहीं, हें 'हिंदु' कार स्वमुखानेंच सांगत आहेत. पण आश्रमाचे आतांपर्यंत प्रस्तुत प्रकरणीं ह्या लिखाणाव्यतिरिक्त अन्य कांहींच लिखाण प्रसिद्ध न झाल्यामुळें थोड्याशा हातचलाखीनें त्याच लिखाणांतून गोमांतकीय हिंदूंच्या विरुद्ध–एवढेंच नव्हे तर त्यांच्या काळजाला झोंबणारा असा ध्वनि काढून दाखवितां आला तर आश्रमावर अनायासेंच सर्व हिंदुजनतेचा रोष होईल व मग तो आपल्या मरणानेंच मरून जाईल असा 'हिंदु'-कारांनीं कावा रचला, व त्याला अनुसरून त्यांनीं गोमांतकीय हिंदुजनतेस आश्रमाविरुद्ध चिथावणी देण्याचा सारखा सपाटा चालविला. नुकत्याच स्थापन झालेल्या गोमांतकीय हिंदुसभेचीहि पुष्कळशी प्रतिष्ठित मंडळी त्यामुळें प्रक्षुब्ध झाली व आश्रमानें आपल्या मासिकांत खरोखरच काय म्हटलें आहे हें न पाहतां किंवा त्याचा पुरतेपणीं विचार न करतां त्यांनीं आश्रमाविरुद्ध

जोरांची मोहिम सुरू केली. प्रत्यहीं आश्रमावर कुत्सित, वाष्कळ, मत्सरी, खोडसाळ व अश्लील आरोप बेमुर्वतपणें करणाऱ्या हिंदुकारांच्या सुरांत त्यांनींहि आपले सूर मिळवून दिले !

पुढें कांहीं दिवस गेल्यानंतर गोमांतकीय हिंदुसभेतर्फे एक शिष्टमंडळ पुणें, मुंबई व रत्नागिरी येथें गो. हिं. सभेच्या कार्याविषयीं पाठिंबा मिळविण्याकरितां म्हणून पाठवून देण्यांत आलें. त्यांत श्री. द. व्यं. पै, सुकेरकर, कामत व सरदेसाई हे चार गृहस्थ होते. त्या दौऱ्यांत शिष्टमंडळानें आपल्या कल्पनेप्रमाणें आश्रमाच्या नीच, स्वार्थी व दुष्ट हेतूंचा आणि गो. हिं. सभेच्या उज्ज्वल (!) ध्येयाचा सर्वत्र पाढा वाचला व "पहिल्यानें संघटणेचें व नंतर शुद्धीचें कार्य हातीं घेण्याचा निश्चय गो. हिं. सभेनें केला आहे व त्याला आपण सर्वांनीं साहाय्य करावें," अशी मागणी मागितली. ज्या शुद्धिकार्याच्या निमित्तानें म्हणून गो. हिं. सभेचा जन्म झाला ती हिंदुसभा, त्या शुद्धिकार्याचाच प्रश्न गौण ठरवीत असल्याचें पाहून पुष्कळांना मोठें नवल वाटलें, व श्री. चित्रावशास्त्री ह्यांनीं तर शिष्टमंडळास असें सुचविलें कीं, "संघटना झाल्यानंतर शुद्धिकार्य असें म्हटल्यास ही जांमई केव्हां थांबेल तें सांगतां येणार नाहीं. तेव्हां संघटनेच्या कार्याबरोबरच शुद्धीचें कार्य हातीं घ्यावें. शुद्धिकार्य मागें ठेवूं नये." "आश्रमाची निंदा न करतां तुम्हीं जें कांहीं करणार आहांत तेवढेंच सांगा" अशी स्पष्ट सूचना मात्र शिष्टमंडळास जेथें तेथें मिळाल्याविना राहिली नाहीं. रत्नागिरीस तर श्री. तात्याराव सावरकरांनीं त्यांस "येथें तुम्ही आश्रमाविरुद्ध भाषण केल्यास सभा उधळून जाईल हें लक्षांत ठेवा," असें स्पष्टपणें बजावलें. शिष्टमंडळ पुण्याहून मुंबईस आलें, तेव्हां डॉ. सावरकर ह्यांच्या मध्यस्थीनें गो. हिं. सभा व मसुराश्रम ह्यांचा समेट घडवून आणण्याचा प्रयत्न करण्यांत आला. 'आश्रम समेटाला तयार नाहीं. समेट करूं करूं असें तो थोडें अगत्य दाखवून बोलेल, पण प्रत्यक्ष समेटाचा प्रसंग आला म्हणजे अशा कांहीं अटी पुढें करील कीं, त्या गोमांतकीयांस आणि मध्यस्थांसहि कधींच कबूल होऊं नयेत. आश्रम असें सांगेल कीं, 'अमुक मुद्यावर बोलूंच नये, वाटाघाटींत अमुक माणसांनीं हजरच राहूं नये. गोमांतकीयांनीं अमुक इसमांना आपले प्रतिनिधि म्हणून निवडूंच नयेत,' इत्यादि प्रकारची हाकाटी श्री. पैनीं चालविली होतीच. परंतु शिष्टमंडळाची ही अपेक्षा आश्रमानें फोल ठरविली व समेट करण्याची आपली तीव्र इच्छा असल्याचें पुण्य संपादन करूनच्या करून तो न करण्याचा शिष्टमंडळाचा कावा हाणून पाडला गेला. मुंबईच्या महाराष्ट्र ग्रंथ संग्रहालयांत शनिवारीं दुपारीं उभय पक्षांच्या मंडळींची बैठक झाली. डॉ. सावरकर, डॉ. वेलकर, डॉ. सुरतकर श्री. वासुदेवराव मुंडले, श्री. नवरे, श्री. हर्षे (टि. वि.) तद्वतच श्री. लाड, डॉ. कामत, श्री. मिरोळकर, श्री. फाटक, श्री. नाइक, श्री. तटनीस, श्री. वर्दे, खेरीज गावडे लोकांचे प्रतिनिधि, श्री. गोपाळ गावडा व विठ्ठल सुर्लीकर आणि कालापुरचे श्री. गोपाळराव परीट इत्यादि गृहस्थ उपस्थित होते. उभयपक्षांच्या मंडळींत रात्रीं आठ नऊ वाजेपर्यंत रडा जंगी वादविवाद झाला. दासबोध मासिकांतील लिखाणांतून गो. हिं. सभेच्या कार्यकर्त्यांवर, ते म्हणतात त्याप्रमाणें लांच खाऊपणाचा आरोप केलेला नाहीं, असें श्रीमन्महाराजांनीं सिद्ध करून दिलें. गो. हिं. सभेवर आश्रमानें आरोप केलेला नाहीं, हें देखून शिष्टमंडळाचा आनंद गगनांत मावेना व त्यांनीं तसें आश्रमाकडून लेखी लिहून मागितलें. वस्तुतः प्रारंभींच्या खासगी पत्रांत

आश्रमाकडून गो. हिंदु सभेच्या अध्यक्षांस 'ही गोष्ट हिंदु सभेकडून आपणावर कां ओढून घेतलं जात आहे,' असें स्पष्टपणें विचारण्यांत आलेंच होतें; परंतु त्यावेळीं हिंदु सभेचें समाधा झालें नाहीं, तरी तें आतांच्या खुलाशानें झालें. नंतर डॉ. सावरकरांनीं श्री. पैप्रभृतींना त्यां आश्रमावर पैसे खाल्ल्याच्या केलेल्या आरोपाबद्दल जाब विचारला, तेव्हां आणखी थोडा वादविवा होऊन त्यांनीं आपला आरोप सपशेल काढून घेतला व मग समेटाचा मसुदा तयार करण्य येऊन त्यावर आश्रमातर्फे ब्र. क्षीरसागर व गोवा हिंदु सभेतर्फे श्री. कामत, श्री. पै व श्र यशवंतराव सरदेसाई ह्यांच्या सह्या झाल्या, व आभार प्रदर्शन होऊन बैठक समाप्त झाली. उभयप झालेला समेट असाः—

( १ ) *श्रीदासबोध मासिकाच्या दुसऱ्या वर्षाच्या चौथ्या अंकाच्या मलपृष्ठावर गोमांतकांत* कांहीं व्यक्तींवर जो आरोप करण्यांत आला आहे, त्या संबंधानें आश्रमाचा खुलासा असा व गोमांतकीय हिंदुसभेचे समासद अगर कार्यकर्ते यापैकीं कोणत्याहि व्यक्तीवर हा आरोप करण्य आलेला नाहीं.

( २ ) गोमांतकीय शुद्धिकार्याबाबत आश्रमाकडून कोणत्याहि प्रकारें पैशाचा दुर्विनिय झाला असें गोमांतकीय हिंदु-सभेचें म्हणणें नाहीं.

उभयतांच्या मनांत एकमेकांविषयीं आतां कोणत्याहि बाबतींत गैरसमज राहिलेला नाहीं.

( ३ ) लोकांच्या माहितीकरितां आश्रमानें गोमांतकांतील शुद्धिकार्यासाठीं केलेल्या खर्चा हिशोब प्रसिद्ध करावा, अशी गोमांतकीय हिंदुसभेची विनंति आहे.

शंकर धोंडो क्षीरसागर,

व्यवस्थापक ब्रह्मचर्याश्रम मसूर.

| | | |
|---|---|---|
| मराठी-ग्रंथ-संग्रहालय मुंबई. ता. ३ नोव्हेंबर १९२८ | शिष्टमंडळ गोमांतकीय हिंदुसभा | दत्तात्रय व्यंकटेश पै<br>जनार्दन विष्णु कामत<br>यशवंत सूर्यराव सरदेसाई |

ह्याप्रमाणें समेट होऊन गोमांतकांतील हिं. सभेचें शिष्टमंडळ गोमांतकांत परत गेलें; परंतु ह्या समेटांत आपल्या हातीं कांहींच लागलें नाहीं—आपला उद्दिष्टार्थ सफल झाला नाहीं, असें पाहून श्री. पै प्रभृतींनीं कांहीं विद्यार्थ्यांना हाताशीं घेऊन पुनश्च आश्रमाविरुद्ध जंगी मोहीम सुरू केली. आश्रमाविषयीं वाटेल त्या खोट्यानाट्या गोष्टी सांगून गावढ्यांनाहि बिथरविण्याचा प्रयत्न जोरानें करण्यांत येऊं लागला. मुंबईच्या विविधवृत्तानें पण समेटप्रसंगीं झालेला वादविवाद प्रसिद्ध न करण्याचें सर्वा-

गावडे मंडळी श्रीमन्महाराजांच्या दर्शनास अतीव उत्सुक होऊन बसली होती, त्यांच्याकडून आश्रमांत सारखीं निमंत्रणावर निमंत्रणें येत होतीं; परंतु बाकीच्या कामाच्या ओढीमुळें श्रीमन्महाराजांस तिकडे जातां आलें नाहीं. सरकारी अनुज्ञेनुसार आश्रमावरील प्रतिबंधहि आतां उठलेला असून, आश्रमाची एक शाखा तिकडे आपलें प्रचारकार्य करीत असल्याला २॥४ महिने होऊन गेले होते. तेव्हां श्रीमन्महाराजांनीं गोमांतकांत जाण्याचें ठरविलें, व त्याप्रमाणें जिकडे तिकडे कळविण्यांत आलें. गोमांतक हिंदुसभेनें आपल्या स्थापनेपासून आश्रमाला विरोध करण्याचाच जरी विडा उचलिला होता, तरीसुद्धां आतां मुंबईस समेट झाला ह्या दृष्टीनें गो. हिं. सभेच्या अध्यक्षांना इतर आश्रमप्रेमी सज्जनांप्रमाणेंच तार करण्यांत आली होती. तत्पूर्वीहि श्रीमन्महाराजांच्या गोमांतकांतील दौऱ्यांत विचारविनिमयार्थ पाचारण करणारीं पत्रें व्यक्तिशः सर्वांस पाठविण्यांत आलींच होतीं; परंतु ' मसुरकर गोव्यांत येतात कसे ' हें आम्ही पाहातों, असें म्हणून विरोधीकंपूनें आपल्या अस्तन्या वर सारिल्या व त्यांनीं आश्रमाचे सर्व बेत हाणून पाडण्यासाठीं चंग बांधला. समस्त गावड्यांनीं प्रेमभरानें श्रीमन्महाराजांची पणजी येथें मिरवणुक काढण्याचें ठरविलें होतें; परंतु कांहीं सरकारमान्य विरोधकांनीं पोलिस अधिकाऱ्यांच्या कानाला लागून ' आश्रम हा क्रांतिकारक व बोल्शेव्हिक आहे; पो. राज्य उलथून पाडण्यासाठीं सावरकरांशीं त्यानें संगनमत केलें आहे, ' इत्यादि प्रकारच्या कागाळ्या केल्या. अर्थातच विरोधकांच्या म्हणण्याप्रमाणें सरकार श्रीमन्महाराजांना गोमांतकांत येण्याला जरी प्रतिबंध करूं शकलें नाहीं तरी गावड्यांनीं ठरविलेल्या मिरवणुकीला दिलेली परवानगी मात्र काढून घेण्यांत आली. साहजिकच गावड्यांची तीव्र निराशा झाली. तद्वतच पणजी येथील महालक्ष्मीच्या देवालयांत श्रीमन्महाराजांची पायपूजा करून त्यांचें दर्शन घेण्याचेंहि गावड्यांनीं ठरविलें होतें; परंतु विरोधकांच्या कारवाईनें व चिथावणीनें मंदिराच्या चालकांकडूनहि ही गावड्यांची मनीषा धिक्कारपूर्वक नाकारण्यांत आली. एवढेंच नव्हे तर गावड्यांना देवतुल्य वाटणाऱ्या त्यांच्या परमपूजनीय श्रीमन्महाराजांवर निंद्य असे वाक्प्रहारहि करण्यांत आले. तेव्हां गावडे खवळले व त्यांच्या मनांत ह्या लोकांविषयीं तीव्र असंतोष व अप्रीति निर्माण झाली.

'श्रीमन्महाराजांनीं गोमांतकांत येऊंच नये. आले तरी त्यांचा आदर सत्कार कोणी करूं नये,' एवढेंच नव्हे ' तर त्यांस उतरण्यासाठीं कोठेंहि जागा मिळूं नये, ' अशा प्रकारचा कडेकोट बंदोबस्त करण्याचा विरोधी कंपूनें प्रचंड अट्टाहास चालविला होता. साहजिकच गोमांतकस्थ कित्येक आश्रमप्रेमी मंडळींनीं श्रीमन्महाराजांनीं ह्यावेळीं गोमांतकांत येऊं नये, कदाचित् त्यांच्या जीवितासहि धोका येण्याचा संभव आहे; असें प्रेमपूर्वक कळविलें. जीविताला अपाय करण्यासंबंधींच्या त्यांच्या कल्पनेचा उगम, मागें एका प्रतिष्ठित म्हणविणाऱ्या डॉक्टरांनीं, दासबोध मासिकांतील विरोधकांनीं आक्षिप्त ठरविलेला मजकूर नुकताच प्रसिद्ध झाला असतां, आश्रमांतून औद्योगिक पाहणीसाठीं गेलेले प्रो. परांजपे ह्यांच्या समक्ष ' क्षीरसागर वा मसुरकरबुवा गोव्यांत आले तर त्यांना पिस्तुल रोखून जाब विचारीन, ' अशा काढलेल्या उद्गारांत होता. पण 'प्राण जाइ बरु वचन न जाइ' ह्या श्रेष्ठ पुरुषांच्या दंडकानुसार श्रीमन्महाराजांनीं आपला प्रसिद्ध झालेला कार्यक्रम निश्चितच केला, व अगदीं ठरलेल्या दिवशींच ( ता० १७ डि० १९२८ ) गोमांतकांतील पेडणें येथें निधड्या छातीनें प्रवेश केला. श्रीमंत रावराजे काकासाहेब पेडणेकर, बापुसाहेब देशप्रभु प्रभृति मंडळींनीं

लक्षांत घेऊन त्यांनीं विरोधकांस त्यांच्या अविचारी निश्चयापासून परावृत्त केलें. नंतर त्यांनीं श्रीमन्महाराजांस विचारून विरोधीपक्षियांस दुसरे दिवशीं सकाळीं नऊ वाजतां बैठकीसाठीं बोलाविलें. कटवाल्या लोकांची सभा चालली असून येथें कांहीं दगा फटका आहे असें सांगून आणविलेल्या पोलिस-पार्टीचा नायक एक युरोपियन सार्जंट हाहि मालकांच्या परवानगीनें वाड्यांत आला. सभास्थान व तेथें शांततेनें बसलेली मंडळी पाहून, त्यानें खालीं येऊन आपणाला बोलावणाऱ्यांची यथेच्छ खरड-पट्टी काढली व आपली पार्टी घेऊन तो निघून गेला. दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें नियोजित समयीं विरोधी पक्षीय लोक आले नाहींत. ह्याच दिवशीं २३ लोकांच्या सहीनें एक अनावृत पत्र प्रसिद्ध झालें. ह्या पत्रास उत्तर म्हणून आश्रमप्रेमी गृहस्थांकडून ७२ सह्यांचें एक पत्र प्रसिद्ध झालें. वरील प्रमाणें बैठकी, वादाविवाद, चर्चा, आशंका, उत्तरें, प्रत्युत्तरें हे प्रकार सर्वत्र चाललेच होते. श्रीमन्म-हाराजांनीं २–३ दिवस पणजींत मुक्काम केला व तदनंतर आपला गोमांतकांतील कार्यक्रम संपवून ते कारवारकडे जाण्यास निघाले. वाटेंत केपें व कुंकळ्ळी येथें श्रीमन्महाराजांना मुद्दाम बोलावण्यांत आलें व तेथें मानपत्र समर्पणसमारंभ व मिरवणूक वगैरे कार्यक्रम होऊन श्रीमन्महाराजांचा गौरव करण्यांत आला. कुंकळ्ळी येथील समारंभ उधळून देण्याचा विरोधकांनीं एकदोन हस्तकांकरवीं डाव रचला होता, पण तो त्यांच्या कमनशिबानें सिद्धीस न जातां त्यांच्यावरच उलटला. असो.

वरीलप्रमाणें २२–२३ दिवस विरोधकांच्या धुमश्चक्रींत आपले सर्व कार्यक्रम यथास्थितपणें पार पाडून श्रीमन्महाराज आश्रमासह कुंकळ्ळीवरून सदाशिवगड कारवारकडे निघून गेले.

वस्तुतः मुंबईस एकवार समेट झाला असतां त्याच हिंदुसभेच्या सभासदांनीं पुनश्च त्याच काल्पनिक बदनामी करतां वरीलप्रमाणें आश्रमाशीं अनुदार व अश्लाघ्य असें वर्तन करावें व जनतेलाहि तशीच चिथावणी द्यावी, ही गोष्ट त्यांस सदैव लांच्छनास्पद अशीच राहील. कोणताहि निःपक्षपाती इतिहासकार जेव्हां वरील घटनेचा शांतपणें विचार करील, तेव्हां तो असेंच म्हणेल, कीं, दासबोध मासिकाच्या लिखाणांतून गोमांतकीय हिंदूंच्या बदनामीचा आपणांस इष्ट तो ध्वन्यर्थ मत्सुराश्रमविरोधीपक्षानें मुद्दाम काढला व त्या निमित्तानें विरोधकांनीं आश्रमाचें सुयश कलंकित करून त्याला गोमांतकीय हिंदुजनतेच्या रोषाला बळी पडण्याचा अत्यंत नीच, दुष्ट पण अयशस्वी असा प्रयत्न केला.

थोर पुरुषांना जनमनांतून खालीं उतरविण्याचे असेच प्रयत्न नीच, कुटिल, मत्सरी व दुष्ट लोकांकडून नित्य होत असतात. लो. टिळकांच्या आयुष्यांतील असाच एक प्रसंग येथें सांगतां येण्यासारखा आहे. "त्या एका रात्रीच्या अवधींत टिळकांविरुद्ध लोकमत प्रक्षुब्ध करण्याकरितां सुरतेच्या पुढाऱ्यांनीं हरतऱ्हेचे प्रयत्न केले. जातिद्वेषाचा आरोप हा फार सोपा आरोप असतो. तो कोणी कोणावर केल्यास चटदिशीं विश्वास बसतो 'टिळकांनीं गुजराथी लोकांना नांवें ठेविलीं' या एका मुद्याच्या आधारावर टिळकांच्या द्वेषाचें पीक एका रात्रींत पिकून उभें राहिलें. एक निनांवी हस्तपत्रक गुजराथींत लिहून वाटलें गेलें. त्याचा आशय असा होता—"सुरतेचे गुजराथी नागरिक हो, उठा जागे व्हा; कर्तव्य बजावण्याची वेळ आली आहे. तुमच्या तोंडाला टिळकांनीं काळें फासलें तें धुवून काढा. त्यांनीं आपल्या वर्तमानपत्रांतून तुम्हांला जीं शेलकी

लक्षांत घेऊन त्यांनीं विरोधकांस त्यांच्या अविचारी निश्चयापासून परावृत्त केलें. नंतर त्यांनीं श्रीमन्महाराजांस विचारून विरोधीपक्षियांस दुसरे दिवशीं सकाळीं नऊ वाजतां बैठकीसाठीं बोलाविलें. फटवाल्या लोकांची सभा चालली असून येथें कांहीं दगा फटका आहे असें सांगून आणविलेल्या पोलिस-पार्टीचा नायक एक युरोपियन सार्जंट हाहि मालकांच्या परवानगीनें वाड्यांत आला. सभास्थान व तेथें शांततेनें बसलेली मंडळी पाहून, त्यानें खालीं येऊन आपणाला बोलावणाऱ्यांची यथेच्छ खरड-पट्टी काढली व आपली पार्टी घेऊन तो निघून गेला. दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें नियोजित समयीं विरोधी पक्षीय लोक आले नाहींत. ह्याच दिवशीं २३ लोकांच्या सहीनें एक अनावृत पत्र प्रसिद्ध झालें. ह्या पत्रास उत्तर म्हणून आश्रमप्रेमी गृहस्थांकडून ७२ सह्यांचें एक पत्र प्रसिद्ध झालें. वरील प्रमाणें बैठकी, वादविवाद, चर्चा, आशंका, उत्तरें, प्रत्युत्तरें हे प्रकार सर्वत्र चाललेच होते. श्रीमन्म-हाराजांनीं २–३ दिवस पणजींत मुक्काम केला व तदनंतर आपला गोमांतकांतील कार्यक्रम संपवून ते कारवारकडे जाण्यास निघाले. वाटेंत केपें व कुंकळ्ळीं येथें श्रीमन्महाराजांना मुद्दाम बोलावण्यांत आलें व तेथें मानपत्र समर्पणसमारंभ व मिरवणूक वगैरे कार्यक्रम होऊन श्रीमन्महाराजांचा गौरव करण्यांत आला. कुंकळ्ळी येथील समारंभ उधळून देण्याचा विरोधकांनीं एकदोन हस्तकांकरवीं डाव रचला होता, पण तो त्यांच्या कमनशिबानें सिद्धीस न जातां त्यांच्यावरच उलटला. असो.

वरीलप्रमाणें २२–२३ दिवस विरोधकांच्या घुमश्चक्रींत आपले सर्व कार्यक्रम यथास्थितपणें पार पाडून श्रीमन्महाराज आश्रमासह कुंकळ्ळीवरून सदाशिवगड कारवारकडे निघून गेले.

वस्तुतः मुंबईस एकवार समेट झाला असतां त्याच हिंदुसभेच्या सभासदांनीं पुनश्च त्याच काल्पनिक बदनामी करतां वरीलप्रमाणें आश्रमाशीं अनुदार व अश्लाघ्य असें वर्तन करावें व जनतेलाहि तशीच चिथावणी द्यावी, ही गोष्ट त्यांस सदैव लांच्छनास्पद अशीच राहील. कोणताहि निःपक्षपाती इतिहासकार जेव्हां वरील घटनेचा शांतपणें विचार करील, तेव्हां तो असेंच म्हणेल, कीं, दासबोध मासिकाच्या लिखाणांतून गोमांतकीय हिंदूंच्या बदनामीचा आपणांस इष्ट तो ध्वन्यर्थ मत्सराश्रमविरोधीपक्षानें मुद्दाम काढला व त्या निमित्तानें विरोधकांनीं आश्रमाचें सुयश कलंकित करून त्याला गोमांतकीय हिंदुजनतेच्या रोषाला बळी पडण्याचा अत्यंत नीच, दुष्ट पण अयशस्वी असा प्रयत्न केला.

थोर पुरुषांना जनमनांतून खालीं उतरविण्याचे असेच प्रयत्न नीच, कुटिल, मत्सरी व दुष्ट लोकांकडून नित्य होत असतात. लो. टिळकांच्या आयुष्यांतील असाच एक प्रसंग येथें सांगतां येण्यासारखा आहे. "त्या एका रात्रीच्या अवधींत टिळकांविरुद्ध लोकमत प्रक्षुब्ध करण्याकरितां सुरतेच्या पुढाऱ्यांनीं हरतऱ्हेचे प्रयत्न केले. जातिद्वेषाचा आरोप हा फार सोपा आरोप असतो. तो कोणी कोणावर केल्यास चहूंदिशीं विश्वास बसतो 'टिळकांनीं गुजराथी लोकांना नांवें ठेविलीं' या एका मुद्याच्या आधारावर टिळकांच्या द्वेषाचें पीक एका रात्रींत पिकून उभें राहिलें. एक निनांवी हस्तपत्रक गुजराथींत लिहून वाटलें गेलें. त्याचा आशय असा होता–"सुरतेचे गुजराथी नागरिक हो, उठा जागे व्हा; कर्तव्य बजावण्याची वेळ आली आहे. तुमच्या तोंडाला टिळकांनीं काळें फासलें तें धुवून काढा. त्यांनीं आपल्या वर्तमानपत्रांतून तुम्हांला जी शेलकी

श्रीमन्महाराजांचा मानपत्रादिकांनीं यथोचित गौरव व आदरसत्कार केला. तद्वतच ह्या आणि-णीच्या प्रसंगीं येथील आश्रमप्रेमी मामलेदार माजी नामदार श्री. भास्करराव रुद्राजी नाईक, प्रतापराव सरदेसाई ह्यांनीं ऑक्टिंग गव्हर्नर, कमान्डर–इन्–चीफ प्रभृति सरकारी अधिकाऱ्यांना मुद्दाम जाऊन भेटून आश्रमाविषयीं करवून दिलेले भलभलते गैरसमज निरास करण्याचें महनीय कृत्य केलें व आश्रम हीं राजकीय स्वरूपाची संस्था नसून ती केवळ धार्मिकच कशी आहे हें त्यांनीं प्रमुख सत्ताधिकाऱ्यांस पटवून दिलें. नंतर म्हापसें डिचोलीवरून श्रीमन्महाराज सावई, वेरे, केरी, प्रियोळ, नागझर, करमळी धुळापी, पाळें, चिंचल, काळापूर इत्यादि गावड्यांच्या गांवांत गेले. गावड्यांत अपूर्व उत्साह दिसून आला, व त्यांनीं आपलें श्रीमन्महाराजांवरील निर्व्याज व अढळ प्रेम ठिकठिकाणीं मोठमोठे समारंभ करून व भजनी मिरवणुकी काढून व्यक्त केलें. श्रीमन्महाराजांनीं प्रत्येक ठिकाणीं सर्वांना धर्मरक्षणार्थ अत्यंत कळकळीचा उपदेश केला, व ज्यांनीं ज्यांनीं शुद्धिकार्यांत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें साहाय्य केलें होतें त्या सर्वांचें जाहीररीत्या हार्दिक अभिनंदन केलें. गावड्यांच्या वाड्यावरील सर्व कार्यक्रम आटोपून श्रीमन्महाराज, रायबंदर वरून पणजीस आले. रायबंदर येथें मोठा मानपत्रसमारंभ झाला. पणजी येथें समस्त गावड्यांच्या तर्फे म्हणून एक मानपत्र अर्पण करण्यासाठीं ठिकठिकाणचे गावडे प्रतिनिधि जमले होते. तद्वतच श्रीमन्महाराज जाण्यापूर्वी दर्शन व निरोप घेण्यासाठींहि शेंकडोशें गावडे पणजीस आले होते. श्री. यशवंतराव लवंदे यांच्या वाड्यांत गावडे, तरुणमित्रमंडळ व अखिल भारतीय हिंदुमहासभेची गोमांतकीय शाखा ह्यांच्या वतीनें श्रीमन्महाराजांस मानपत्र समर्पण करण्याचा समारंभ संध्याकाळीं होत होता. आपलें कांहींहि न चालतां आश्रमाचे कार्यक्रम होतच आहेत हें पाहून विरोधकांचें पित्त भडकलें व ज्या डॉक्टर सासरदांड्यांनीं मागें पिस्तुलाची धमकी दाखविली होती तेच आपल्या संवगड्यांसह, आश्रमानें दासबोधांतून केलेल्या गोमांतकीयांच्या अक्षम्य बदनामीचा जाब विचारण्यासाठीं तणतणत समारंभस्थानीं आले. समारंभ खासगी जागेंत चाललेला असल्यामुळें त्यांना वाड्यांत प्रवेश करावयास मिळाला नाहीं. तेव्हां रस्त्यावरूनच विरोधकांनीं घराचा मालक, आश्रम व श्रीमन्महाराज ह्यांच्यावर अपमानकारक शब्दांचा वर्षाव चालविला. आश्रमाला मागें दिलेल्या धमकीप्रमाणें त्यांनीं बरोबर पिस्तुलेंहि आणलीं होतीं, असें कित्येकांनीं सांगितलें. एवढेंच नव्हे तर 'त्या गोसावड्यांजवळ दंडे आहेत तर आमच्या जवळहि पिस्तुलें आहेत' असेहि ध्वनि त्यांच्या तोंडांतून निघालेले पुष्कळांनीं ऐकिले. थोडक्याच वेळांत एक पोलिसपार्टीहि आणविली गेली. विरोधकांचा घरांत घुसून दांडगाई करण्याचा बेत होता. हेतु हा कीं, कांहींतरी निमित्तानें आश्रमीय लोकांना मारामारींत ओढलें म्हणजे पोलिसांना 'आश्रमीय लोक पहा दंगेखोर आहेत' असें सप्रमाण दाखवितां येईल व त्या योगें पोलिसांकडून आयतीच संभावना होऊन आश्रमाची चांगलीच छी:थू होईल; एवढेंच नव्हे तर आश्रमीय लोक 'शांतताभंजक' आहेत असें सरकारला ठरवितां येऊन त्यांची उचलबांगडी गोमांतकांतून परस्पर कायमचीच होऊं शकेल, असा विरोधकांचा एकंदर व्यूह होता; परंतु त्यांचा हा डाव न ओळखण्याइतके आश्रमीय लोक मूर्ख नव्हते. विरोधकांनीं बाहेर चालविलेला धांगडधिंगा ते शांत चित्तानें पहात राहिले होते व अशा दंगलींतच वरील दिवाणखान्यांत मानपत्र समर्पणाचा समारंभ यथास्थितपणें पार पाडला. कार्यक्रम होऊन गेला हें पाहतांच प्रतिपक्षी अगदीं हातघाईवर आले. क्षणदोनक्षणांतच आतां कांहीं तरी भयंकर घटना घडून येणार इतक्यांत पणजीचे एक सन्माननीय नागरीक श्री. रखुराव देशपांडे हे त्या स्थळीं आले व चटकन् परिस्थिति

लक्षांत घेऊन त्यांनीं विरोधकांस त्यांच्या अविचारी निश्चयापासून परावृत्त केलें. नंतर त्यांनीं श्रीमन्महाराजांस विचारून विरोधीपक्षियांस दुसरे दिवशीं सकाळीं नऊ वाजतां बैठकीसाठीं बोलाविलें. फटवाल्या लोकांची सभा चालली असून येथें कांहीं दगा फटका आहे असें सांगून आणविलेल्या पोलिस-पार्टीचा नायक एक युरोपियन सार्जंट हाहि मालकांच्या परवानगीनें वाड्यांत आला. सभास्थान व तेथें शांततेनें बसलेली मंडळी पाहून, त्यानें खालीं येऊन आपणाला बोलावणाऱ्यांची यथेच्छ खरड-पट्टी काढली व आपली पार्टी घेऊन तो निघून गेला. दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें नियोजित समयीं विरोधी पक्षीय लोक आले नाहींत. ह्याच दिवशीं २३ लोकांच्या सहीनें एक अनावृत पत्र प्रसिद्ध झालें. ह्या पत्रास उत्तर म्हणून आश्रमप्रेमी गृहस्थांकडून ७२ सह्यांचें एक पत्र प्रसिद्ध झालें. वरील प्रमाणें बैठकी, वादविवाद, चर्चा, आशंका, उत्तरें, प्रत्युत्तरें हे प्रकार सर्वत्र चाललेच होते. श्रीमन्म-हाराजांनीं २–३ दिवस पणजींत मुक्काम केला व तदनंतर आपला गोमांतकांतील कार्यक्रम संपवून ते कारवारकडे जाण्यास निघाले. वाटेंत केपें व कुंकळ्ळी येथें श्रीमन्महाराजांना मुद्दाम बोलावण्यांत आलें व तेथें मानपत्र समर्पणसमारंभ व मिरवणूक वगैरे कार्यक्रम होऊन श्रीमन्महाराजांचा गौरव करण्यांत आला. कुंकळ्ळी येथील समारंभ उधळून देण्याचा विरोधकांनीं एकदोन हस्तकांकरवी डाव रचला होता, पण तो त्यांच्या कमनशिबानें सिद्धीस न जातां त्यांच्यावरच उलटला. असो.

वरीलप्रमाणें २२–२३ दिवस विरोधकांच्या धुमश्चक्रींत आपले सर्व कार्यक्रम यथास्थितपणें पार पाडून श्रीमन्महाराज आश्रमासह कुंकळ्ळीवरून सदाशिवगड कारवारकडे निघून गेले.

वस्तुतः मुंबईस एकवार समेट झाला असतां त्याच हिंदुसभेच्या सभासदांनीं पुनश्च त्याच काल्पनिक बदनामी करतां वरीलप्रमाणें आश्रमाशीं अनुदार व अश्लाघ्य असें वर्तन करावें व जनतेलाहि तशीच चिथावणी द्यावी, ही गोष्ट त्यांस सदैव लांच्छनास्पद अशीच राहील. कोणताहि निःपक्षपाती इतिहासकार जेव्हां वरील घटनेचा शांतपणें विचार करील, तेव्हां तो असेंच म्हणेल, कीं, दासबोध मासिकाच्या लिखाणांतून गोमांतकीय हिंदूंच्या बदनामीचा आपणास इष्ट तो ध्वन्यर्थ मठ्ठराश्रमविरोधीपक्षानें मुद्दाम काढला व त्या निमित्तानें विरोधकांनीं आश्रमाचें सुयश कलंकित करून त्याला गोमांतकीय हिंदुजनतेच्या रोषाला बळी पडण्याचा अत्यंत नीच, दुष्ट पण अयशस्वी असा प्रयत्न केला.

थोर पुरुषांना जनमनांतून खालीं उतरविण्याचे असेच प्रयत्न नीच, कुटिल, मत्सरी व दुष्ट लोकांकडून नित्य होत असतात. लो. टिळकांच्या आयुष्यांतील असाच एक प्रसंग येथें सांगतां येण्यासारखा आहे. "त्या एका रात्रीच्या अवधींत टिळकांविरुद्ध लोकमत प्रक्षुब्ध करण्याकरितां सुरतेच्या पुढाऱ्यांनीं हरतऱ्हेचे प्रयत्न केले. जातिद्वेषाचा आरोप हा फार सोपा आरोप असतो. तो कोणी कोणावर केल्यास चट्दिशीं विश्वास बसतो 'टिळकांनीं गुजराथी लोकांना नांवें ठेविलीं' या एका मुद्याच्या आधारावर टिळकांच्या द्वेषाचें पीक एका रात्रींत पिकून उभें राहिलें. एक निनांवी हस्तपत्रक गुजराथींत लिहून वाटलें गेलें. त्याचा आशय असा होता–" सुरतेचे गुजराथी नागरिक हो, उठा जागे व्हा; कर्तव्य बजावण्याची वेळ आली आहे. तुमच्या तोंडाला टिळकांनीं काळें फासलें तें धुवून काढा, त्यांनीं आपल्या वर्तमानपत्रांतून तुम्हांला जी शेलकी

निंदाव्यंजक विशेषणें लाविलीं तीं ' धी गुजराथी ' या वर्तमान पत्रानें हुडकून काढून चवाठ्यावर आणलीं आहेत. त्याला टिळकांना उत्तर देतां आलें नाहीं आणि बालाजीच्या मैदानांत, मोठें भाषण करून ' मी गुजराथी लोकांची निंदा केली नाहीं असें टिळकांनीं प्रतिपादिलें, आणि मला मदत करा असा उलटा केविलपणाचा आव आणून तुमची प्रार्थना केली ! ' हीं केवळ तुमची फसवणूक होय. त्यांनीं भाषणांत असेंहि सांगितलें, कीं, ' मी राष्ट्रीयसभा मोडायला कांहीं सुरतेला आलों नाहीं. पण टिळकांच्या पक्षानें कालच्या सभेंत कसें तुफान केलें हें तुम्हीं पाहिलेंच. आज पुन्हां सभा आहे. तेव्हां तुम्ही काय करणार ? टिळकपक्षाचें तुफान न होईल अशीच व्यवस्था करणार कीं, टिळकांनीं आपल्या पत्रांत सुरती लोकांना नेभळट, नपुंसक म्हटलें. तेंच खरें असें जगाला दाखविणार ? पूर्वी शिवाजी दोन वेळां येऊन सुरत लुटून गेला, तेव्हां तो म्हणूनच गेला कीं, आणखी एकदां येऊन सुरत लुटून जाईन. त्याप्रमाणें शिवाजी कांहीं येऊं शकला नाहीं. पण आज टिळक येऊन तुमचे नाककान कापून घेऊन जात आहे. तरी उठा, जागे व्हा ! " ( टि. च. सं. २ भाग ६ )

टिळकचरित्रांतील वरील प्रसंगावरून वाचकांना गोमांतकांतील मत्सरी विरोधकांनीं आश्रमा-विरुद्ध उठविलेल्या काहुराचें रहस्य स्पष्टपणें समजून येईल. परंतु अशा प्रकारें आश्रमाला हा भयंकर विरोध एकसारखा सहन करावा लागला तरी आपल्या कृतसंकल्पापासून एक रेंसभरहि ढळण्याचें त्यानें कधींहि मनांत आणलें नाहीं. आश्रमाच्या कित्येक इष्टमित्रांनीं ' अशा विरोधांत काम करून शक्तीचा अपव्यय करण्यापेक्षां तें सोडून द्या ' अशा सूचना वरचेवर दिल्या. तथापि हा हट्टवादीपणाचा आरोप पदरांत घेऊन व प्रसंगीं कांहीं मित्रांचा रोष स्वीकारूनहि आश्रमानें आपलें गोमांतकांतील कार्य आतांपर्यंत चालूच ठेवलें आहे. "करारीपणा दाखविला तर तो दुराग्रह, कर्तव्यनिष्ठा दाखविली तर तो अहंकार आणि निवृत्ति स्वीकारली तर तो कमकुवतपणा" असले हे उलटसुलट आक्षेप कार्यकर्त्यांवर सदैव यावयाचेच; पण एकदां पुढें टाकलेलें पाऊल कायम करण्यांत-म्हणजेच असंख्य विघ्नांचा मारा एकसारखा झाला तरी प्रारंभिलेलें कार्य, वाटेल तें झालें तरी तडीस नेण्यांतच-दिव्य पराक्रम व श्रेष्ठ पुरुषार्थ सांठविलेला असतो, हा महनीय सिद्धांत कोण अमान्य करील ?

विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः
प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥

वस्तुतः ज्या गोमांतकाविषयीं विरोधी पक्षाचे अध्वर्यु 'हिंदुकार' २१ फे. १९२८ पर्यंत "गोव्यांतील सर्वसमाजाच्या सामान्य हितसंबंधाच्या संरक्षणाकरितां किंवा संवर्धनाकरितां सर्व समाजाच्या एकत्रतेनें ज्या चळवळी व्हावयाच्या व तसें झाले असतांच ज्या यशस्वी होण्याचा संभव आहे, त्यांचा येथें जन्महि होणें दुरापास्त झालें आहे," अशी हाकाटी करीत आहेत व 'गोमांतकीय हिंदूंच्या बिकट परिस्थितीची सुधारणा करण्याचा ' हिंदूकरण हा जरि परिणामकारक व अनिवार्य असा उपाय असला तरी तो अमलांत आणणें हें मात्र बरेंच कठीण काम आहे. कारण तो हातांत घेऊन, सिद्धीस नेण्यास अनेक प्रकारच्या अडचणी येणार आहेत ! " असें स्पष्टपणें प्रतिपादन करीत आहेत, त्याच गोमांतकांत तीच हिंदूकरणाची ४०० वर्षे अशक्य झालेली चळवळ

आश्रम २६ फे. १९२८ ला म्हणजे हिंदुकारांच्या वरील गोष्टीनंतर पांचव्या दिवशींच यशःसिद्ध करून दाखवितो व ज्या ह्या अपूर्व घटनेमुळें गोमांतकाचें नांव हिंदुस्थानच्या इतिहासांत 'सुवर्ण अक्षरांनीं' लिहिण्यासारखें होतें, एवढेंच नव्हे तर जगाच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत दुमदुमून जातें, त्याच आश्रमावर त्याच गोमांतकांत कांहींजणाकडून वाटेल तसे अश्लिल व नीच आरोप करण्यांत येतात, एवढेंच नव्हे तर कांहींजण त्याच्यावर पिस्तुल रोखण्यासहि कमी करीत नाहींत, हें दृश्य पाहून पुष्कळांना आश्चर्य वाटेल; पण या दृश्यांत अभूतपूर्व असें तें काय आहे ? ज्या कोलंबसानें अमेरिकाखंड शोधून काढून आपल्या देशाचें नांव अजरामर केलें, त्याच कोलंबसाचा त्याच्या कांहीं देशबांधवांकडून अनन्वितपणें छळ कसा झाला, एवढेंच नव्हे तर त्याच्या विरुद्ध कागाळ्या करून अंतीं त्याला हातापायांत बेड्या घालून अमेरिकेहून कैद करून कसें आणलें, तें इतिहासज्ञांस परिचितच आहे. किंवा रोमचें नांव जगभर दुमदुमून सोडणारा पाश्चात्य रणशूर विजेता ज्युलिअस सीझर, ह्याच्यावर फाजील महत्त्वाकांक्षीपणाचा आरोप लादून, ब्रूटसकॅशिअस प्रभृतींनीं त्याचा अमानुषपणें केलेला वधहि, वरील गोष्टच सिद्ध करीत आहे. पण कोलंबसाची व सीझरचीच गोष्ट कशाला? ज्या आल्फोंस द आल्बुकर्कनें गोव्याचें राज्य जिंकलें त्याचाहि दृष्टांत येथें सांगतां येण्यासारखा आहे. आल्बुकर्कनें हिंदुस्थानांत पोर्तुगीज राज्याची संस्थापना करण्यासाठीं किती अविश्रांत परिश्रम घेतले हें सर्वांस विदितच आहे. पण पोर्तुगीज लोकांवर त्यानें केलेल्या ह्या महदुपकाराप्रीत्यर्थ त्याला कोणतें पारितोषिक मिळालें ? तें पारितोषिक म्हणजे त्याच्या विरुद्ध पोर्तुगालमध्यें स्वार्थसाधु व मत्सरी लोकांनीं केलेल्या अनेकविध खोट्यानाट्या कागाळ्यांमुळें त्याच्यावर राजाची झालेली अवकृपा, स्वजनांकडून छळ व आप्तेष्टांकडून उपहास ह्याविना दुसरें कांहीं नव्हतें. परंतु ह्या सर्वांपेक्षांहि जेव्हां पोर्तुगालच्या राजाकडून आल्बुकर्क पदच्युत केला गेला, तेव्हां त्या संभावित पुरुषानें त्या अपकीर्तिपेक्षां मरणालाच कवटाळणें श्रेयस्कर कसें मानलें—तो हृदयविदारक प्रसंग इतिहासज्ञांस परिचितच आहे. ज्यावेळीं श्रीमत् स्वामी—विवेकानंदांनीं पाश्चात्य देशांत श्रेष्ठ प्रतीचा दिग्विजय मिळविला, त्या वेळीं त्यांच्यावरहि हिंदुस्थानांतील कांहीं नीच वृत्तपत्रकारांनीं वाटेल तशी भरमसाट टीका केली. त्याबद्दल स्वामींनीं आपल्या पत्रांत जे उद्गार काढले आहेत ते कोणाहि कार्यकर्त्यास अत्यंत मननीय आहेत. ते म्हणतातः—" हिंदुस्थानांतील कांहीं पत्रांनीं मजवर केलेली टीका माझ्या अवलोकनांत आली; परंतु अशी टीका होणें हें भारतभूमीच्या सद्यःस्थितींत रीतिसरच आहे. गुलामगिरींत वाढलेल्या समाजांत परोत्कर्षासहिष्णुता उत्पन्न होणें हें रास्तच आहे. माझ्या बाळा, गुलामगिरींत खितपत असलेल्या जनसमूहाकडून तूं कसलीहि अपेक्षा करूं नको. सध्यांची परिस्थिति अत्यंत बिकट—अत्यंत निराशजनक आहे, ही गोष्ट खरी. परंतु तिजविषयीं माझें म्हणणें मोकळेपणानें मीं तुम्हां सर्वांस सांगतों ' आमच्या सध्यांच्या समाजांत कसलीच महत्त्वाकांक्षा उरली नाहीं. भविष्यकाळीं आपण आपली स्थिती उच्चप्रतीची करूं, असा आत्मविश्वास तर त्यांच्या ठिकाणीं नाहींच. पण दुसरा कोणी त्यांच्यासाठीं मनापासून खटपट करूं लागला, तर त्याच्या मार्गांत कांटे पसरण्याचें काम करण्यास हवे तितके लोक तयार होतात. असल्या मृतपिंडांच्या समाजांत थोडें तरी चलनवलन—थोडीतरी जीवनकळा उत्पन्न करण्याचें सामर्थ्य तुमच्यांत आहे काय ? एकादें अत्यंत हट्टी मूल औषध पितांना जसें वैद्याला लाथा मारतें, तसा आमचा समाज आहे. त्या वैद्यानें चातुर्य तुमच्या अंगीं आहे काय ? " असो.

परंतु विरोधीपक्षानें ह्याप्रमाणें आश्रमाविरुद्ध कितीहि आकांडतांडव केलें,—गोमांतक विरुद्ध—आश्रम, सारस्वत विरुद्ध-आश्रम, महाराष्ट्र विरुद्ध—गोमांतक—अशा निरनिराळ्या पर्यायानें व वाटेल तसल्या खोट्यानाट्या संतापजनक गोष्टी 'मसूरकरांचे अश्लील प्रलाप' म्हणून प्रसिद्ध करून गोमांतकीयांना आश्रमाविरुद्ध उठविण्यास सारखी चिथावणी दिली, तरी सुदैवानें गोमांतकीय बहुजन समाज या मत्सरी टोळक्याच्या चिथावणीला बळी पडला नाहीं. त्याचें आश्रमावर पहिलें जसें प्रेम होतें तसेंच कायम राहिलें. त्यानें आश्रमाविषयींचा आपला प्रेमादर श्रीमन्महाराजांच्या दौऱ्याच्या वेळींहि ठिकठिकाणीं व्यक्त केला. त्याबद्दल आश्रम त्यांचा सदैव ऋणीच राहील. चार दोन मत्सरी माणसांनीं केलेल्या ह्या किळसवाण्या धुळवडीचा आश्रमाला वेळींच प्रतिकारहि करतां आला असता, नाहीं असें नव्हे, परंतु श्रीमन्महाराजांचे नित्याचें सांगणें असें कीं, "शांतिब्रह्म येशू ख्रिस्त, धर्मासाठीं क्रॉसवर चढविला गेला. मग त्याच्या धर्मावर जर आपणांस विजय मिळवावयाचा असेल तर त्याच्यापेक्षांहि दसपट शांतीनें व धिमेपणानें आपणाला काम केलें पाहिजे." येशू ख्रिस्त नेहमीं आपल्या शिष्यांस हेंच सांगे कीं, "जेव्हां लोक तुम्हांला शिव्या देतील, तुमचा छळ करतील, तुमच्यावर हवे ते आळ घेतील तेव्हांच तुम्हीं धन्य व्हाल!"



# प्रकरण ६ वें.

# उपसंहार.

" मुख्य गुण म्हटला म्हणजे निश्चय व संकटांना हाणून पाडण्याची बुद्धि लागते. संकटांना जुमानलें नाहीं म्हणजेच देवता ' वरं ब्रूहि ' म्हणते. " —लो. टिळक.

ध्येयसिद्धीच्या मार्गांत 'कितीहि ठोकरा खाव्या' लागल्या, अडीअडणीचे केवढेहि डोंगर कोसळून पडले व विघ्नांच्या केवढ्याहि मोठ्या ' फौजा उठल्या ' तरी एका दृढ निश्चयानें व अखंड चिकाटीनें हातीं घेतलेलीं कामें तडीस नेण्यांतच खरा पुरुषार्थ असतो. आश्रमहि ह्याच दृढ निश्चयानें प्रेरित झालेला असल्यामुळें मत्सरी विरोधकांच्या हाकाटीला न जुमानतां सर्व संकटांना तोंड देतदेत आपला मार्ग त्यानें चोखाळीत आणला. त्याबरोबरच गावड्याना भयंकर हाल-अपेष्टा, मारहाण, क्वचित् तुरुंगवासहि सोसावा लागला; पण आश्रमावरील त्यांची निष्ठा रतीमरहि कमी होऊं शकली नाहीं. साहजिकच ' न ढळणारा लोकांच्या मनाचा निश्चय व संकटांस न भिणाऱ्या पुढाऱ्यांची योग्य परंपरा ह्यांची सांगड पडल्यावर अपयशाची भीति बाळगण्यास नको, ' ह्या लोकमान्यांच्या सिद्धांतानुसार गोमांतकातील प्रचंड कार्यहि यशःसिद्ध होऊं शकलें.

गोमांतकांतील ह्या चिरस्मरणीय शुद्धिकार्याचा इतिहास येथवर संकलित स्वरूपांत कथन करण्यांत आलेला आहे. ज्या पोर्तुगीज राज्यांत केवळ हिंदुत्वाच्या महान् घोर अपराधा ( ! ) साठीं शतकानुशतकें अमानुष व असह्य छळाखालीं हिंदुजनता अगदीं पिळवटून गेली होती, जेथें एकाकाळीं हिंदुत्वाचा नुसता उच्चार करणें म्हणजेहि असंख्य आपत्तींना जन्म देणें होतें, अशा ह्या विलक्षण कुचंबणुकीमुळें जेथें हिंदुजनता सदैव ' निराशा ' व ' किंकर्तव्यमूढता ' ह्यांच्या घनदाट तमःपटलांत कसेबसे दुःखानें आपले दिवस कंठणें ह्यापलीकडे कांहीं करू शकत नव्हती; पुढें लोकसत्तेच्या धर्मस्वातंत्र्याच्या काळांतहि जेथें हिंदूंना पददलित व अवमानित मानण्यांतच ख्रिस्त्यांना भूषण वाटतें, त्याच स्थळीं व त्याच कडव्या सत्तेखालीं ४०० वर्षापूर्वी छळाबळानें बाटविलेल्या ख्रिस्ती गावड्यांच्या अंतःकरणांत हिंदु धर्मप्रेमाचें बीज अंकुरविलें जाईल, त्याला अनुकूल असें खतपाणी मिळेल, बालपणीं त्याची योग्य जोपासना होऊन विनाशक जीवजंतूंचें तोंड त्याला त्या वेळीं न लागेल आणि अशा रीतीनें त्याच्या पूर्ण वाढीनंतर त्याचा एक प्रचंड जोमदार वृक्ष बनून त्याच्या छायेखालीं हजारों ख्रिस्ती लोक सुखासमाधानानें, शांत चित्तानें, उजळ माथ्यानें नांदूं लागतील; अशी केवळ कल्पना करणेंहि कांहीं थोड्या काळापूर्वीपर्यंत, हा स्वप्नसृष्टीचा एक खेळच म्हणून मानलें गेलें असतें. पण अघटित घटनापटु दयावत्सल परमेश्वराच्या कृपाप्रसादानें, व पुण्यश्लोक पूर्वजांच्या आशीर्वादानें गोमांतकाच्याच मध्ये, तर हिंदुस्थानच्या इतिहासांत ही एक अभूतपूर्व व म्हणूनच अत्यंत महत्त्वाची

अशी घटना घडून आली. जी गोष्ट गेलीं ४०० वर्षें अशक्यप्रायच म्हणून गणली गेली होती, ती या समयीं यशःसिद्ध झाल्यानंतर कांहीं दुष्ट, मत्सरग्रस्त, कुत्सित, टवाळांनीं जरी तिला आतां सहजसाध्यतेच्या कोटींत ढकललें आणि त्या महत्कार्याकरितां आश्रमाला करावे लागलेले दीर्घ प्रयत्न, अमित शारीरिक परिश्रम व भयंकर आर्थिक नुकसान जरी अशांच्या कोत्या बुद्धीला आकलन होऊं शकलें नाहीं, तरी निःपक्षपात बुद्धीचे इतिहासज्ञ ह्या अलौलिक घटनेचें श्रेष्ठ महत्त्व व भावी सुपरिणाम यथार्थत्वानें जाणणारच आहेत.

गावडे लोक स्वधर्मांत प्रविष्ट होऊन आतां दोन वर्षें होऊन गेलीं आहेत. ह्या इतक्याश अल्पावधींतच अंतर्बाह्यतः त्यांच्यांत घडून आलेला पालट हा कोणालाहि चकित करून सोडणारा आहे. त्यांची वैयक्तिक शुचिर्भूतता त्यांच्या घरादाराची स्वच्छता, त्यांची मानसिक प्रसन्नता, त्यांचं आनंदी व निर्भय वृत्ति पाहून, कोणालाहि निःसंशय समाधानच वाटेल. गोपाष्टमी, गणेशचतुर्थी गीताजयंती, रामनवमी, दासनवमी इत्यादि महोत्सव अत्यंत आनंदोल्हासानें व मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें त्यांना साजरे करतांना पाहून कोणाला धन्यता वाटणार नाहीं? परंतु ह्या सर्व उत्सवांपेक्षांहि ज्या दिवशीं त्यांना हिंदुधर्माचें द्वार आश्रमानें मोकळें करून दिलें, त्या दिवसाचे माहात्म्य त्यांना विशेषच वाटून त्यांनीं त्या 'सुवर्णदिनाचा' महोत्सव प्रचंड उत्साहानें साजरा करावा, ह्यांत नवल तें काय? आतांपर्यंत असे दोन महोत्सव झाले. त्यांपैकीं पहिला महोत्सव श्री. दादाराव वैद्य ह्यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा करण्यांत आला. दोन प्रहरीं चिंबल येथे भगवतीच्या तळीवर–शुद्धीचा दिव्य अग्नि प्रथम प्रज्वलित झालेल्या पवित्रस्थळीं–उत्सवांसाठी मुद्दाम उभारलेल्या विस्तीर्ण व शोभायमान मंडपांत शेंकडोंशें गावडे संमीलित झाले दूरदूरच्या गांवोगांवहूनहि पुष्कळशी प्रतिष्ठित मंडळी आपल्या ह्या धर्मबांधवांच्या महोत्सवांत भाग घेऊन त्यांस आश्वासित व प्रोत्साहित करण्याकरितां एकत्र जमूं लागली. मसूर आश्रमांतून ब्र शंकरबुवादिक विद्यार्थीगण खास उत्सवासाठीं श्रीमन्महाराजांचा संदेश घेऊन उपस्थित होता. सर्वांचे जमवाजमव झाल्यावर श्री. रामभाऊ लवंदे ह्यांनीं समारंभाचें अध्यक्षस्थान पणजीचे सुप्रसिद्ध, ज्ञान वृद्ध व तपोवृद्ध पुढारी श्री. दादासाहेब वैद्य–कीं ज्यांना शुद्धिप्रकरणांत ३१ तास तुरुंगवास पत्क रावा लागला होता–ह्यांना स्वीकारण्याविषयीं विनंती केली व त्याला श्री. शंखवाळकर वकील ह्यांनी अनुमोदन दिल्यावर, श्री. दादासाहेब अध्यक्षस्थानीं विराजमान झाले. तेव्हां श्री. लवंदे ह्यांनीं महो त्सवानिमित्त ठिकठिकाणाहून विद्युद्द्वारा आलेले शेंकडों सहानुभूतिपर संदेश वाचून दाखविले. संदेश ऐकून आपणां पाठीमागें इतके बावीस कोटी हिंदुलोक उभे असल्याचें गावड्यांस दिसून आलें व आनंदानें सर्वजण देहभान विसरून गेले.

संदेशवाचनानंतर पणजीच्या प्रकाशपत्राचे संपादक श्री. व्यंकटेशराव सरदेसाई ह्यांनीं गाव ड्यांना धीर देणारें सुंदर भाषण केलें व 'तुम्ही आमचेच आहां भिऊं नका. आमचे मतभेद आम्ह पाहून घेऊं. तुम्ही त्यांचा विचार करूं नका. तुम्हीं प्रत्येकानें एकेक तरी परधर्मातला मनुष्य आपल्य धर्मांत आणण्याची प्रतिज्ञा करा' असें सांगितलें.

त्यावर डॉ. वोरकर आपल्या नित्याच्या जोरदार पद्धतीनें म्हणाले "तुम्हीं अगदीं कसलीहि फाजगी करूं नका. बॅ. सावरकरांनीं सांगितल्याप्रमाणें धर्मभास्कर विनायक महाराज मसूरकर

मसुराश्रम-यांच्यावरच अढळ श्रद्धा ठेवा. तुम्हांस आतां 'बामण' विचारीत नाहींत अशी कोणी तुमची दिशाभूल करूं लागला तर तें तुम्हीं अगदीं मानूं नये. जोंपर्यंत आम्ही जिवंत आहोंत तों पर्यंत तुम्हांस विसरणार नाहीं, आपण एकमेकांस साहाय्य करूं या, तुम्हीं भिऊं नका, आमचा तुम्हांस पूर्ण पाठिंबा आहे."

नंतर श्री. रामभाऊ लवंदे ह्यांनीहि गावढ्यांस आश्वासित केलें कीं "जरी करमळीचीं कांहीं माणसें परत खिश्चन झालीं तरी तीं मनानें पूर्ण हिंदूच आहेत. नुसत्या पाणी शिंपडण्यानें कोणी खिस्ती होत नाहीं. शिंपडून तर काय पण आम्हीं त्यांच्या हातचें पाणी—सोडा वाटर—पिऊनहि हिंदूच आहोंत कीं नाहीं? म्हणून घाबरूं नका. चोवीस कोटी हिंदुलोक तुमच्या पाठीमागें उभे आहेत. श्रीमन्महाराजांच्या थोर तपस्येनें, महत्पुण्याईनें व त्यांच्या निःसीम स्वार्थत्यागपूर्वक अविश्रांत परिश्रमानें तुम्हांस प्राप्त झालेला हा तुमच्या पूर्वजांचा-धर्म तुम्हीं सोडूं नका." ह्यावर श्री. आंगले म्हणाले 'तुमच्याकरितां जागोजाग ब्रह्मचर्याश्रमानें शाळा काढल्या आहेत त्यांत आपल्या मुलांबाळांना पाठवून सुशिक्षित करा म्हणजे जगांत काय चाललें आहे ह्याचें तुम्हांस ज्ञान होईल."

ह्या भाषणानंतर धर्मभास्कर श्रीमन्महाराजांचा संदेश मोठ्यानें वाचून दाखविण्यांत आला; यामुळें सर्वत्र पवित्रपणाचें व शांतपणाचें वातावरण पसरलें व गावढ्यांच्या मुखश्री आनंदोत्साहानें विलसूं लागल्या. तो संदेश असाः—

"भक्तवत्सल परमेश्वराच्या कृपाप्रसादानें तद्वतच वाडवडिलांच्या थोर पुण्याईनें चारशें वर्षांतर तुम्ही पुनश्च आपल्या श्रेष्ठ हिंदुधर्माच्या शीतल छायेंत प्रविष्ट झाल्याला आज बरोबर वर्ष होत आहे. ह्या एक वर्षाच्या अल्पावधींतच तुम्हांवर कित्येक संकटें कोसळलीं, कोसळविलीं जात आहेत व पुढेंहि जातील; परंतु गेलीं चारशें वर्षें सतत जो तुम्हीं परधर्मांत छळ सोसला त्या पुढें हीं संकटें काय होत? म्हणून निरुत्साह किंवा हताश होऊं नका. परमेश्वर हा भक्तांची परीक्षा पहात असतो. आपल्या भक्ताच्या धारिष्टाला कसोटी लावीत असतो. अर्थात् संकटांना न जुमानतां परमेश्वरावर व आपल्या धर्मावर एकनिष्ठपणें प्रेम करा. परमेश्वर तुम्हांला कधींहि अंतर देणार नाहीं. तुम्हांस कोणी कितीहि व कांहींहि सांगितलें तरी महत्पुण्याईनें लाभलेला हा आपला धर्म सोडूं नका. 'प्राण गेला तरी चिंता नाहीं, धर्म सोडावयाचा नाहीं' हा निर्धार ठेवा. कारण धर्मरक्षणानेंच तुमचें ऐहिक व पारलौकिक कल्याण साधणार आहे. तुम्ही एक जुटीनें व प्रेमानें राहिलां म्हणजे तुम्हांस कोणीहि त्रास देण्यास धजणार नाहीं. पाद्री लोकांच्या किंवा इतरांच्या धमकावण्यांना तुम्ही भीक घालूं नका. ते पुनश्च तुम्हांस खिस्तीधर्मांत येण्याविषयीं गळ घालतील, त्रास देतील, धाकदपटशा दाखवतील; पण तुम्ही न डगमगतां धीरोदात्तपणें त्यांस सांगा कीं 'आम्ही तुमच्या केवळ पाणी शिंपडण्यानें किंवा चार अक्षरें पुटपुटल्यानें आतां खिस्ती होणें शक्य नाहीं. जोंपर्यंत आमचें मन सर्वस्वी 'हिंदु'च आहे तोंपर्यंत तुम्हीं कांहींहि केलेंत तरी आम्ही अंतर्बाह्य हिंदुच राहणार—नव्हे तुम्हांसहि हिंदु बनविणार! तुम्हीं तरी कोठून आकाशांतून आलां आहांत थोडेच! तुम्ही पण आमचेच आहां ......' तुम्हांस नाहीं नाहीं त्या गोष्टी सांगून भेडसाविण्यांत येईल. तुमचीं मनें कलुषित करण्याचा प्रयत्न केला जाईल, परंतु त्या गोष्टी तुम्हीं अगदीं मनावर घेऊं नका! त्यांच्यावर विश्वास ठेवूं नका. तुम्हीं बिलकूल घाबरूं नका. सबंध भरतखंडांतील बत्तीस कोटी हिंदु लोक तुमच्या पाठीमागें उभे

आहेत. ते तुमच्या सुखदुःखांत स्वतःला सुखी वा दुःखी मानतात. म्हणून त्यांच्या प्रेमळ पाठिंब्याकडे लक्ष देऊन तुम्ही कांहीं झालें तरी आपला धर्म सोडूं नका, आपला धर्म सोडूं नका, आपला धर्म सोडूं नका. तुमची सर्व पुढील संतति तुम्हांस धन्यवाद देईल; तुमचे थोर पूर्वज व वाडवडील तुम्हांस आशीर्वाद देतील दयाघन परमेश्वर तुम्हांवर कृपावृष्टि करील.

प्रसंग ह्या कठीण हो । बहुत पावले मोह हो ।
परंतु यत्न पाहती । पुढें सुखेंचि राहती ॥
विवेक पाहणें वरा । वरा विचार तो करा ।
उपासकांसि सूचना । उपासना उपासना ॥

" बोला हिंदु धर्मकी जय ! हिंदु धर्मकी जय ! ! हिंदु धर्मकी जय ! ! !

जयजय रघुवीर समर्थ ! "

ह्या दिव्य व तेजस्वी संदेशाच्या मुद्रित प्रती सर्वांना वाटण्यांत आल्यावर, अध्यक्ष श्री दादासाहेब वैद्य समारोपादाखल म्हणाले " नुकत्याच झालेल्या दंग्यांत मुंबईकडे धर्माकरिता कितीतरी माणसें मेलीं व जखमी झालीं तें पाहा. तसे तुम्हीं धर्मरक्षणार्थ सतत उद्युक्त रहा हिंदुधर्माची ज्योत अशीच अखंड तेवत ठेवा. "

तदनंतर समस्त गावडे समाजातर्फे श्री. विठ्ठल सुर्लीकर व श्री. केशव कुंडईकर ह्या गावड्यांनीं समयोचित भाषणें करून, महाराष्ट्रांतील व गोमांतकांतील पुढारी, समस्त हिंदुजनता तद्वतच मसूर आश्रमीय मंडळी ह्या सर्वांचे अंतःकरणपूर्वक आभार मानले व हिंदुधर्माच्या प्रचंड जयघोषांत हा पहिला गोड सुवर्ण महोत्सवसमारंभ समाप्त झाला.

दुसरा उत्सव चिंबल–गोवा येथें फाल्गुन शुद्ध ६ बुधवार ( तारीख ५–३–३० ) रोजी ' विजयनगर ' नामक मंडपांत थाटानें साजरा केला—

सकाळीं मंडपांत नवहिंदूंच्या प्रौढ सुवासिनी स्त्रियांकडून सडासंमार्जन व रांगोळ्या वगैरे झाल्यानंतर सर्वांनीं मिळून ( आश्रमीय पाठशाळेंतील विद्यार्थी, धर्मभास्कर भजनीमेळा वगैरे लोकांनीं ) करुणाष्टकें, मनाचे श्लोक व भजन यांचा कार्यक्रम केल्यानंतर तेजोबलवर्धक असे सूर्यनमस्कार घालून सर्वांनीं तेथील आद्यशुद्धियज्ञकुंडास प्रदक्षिणा घातल्या. दुपारीं इतर अनेक गांवांतून आलेल्या शुद्धीकृत गावड्यांचा ( नवहिंदूंचा ) भोजनसमारंभ झाला. संध्याकाळी ५ वाजतां पणजी, रायबंदर, कुंभारजुवे, डिचोली, माशेल, पेडणें वगैरे गांवांतील अनेक सभ्य गृहस्थ आले होते. त्यांत गोमांतकांतील सुप्रसिद्ध घडाळांचे व्यापारी उद्यमभास्कर श्री. पुंडलीक अनंत केणी, तसेच डॉ. येन्डेकर, वे. शा. सं. करंडे शास्त्री, ह. भ. प. रामचंद्र कृष्ण कामत, श्री पांडुरंग शेवणी बोरकर, श्री. कृष्णाजी परशुराम प्रभु देसाई, श्री. सामंत मास्तर वगैरे मंडळी होती. याशिवाय अंत्रुज बतमाम सत्तरी व तिसवाडी महालांतील शेंकडोंशें नवहिंदू लोकहि उत्सवास आलेले होते. मनुष्यांचा समुदाय सुमारें एक सहस्र पर्यंत होता. प्रथम ईशस्तवन, मुलांचें सुंदर

गायन झाल्यानंतर श्रीरामनामजप सर्वीकडून करविण्यांत आला. त्यानंतर नवहिंदूंच्या कुमारिकांनीं बसविलेलें कोंकणी भाषेतील एक गाणें म्हणण्यांत आलें व नवहिंदूंच्या मुलांचा टिपऱ्यांचा नाच झाला. नवहिंदूंची स्वयंसेवक मंडळी खादीवेषांत उत्सवाची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेवीत होती. सर्व मंडळी मंडपांत सुव्यवस्थित बसल्यानंतर शुद्धिकार्याचे कर्मवीर रामचंद्र नारायण लवंदे यांनीं विद्युत्संदेश वाचून दाखविले, व उत्सवाचें महत्त्व सांगून समारंभाचें अध्यक्षस्थान वे. शा. सं. रामचंद्र वामन नाईक करंडे शास्त्री यांना स्वीकारण्याविषयीं विनंति केली. ह्या सूचनेस तेथील प्रसिद्ध डॉ. त्रिविक्रम गोविंद कामत यळेकर यांनीं अनुमोदन दिल्यावर शास्त्रीबुवा अध्यक्ष स्थानापन्न झाले.

गोव्यांत मागें स्थापन झालेल्या हिंदुसभेचे अध्यक्ष ह्या दृष्टीनें विचार करतां त्यांचें हें भाषण फार महत्त्वाचें होतें. त्यांनीं आपल्या भाषणांत अनेक गोष्टींचा स्पष्टोक्तीनें बराच खुलासा केला व शुद्धिशत्रुकंपूचा यथेच्छ समाचार घेतला. निःपक्षपात बुद्धीनें केलेलें हें त्यांचें भाषण ऐकून श्रोत्यांना सानंदाश्चर्य वाटलें.

ज्याप्रमाणें गीताजयंत्युत्सवांत नवहिंदूंस वांटण्यासाठीं श्रीकृष्णसंदेशाचीं पुस्तकें गेलीं होतीं, तसेंच याहि उत्सवासाठीं मसूराश्रमांतून पाठविलेलीं समर्थांचीं सुंदर व संग्राह्य छायाचित्रें नवहिंदूंत वांटलीं. यामुळें नवहिंदूंत आनंदी आनंद झाला.

नंतर कुंभारजुवेच्या शारदा पाठशाळेचे मुख्याध्यापक श्री० सामंत, ह. भ. प. रामचंद्र कृष्ण गमत, चंद्रगडकर यांचीं समयोचित धर्मोत्तेजनपर, व सावर्डे–पंचवाडी येथील श्रीमती गोकुळाबाई ाळावलीकर यांचें स्त्रियांस उद्देशून धर्मश्रद्धा व नामस्मरण यांवर, अशीं सुंदर भाषणें झालीं. नवहिंदु ोपाळ गावडे यांचें फारच स्फूर्तिदायक भाषण झालें. श्री. लवंदे यांनीं कोंकणी भाषेंत रचलेलें वहिंदूंचें गाणें लहान मुलांकडून म्हणविण्यांत आलें. नंतर आरत्या, प्रसाद, सामुदायिक प्रार्थना ौरे होऊन हा हिंदुधर्माच्या जागृतीचा गोड चिरस्मरणीय सुवर्णदिनसमारंभ निर्विघ्नपणें व आनंदानें ार पडला. रात्रीं घरोघर रोषनाई व गांवांत 'राम गस्त'–नामस्मरणाच्या भजनाची फेरी झाली.

ह्या उत्सवाप्रमाणेंच 'पतितपावन मंदिरा'च्या स्थापनेचाहि एक महत्त्वपूर्ण उत्सव चिंचल येथें श्री० दिगंबरदास ह्यांच्या शुभहस्तें साजरा करण्यांत आला. मंदिरांत श्रीसमर्थ रामदास स्वामी व श्रीमन्महाराज ह्यांचीं छायाचित्रें ठेवण्यांत आलीं आहेत. सर्व नवहिंदूंनीं रात्रंदिवस परिश्रम घेऊन हें मंदिर उभारलें आहे. चारशें वर्षांनंतर उभारलेल्या ह्या मंदिरांत आपल्या देवाची मनोभावें प्रार्थना करतांना त्या दिवशीं प्रत्येक नवहिंदूला जो आनंद व उल्हास वाटत होता तो शब्दांनीं वर्णन करतां येणार नाहीं. शुद्धिवीर श्री० रामभाऊ लवंदे व श्री० दिगंबरदास ह्यांचीं समयोचित व अत्यंत परिणामकारक भाषणें झालीं. ज्या पोर्तुगीज सत्ताधीशांनीं केवळ हिंदुत्वासाठींच हिंदुलोकांचा अनन्वित छळ केला, त्याच पूर्वींच्या धर्मवेड्या पोर्तुगीज सत्तेखालीं गोमांतकांत छळाबळानें बाटलेल्या लोकांना उघडपणें हिंदु–धर्म–दीक्षित करण्यासाठीं 'पतितपावन मंदिरा'ची स्थापना होणें ही गोष्ट अत्यंत विस्मयकारक नाहीं असें कोण म्हणेल ?

चिंचल येथील पतितपावन मंदिराप्रमाणेंच पानवेल येथेंहि पाडव्याच्या शुभ मुहूर्तावर (चैत्र शु॥ १–१८५२) श्री मारुति–मंदिराचा पाया घालण्याचा समारंभ, आश्रमावर निस्सीम प्रेम करणारे

गायन झाल्यानंतर श्रीरामनामजप सर्वांकडून करविण्यांत आला. त्यानंतर नवहिंदूंच्या कुमारिकांनीं बसविलेलें कोंकणी भाषेंतील एक गाणें म्हणण्यांत आलें व नवहिंदूंच्या मुलांचा टिपऱ्यांचा नाच झाला. नवहिंदूंची स्वयंसेवक मंडळी खादीवेषांत उत्सवाची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेवीत होती. सर्व मंडळी मंडपांत सुव्यवस्थित बसल्यानंतर शुद्धिकार्याचे कर्मवीर रामचंद्र नारायण लवंदे यांनीं विद्युत्संदेश वाचून दाखविले, व उत्सवाचें महत्त्व सांगून समारंभाचें अध्यक्षस्थान वे. शा. सं. रामचंद्र वामन नाईक करंडे शास्त्री यांना स्वीकारण्याविषयीं विनंति केली. ह्या सूचनेस तेथील प्रसिद्ध डॉ. त्रिविक्रम गोविंद कामत यळेकर यांनीं अनुमोदन दिल्यावर शास्त्रीबुवा अध्यक्ष स्थानापन्न झाले.

गोव्यांत मागें स्थापन झालेल्या हिंदुसभेचे अध्यक्ष ह्या दृष्टीनें विचार करतां त्यांचें हें भाषण फार महत्त्वाचें होतें. त्यांनीं आपल्या भाषणांत अनेक गोष्टींचा स्पष्टोक्तीनें बराच खुलासा केला व शुद्धिशत्रुकंपूचा यथेच्छ समाचार घेतला. निःपक्षपात बुद्धीनें केलेलें हें त्यांचें भाषण ऐकून श्रोत्यांना सानंदाश्चर्य वाटलें.

ज्याप्रमाणें गीताजयंत्युत्सवांत नवहिंदूंस वांटण्यासाठीं श्रीकृष्णसंदेशाचीं पुस्तकें गेलीं होतीं, तसेंच याहि उत्सवासाठीं मसूराश्रमांतून पाठविलेलीं समार्थांचीं सुंदर व संग्राह्य छायाचित्रें नवहिंदूंत वांटलीं. यामुळें नवहिंदूंत आनंदी आनंद झाला.

नंतर कुंभारजुवेच्या शारदा पाठशाळेचे मुख्याध्यापक श्री० सामंत, ह. भ. प. रामचंद्र कृष्ण कामत, चंद्रगडकर यांचीं समयोचित धर्मोत्तेजनपर, व सावर्डे-पंचवाडी येथील श्रीमती गोकुळाबाई तळावलीकर यांचें स्त्रियांस उद्देशून धर्मश्रद्धा व नामस्मरण यांवर, अशीं सुंदर भाषणें झालीं. नवहिंदु गोपाळ गावडे यांचें फारच स्फूर्तिदायक भाषण झालें. श्री. लवंदे यांनीं कोंकणी भाषेंत रचलेलें नवहिंदूंचें गाणें लहान मुलांकडून म्हणविण्यांत आलें. नंतर आरत्या, प्रसाद, सामुदायिक प्रार्थना वगैरे होऊन हा हिंदुधर्माच्या जागृतीचा गोड चिरस्मरणीय सुवर्णदिनसमारंभ निर्विघ्नपणें व आनंदानें पार पडला. रात्रौ घरोघर रोषनाई व गांवांत 'राम गस्त'—नामस्मरणाच्या भजनाची फेरी झाली.

ह्या उत्सवांप्रमाणेंच 'पतितपावन मंदिरा'च्या स्थापनेचाहि एक महत्त्वपूर्ण उत्सव चिंचळ येथें श्री० दिगंबरदास ह्यांच्या शुभहस्तें साजरा करण्यांत आला. मंदिरांत श्रीसमर्थ रामदास स्वामी व श्रीमन्महाराज ह्यांचीं छायाचित्रें ठेवण्यांत आलीं आहेत. सर्व नवहिंदूंनीं रात्रंदिवस परिश्रम घेऊन हें मंदिर उभारलें आहे. चारशें वर्षांनंतर उभारलेल्या ह्या मंदिरांत आपल्या देवाची मनोभावें प्रार्थना करतांना त्या दिवशीं प्रत्येक नवहिंदूला जो आनंद व उल्हास वाटत होता तो शब्दांनीं वर्णन करतां येणार नाहीं. शुद्धिवीर श्री० रामभाऊ लवंदे व श्री० दिगंबरदास ह्यांचीं समयोचित व अत्यंत परिणामकारक भाषणें झालीं. ज्या पोर्तुगीज सत्ताधीशांनीं केवळ हिंदुत्वासाठींच हिंदुलोकांचा अनन्वित छळ केला, त्याच पूर्वींच्या धर्मवेड्या पोर्तुगीज सत्तेखालीं गोमांतकांत दडपणानें बाटले गेलेल्या लोकांना उघडपणें हिंदु-धर्म-दीक्षित करण्यासाठीं 'पतितपावन मंदिरा'ची स्थापना होणें ही गोष्ट अत्यंत विस्मयकारक नाहीं असें कोण म्हणेल ?

चिंचळ येथील पतितपावन मंदिराप्रमाणेंच पानवेल येथेंहि पाडव्याच्या शुभ मुहूर्तावर ( चैत्र शु॥ १-१८५२ ) श्री मारुति-मंदिराचा पाया घालण्याचा समारंभ, आश्रमावर निस्सीम प्रेम क

श्री. भार्गव स. कामत वाघ यांच्या हस्तें झाला. हनुमज्जयंतीला ( चैत्र शु० १५-१८५२ ) आश्रमांतून पाठविलेल्या संगमरवरी मूर्तीची स्थापनाहि व्हावयाची होती; परंतु आकस्मिकपणें गावड्यांचा एक मुलगा मोटारीखालीं सांपडून वारल्यामुळें तो समारंभ तसाच रहित करण्यांत आला. *श्री. भार्गव स. कामत वाघ ह्यांनीं आपल्या घराजवळच्या वाडींतील प्रशस्त जागा मसूराश्रमास* अर्पण केली आहे. त्या जागेंतच एका अंगाला वरील लहानसें मारुतिरायांचें मंदिर नवहिंदूंसाठीं बांधण्याचें काम चाललें आहे. तद्वतच चिंबल येथील धर्मप्रेमी भाटकर श्री० केशव पुंडलीक कामत ह्यांनींहि आपल्या श्रीभगवतीच्या तळीवरील चिंबल येथील भाटांतील ८ हात लांब व ८ हात रुंद *अशी जागा ' हनुमान जयस्तंभा ' साठीं अर्पण केली आहे श्री० भार्गव सगुण कामत वाघ* व श्री० केशवराव कामत पानवेलकर ह्या उभयतांनीं दाखविलेली ही उत्कट धर्मसेवातत्परता कोणाला कौतुकास्पद वाटणार नाहीं ?

वरील सर्व आनंदोल्हासाच्या गोष्टी झाल्या हें ठीकच झालें; परंतु सध्यां एक महत्संकट नवहिंदुसमाजावर ओढवलें आहे. गोमांतकांतील शुद्धिकार्याची प्रचंड लाट जेथल्या तेथेंच जिरवून टाकावी किंवा शुद्धीचा महान् वृक्ष समूळ ठार मारला जावा एतदर्थ कांहीं ख्रिस्ती जमीनदार, पाद्रीशाही व तिच्या चिथावणीनें कांहीं सत्ताधिकारी ह्यांनीं प्रारंभापासून कसकसें थैमान घातलें, हें मागें वर्णन केलेंच आहे. शुद्धिचळवळीला शांतताभंगकारक किंवा राजकारणी हेतु चिकटविण्याचे शुद्धिशत्रूंचे आटोकाट प्रयत्न, माजी गव्हर्नर जनरल पेद्रोद अमोरिम ह्यांनीं पूर्ण विचारानंतर ठेवलेल्या *धर्मताटस्थ्याच्या प्रशंसनीय धोरणामुळें कसे विफल झाले, हेंहि मागें दाखविलेंच आहे.* परंतु दुर्दैवानें हे विचारी, उदार मनाचे, प्रजाहिततत्पर व गरीबांचे कनवाळु असे गव्हर्नर जनरल नुक्तेच ख्रिस्तवासी झाले *आणि नवहिंदु गावड्यांच्या अन्याय्य गांजणुकीला पुनरपि प्रारंभ झाला.*

'येन केन प्रकारेण' गावड्यांना पेंचांत धरून त्यांनीं केलेल्या हिंदुधर्माच्या स्वीकाराबद्दल त्यांना यथेच्छ प्रायश्चित्त द्यावें, असा शुद्धिविरोधकांचा डाव आहे व त्या दृष्टीनें गावड्यांवर एक महत्संकट गुदरविण्यांत आलें आहे. पोर्तुगीज सरकारच्या ' रेजिस्त सिविल ' कायद्यान्वयें नांव बदलण्यास सुमारें ४० रुपये खर्च पडतो. आतांपर्यंत विवाहनोंदणी इत्यादि वेळीं प्रथम ख्रिस्ती नांव सांगावयाचें व नंतर ' ऊर्फ ' म्हणून हिंदुनांव लावावयाचें असाक्रम चालत असे व त्याला कोणी आडकाठी घेतली नव्हती; परंतु आतां वरील कायदा सक्तीनें अंमलांत आणला जात आहे. अर्थात् नांव बदलून घेण्यासाठीं प्रत्येकाला ४० रुपयांचा भूर्दंड भरणें भागच आहे. ही नूतन आपत्ति ओढवतांच गावडे लोकांचे मुख्य मुख्य प्रतिनिधि गव्हर्नर जनरलांस जाऊन भेटले व ' मा बाप सरकारनें ही गरीबांची छळणूक दूर करावी ' अशी नम्र विनंति केली. तेव्हां " तुम्ही ख्रिस्त्यांचे हिंदु कसे झाला ? " असें विचारण्यांत आलें. " आम्हीं स्वखुशीनें हिंदु झालों " असें *गावड्यांनीं उत्तर देतांच, ' तर मग स्वखुषीनेंच ४० रुपये पण भरा ' असें त्यांस सांगण्यांत* आलें ! गरीब बिचारे गावडे हिरमुष्टी होऊन परत गेले. वास्तविक माजी गव्हर्नर जनरल साहेबांच्या उदार वृत्तीप्रमाणें, तद्वतच लोकसत्तेच्या धर्मस्वातंत्र्याच्या उज्ज्वल ब्रीदाप्रमाणेंहि प्रस्तुतच्या गव्हर्नर साहेबांनीं ह्या प्रकरणीं निर्णय द्यावयास पाहिजे होता. परंतु अद्यापिहि फार समय झाला नाहीं, तोंच सध्यांच्या गव्हर्नर जनरलांनीं आपल्या अंगीकृत धोरणांत पालट करावा, व गरीब

गावड्यांना नाडणारा हा कायदा पोर्तुगालहून तत्काळ बदलून आणावा, अशी त्यांस आमची आग्रहपूर्वक नम्र विज्ञापना आहे. प्रजेचें खरें हित साधून लोकशाहीची श्रेष्ठ सेवा करण्याची ही उत्कृष्ट संधि ते वायां दवडणार नाहींत अशी आम्हांस बळकट आशा आहे. त्याप्रमाणेंच आमची समस्त हिंदुजनतेलाहि अशी विनीत प्रार्थना आहे की, तिच्या आशीर्वादानें व प्रेमळ पाठिंब्यानेंच ह्या गावडे बंधूंना चारशें वर्षांनंतर आपल्या स्वधर्म–गृहांत प्रवेश मिळाला आहे. तरी गावड्यांच्या सध्यांच्या ह्या महत् विकट प्रसंगीं समस्त हिंदुजनता त्यांचा पाठपुरावा करील व पोर्तुगालच्या पार्लमेंटपर्यंत हा लढा चालवून आपल्या धर्मबांधवांची अन्याय्य गांजणुकी-पासून सोडवणूक करील अशी आम्हांस दृढ श्रद्धा आहे. ह्या दृष्टीनें पुणें हिंदुसभेनें अत्यंत जागरुकपणें एक महत्त्वाचा असा ठराव करून गव्हर्नर जनरलकडे पाठविला आहे.

पुणें हिंदुसभेचा तो ठराव असा:—

( १ ) " धार्मिक तटस्थपणाबद्दल पूर्वी गव्हर्नरसारख्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून वारंवार निश्चित अभिवचनें मिळालीं असतांहि सध्यां ख्रिस्ती धर्म सोडून मूळ हिंदुधर्मांत स्वखुषीनें आलेल्या गोमांतकांतील नवहिंदूंना विशेष त्रास होऊं लागला आहे. यास्तव पोर्तुगीज सरकारास ही सभा पुढीलप्रमाणें विनंति करीत आहे:—

( अ ) धर्मांतरानंतर हिंदूंना नांव नोंदण्याबद्दल माणशीं ४० रु. चा जो खर्च येतो तो नवहिंदूंची गरीबीची स्थिति लक्षांत घेतां त्यांना माफ करावा. प्रचलित कायद्याप्रमाणें तसें करणें शक्य नसेल तर असला कायदा बदलून घ्यावा.

( ब ) नवहिंदूंना ख्रिस्ती मिशनऱ्यांकडून किंवा त्यांच्या प्रेरणेनें खालच्या स्थानिक अधि-काऱ्यांकडून कोणत्याहि प्रकारचा त्रास दिला जाणार नाहीं, अशी व्यवस्था व्हावी.

या दोन गोष्टींची अंमलबजावणी करून पोर्तुगीज सरकार आपलें तटस्थपणाचें धोरण प्रचीतीला आणून देईल व ब्रिटिश मुलखांतील हिंदूंना तेथील हिंदुबांधवांबद्दल जी चिंता वाटत आहे ती दूर करील असा या सभेस विश्वास वाटत आहे. "

ह्याच धर्तीवर सर्वत्र ठराव होऊन गोवा सरकारला कायदा बदलणें भाग पाडणें अत्यावश्यक आहे. तरी सर्व हिंदुसभांनी ह्या प्रश्नाचा तातडीनें विचार करावा अशी आमची आग्रहाची विनंती आहे. असो.

गोमांतकाच्या शुद्धीच्या स्वरूपांत हिंदुधर्माचा तेजस्वीपणा पुनरपि एकदां सर्व जगताच्या प्रत्ययास आला. ब्रि. हिंदुस्थानांतील पाद्री लोक खडबडून जागे झाले; व आतां आपल्या 'कळपांची उपेक्षा करून भागणार नाहीं' असें त्यांना कळून चुकलें. पाद्रीमंडळें गांवोगांव व खेडोपाडीं आपलीं शुभवर्तमानें पुनरपि निरलसपणें व औत्सुक्यपूर्णतेनें सर्वांस निवेदन करूं लागलीं. ख्रिस्ती वृत्तपत्रांनीं, 'पाद्रीमंडळानें आतांपर्यंत आपल्या अनुयायांच्या सुधारणेकडे सर्वतोपरी दुर्लक्ष केल्यामुळेंच प्रस्तुतची घटना घडून आली,' म्हणून पाद्र्यांस दोषार्ह ठरविलें. सर्व ख्रिस्ती समाज हादरून गेला व ठिकठिकाणच्या त्यांच्या पुढाऱ्यांनीं मुख्य केंद्रांतून चांगले चांगले धर्मप्रचारक

तांतडीनें पाठवून देण्याविषयीं निकडीची मागणी केली. आपलें रोमन कॅथॉलीक पाद्रीमंडळ बदलून प्रोटेस्टंट पाद्रीमंडळ आपणांस मिळावें, अशी वसईकर खिश्चनांनीं आजपर्यंत पुष्कळ चळवळ केली होती; परंतु आतांपर्यंत उपेक्षिली गेलेली ती त्यांची मागणी गोमांतकांतील शुद्धिकार्य झालेलें पाहतांच एकदम मान्य करण्यांत आली व वसईकडील प्रांत प्रोटेस्टंट पाद्री मंडळाच्या अधिकारक्षेत्रांत देण्यांत आला.

पाद्रीमंडळें व खिस्तीलोक जों जों इकडे ह्याप्रमाणें स्वसमाजसंरक्षणार्थ धांवाधांव करूं लागले तों तों तिकडे हिंदुसमाजहि आपली निष्क्रिय उदासीनता झाडण्यासाठीं उद्युक्त होऊं लागला. गोमांतकांतील अवघड पेंच सुटलेला पाहून, हिंदुमात्राला धन्यता वाटली. विशेषतः प्रत्येक महाराष्ट्रीयाचें अंतःकरण आत्मविश्वासानें भरून गेलें, व ठिकठिकाणीं शुद्धीकरणार्थ प्रयत्न सुरू झाले. 'कृण्वन्तो विश्वमार्यम्।' ही वंदनीय पूर्वजांची घोषणा ज्याच्या त्याच्या मनींमुखीं विलसूं लागली. सर्व मानवजात आर्यभावानें युक्त केल्याविना विश्वांत शांति, सौख्य व समाधान नांदूं शकणार नाहीं हीच त्या महाभागांची सर्वश्रेष्ठ शिकवणूक आहे, व तिची अल्पशी खुणूक गोमांतकीय शुद्धीमुळें हिंदुसमाजास अनुभविण्यास मिळाल्याविना राहिली नाहीं. 'येन केन प्रकारेण' हिंदुसमाजसंस्कृति ठार व्हावी एतदर्थ रात्रंदिवस पिढ्यान् पिढ्या खपणाऱ्या विधर्मी समाजाची आजवर इच्छेनें वा अनिच्छेनें धारणा पोषणा करणारा गावडे लोकांचा एवढा मोठा समाज, आतां हिंदुदेवधर्म संस्कृतीची सेवा करण्यास लागलेला पाहून कोणाहि हिंदूस साभिमान पूर्वक धन्यताच वाटेल आणि अशाच पद्धतीनें बाकीच्या विधर्मी समाजानाहि जर आर्यसंस्कार दिले गेले, तर त्यांच्या अनिवार साम्राज्यतृष्णेच्या पायीं सध्या जगांत जी भयंकर अनर्थवाही भीषणपरंपरा सर्वत्र धुमाकूळ घालीत आहे, ती अवश्यमेव मुळापासून नष्ट केली जाऊन सर्वत्र शांतिसौख्याचें साम्राज्य स्थापन होऊं शकेल, हें दिव्य दृश्यहि त्यांच्या अंतश्चक्षूंसमोर तत्काळ उभें राहील. हिंदुमात्राचें हें रम्य सुखस्वप्न लवकरच सत्यसृष्टींत उतरण्यासाठीं, " ब्रह्म तेजानें युक्त असा ब्राह्मणवर्ग या राष्ट्रांत निर्माण होवो, या राष्ट्रांत शूरवीर, धनुर्विद्येंत प्रवीण, मृगयेंत निष्णात व महारथी असा क्षत्रियवर्ग निर्माण होवो. तद्वतच येथें विपुल दूध देणाऱ्या गाई, वाहनें वाहणारे चांगले खंदे बैल, वेगवान् घोडे, सौभाग्यवती, पुत्रवती, वीर्यवती व स्वकर्तव्यदक्ष अशा कुटुंबिनी निर्माण होवोत. या यजमानाला जयशाली, रथप्रवीण व सभापंडित असे वीर पुत्र होवोत. आमच्या इच्छेनुसार येथें उत्तम पर्जन्य-वृष्टि होवो. वनस्पति फलभारानें युक्त होवोत. आमचा योगक्षेम निर्विघ्नपणें चालो; " अशी आमची त्या जगदुद्धारक व भक्तप्रतिपालक परमेश्वराच्या चरणीं विनीत प्रार्थना आहे.

" आब्रह्मन् ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायतामस्मिन्राष्ट्रे राजन्यः शूर इषव्योऽतिव्याधी महारथो जायतां दोग्ध्री धेनुर्वोढानड्वानाशुः सप्तिः पुरंध्रिर्योषा जिष्णू रथेष्ठाः सभेयो युवास्य यजमानस्य वीरो जायतां निकामे निकामे नः पर्जन्यो वर्षतु फलवत्यो न ओषधयः पच्यन्तां योगक्षेमो नः कल्पताम् ॥ "

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः।

# गोमांतक-शुद्धि-विषयक कांहीं लेख व परिशिष्टें.

## गोमांतकांतील शुद्धीकृत लोकांची संख्या.

### तिसवाडी महाल.

| गांव | संख्या. | गांव | संख्या |
|---|---|---|---|
| चिंबल | ८०० | काकरा | ६ |
| नागझर. | ३५० | सान्तान. | ३५० |
| कालापूर. | २८५ | जिनांत. | १५० |
| नागाळी. | २५० | पणजी. | ९ |
| पाळें. | २७० | दिवाडी. | ११ |
| वांबार. | १७० | चोडण. | १०० |
| मणमाट. | १२५ | लौंढा. | २६ |
| धुळापी. | १०० | सुकेरवाळ | ३४ |
| करंजाळ. | १०० | बेती. | ५० |
| सावले. | ७० | मुरगांव. | ७५ |
| झाडयांत. | ८५ | दोनापावल. | ६१ |
| नावशी. | ७० | नावशी ( बडलेमाट ) | १७५ |
| पानवेल. | ५० | कालापूर चिंबल नागझर इत्यादि स्थळीं आसपासच्या वाडयावरून आलेले. | ३०३ |
| पाळ्यांत ( शिरदोंन ) | १३५ | | |
| करमळी. | ६९० | | |

### अंत्रुज महाल.

| गांव. | संख्या | गांव | संख्या |
|---|---|---|---|
| १ आकार. | ८६ | १५ करमळो | २८१ |
| २ कुडुमडे. | ४० | १६ आर्ले. | १४ |
| ३ खेडे. | ५६ | १७ सांकव. | ४३ |
| ४ मंगेशीं | ५२ | १८ मधलावाडा. | १९ |
| ५ कोने | ५८ | १९ सांकव वरील वाडा. | १३९ |
| ६ गांवठण. | १७ | २० पांचमी. | ३६ |
| ७ खेडे | ९ | २१ मुरडी | १४१ |
| ८ पिसागळ | ११ | २२ थोरी | २६ |
| ९ माजीलवाडा | १८७ | २३ वाणस्तर | १२ |
| १० कुंकळे. | ३०१ | २४ वाडी | ९ |
| ११ टामशी. | ३ | २५ धोणशी. | १६२ |
| १२ आंवाद | १३७ | २६ कुर्टी टेंवी. | ४ |
| १३ आर्ले, वांगाळ | १६९ | २७ सावई | १६२ |

### बतग्राम महाल.

पाळी १७५  सूर्ले ७५

### सत्तरी महाल.

थोंर्ते २८४  ठाणगांव ४५

तिसवाडी ४८५१, अंत्रुज २१७४, बतग्राम २५०, सत्तरी ३२९, व स्थळोस्थळीं झालेलीं फेरकोळ शुद्धीकरणें १६१. एकूण शुद्धीकृतांची संख्या ७८१५.

# ब्रह्मचर्याश्रम मसूर (जि. सातारा)

माहे मार्च सन १९२७ ते १९३० अखेर शुद्धिकरणाप्रीत्यर्थ झालेल्या आयव्ययाचा तक्ता

**जमा** — रु. — **नांव**

| जमा रु. | तपशील | नांव रु. | तपशील |
|---|---|---|---|
| ५१ | श्री शिल्लक | ७३५२–१–६ | प्रवासखातें |
| १४३७–८–० | श्रीदासबोध मासिक | १६३१–८–३ | टपालखातें |
| १०७०२–०–९ | ब्रह्मचर्याश्रम मसूर | २६२–२–३ | छापखानें |
| १५१७–०–० | श्रीदासबोध कार्यालय | १३२२–१–९ | भांडारखातें |
| | | २५३–०–० | कमाई खातें |
| १३६५७–८–९ | | १६२१-११-९ | भोजन खातें |
| १०५७७–१–० | अनेकांकडून शुद्धिकरणाप्रीत्यर्थ आलेले (मेतरी मराठा ऑफिस, अखिल भारतीय शुद्धिसभा रत्नागिरी शुद्धिसभा, श्रद्धानन्द स्मारक शुद्धि फंड, श्रद्धानन्द कार्यालय इतर शुद्धिसभा व जनता.) | ४९१-१५-३ | किरकोळ खातें |
| | | १३०९–६–० | प्रचारक खातें |
| | | २७३४–८–० | वाङ्मय खातें |
| | | ५४८–६–० | शुद्धिकरण खातें |
| | | २८३७–७–९ | पाठशाळा खातें |
| | | १०६५–०–० | पगार खातें |
| | | २०००–०–० | कर्ज फेड |
| | | | १४०० श्री दासबोध मासिक |
| | | | ६०० श्री दासबोध कार्यालय |
| | | | २००० |
| | | ५० | तात्पुरतें खातें |
| | | २३४७२–४–६ | |
| | | ८१३-१०-३ | श्री शिल्लक पैकीं मार्च अखेर |
| २४२८५–१४–९ एकूण | | २४२८५-१४-९ | |

# गोव्यांतील शुद्धीचें महत्त्व.

(केसरी—अमलेख, मिती फा. शु. १५ शके १८४९.)

मागें वळून पाहिलें म्हणजे आश्चर्य वाटेल इतकी हिंदुसमाजाच्या मनोवृत्तींत आज पालट झाली आहे आणि ही पालट समाजाच्या जिवंतपणाची व चिवटपणाचीहि साक्ष पटवीत असल्यामुळें आनंद होऊन आशावादहि बळावतो. प्रसंग ओळखून व विवेक करून आपली क्रिया पालटील तोच भाग्यपुरुष आणि तोच जिवंत समाज. फार दूरची गोष्ट नाहीं, दहावीस वर्षांपूर्वीच हिंदु समाजाच्या बाहेर गेलेलीं माणसें समाजांत परत आणण्याची गोष्ट काढली तर कित्येकांना महत्संकट वाटे; कित्येकांचे अंगावर शहारे येत; कित्येक सचिंत होत. एके काळीं हिंदु समाजांतच असून मोहानें, लोभानें अगर बलात्कारानें बाहेर गेलेलीं माणसेंहि परत घ्यावींत का न घ्यावींत याविषयींच लोक साशंक, तर मग अगदींच बाहेरच्यांस आंत घेण्याची गोष्ट दूरच राहिली; पण अगदीं गळ्याशीं संकट आल्यावर व उशिरां कां होईना हिंदुसमाज सावध झाला हीच भाग्याची गोष्ट होय.

शुद्धीस विचकणाऱ्या हिंदु समाजानें आतां ती संजीवनी हातीं घेतली आहे, आणि तिच्या अनुभवानें समाजांत अधिकाधिक आत्मविश्वास उत्पन्न होत आहे. बाटलेल्या लोकांना आपल्यांत घेतलें तर ते आपल्याला पचतील कीं नाहीं, अशा विवंचनेंत हिंदु समाज होता. पण परिस्थितीच्या कोंडींत सांपडल्यावर 'न संशयमनारुह्य नरो भद्राणि पश्यति । संशयं पुनरारुह्य यदि जीवति पश्यति ॥' ही शिकवण लक्ष्यांत घेऊन हिंदु समाजानें ह्या संशयाचें आरोहण करण्याचा हिय्या केला आणि खाय हेंच अधिकाधिक भुकेचें औषध व्हावें, तसा या शुद्धीच्या संजीवनीचा परिणाम झाला! पूर्व हिंदूंना तर परत घेतलेंच पाहिजे, पण अपूर्व हिंदूंनाहि हिंदु समाजांत घ्यावें, असा देखील आज चोहोंकडून ध्वनि निघत आहे. मिस मिलरच्या शुद्धिकरणाच्या वादांत तिचा लग्नाचा हेतु आणि तोहि तुकोजीरावांच्या दोन राण्या जिवंत असतांना तिसरें लग्न; यामुळेंच या शुद्धीकरणाबद्दल कित्येकजण विरोधी व कित्येक साशंक आहेत; पण तिच्या शुद्धीकरणाच्या बाबतींत या भावी अनिष्ट गोष्टीचा धागा नसता तर केवळ शुद्धीकरण या दृष्टीनें त्याला फारशी प्रतिकूलता दिसून आली नसती; कारण, पूर्वहिंदू खाऊं आणि अपूर्वहिंदू तोंडीं लावूं अशी आज हिंदु समाजाची सर्वभक्षक वृत्ति दिसूं लागली आहे.

हिंदूंना कित्येक शतकें चालत आलेली चूक दुरुस्त करावयाची असल्यामुळें या बाबतींत त्यांनीं कितीहि उत्साह दाखविला तरी तो थोडाच होईल; कारण, या उत्साहाला पुरून उरेल इतका कार्याचा डोंगर हिंदु समाजापुढें उभा आहे. सुलभ संकोची, प्रसरणशून्य, असंघटित आणि विस्कळित अशा एकट्या हिंदुधर्मीय समाजाशीं दोन जबर ग्रसिष्णु, शीघ्रप्रसारक व संघटित अशा परधर्मीय समाजाची गांठ पडली आहे. एक वनचर वरून पर्वत ओलांडून हिंदु समाजावर घसरला. दुसरा जलचर समुद्राच्या लाटेसरशी उसळी मारून आंत घुसला. त्यांचे धर्म येनकेन—साधक, तर आपला येनकेन—संकोची. अशांची गांठ पडल्यावर झाला तेवढा संकोच थोडाच वाटतो. जाण्यास मुक्तद्वार

पण परत येण्याच्या मार्गात अनंत-तट अशा या पूर्वस्थितींत हिंदु समाज टिकला तरी कसा याचेंच आतांच्या. शुद्धिसंजीवनीनें प्रसरणशील बनलेल्या हिंदु समाजास आश्चर्य वाटेल. असो. हिंदु समाजाची प्रसरणशील वृत्ति तयार झाली, पण कृतीचा मार्ग निरलस व धडाडीच्या प्रयत्नानें आक्रमण केला तरच ती वृत्ति पालटल्याचा उपयोग. परधर्मीय समाज पूर्वी मऊ सांपडलेल्या हिंदु समाजाला उकरीतच होते. आतां हिंदु समाज अधिक टणक झाला; यामुळें तेहि सावध होऊन हिंदु समाजाकडून होणारें हें शुद्धीचें आक्रमण थांबविण्यासाठीं सुधारून वाढविलेले प्रयत्न करणारच. त्याला हिंदुसमाज पुरून उरला, तर त्याच्या जागृतीचा खरा उपयोग.

उत्तरेकडील संकट आर्यसमाजानें व मालवीयजींच्या हिंदुमहासभेनें थोपविलें, इतकेंच नव्हे तर परधर्मीयांस संकट वाटण्याइतकें तिकडे कार्य झालें. जुलमानें मुसलमान झालेले पण हिंदु संस्कृतीच्या व परंपरेच्या खुणा ज्यांनीं अद्यापिहि जिवंत ठेवल्या असे मलकाना रजपूतांसारखे समाज हजारांनीं परत स्वधर्मीत आले. दक्षिणेकडे मात्र धर्मांतराच्या संकटांत सांपडलेले अशा तऱ्हेचे अनेक समाज असतांहि त्यांना हात घालण्याचा हिंदु समाजाचा प्रयत्न अद्यापि तितका यशस्वी झाला नव्हता. झाले ते प्रयत्न किरकोळ पुष्कळ झाले. गोव्याकडे व वसईकडे अंतरंगानें व संस्कृतीनेंहि पूर्ण हिंदू पण जुलुमाचा रामराम ह्मणून अपरिहार्यतेनें ख्रिश्चन राहिलेले हजारों ख्रिश्चन आहेत. त्यांना शुद्ध केलें पाहिजे अशी वाटाघाट सुरू होती; पण प्रत्यक्ष त्या कार्यास कोणीकडून कसा हात घालावा हें सांगून तें करून दाखविण्यास कोणी पुढें आलें नव्हतें. विशेषतः गोव्यासारख्या कडवट ख्रिश्चनांच्या सत्तेखालीं असलेल्या भागांत या कार्याला तोंड कसें लागणार या विवंचनेंत हिंदुसभेचे कार्यकर्ते होते. खुद्द गोमांतकांतील हिंदु कार्यकर्तेहि याचा विचार करीत होते. बाटविलेले लोक हिंदु व्हावयास तयार होते; पण एकेकटे शुद्धिकरण करून घेण्यास भीत होते. एकदम मोठ्या प्रमाणांत शुद्धिकरण करणें हा या स्थितींतून बाहेर पडण्याचा मार्ग होता आणि त्याची सिद्धता गोव्यासारख्या ख्रिश्चन सत्तेखालीं व ख्रिश्चनांच्या वर्चस्वाखालीं असलेल्या प्रांतांत करणें बिकट व धाडसाचेंच होतें.

पण रामदासांच्या शिकवणीचा प्रसार करणारे एक महंत व त्यांचे शिष्य हे प्रसंगोचित धारिष्ट करण्यास तयार झाले. त्यांनीं या बिकट परिस्थितींतून मार्ग काढून तेथील लोकांचीं मनें तयार करून शुद्धिसमारंभाची भूमिका तयार केली आणि या प्रयत्नास फळ येऊन गेल्या ता० २६ रोजीं नव्या गोमांतकांत चिंबल मुक्कामीं पहिल्याच सत्रांत सुमारें एक हजार गावडे ख्रिस्ती लोकांचा शुद्धीकरणविधि श्री. विनायक महाराज मसूरकर यांचे शिष्य श्री. आनंदमूर्ति यांनीं केला. या समारंभास गोमांतकांतील सर्व हिंदु संस्थांचे प्रमुख, सुशिक्षित, शास्त्री, पंडित, व्यापारी, जमीनदार इ० मंडळी जमलेली होती; आणि ज्यांना येतां आलें नाहीं त्यांनीं संमतिदर्शक पत्रें पाठविलीं होतीं. त्याच दिवशीं कुर्के येथेंहि अशीच आणखी ४०० गावडे लोकांची शुद्धि करण्यांत आली. त्यानंतर अशाच गढ्यानें एकामागून एक शुद्धिकरण चालू असून आतांपर्यंत ही संख्या १३०० इतकी झाली आहे. या वार्तेनें महाराष्ट्रांतील हिंदु समाजांत सर्वत्र एकच आनंदी-आनंदाची उर्मि उसळावी व जिकडून तिकडून या अपूर्व शुद्धीकरणाचें अभिनंदन व्हावें यांत नवल नाहीं. हें कार्य तडीस जाईपर्यंत हिंदुमहाराष्ट्र त्याचा सर्वतोपरी पाठपुरावा करील अशी

आह्मांस आशा आहे. हें शुद्धीकरण झाल्यावर कांहीं ख्रिस्ती लोक त्याविरुद्ध कारवाई घडवून आणण्याकरितां गोव्याच्या गव्हर्नराकडे गेले होते; पण गोव्यांत अलीकडे धर्मस्वातंत्र्य जाहिर झालें असल्यानें या कार्यांत हात घालण्याचें गव्हर्नरांनीं नाकारिलें, असें कळतें व तसें असल्यास तो त्यांचा थोरपणाच होय.

ख्रिश्चनांचा विरोधाचा हा राजरस्ता अशा रीतीनें खुंटला असला तरी इतर अनेक अडचणी व संकटें दुसऱ्या रीतीनें शुद्धीकृतांवर, शुद्धि करणारांवर व हिंदुसमाजावर आणण्याची खटपट यापुढें त्यांचेकडून होणारच नाहीं, असें सांगतां येत नाहीं. त्याला तोंड देण्यासाठीं व हें कार्य परिपूर्ण होण्यासाठीं लागणारें सर्व प्रकारचें साहाय्य महाराष्ट्र देईल अशी आह्मांस आशा आहे. या कार्यासाठीं दोन प्रकारचें साह्य पाहिजे. एक सर्वत्र सभा भरून या कार्यास पाठिंबा देणें व दुसरें द्रव्यसहाय्य. पंधरावीस हजार गावडे लोक हिंदुधर्मांत आणावयाचे ह्मणजे त्यांच्या शिक्षणाची व त्यांच्यावर इतर ज्या कांहीं अडचणी येतील त्या दूर करण्याची व्यवस्था करणें अवश्य आहे. प्रत्यक्ष शुद्धीला खर्च थोडा लागतो; पण पुढील व्यवस्थेसाठीं पैशाची जरुरी अधिक लागते. यासाठीं शाब्दिक पाठिंबा देणाऱ्या हिंदूंच्या प्रत्येक सभेंतून या कार्यासाठीं निधि गोळा होऊन तो व्यवस्थापक ब्रह्मचर्याश्रम मसूर, जिल्हा सातारा, या पत्त्यावर पाठविला जावा. कोणी केसरी कार्यालयाकडे रक्कम पाठविल्यास आह्मी ती त्यांचेकडे धाडूं. मलकानाच्या शुद्धीकरणाच्या कार्यांत श्रद्धानंदांनीं एक लाखाची मागणी केली व लाला हंसराज यांनीं दीड लाख रुपये पुढें केले! तेहि त्या कार्यास पुरले नाहींत. या दृष्टीनें पाहतां महाराष्ट्रांतून या कामीं निदान पंधरावीस हजार रुपये तरी जमवून पाठविणें अवश्य आहे.

व्यक्तिशः शुद्धीकरण हें हिंदु समाजास नवीन असलें, तरी जातिशः शुद्धीकरण हें ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां हिंदु समाजास नवीन नाहीं. हिंदुस्थानांत आर्य अनार्य यांचा एक समाज झाला तो अनार्यांना जातिशः आर्यसमाज रचनेंत समाविष्ट करूनच झाला. आजहि जातिघटित हिंदु समाजांत जातिशः शुद्ध झालेल्यांची स्वतंत्र जात होत असल्यामुळें शुद्धीकरणानंतर त्यांना कोणत्या जातींत समाविष्ट करावें व कसें करावें, हा पुढचा जातीकरणाचा प्रश्नच रहात नाहीं. हिंदु धर्मांतून ख्रिश्चन व मुसलमानी धर्मांत गेल्यावरहि बऱ्याच हिंदूंनीं आपले जातीचे गट कायम ठेविले. ख्रिश्चन व मुसलमानी समाजांत आजहि कोठें कोठें जाती आढळतात, त्या यामुळेंच होत. व्यक्तीला शुद्ध केल्यावर संबंध तोडणें व नवे जोडणें या क्रिया आवश्यक ठरतात. पण जातिशः शुद्धीकरणांत संबंधांचें जाळेंच्या जाळेंच बाह्य धर्मांतून उठून हिंदु धर्मांत येतें, ह्मणून संबंध तोडावेहि लागत नाहींत. एखादीच व्यक्ति परधर्मांत आल्यावर कांहीं दिवस अस्थिर राहण्याचा संभव असतो, पण जात ही तावडतोब स्थिर होते. भ्रष्टीकरण हें पूर्वी व्यक्तिशः व जातिशःहि झालें; अर्थात त्याला प्रतिक्रियारूप शुद्धीकरण हेंहि व्यक्तिशः व जातिशः अशा दोनहि रीतींनीं व्हावयास पाहिजे. व्यक्तिहि एका धर्मांतून उचलून दुसऱ्या धर्मांत शुद्धीकरणानें नेऊन ठेवावी लागते; पण जातिशः शुद्धीकरणांत जातिहि पूर्वीच्याच जागीं स्थिर राहून तिच्या डोक्यावरील एका धर्माचें छत्र काढून दुसऱ्या धर्माचें छत्र तेथें आणिलें इतकाच फरक होतो. जाति ही बसल्या जागींच सुप्रतिष्ठित असते; व्यक्तिशः शुद्धीकरण हें करावयास सोपें, पण टिकावयास कठिण. उलट जातिशः शुद्धीकरण हें करावयास अवघड पण टिकविणें अगदीं सुलभ. असें

जातिशः शुद्धीकरण दक्षिणेकडे आतांपर्यंत झालें नव्हतें. म्हणूनच गोव्यांतील या शुद्धीकरणाची महती विशेष आहे. या शुद्धीकरणामुळें इतरहि अशाच संभवनीय व प्रयत्नसाध्य जातिशः शुद्धीकरणाकडे हिंदुसमाजाचें लक्ष अधिक लागेल व एका ठिकाणचा हा अनुभव दुसऱ्या ठिकाणीं उपयोगी पडल्याखेरीज राहणार नाहीं.

गोव्यांत घडलेलें हें शुद्धीकरण महाराष्ट्रीय हिंदूंचेंच आहे. गावडे लोक हे महाराष्ट्रांतील मलकानाच होत. हे गावडे नव्या गोमांतकांत चिंबल, करमळी, तागांव, कुर्क, कालापूर इ० गांवांत पसरलेले असून, जन्म, लग्न व मरण या वेळच्या तीन संस्कारांखेरीज त्यांच्यांत खिस्तिपणा असा कांहींच नसून बाकीच्या प्रसंगीं ते आचारविचारांत पूर्ण श्रद्धाळू हिंदूच होते. चार शतकें त्यांनीं आपला हा हिंदुधर्म, हिंदु चालीरीती, हिंदु आचार व हिंदु पोशाखहि कायम ठेवला. ते परसंस्कृत हिंदूच होते; ते आतां स्वसंस्कृत हिंदु होत आहेत. चारशें वर्षांपूर्वी तरवारीच्या जोरावर खिस्त्यांनीं बळकाविलेला प्रांत इतक्या दिवसांनंतर व तोहि शांततेनें हिंदूंनीं आक्रमिला. या गावडे लोकांची वस्ती सुमारें १५–२० हजार आहे व ते सर्वच्या सर्व शक्य तितक्या त्वरेनें शुद्ध झाले पाहिजेत आणि त्यांच्या संस्कारांची, शिक्षणाची इ० व्यवस्थाहि झाली पाहिजे. गोमांतकांतील हिंदु तर या कार्यास सिद्ध आहेतच, पण सर्व महाराष्ट्रांतील हिंदूंनीं हें कार्य आपलें आहे व तें तडीस नेण्याचा बोजा आपल्यावर आहे, हें ओळखिलें पाहिजे. महाराष्ट्राचा एक महत्वाचा भाग निजामशाहींत मुसलमानी अमलांत अडकला आहे. हा दुसरा भाग पोर्तुगीजांच्या अमलाखालीं सांपडला आहे आणि इंग्रजांच्या सत्तेखालीं असलेला भागहि वऱ्हाड मध्यप्रांत व मुंबई इलाखा या चिरफाडीच्या प्रांतरचनेंत दुभंगला गेला आहे. राजकीय दृष्ट्या जरी अशा रीतीनें विभागणी झाली असली तरी भाषा, धर्म व संस्कृति या दृष्टीनें तो एक व अखंड आहे; आणि एका देहाच्या कोणत्याहि अवयवाचे सुखदुःखभोग जसे एका जीवालाच पावतात तसेच हे विभाग चळवळीच्या व संवेदनेच्या दृष्टीनें तर संलग्नच असावयास पाहिजेत.

श्रीसमर्थांनीं शिवाजीमहाराजांच्या स्वराज्य संस्थापनेच्या प्रयत्नाचे वेळीं प्रसंग ओळखून 'मराठा तितुका मेळवावा' अशी घोषणा केली. मुसलमानांच्या हातून मराठ्यांनीं महाराष्ट्र सोडविल्यावर त्यांनीं बाहेर स्वाऱ्या सुरू केल्या. त्या स्वाऱ्यांचे वेळींच 'हिंदु तितुका मेळवावा' या धर्मकरणाची जोड मिळावयास पाहिजे होती. त्याबरोबरच त्या वेळीं शुद्धीच्या संजीवनीची जोड दिली गेली असती तर काय काय झालें असतें, हा विचार आतां निरर्थक असला तरी इतिहास वाचतांना तो मनांत डोकावून चित्ताला चटका लाविल्याखेरीज रहात नाहीं; तरी पण आजच्या काळांत उशिरा कां होईना समर्थांच्या शिकवणीनें व स्फूर्तीनेंच हें हिंदूंच्या मेळाव्याचें कार्य होत आहे, हें पाहून कोणास आनंद होणार नाहीं? त्याचप्रमाणें स्वामी श्रद्धानंद व महाराष्ट्रांतील आद्य हिंदु मिशनरी गजाननराव वैद्यहि हा प्रसंग पहाण्यास जगले असते तर त्यांना आपल्या कार्याची परिणति पाहून केवढा आनंद वाटला असता, हीहि कल्पना यावेळीं मनांत सहाजिकच येते. थोर पुरुषांची व कार्यकर्त्यांची स्मृति जागृत करणारी अशी ही घटना आहे, तशीच ती भावी कालासंबंधीं निरनिराळ्या आशाहि उत्पन्न करणारी आहे. या शुद्धीकरणांत तत्कालीन राजकारण नाहीं हें खरें. पण विचारांची धांव या प्रसंगावरून परंपरेनें राजकारणाला

जाऊन मिळते हेंहि तितकेंच खरें आहे. हिंदुस्थान जर स्वतंत्र व्हावयाचें तर ब्रिटिश मुलूख, संस्थानें यांच्याप्रमाणेंच पोर्तुगीज व फ्रेंच यांच्या ताब्यांत असलेल्या प्रदेशांचा विचारहि त्यांत अवश्यमेव येतो, आणि भाषावार प्रांतरचना करावयाची तर या पैकीं कोणता भाग कोणत्या प्रांतांत समाविष्ट केला जाणार हाहि विचार मनांत उद्भवून स्वतंत्र हिंदुस्थानांतील स्वतंत्र महाराष्ट्र प्रांतांत गोमांतकाचा अवश्य अंतर्भाव केला पाहिजे असेंच ह्मणावें लागतें; आणि ह्या अंतिम ध्येयाचे धागे आजच्या व्यवहारांतहि येतात. ते जोडावयाचे ह्मणजे गोमांतकाला महाराष्ट्रीय चळवळींत, हिंदू चळवळींत आणि राष्ट्रीय चळवळींतहि हक्काचें प्रतिनिधित्व द्यावयास नको काय?

राष्ट्रांतील तीन धर्मांपैकीं दोन धर्मांचे दरवाजे खुले व एकाचे बंद असण्यानें खऱ्या धर्म-स्वातंत्र्यास बाध येऊन धर्मदृष्ट्या कृत्रिम व घोटाळ्याची परिस्थिति उत्पन्न होते. ती या शुद्धि-चळवळीनें नाहींशी केली व धार्मिक बाबतींत हिंदुस्थानांत खऱ्या स्वयंनिर्णयाचा मार्ग मोकळा केला. धार्मिक स्वयंनिर्णयाच्या दृष्टीनें राष्ट्रीय व राजकीय अशा भूमिकेवरहि शुद्धीचें महत्त्व आहे. आज तें कोणास दिसत नसलें अगर पटत नसलें तरी कालांतरानें तें पटल्याखेरीज रहाणार नाहीं, असा आह्मांस भरंवसा आहे. कृत्रिम अडचणींनीं मनांतून एक धर्म तर नांवानें दुसराच धर्म, अशा अर्धवट स्थितींत समाजाचा कोणताहि भाग असणें ही राष्ट्रीय व सामाजिक दृष्ट्याहि चांगली गोष्ट मानितां येणार नाहीं. ह्मणूनच गोमांतकांतील गावड्यांचें संघशः शुद्धीकरण हें धार्मिक, प्रांतिक व राष्ट्रीय अशा सर्व दृष्टींनीं महत्त्वाचें व हितकारक असल्यामुळें त्या कार्यास सर्व बाजूंनीं पाठिंबा मिळून तें त्वरित व पूर्णपणें तडीस जाईल अशी आह्मीं उमेद बाळगितों.

---

# गोव्यांतील पोर्तुगीजांचा धर्मप्रसार.

( ले.—श्री. रामकृष्ण गोपाळ भिडे )

मसूर ब्रह्मचर्याश्रमांतील उत्साही कार्यकर्ते श्री. आनंदमूर्ती यांनीं गोवें प्रांतांत सुमारें ४०० वर्षांपर्यंत बंद झालेलीं हिंदु धर्मांचीं द्वारें खुलीं करून गेल्या आठवड्यांत हजारों पूर्व हिंदूंना पुनरपि स्वधर्मांत अधिष्ठित केलें. या वार्तेनें प्रत्येक हिंदुधर्माभिमान्याचें अंतःकरण आनंदानें उचंबळून आल्याखेरीज राहणार नाहीं. बाह्यतः परधर्माचा डाग लागला असला तरी इतक्या दीर्घ कालांतहि तेथील शुद्धीकृतांनीं आज तागायत् आपलीं अंतःकरणें हिंदुधर्माच्या अभिमानानें सारखीं प्रज्वलित ठेविलीं होतीं, ही एकच गोष्ट त्याबद्दल आदर उत्पन्न करण्यास पुरेशी आहे.

तलवारीच्या धारेवर धर्मप्रसार व त्याजबरोबर राज्यप्रसार करण्याच्या तत्त्वाचा आद्यजनक इस्लाम धर्मानुयायी हसन-बिन-सुब्बाह हा असून त्याच्या अनुयायांनीं एका काळीं जगभर गोंधळ माजविला होता, ही गोष्ट इतिहासज्ञांस परिचित आहे. खड्गाचें सहाय्य घेण्याचा मूळ उपक्रम इस्लामियांनीं केला व त्यानंतर कांहीं कालानें ख्रिस्तिलोकांनींहि त्याच तत्त्वांचा अंगिकार केला. युरोपांत प्रॉटेस्टंटांचा झालेला अमानुष छळ त्यांचीं तीं इन्क्विझिशन कोर्टें वगैरे आंगावर शहारे आणणारे अघोरप्रकार सर्वश्रुत असेच आहेत. या हत्यारी पंथाचा—मुसलमान व ख्रिस्ती—सर्वच इतिहास अत्यंत भीषण व रोमांचकारी कथांनीं भरलेला आहे. तथापि प्रस्तुतच्या लेखांत त्यांचा परामर्ष न घेतां गोवें प्रांतांत धर्मप्रसार करतांना ख्रिस्त्यांनीं कायकाय प्रकार केले,

शुश्रूषा करूं लागला, व भीक मागून आपला चरितार्थ चालवूं लागला; परंतु या मार्गानें आपला इष्ट हेतु सफल होईल असें त्याला दिसेना. तेव्हां त्यानें गोव्याचा बिशप डॉन-जॉनन्द आल्बुकर्क यांस आपलीं अधिकारपत्रें दाखविलीं; त्याची मदत मागितली व उपदेश करण्यास सुरुवात केली; परंतु देशी भाषा त्याला येत नव्हती. म्हणून तो काय बडबड करी हें लोकांस समजत नसे. तेव्हां त्यानें हिंदुस्थानी ( मराठी ) भाषेच्या अभ्यासाला सुरुवात केली. त्याबरोबर त्यानें एक ख्रिस्ती कॉलेजहि काढलें व त्यावेळीं त्यानें आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. त्यानें तेथें अनेक शाळाहि घातल्या; परंतु द्रव्याखेरीज त्या चालणार कशा ? तेव्हां त्यानें सरकारी सैन्याच्या मदतीनें गोव्या भोंवतालच्या सर्व हिंदु देवालयांचा विध्वंस करून तेथील अपरंपार संपत्ति या नव्या शिक्षण संस्थांकडे लावली ! फ्रॉन्सिस झेवियर यानें तेथें जो धर्म प्रसार केला तो सर्वस्वी सैन्य-बलावर केला. हिंदु धर्ममंदिरांचा उच्छेद करणें, मूर्तीचें भंजन करणें, त्याच मंदिरांत ख्रिस्ताच्या क्रूसाची स्थापना करणें व त्याच्या शेजारीं तरुणांना शिक्षण देण्यासाठीं इमारत उठविणें हा त्याचा क्रम होता. यानंतर त्यानें आपल्या मदतीसाठीं पोर्तुगालहून आणखी मिशनरी मागविले. ते येतांच पोर्तुगीज अंमल जेथें होता त्या ठिकाणीं तद्देशीय मिशनरी तयार करण्यासाठीं मठ स्थापन करण्यांत आले. तद्देशीय म्हणजे गोव्यांतीलच लोक, पण ते ख्रिस्ती मिशनरी होणार कसे ? या कामीं झेवियरनें लष्करी सामर्थ्यच उपयोगांत आणिलें. गोवें प्रांतांतील घरंदाज अशा १२० घराण्यांतील तरुणांना सैन्यबलावर घरांतून ओढून त्यांना मिशनरी बनविण्यासाठीं पोर्तुगालहून नव्यानें आलेल्या धर्मोपदेशकांच्या स्वाधीन करण्यांत आलें.

परंतु अशा रीतीनें त्यांना सक्तीनें ख्रिस्ती धर्मांत घेतलें गेलें तरी ख्रिस्ती धर्माला त्यांना पचवितां येईना. ते तोंडानें मिशनरी सांगत ते शब्द उच्चारीत परंतु त्यांच्या चालीं आचार-विचार मूळचेच कायम राहिले; व पोर्तुगीज पाद्री त्या गांवाहून दुसरीकडे गेला कीं त्या गांवचे ब्राह्मण त्यांना पुन्हः हिंदु करून घेत. ( गोवें प्रांतांत बाटलेल्यांना परत स्वधर्मांत घेतले जात नसे, असें सांगण्यांत येतें, परंतु इतिहासकार थिओडोर ग्रीसिंगर तर असें ह्मणतो कीं,—

"It so happened that the native priests, the Brahmins, had not the least difficulty in bringing the people back again to the religion in which they had been born and bred."—p. 91.

ब्राह्मण वर्गानें अशा प्रकारें उलट आक्रमण करण्यास सुरुवात केल्याचें पाहून झेविअरचा मित्र ॲन्टोन क्रिमिनल यानें ब्राह्मणांचा मनस्वी छळ केला. तेव्हां ब्राह्मणवर्गानें इतर हिंदुधर्मीय राजांना आपणांस या संकटांतून सोडवा, अशी परोपरीनें प्रार्थना केली; परंतु 'मला काय त्याचें ?' हीच वृत्ति तेथेंहि आड आली. क्रिमिनल यानें आपल्या अनुयायांच्या मदतीनें ब्राह्मणांचा संहार करण्याचा सपाटा सुरू केला व अशा ह्या संधीचा फायदा घेऊन झेविअर यानेंहि स्पेनमधील इन्क्विझिशन कोर्टच्या धर्तीवर गोवा येथें एक कोर्ट उघडलें व इतर स्वतंत्र हिंदुधर्मीय राजांनीं असाह्य स्थितींत सोडलेल्या तेथील प्रजेची गांजणूक सुरू झाली. मिशनऱ्यांच्या मदतीला पोर्तुगीज सैन्य, तर उलट प्रतिपक्षी निर्बल, अशा स्थितींत तेथील लोकांवर कसे अत्याचार व जुलूम झाले असतील याची कल्पना करतां येण्याजोगी आहे. जो कोणी बाटलेला वा बाटविलेला हिंदु

लोकांचा कसा भयंकर छळ केला, याचा इतिहास थोडक्यांत देण्याचें योजिलें आहे. प्रसिद्ध इतिहासकार थिओडोर ग्रीसिंगर यांनीं ' जेसुइट लोकांचा इतिहास ' म्हणून एक उत्तम ग्रंथ लिहिला असून त्यांत त्यांचीं सर्व कृत्यें नमूद केलीं आहेत, व प्रस्तुतचा लेख बव्हंशीं त्याच पुस्तकाच्या आधारें लिहिला आहे.

या हत्यारी पंथाचा इस्लामीजनक ज्याप्रमाणें उम्मर खलिफाचा सहाध्यायी हसन-बिन-सुब्बाह त्याचप्रमाणें खिस्ती धर्मांतील या पंथाचा जनक इग्नेशस् लॉयोला हा स्पॅनिश सरदार होय.

यानें खिस्ती धर्मप्रसारासाठीं ' सोसायटी ऑफ् जीजस् वॅारियर्स ' नांवाचा स्वतंत्र वर्ग निर्माण केला. त्याचे सर्व अनुयायी कृष्णवर्ण वस्त्रें परिधान करीत. याच सुमारास ल्यूथरनें धर्मसुधारणेचें कार्य हातीं घेतलें होतें व लोकसमाजाचा ओघ त्याजकडे वळूंहि लागला होता. अशा वेळीं कोणा तरी बलिष्ठाच्या सहाय्याची अपेक्षा तिसरा पोपपॉल यास उत्पन्न होऊन त्यानें इग्नेशस् याला सहाय्यार्थ बोलाविलें व त्यानें तें काम आनंदानें पत्करलें.

यावेळीं पोर्तुगालवर तिसरा जॉनराजा राज्य करीत होता. यापूर्वीच पोर्तुगीजांचा अम्मल गोव्यासुद्धां सर्व मलबार किनारा, सिलोन, मालाका, व सुंदा या बेटांवर अल्फान्सो आल्बुकर्क या पोर्तुगीज वीरानें बसविला होता. वास्को-द-गामा हा केप ऑफ गुडहोप मार्गें ज्यावेळीं हिंदुस्तानांत आला त्यावेळीं त्याला कांहीं ठिकाणीं खिस्तीपंथानुयायी लोक दिसले, असें म्हणतात. परंतु पोर्तुगीज राष्ट्र हें अस्सल रोमन कॅथॉलिक संप्रदायाचें असल्यानें ज्या ज्या प्रांतावर आपला अंमल आहे त्याठिकाणीं एकजात अस्सल कॅथॉलिक धर्मच नांदला पाहिजे, नास्तिक मताचा उच्छेद केला पाहिजे, अशी धर्मवेडेपणाची भावना पोर्तुगीज राजा जॉन याच्या अंतःकरणांत खेळत असल्यानें, आपण ज्या धर्मापुढें मान लववितों त्या धर्मापुढेंच आपल्या नवसंपादित प्रजाजनांनीं माना लवविल्या सेरीज ते ' पोर्तुगालचे सत्प्रजाजन ' होणार नाहींत, असें वाटलें व त्याचवेळीं म्हणजे स. १५४० च्या सुमारास इग्नेशस् लायोला यानें स्थापिलेल्या खिस्ती धर्मवीराच्या पंथाचीहि माहिती त्याला लागली व त्यानें इग्नेशस् यास *आपल्या सहाय्यार्थ येण्याबद्दल प्रार्थना केली. मूर्तिपूजकांना खिस्ती करणें हा तर या पंथाचा* मुख्य हेतूच असल्यानें इग्नेशस् यानें आपले दोन सच्छिष्य रॉड्रिग्ज व फ्रॅान्सिस् झेवियर यांना लिस्बनकडे रवाना केलें. त्याच्या धर्माभिमानानें जॉन राजा अत्यंत खूष झाला व त्यानें फ्रॅान्सिस् झेवियर याला हिंदुस्तानाकडे जाण्यास परवानगी दिली. झेवियर याला पोप महाराजांकडूनहि अधिकारपत्रें मिळालीं होतीं. त्या अधिकारपत्रानें झेवियर याला अखिल हिंदुस्तानांतील पोपचा प्रतिनिधि नेमला असून सर्व नास्तिकांना खिस्ती करून घेण्याचा अधिकार देण्यांत आला होता. यासेरीज आशिया खंडांत पोर्तुगीजांचा जेथें जेथें अंमल होता तेथील अधिकाऱ्यांनीं त्यांस हरएक प्रकारें मदत करावी असा स्पष्ट निर्देश अधिकारपत्रांत असून, जॉन राजानें फ्रॅान्सिस झेवियरची सर्व राजेरजवाड्यांस शिफारस केली होती. अशा तयारीनें ता. ७ एप्रील १५४१ रोजीं झेवियर हिंदुस्तानांत येण्यास निघाला, व गोवें प्रांतांत ता. ६ मे १५४२ रोजीं येऊन पोहोंचला.

गोवें प्रांतांत पाऊल टाकल्याबरोबर त्यानें आपल्या कार्यास सुरुवात केली. येथें येतांच त्यानें आपलें राजैश्वर्य बाजूस ठेविलें व एकाद्या सामान्य माणसाप्रमाणें तो दवाखान्यांत गरिबांची

शुश्रूषा करूं लागला, व भीक मागून आपला चरितार्थ चालवूं लागला; परंतु या मार्गानें आपला इष्ट हेतु सफल होईल असें त्याला दिसेना. तेव्हां त्यानें गोव्याचा बिशप डॉन-जॉनन्द आल्बुकर्क यांस आपलीं अधिकारपत्रें दाखविलीं; त्याची मदत मागितली व उपदेश करण्यास सुरुवात केली; परंतु देशी भाषा त्याला येत नव्हती. म्हणून तो काय बडबड करी हें लोकांस समजत नसे. तेव्हां त्यानें हिंदुस्थानी (मराठी) भाषेच्या अभ्यासाला सुरुवात केली. त्याबरोबर त्यानें एक खिस्ती कॉलेजहि काढलें व त्यावेळीं त्यानें आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. त्यानें तेथें अनेक शाळाहि घातल्या; परंतु द्रव्याखेरीज त्या चालणार कशा? तेव्हां त्यानें सरकारी सैन्याच्या मदतीनें गोव्या भोंवतालच्या सर्व हिंदु देवालयांचा विध्वंस करून तेथील अपरंपार संपत्ति या नव्या शिक्षण-संस्थांकडे लावली! फॉन्सिस झेवियर यानें तेथें जो धर्म प्रसार केला तो सर्वस्वी सैन्य-बळावर केला. हिंदु धर्ममंदिरांचा उच्छेद करणें, मूर्तीचें भंजन करणें, त्याच मंदिरांत ख्रिस्ताच्या क्रूसाची स्थापना करणें व त्याच्या शेजारीं तरुणांना शिक्षण देण्यासाठीं इमारत उठविणें हा याचा क्रम होता. यानंतर त्यानें आपल्या मदतीसाठीं पोर्तुगालहून आणखी मिशनरी मागविले. ते येतांच पोर्तुगीज अंमल जेथें होता त्या ठिकाणीं तद्देशीय मिशनरी तयार करण्यासाठीं मठ स्थापन करण्यांत आले. तद्देशीय म्हणजे गोव्यांतीलच लोक, पण ते खिस्ती मिशनरी होणार कसे? या कामीं झेवियरनें लष्करी सामर्थ्यच उपयोगांत आणिलें. गोवें प्रांतांतील घरंदाज अशा १२० घराण्यांतील तरुणांना सैन्यबळावर घरांतून ओढून त्यांना मिशनरी बनविण्यासाठीं पोर्तुगालहून नव्यानें आलेल्या धर्मोपदेशकांच्या स्वाधीन करण्यांत आलें.

परंतु अशा रीतीनें त्यांना सक्तीनें खिस्ती धर्मांत घेतलें गेलें तरी खिस्ती धर्माला त्यांना पचवितां येईना. ते तोंडानें मिशनरी सांगत ते शब्द उच्चारीत परंतु त्यांच्या चालीं आचार-विचार मूळचेच कायम राहिले; व पोर्तुगीज पाद्री त्या गांवाहून दुसरीकडे गेला कीं त्या गांवचे ब्राह्मण त्यांना पुन्हः हिंदु करून घेत. (गोवें प्रांतांत बाटलेल्यांना परत स्वधर्मांत घेतले जात नसे, असें सांगण्यांत येतें, परंतु इतिहासकार थिओडोर ग्रीसिंगर तर असें ह्मणतो कीं,—

"It so happened that the native priests, the Brahmins, had not the least difficulty in bringing the people back again to the religion in which they had been born and bred."—p. 91.

ब्राह्मण वर्गानें अशा प्रकारें उलट आक्रमण करण्यास सुरुवात केल्याचें पाहून झेविअरचा मित्र ॲन्टोन क्रिमिनल यानें ब्राह्मणांचा मनस्वी छळ केला. तेव्हां ब्राह्मणवर्गानें इतर हिंदुधर्मीय राजांना आपणांस या संकटांतून सोडवा, अशी परोपरीनें प्रार्थना केली; परंतु 'मला काय त्याचें?' हींच वृत्ति तेथेंहि आड आली. क्रिमिनल यानें आपल्या अनुयायांच्या मदतीनें ब्राह्मणांचा संहार करण्याचा सपाटा सुरू केला व अशा ह्या संधीचा फायदा घेऊन झेविअर यानेंहि स्पेनमधील इन्किझिशन कोर्टच्या धर्तीवर गोवा येथें एक कोर्ट उघडलें व इतर स्वतंत्र हिंदुधर्मीय राजांनीं असाह्य स्थितींत सोडलेल्या तेथील प्रजेची गांजणूक सुरू झाली. मिशनऱ्यांच्या मदतीला पोर्तुगीज सैन्य, तर उलट प्रतिपक्षी निर्बल, अशा स्थितींत तेथील लोकांवर कसे अत्याचार व जुलूम झाले असतील याची कल्पना करतां येण्याजोगी आहे. जो कोणी बाटलेला वा बाटविलेला हिंदु

फिरून मूर्तिपूजा करील अगर ख्रिस्ती धर्मप्रसारास अडथळा करील त्याला या कोर्टापुढें खेंचण्यांत येई. या रीतीनें असंख्य ब्राह्मणांवर व विशेषतः त्यांतील जे धनवान् होते त्यांजवर पहिल्यांदा दृष्टि फिरून त्यांचे अमानुषपणें वध करण्यांत आले. कित्येकांची मत्ता फुकटांत सांपडावी ह्मणून त्यांना हद्दपार करण्यांत आलें व त्यांची इस्टेट ख्रिस्ती सोसायटीला धर्मप्रसारार्थ देण्यांत आली. एखाद्या इसमानें ख्रिस्ती होण्याचें नाकारतांच मंदाग्नीवर हळूहळू भाजून त्याचे प्राण घेण्यांत येत. नित्य असे शेंकडों प्रकार होऊं लागल्यानें हिंदु लोक भीतीनें गर्भगळीत झाले व त्यानंतर गोव्यांत धर्मप्रसाराचें काम झेविअरला बरेंच सुकर होऊं लागलें. लोकांच्या कत्तली करून त्यांना लुटून जी अलोट संपत्ति त्यानें कमाविली तिच्या बळावर गोवें प्रांतांत मोठमोठीं कॉलेजें त्यानें उठवून दिलीं व हिंदु मंदिरांचा विध्वंस करून त्या जागीं व त्या खेरीजहि इतरत्र कित्येक ख्रिस्ती मंदिरें त्यानें बांधलीं.

गोवें प्रांतांत अशा रीतीनें कृतकार्य झाल्यावर झेविअर हा ख्रिस्तीधर्म प्रसारार्थ चीन, जपान या देशांकडे गेला व तिकडेच डिसेंबर स० १५५२ सालीं वयाच्या ४६ व्या वर्षी ख्रिस्तवासी झाला. झेविअर यानें आपल्या अवघ्या दहा वर्षांच्या कारकीर्दींत इतकें प्रचंड धर्मप्रसाराचें कार्य करून ठेवलें होतें, कीं, त्यायोगें ख्रिस्ती मिशनऱ्यांचा मार्ग अगदीं बिनधोक असा झाला होता. अर्थात् झेविअरच्या मृत्यूनंतर जेसुईट लोकांनीं जिहादाचा उघडा मार्ग सोडून अन्य मार्ग धरला. विदेशी ख्रिस्ती मिशनरी आपल्या मूळ वेषांत जाऊन लोकांस उपदेश करूं लागले ह्मणजे लोक बिचकतात असा त्यांस अनुभव होता. ह्मणून आपल्या वेषांत परिवर्तन करून ते अस्सल ब्राह्मणाप्रमाणें वेष परिधान करूं लागले. हिंदुलोक बाटले तरी त्यांच्यावर बाप्तिस्माचें फक्त पाणी शिंपडण्यापलिकडे फारसा उपयोग होत नाहीं, असाहि त्यांस अनुभव आला. तेव्हां त्यांनीं असा युक्तिवाद सुरु केला कीं, ख्रिस्तीधर्म स्वीकारल्यावर ख्रिस्ती नांवच धारण केलें पाहिजे, असेंहि नाहीं व आपल्या चालीरीतीहि कायम ठेवल्या तरी हरकत नाहीं. पेटर कॉन्स्टॅंटिनो बेस्त्री नांवाचा मिशनरी तर संस्कृत शिकला. ब्राह्मणाप्रमाणें वागूं लागला; लोक तर त्यास साधू साधू ह्मणूं लागले. मोठमोठ्या उच्च प्रतीच्या लोकांत तो वागूं लागला. परंतु अंतरंगानें तो पूर्ण जेसुइट होता व त्याचे इतर मदतनीस हें पूर्ण जाणूनहि होते; परंतु भोळ्या लोकांना त्याचा कावा उमगला नाहीं. याचाच दुसरा जोडीदार पेटर बार्थेलेमी ह्मणून होता. तो वरील प्रमाणें उच्च प्रतीच्या लोकांत न मिसळतां अगदीं खालच्या प्रतीच्या लोकांत मिसळे. त्यांजबरोबर आहारविहार करी. वेश्यावर्गांत त्याचें जाणें येणें फार असे. ख्रिस्तीधर्मात देहविक्रय करून द्रव्य मिळवूं नये असें सांगितलें आहे, तेव्हां आह्मांला ख्रिस्ती कसें होतां येईल? असें त्या ह्मणत. त्यावर बार्थेलेमी ह्मणे, "अः त्यांत काय आहे? व्यवसाय कायम ठेवूनहि तुह्मांस ख्रिस्ती होतां येईल. त्या धंद्यापासून मिळणाऱ्या द्रव्यांतील बराचसा भाग ख्रिस्ताच्या नांवानें धर्म करा व तुमच्या मोहजालांत सांपडतील त्यांना ख्रिस्ती धर्मांत घ्या ह्मणजे झालें." वरील हकीकतीवरून गोवें प्रांतांत पोर्तुगीज ख्रिस्त्यांनीं धर्मप्रसार कसकसा व कोणत्या मार्गांनीं केला याची स्थूल कल्पना वाचकांस येईल. अशा प्रकारें जुलूम, जबरदस्ती, मोह, फसवणूक या मार्गांनीं परधर्मांत गेलेल्या आपल्याच रक्तमांसाच्या व संस्कृतीच्या लोकांस पुनः आपल्या धर्मांत व तेंहि राजीखुषीनें घेणें हें कोणाचेंहि कर्तव्यच ठरेल. ह्मणूनच गोवें प्रांतांत जें अपूर्व शुद्धिकार्य झालें, तें अत्यंत अभिनंदनीय होय.

# ख्रिश्चनांचे प्रयत्न कसे सिद्धीस जातात.

( ले.—चिदानन्द संन्यासी, कार्यवाह अखिल भारतीय-शुद्धिसभा, दिल्ली. )

पूर्वीपेक्षां खिस्ती लोकांचें धर्मप्रसाराचें कार्य किती ढिलें पडत चाललें आहे, हें सर्व लोक जाणूनच आहेत; आणि बहुतेक लोक त्याबद्दल तिरस्कार व्यक्त करीत आहेत. इतकेंच नव्हे तर कित्येक वैज्ञानिक विद्वान् ईश्वरद्रोही आणि नास्तिक बनत चालले आहेत; पण इतकें जरी असलें तरी श्रद्धावान् व प्रेमळ भक्त जे आहेत, त्यांच्या अंतःकरणांतून अजूनपर्यंत या ख्रिश्चन धर्माविषयीं खरोखर आदर व मान आहे व ते आपल्या धर्माकरितां तन, मन व धन यांचें अर्पण करून, प्राणार्पण करण्यासुद्धां सिद्ध आहेत. इतर देश सोडून फक्त हिंदुस्थानांत ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या जवळ जवळ सातशें (७००) संस्था आपलीं प्रचारकार्यें करीत आहेत. तर आपल्यांतील सज्जन व विद्वान् लोकसुद्धां ह्या कामासाठीं त्यांच्या या कार्याला दरवर्षी हिंदुस्थानांत राहणाऱ्या पाद्र्यांना कोटीच्यावर रुपये आपल्याजवळून काढून त्यांना देत आहेत! आतां नुकतेंच एका ख्रिश्चन मिशनरी संस्थेचें वार्षिक प्रतिवृत्त (रिपोर्ट) प्रसिद्ध झाला आहे. त्यांत भारतवासी पाद्री लोकांस बाहेरील ख्रिश्चनांनीं या वर्षी किती मदत केली आहे, याचें चित्र आंकड्यांसुद्धां त्या प्रतिवृत्तांत प्रसिद्ध केलें आहे. त्याचें टिपण सविस्तर खालीं देत आहों. इंग्लंडनें (ब्रिटानिया) २७६९९३५२ पौंड, अमेरीकेनें ९७३६०८४ पौंड, स्वीडन, नार्वे, आणि स्विझर्लंड यांनीं मिळून ७८०९२० पौंड, कानडा देशानें ७२२०९४ पौंड आणि जर्मनीनें ६३९५ पौंड, याप्रमाणें वरील देशांनीं मिळून एकंदर ३८९४४८४६ पौंड दरवर्षी या भारतवर्षांत हिंदूंना खिस्तीधर्मांत घेण्यासाठीं येथील पाद्री लोकांकडे दान स्वरूपानें येत आहेत.

आर्थिक मदतीची रूपरेखा वर आहेच, पण ह्यांचें आर्थिक मदतीपेक्षां प्रचारकार्य किती विस्तृत आहे, याची माहिती ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या संस्थेच्या प्रतिवृत्तावरून आढळून येईलच. त्या प्रतिवृत्तांत त्यांचें प्रचारकार्य किती विस्तृत आहे याची रूपरेखा दिली आहे. ती येणेंप्रमाणें:—७२१८ प्रचार करणारे, २१३१ युरोपियन पुरुष, १४८१ युरोपियन विवाहित स्त्रिया, त्याचप्रमाणें २४०८ अविवाहित मुली असून त्यांचे या भारत वर्षांत प्रचार करण्याचें काम अव्याहत चालू आहेच. तें येणेंप्रमाणें:—ख्रिस्ती धर्माचें शिक्षण देऊन त्यांत उपदेशक निर्माण करणाऱ्या मिशनरी संस्था ६१ असून १४१ अनाथालयें, १७० शिल्प विद्यालयें, ६१७ हायस्कूलें, १५८२० रविवारीं भरणाऱ्या शाळा (सन्डे स्कूल्स) ६५ चर्चला योग्य असे अधिकारी बनविणाऱ्या शाळा, ९८ शेतकीशाळा, ५० विश्वविद्यालयें (कॉलेज), ९४ टीचर ट्रेनिंग स्कूल्स (विद्यार्थ्यांस शिक्षक बनविणाऱ्या शाळा) इतकें असूनसुद्धां ४२ छापखाने, ९९ धर्मप्रचाराचें कार्य करणारीं वृत्तपत्रें; ४०८ दवाखाने व डिस्पेन्सरी; १५९८ डॉक्टर व नर्सेस, ४८०५४ शिक्षक, ५०२१२६ विद्यालयांतील व शाळेंतील विद्यार्थी, ७८२९२४ गिर्जाघरांचे समासद आणि १८४३०७६ वार्षिक वर्गणी देणारे सभासद, या मिशन्सला मदत करतात.

हल्लीं नास्तिकपणाचें वातावरण चोहोंकडे पसरलें असूनसुद्धां त्यांचें आपल्या धर्मावर केवढें प्रेम आहे व त्याचप्रमाणें धर्मसंस्थापकांवर किती अढळ श्रद्धा आहे, हें वरील गोष्टीवरून दिसून येईलच.

शुद्धिसमाचाराच्या वाचकांस 'हें वरील प्रत्यक्ष प्रमाण 'प्रतिवृत्तावरून दिलेलें आहेच. तेव्हां त्यावरून अशा ढिलेपणाच्या काळांत सुद्धां त्यांचे किती सुसंघटित प्रयत्न चालले आहेत, हें वरील त्यांचे आंकडे वाचून कल्पना येईलच. यासाठीं हिंदुलोकांना त्यापासून सावध करण्याकरितां हा लेख लिहिला आहे. ह्यामुळें तरी आम्ही आमचे डोळे उघडून राहिलेल्या २३॥ कोटी बंधूंना सुसंघटित करण्याचा प्रयत्न करूं. ज्याप्रमाणें ख्रिश्चन आपल्या धर्मासाठीं प्राणार्पण करण्यास सिद्ध असतो व आपल्या हजारों धर्मोपदेशकांना धर्मप्रचारार्थ ५२३ कोट रुपये मदत रूपानें खर्चावयास देतो, त्याप्रमाणें जर हिंदु आपल्या धर्माकरितां तन, मन, धनांनीं तसेच प्राणार्पण करण्यास सिद्ध होऊन मदत करितील, तरच त्यांचा तरणोपाय होय!!

हिंदूनों! दूर देशांतील लोक येथें येऊन त्यांनीं आपला प्रयत्न सफल केला व आपण त्याकडे डोळे उघडून पहावें ही किती लज्जास्पद स्थिति होय? आपण आपल्या बंधूंना ते परधर्मांत गेले ह्मणून त्यांकडे तिरस्कृत दृष्टीनें पाहतों; पण त्यांना परत आपल्या उच्च आर्यसंस्कृतींत कसें येतां येईल, याविषयीं तिकडे दुर्लक्ष करतों. या कारणानें आपल्या आर्यसंस्कृतीचें किती नुकसान झालें याची यत्किंचितहि आपणांस कल्पना येत नाहीं. जर एकादा आपला बंधू अज्ञानानें परधर्मांत गेला, व त्यास हिंदुधर्मांत यावयाचें असेल तर आपल्या ' शुद्धिसभांना ' व इतर धर्मजागृतीच्या संस्थांना मदत, ' पैशानें, मनानें व शरीरानें ' करणें आपलें आद्यकर्तव्य होय.

या योगें परधर्मांत गेलेले आपले बंधू आपल्या आर्यधर्मांत ( सनातनी–धर्मांत. ) सहज येऊं शकतील व यामुळें आपल्या धर्माची उन्नतावस्था झाल्याशिवाय केव्हांहि राहणार नाहीं व ह्मणूनच तो उन्नत व्हावा अशी प्रत्येक हिंदुधर्माभिमान्याची इच्छा असेल तर त्यानें मोहनिद्रेचा त्याग करून आपलें पवित्र कर्तव्यकर्म पालन केलें पाहिजे.

---

## यशापयश.

( ले.—श्रीमंत रावराजे व्हायकाउंट काकाराव पेडणेंकर, पेडणें, गोंवा. )

वरील शब्द सापेक्ष आहेत. हे शब्द जेव्हां उच्चारले जातात, तेव्हां डोळ्यांसमोर आपलें साध्य, त्याची शक्याशक्यता व तन्निमित्त केलेल्या प्रयत्नांची योग्यायोग्यता यांचें चित्र उभें राहतें; आणि कृतीवरूनच साधारणपणें यशापयश ठरविण्यांत येतें. ' कृति तशी फलश्रुति ' हा वाक्प्रचार त्याचें गमक होय. ज्या मानानें व जशी कृति घडते त्या मानानें ती यशापयशाला कारणीभूत होते, ही गोष्ट अनुभवावरून प्रत्येकाला समजण्यासारखी आहे. आतां केव्हां केव्हां असेंहि होतें कीं, योग्य दिशेनें प्रयत्न ह्मणजे कृति करून देखील ना यश ना अपयश किंवा क्वचित् प्रसंगीं सपशेल अपयश पदरांत पडतें. याचें कारण आमच्या मतें कर्त्याचें प्राक्तन होय. जसे आमचे उद्योग तसें त्याचें फल, ही गोष्ट निर्विवाद मानली तरी पायाशुद्ध उद्योग करूनहि त्याचें फल पदरांत पडत नाहीं, असें पुष्कळदां होतें. याची संगति अशी लावतां येईल कीं, मनुष्याचें आयुष्य अल्प असल्यानें तेवढ्या तुटपुंज्या आयुर्मर्यादेंत त्याचे उद्योग पुरे होत नाहींत आणि ह्मणूनच यांचें फळ त्यास मिळत नाहीं. ते उद्योग पुरे करून त्याचें फळ अर्थात् यशापयश भोगण्या-

करतां त्या मनुष्याला पुनर्जन्म घ्यावा लागतो व तो पूर्वजन्मांत अपुरीं राहिलेलीं कामें या जन्मांत करीत असतो.

दुसरें, एक निकृष्टावस्थेंतील भूमि जिराइतास उपयोगी पडेल इतकी उत्कृष्टावस्थेंत आणावयाची तर खतमूत घाळून तिची मेहनत मशागत करण्यास निदान दोनतीन तरी वर्षें लागतील. त्याच न्यायानें लोभमोहादिकांच्या संस्कारांनीं निकस झालेल्या मनोभूमिकेस उच्च तत्त्वांचीं बीजें धारण पोषण करण्यास समर्थ करावयाची तर आमच्या मतें शेंकडों वर्षें लागतील व अनेक जन्मजन्मांतरें घेऊन पहिल्या पहिल्या जन्मांतल्या मलिन संस्कारांचे लेप धुऊन टाकावे लागतील, हें उत्क्रांतितत्त्वानें सिद्ध होईल. आतां—

यावज्जीवेत्सुखं जीवेदृणं कृत्वा घृतं पिबेत ।
भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ? ॥

इत्यादि चार्वाकासारख्या तर्कशास्त्रज्ञांपुढें आमचे वरील विचार चुकीचे ठरले तरी चार्वाक हा एकमुखानें नास्तिक ठरला आहे, हें कोणाला सांगण्याची जरुरी नाहीं. एकंदरींत पहातां यशापयश हें पूर्वजन्मार्जित कर्मफल असल्यानें चालू जन्मांत करण्यांत येणाऱ्या उद्योगांत प्राक्तनानुसार त्या मनुष्यास कदाचित् अपयश येईल, कदाचित् यशहि येईल. कदाचित् यशाचें प्रमाण जास्त होत जाऊन त्यानें त्यालाच वाटूं लागेल कीं, हें माझ्या प्राग्जन्मांतील आरंभलेल्या सदुद्योगाचें फल आहे. या विषयाचें सूक्ष्म विवेचन श्रीस्वामी विवेकानंदांनीं शिकागोच्या धर्म–परिषदेंत केलें आहे, तें वाचल्यास प्रत्येकाची खात्री होईल.

सांप्रत काळीं देखील अशीं यशस्वितेच्या भूमिकेचीं तेजस्वी उदाहरणें भूमंडळावर चमकलेलीं आढळतील. श्रीस्वामी विवेकानंदांचेंच चित्र दृष्टीसमोर ठेवल्यास काय दिसेल ? पहिलीं वयाचीं बारा वर्षें पोरखेळांत घालविल्यावर पुढल्या अवघ्या १८–१९ वर्षांच्या अवधींत लोकोत्तर कार्य करून जें त्यांनीं अखिल जगाला थक्क करून सोडलें, ती त्यांची तयारी ह्या जन्मांतली नसून पूर्व जन्मांत पक्व दशेस आलेली पूर्व तयारी होती, असें मानिल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. असें नसतें तर इच्छामरणी श्रीभीष्माप्रमाणें आपलीं एकंदर कर्तव्यें आपण पार पाडलीं अशा समाधानवृत्तीनें त्यांनीं निजधामीं प्रयाण केलें, हें घडतें ना. त्याचप्रमाणें श्रीमदाद्यशंकराचार्य, श्रीज्ञानेश्वर महाराज इत्यादि महात्म्यांचीं परमपावन अशीं विस्मयजनक चरित्रें आज जगतीतलावर ठळक उदाहरणादाखल शोभत आहेत.

आज आमच्या गोमांतकांत घडून आलेल्या यशस्वी शुद्धिकार्यांत अशाच एका महात्म्याच्या तपस्येला अपूर्व यशःसिद्धि मिळाल्याचा कृतज्ञतापूर्वक प्रामुख्यानें उल्लेख करण्याचें भाग्य आम्हांस लाभलें आहे. ह्या शुद्धीकरणाच्या प्रसंगानें प्रथम गोव्यांत हिंदूंचें जें अशुद्धीकरण (बाटाबाट) घडून आलें, त्या बाबतींत थोडी ऐतिहासिक माहिती दिल्यास उपयुक्त होईल.

साधारणपणें पहातां आमच्या गोमांतकाच्या मानेवर १३ व्या शतकापासून परराज्यांचें जूं चढलें, असें इतिहासावरून दिसतें. त्यापैकीं पहिला अनुग्रह स. १३२४ त अल्लाउद्दीनाचा झाला. त्यापासून १४४० पर्यंतच्या काळांतल्या उलथापालथी सोडल्या व त्या पुढील १४६९ पर्यंतच्या

धकाधकीचा मामलाहि सोडून दिला तरी यानंतर गोमांतकाला परकीय सत्तेचें कायमचें जोखड वाहण्याचा जो भाग्योदय आला तो आज घटकेपर्यंत अप्रतिहतपणें चालला आहे ! अर्थात् आज आमचें गोमांतक, सहाशें वर्षें पारतंत्र्याच्या शीतल छायेंत सुखसमाधान मानून घेण्याची सवय अंगवळणी पडल्यामुळें कीं काय !—आनंदसागरांत पोहत असल्याचा भास होतो. वरील ६०० वर्षांच्या कालावधीपूर्वी गोमांतकांत जें होतें व आज जें उरलें आहे त्याची तुलना करून पहातां असल्याच आपत्तीला बळी पडलेल्या इतर प्रदेशाहून याचें ( गोमांतकाचें ) जें कल्पनातीत नुकसान झालें त्याचें यथार्थ चित्र रेखाटण्यास तैमूरलंग, खिलजी, औरंगजेब यासारख्या चित्रकारांनीं जे कोठेंकोठें चित्रपट रंगविले आहेत त्यांवरूनच त्याची रूपरेषा वाचकांनीं समजून घ्यावी. एकाद्यानें केलेल्या पापाचा अनुवाद केला तर त्यास दोष लागतो या न्यायानें तें चित्र रेखाटणें म्हणजे जवळ जवळ पूर्वजांच्या खुनाचें पाप अंगावर ओढून घेणें आहे. तरी पण दिग्दर्शनापुरतें थोडक्यांत लिहिणें भाग आहे.

मागें लिहिल्याप्रमाणें अनेक राज्यव्यवस्थेखालीं गोमांतकाचें अत्यंत नुकसान होऊन त्याच्या दैन्यावस्थेला पारावार नाहींसा झाला ! तो इतका कीं, याहून नरकवास पुरवेल, पण गोमांतकांत रहाणें नको, असें एतद्देशीयांस वाटूं लागून असंख्य कुटुंबेंचीं कुटुंबें आपली स्थावर जंगम इस्टेट आणि प्राणांहून प्रिय जन्मभूमी यांस शेवटचा रामराम ठोकून नंदनवनासारख्या गोमांतक देशांतून निघून वाट फुटेल तिकडे पळून गेलीं ! यास कारण त्या वेळचा कायदा हें होय. सोळाव्या शतकाच्या अर्धाच्या सुमारास असा हुकूम सुटला कीं, गोमांतकांतील हिंदूंचीं सर्व देवालयें पाडून त्या जागीं इगरजा ( चर्चें ) बांधाव्या व हिंदूंच्या देवळांचीं सर्व उत्पन्नें इगरज्यांला मिळावीं ! याच सुमारास खासगी व्यक्तींच्या उत्पन्नासंबंधीं दुसऱ्या एका कायद्यानें तर इतका कहर उसळवून दिला कीं २४ तासांचे आंत जमीनदारांनीं बाटावें नाहींतर तितक्याच तासांत गोमांतक सोडून चालतें व्हावें. हाय हाय ! काय हा हिंदूंवर शोचनीय प्रसंग ! यास म्हणतात सुधारणा आणि सुधारलेली नीतिमत्ता ! पाश्चात्यांचा जर कोणता गुण असेल तर तो हाच कीं, त्यांनीं आपल्या सुखाकरतां दुसऱ्याचे अनन्वित हाल करावे ! आणि दुसऱ्यांनीं ते मुकाट्यानें सहन करावे ! रावणानें म्हणे चंद्राला चाकरीस ठेवून त्याच्या शितल अमृतस्रावानें स्नान केलें ! औरंगजेबानें तर हिंदूंचे पवित्र वेद, उपनिषदें इत्यादि अमूल्य ग्रंथांच्या पोथ्यांचे भारे जाळून त्यावर आपल्या सैन्याकरितां पाणी तापविण्याची २।३ महिने सोय केली आणि आपल्या देवावर जर काफरांच्या रक्तांचा अभिषेक केला तर त्यांत मोठेंसें नवल काय ? रेडे बकऱ्यांचा बली देण्याची रानटी चाल कोठें आहेच कीं नाहीं ? मग हिंदू म्हणजेच रेडे, अशांच्या माना मुरगाळून त्यांच्या रक्तानें त्यांनीं आपल्या सुधारलेल्या मत्सरी महत्त्वाकांक्षेच्या देवीला अभिषेक केला तर त्यांत आश्चर्य नाहीं.

अशा प्रकारें जन्मास येणारे कायदे, निजधामास जाणारे त्या वेळचे हिंदु-रेडे व त्यांचीं गोठेंवजा देवळें या सर्वांचा एकाच दिवसाचा हिशेब दिला तरी त्यावरून एका वर्षाचा आढावा काढतां येईल. सांद्यंत हकीकत समजून घेणारांस Bosquejo Historico das Comunides Agricolas de Goa हें पुस्तक वाचण्याची आम्हीं शिफारस करितों. वरील पुस्तकांत एका प्रसंगीं च एकाच दिवसांत २८० हिंदूंचीं देवालयें साष्टी महालांत जमीनदोस्त केल्याचा स्पष्ट उल्लेख आहे ! त्या मानानें इतर बाटविणें इत्यादि गोष्टींचीहि भरपूर माहिती त्यांत वाचावयास

मिळेल. त्यांतल्या त्यांत दुःखा अंतीं सुख मानवें तें, हेंच कीं, पोर्टुगिजांनीं तो आपला दुष्ट असा इंक्विजिसांवाचा क़ायदा ओळखून रद्द केला व आज आम्ही प्रजासत्ताक राज्याचा उपभोग घेत आहों. तात्पर्य, ही ऐतिहासिक माहिती तपशीलवार लिहूं लागल्यास एक भला भला लठ्ठ असा ग्रंथच होईल, म्हणून तसें करीत नाहीं. इतक्या विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल कीं, मागें लिहिल्याप्रमाणें गोमांतकांतील लोक कसे बाटले व आज शुद्धीकरणांची गरज कां भासली, ह्या बाबतींत आम्हीं जो यशापयशाचा मुद्दा घेतला आहे त्याची आतां छाननी करावयाची आहे.

आज गोमान्तकांत चाललेली शुद्धीकरणाची अर्थात् पतितपरावर्तनाची चळवळ म्हणजे ६०० वर्षां इतक्या दीर्घकालीन धार्मिक नुकसानभरपाईचें पवित्र कार्य होय. इतक्या व्यापक अर्थाचा या शब्दांत समावेश होत असल्यानें एवढें हें अवघड व यापूर्वी कोणाहि हिंदुपुत्रानें मनांतहि प्रायः न आणलेलें कार्य घडवून आणण्यास जी व्यक्ति धडाडीनें पुढें आली आहे, तिची ओळख कोणत्या शब्दांनीं करून द्यावी, हें कळत नाहीं. सहाशें वर्षांचें कार्य ज्या पक्षीं चार दोन वर्षांच्या अल्पावधींत एका महात्म्यानें घडवून आणिलें त्या पक्षीं त्यांचा या कार्या-संबंधाच्या प्रयत्नांचा निदिध्यासपूर्वक अभ्यास,—आम्हीं मागें भीष्मविवेकानंदादिकांच्या उदाहरणांनीं प्रदर्शित केलेल्या विचारसरणी प्रमाणें ६०० वर्षांत निदान ८।१० तरी जन्म घेऊन—चालू असला पाहिजे; असें न मानलें तर कांहींहि गाजावाजा न करितां हें शुद्धीकरणाचें बिकट व धोक्याचें कार्य अल्पावधींत पार कसें पडावें याची संगतीच लागणार नाहीं. म्हणून आम्हीं तर असें समजतों कीं, पूर्वावतारांतल्या अपुऱ्या उद्योगाचें यशस्वी कार्य चालू अवतारांत अवघ्या थोड्याच वर्षांत श्रीस्वामी विनायक महाराज यांनीं पार पाडून आपलें अवतारकार्य पूर्ण केलें आहे! न पेक्षां गेल्या सहाशें वर्षांच्या कालांत आमच्या गोमांतकांत अहिरावण-महिरावणांसारखे गोमान्तकस्थ वीर होऊन गेले आहेत! त्यांनीं गोरेबाबू म्हणवून घेऊन बंगाली बाबूंशीं स्पर्धा केली आहे; ते मुत्सद्दी व कारस्थानी असल्यामुळें धार्मिक, सामाजिक, राजकीय, औद्योगिक इत्यादि कामांत पुढारीपणाचा मान त्यांनीं मिळविला आहे; परंतु त्यांपैकीं एकानेंहि पतितपरावर्तनाच्या कामीं आपल्या अधिकाराचा कांहीं इतकाहि उपयोग केलेला नाहीं, असें दुःखानें म्हणावें लागतें आणि किती तरी दूर अंतरावर असलेल्या मसूरच्या ब्रह्मचर्याश्रमाच्या मदतींनीं तें काम कृतींत आणून दाखविलें यामुळें त्यांचे कृतज्ञतापूर्वक जयजयकारोद्गार उच्चारावे असें वाटतें! ही, आपले ( गोमांतकस्थ ) व परके ( विनायक महाराज ) यांच्या अंतःकरणाची तुलना केली तर ती जितकी विलक्षण तितकीच तापकारक वाटते. आतां दुसऱ्या बाजूनें विचार केला तर श्रीविनायक महाराजांसारख्या त्रयस्थांकडून हें शुद्धिकार्य घडल्यानें इकडील वातावरणास जी नवीन दिशा लागली आहे ती महत्त्वाची व आश्चर्यकारक अशी इष्टापत्तीच होय.

वास्तविक सूक्ष्म विचार केला तर यांत आश्चर्य मानण्याचेंहि कारण नाहीं. हेतु हा कीं, आमच्या मागील तात्त्विक विवेचनांत चुकून राहिलेल्या एका प्रश्नाची फोड केली म्हणजे याचा उलगडा होईल. तो असा कीं, श्रीस्वामी विनायकबुवा मसूरकर ही व्यक्ति म्हणजे इंक्विझिशनच्या ( बाटाबाटीच्या ) वेळीं हद्दपार झालेल्या किंवा बळजबरीनें आपल्या प्रिय धर्मास बळी पडलेल्या

कोणातरी गोमांतकीय हुतात्म्याचाच अवतार असावा. कारण, ते गोव्यापासून दूर अंतरावरील इंग्रजी अमलांतल्या ठिकाणीं रहात असतांना व गोमांतकापेक्षां तिकडील प्रांतांत शुद्धिकार्याला बिनहरकत ऐसपैस क्षेत्र असतांना तें सोडून त्यांनीं गोमान्तकासारख्या अनेक राजकीय प्रतिबंधाच्या परकी अमलांतच जो शुद्धिकार्याचा पहिला बांब गोळा फेंकला तो गोमांतकाशीं त्यांचा पूर्व जन्मांतला निःसंशय लागाबांधा असला पाहिजे म्हणून होय, असें ठरतें. आणि यावरूनच वाटतें कीं, त्यांच्या अंतःकरणांत गोमान्तकीयांविषयीं होणाऱ्या आत्मीय भावनेच्या गूढ वेदनांमुळेंच त्यांच्या अंतःकरणवृत्ति गोमांतकाकडे ओढ घेत आहेत. याला शास्त्रीय प्रमाणहि "व्यतिषजति पदार्थानांतरः कोऽपि हेतुर्न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयंते ॥" असें आहे. म्हणजे–एकादा पदार्थ, मनुष्य, किंवा प्रदेश यांकडे उगीचच्याउगीच जें मन आकर्षिलें जातें त्याचें कारण मनच जाणे. प्रीतीला बाह्य देवघेवीची गरज नसते. यालाच उद्देशून व्यवहारांत 'मनोमन साक्ष!' ही म्हण रूढ झाली आहे. एकंदर विवेचनाचा फलितार्थ हा कीं, श्री विनायक महाराज हे दुसरे तिसरे कोणी नसून पूर्व जन्मींचे आमचेच गोमांतकस्थ आहेत. आतां कांहीं व्यक्तींचा "आम्ही गोमांतकचे पिढीजात रहिवासी असल्यामुळें आमच्या हक्कांतलें शुद्धिकार्याचें यश बाहेरच्या परक्यानें हिरावून नेणें योग्य नाहीं" असें वाटून आश्रमाकडची या बाबतींतील जबाबदारी हिसकण्याचा विचार दिसत आहे, परंतु आमच्या मतें हें सर्वथैव अयुक्त व अनिष्ट आहे.

खरें पाहिलें तर गोमांतकीय शुद्धिकार्याचा पहिला उत्पादक ब्रह्मचर्याश्रम असून त्या कामीं समाजाला जें यश मिळावयाचें तें आश्रमाच्या प्रतिनिधित्वानेंच मिळणार आहे, आणि त्याचेंच महत्त्व अधिक आहे. हें यश, आश्रमाचा संबंध सोडून कोणी समाजधुरंधर मिळवूं म्हणेल तर तें शक्य नाहीं; कारण, श्री विनायक महाराजांवरच गावडे समाजाची एकांतिक श्रद्धा, भक्ति व अढळ निष्ठा असून आश्रमाच्या उपदेशालाच तो भुकेलेला आहे. आश्रमीय व्यक्तींच्या उपदेशाचा परिणाम शुद्धिकृतांप्रमाणें शुद्ध होऊं पहाणाऱ्यांच्या मनांवर जितका होईल तितका तो इतर सामान्य व्यक्तींच्या उपदेशाचा होणें शक्य नाहीं. वत्सांचा आपल्या मातेकडे जसा अकृत्रिम ओढा असतो, त्याप्रमाणेंच गावड्यांचीं मनें आश्रमाकडे ओढ घेत असतात. याचें प्रत्यंतर पहावयाचें असेल तर कांहीं दिवसांमागें एक हजार गावड्यांच्या सभेनें केलेले ठराव पहावे म्हणजे खात्री होईल. सारांश, ज्यांच्यावर ज्यांचा विश्वास आहे त्यांजकडूनच त्यांचें कार्य करणें श्रेयस्कर असल्यानें त्यांच्या अधिकारांत कोणीहि ढवळाढवळ करू नये. सांगावयाचें काय कीं, ब्रह्मचर्याश्रमालाच इतरांनीं सर्वभावें मदत करून त्यांजकडूनच शुद्धिकार्य पूर्ण करून घेणें हेंच अधिकारदृष्ट्या सर्वस्वी उचित आहे.

गोमांतकांत प्रतिनिधिभूत आश्रमाच्या शाखा स्थापन करून त्यांच्याद्वारें शुद्धिकार्य करण्यास अशक्य काय आहे ? आश्रमाचें मध्यवर्तिस्थान इंग्रजी हिंदुस्थानांत असलें तरी गोमांतकांत त्याच्या शाखा स्थापण्यास कोणतीच हरकत नाहीं; व हें काम ज्या अर्थी धार्मिक आहे, त्या अर्थी येथील कार्याची दिशा आंखण्याचें काम, गोमांतकांतील दोन धर्मसंस्थानांच्या अधिकारांतलें असून तें त्यांनीं अवश्य केलें पाहिजे, असें आम्हांस वाटतें. कारण, वरच्यासारखें ( शुद्धि चळवळीचें ) कार्य अधिकारी अशा धर्मपीठांनीं आपल्या हातीं घेतलें तर अधिकाराच्या जडवाईमुळें तें समाजाच्या क्षेत्रांत चांगलें मूळ धरून त्याचा वृक्ष फोंफावल्याशिवाय रहाणार नाहीं आणि हें संस्थानांकडून झालेलें कार्य जितकें बेमालूम होईल तितकें तें खासगी व्यक्तींकडून केव्हांहि होणें शक्य नाहीं.

याचें प्रत्यक्ष गमक म्हणजे घडून आलेलें, यशस्वी शुद्धीकरण होय. हें अभूतपूर्व कार्य करण्यास मूर्तिमान् दारिद्र्य अशा भसाच्या छटा, जटा, छाट्या व दाढ्या जितक्या समर्थ झाल्या त्याच्या शतांशानेंहि नाजूक दाढ्यामिशा कार्य करूं शकल्या नसत्या आणि हें भाकीत आम्हीं मागें ६०० वर्षांत वाट चुकलेल्या ( बाटलेल्या ) आपल्याच बांधवांस फिरून आपल्या घरांत घेण्याकरितां हात पुढें करण्यास एकहि सोवळा वाचिवीर सरसावला नाहीं, हें दाखवून सिद्ध केलें आहे. जमीन चांगली भाजून नांगरून तींत बीं पेरलें आहे. त्याची उगवण तरी जोमानें व्हावी म्हणून कोणी स्थानिक छाटी ( दोहों पैकीं एक तरी धर्मपीठ ) पुढें येईल म्हणावें तर तिकडूनहि अद्यापि आशेचा एकहि किरण डोकावत नाहीं.

आज हें कार्य नांवाला ब्रह्मचर्याश्रमाच्या प्रतिनिधित्वाखालीं म्हणून जरी कांहीं लोक रेटीत आहेत तरी त्यांस शिस्तीचें नियंत्रण व धर्मपीठासारख्या तेजस्वी शक्तीचें पाठबळ नसल्यानें त्यांत आत्मविश्वास व जीवंत धडाडी नाहीं. पाठीमागें सेनापति नसलेल्या सैनिकांच्या अव्यवस्थित व पळपुट्या लढाईप्रमाणें सध्यां अनिश्चित स्वरूपाचें फुटकळ काम चाललें आहे. तेव्हां एकीकडून ब्रह्मचर्याश्रमाचें नियुक्त मंडळ, दुसरी कडून गोव्यांतील मठसंस्था मिळून हें शुद्धिकार्य संघटित स्वरूपानें चालविण्यांत आलें असतें तर आज त्याला केवढें तरी भव्य व सुहृदुष्टांच्याहि डोळ्यांत भरण्यासारखें रूप आलें असतें, व त्याचा व्याप गोमांतक व्यापूनहि उरला असता ! परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, आज धर्मपीठें तर आपली जुनीपुराणी शतच्छिद्री छाटी सोळा आणे सोवळी राखण्याकरितां आपल्या भोंवतीं, झाडलोट, छाटाछाट, व हाकाहाक करून "एकमेवाद्वितीयं ब्रह्म" चा शुकशुकाट वाढवीत बसलीं आहेत !. आणि त्यामुळें हा आता कार्याचा सारा भार, समाजांतील सुबुद्ध व सहृदय व्यक्तींवरच येऊन पडल्यामुळें त्या व्यक्ती आपापली जबाबदारी ओळखून यथाशक्ति शुद्धिकार्य करीत आहेत. तेव्हां आतां तरी मठसंस्था— आपापली झोंपमोड करून घेऊन रंगारूपास येऊं पहाणाऱ्या कार्यास योग्य असें वळण लावतील व त्याची धुरा आपण वाहतील तर त्यांस यशःसिद्धि व कीर्ति खात्रीनें माळ घातल्याशिवाय रहाणार नाहीं. तरी त्यांनीं एका क्षणाचाहि विलंब न लावतां, शुद्धिकार्य म्हणजे धर्मरक्षणाच्या अंगांपैकींच एक अंग असल्यानें आपल्या कर्तव्यकक्षेंतलेंच तें अवश्य कर्तव्य आहे असें समजून हें कार्य हातीं घ्यावें, अशी आमची त्यांना नम्र विनंति आहे. आमची खात्री आहे कीं, धर्मपीठा-

धिपति आमच्या विनंतीस मान देतील आणि सरकार-मान्य अशा पीठांच्या दिव्य धार्मिक सत्तेचा सदुपयोग शुद्धिकार्याला सहाय देण्यांत करून हिंदुसमाजाचा विकल झालेला अवयव धष्ट, पुष्ट व बलिष्ठ करतील. आमचें ठाम मत आहे कीं, या कार्यांत धर्मसंस्थांचा पूर्ण पाठिंबा मिळेल तर शुद्धिकार्याचें क्षेत्र चारहि दिशांनीं विस्तार पावल्याशिवाय रहाणार नाहीं.

खरें पाहिलें असतां रिपब्लिक राज्यपद्धति धर्मास महत्त्व देत नाहीं. "ख्रिस्ती हिंदू झाले किंवा हिंदू मुसलमान झाले तरी त्यांस आह्मीं आडकाठी करीत नाहीं," असें राजप्रतिनिधि साहेबांनीं ( गव्हर्नरनीं ) उदार आश्वासन दिलें आहे. यावरून आमच्या राज्यपद्धतीचें उदार धोरण कोणाच्याहि लक्षांत येईल. तेव्हां धर्मपीठांनीं नसती संशयपिशाचिकेची टोंचणी आपल्या मनास लावून न घेतां व 'यश कीं अपयश ?' असल्या दोन दरडीवर हात न ठेवतां चालून आलेली यशःसिद्धि हातची गमावूं नये. काल हा झपाट्यानें पुढें पळत असून पुढें टाकलेलें पाऊल मागें घेण्याची त्याला सवई नाहीं, हें चांगलें लक्षांत ठेवावें. ब्रह्मचर्याश्रमानें आरंभून दिलेलें कार्य आपण त्यांत भाग घेतला नाहीं तरी आतां थांबत नाहीं-कसें तरी पार पडणारच आहे. आपण मात्र पवित्र धर्मकार्याच्या श्रेयास मुकणार आहों, हेंहि भोंवतालच्या परिस्थितीवरून नीट हेरून ठेवावें. नरेंद्रमंडळाचा वारा वेळीं अवेळीं आडवळणांनीं चढउतार करूं लागलाच तर त्या मानानें धर्मपीठांची व हिंदुसमाजांतील पुढाऱ्यांची जबाबदारी वाढली इतकेंच ह्मणतां येईल. शुद्धिकार्य थंडावेल, असें मुळींच समजूं नये. इतकेंच काय, तर "कीं तोडिला तरु फुटे आणखी भरानें !" या न्यायानें शुद्धिकार्यास जसजसे धक्के बसत जातील तसतशी त्यालाहि श्रीविनायकमहाराजांच्या पुण्याईनें जोराची उसळी आल्याशिवाय रहाणार नाहीं, हा प्रत्येकानें पूर्ण आत्मविश्वास ठेवावा. ह्या विवेचनाचा इत्यर्थ हा कीं, "यापुढें गोमांतकांतील धर्मपीठांच्या दोनहि आचार्यांनीं आह्मीं त्या गांवचेच नाहीं असें भासविण्याकरितां दूर दूर रहाण्याचें सोडून देऊन राजरोसपणें शुद्धिकार्य हातांत घेऊन तें कडेस पोंचवावें" हेंच धर्मगुरु ह्मणविणारांचें आजचें आद्य कर्तव्य आहे.

याप्रमाणें धर्मपीठांनीं श्रमविभागाच्या तत्त्वांवर शुद्धिकार्यांत भाग घेतला म्हणजे मसूरच्या ब्रह्मचर्याश्रमावरचा बोजा तितक्या प्रमाणांत हलका होईल व त्याच्या सामर्थ्याचा उपयोग अन्यत्र असल्याच कार्यांत त्याला करतां येईल. दुसरें, मागें लिहिल्याप्रमाणें सरकार दरबारांतहि वजन व मानमान्यता असलेल्या अधिकारी धर्मपीठांकडून हें शुद्धिकार्य उरकण्यांत आलें तर तें निर्विवाद होऊन शिवाय मग ब्रह्मचर्याश्रमीय कार्यकर्त्यांच्या बाबतींतल्या प्रमाणें 'वाघ आणि कोंकरूं' ह्या धड्यास अनुसरून नरेंद्र मंडळालाहि वडाची साल पिंपळास लावण्यास जागा रहाणार नाहीं. एकंदरींत सांगावयाचें काय कीं, हें शुद्धिकार्य किंवा पतितपरावर्तन पार पाडण्याची धुरा एतद्देशीय धर्मसंस्थानांमार्फतच वाहणें सर्वस्वी हिताचें, कमी अडचणींचें व सद्यःफलदायी आहे, असें आमचें मत आहे. असें असूनहि जर येथील उभय धर्मपीठांच्या आचार्यांनीं ही गोष्ट मनांवर घेतली नाहीं तर मसूरच्या ब्रह्मचर्याश्रमाला नाइलाजानें आपण लावलेल्या रोपाची निगा करून त्याचा विस्तार करणें भागच आहे; आणि उपक्रम केल्याप्रमाणें उपसंहारहि करून या यशाचा पूर्ण वांटा पदरांत घेण्यास श्रीस्वामी विनायकबुवा मसूरकर केव्हांहि समर्थच आहेत.

---

# गोमांतकांतील शुद्धीचा छोटा इतिहास.

(ले.—श्री. गो. पु. हेगडे देसाई, सं. भारत केपें, गोवा.)

गेल्या २०।२५ वर्षामागची गोष्ट. त्या काळीं मी पणजी-पाठशाळेंत पोर्तुगीज दुय्यम शिक्षण संपादन करीत होतों. अलीकडे गोमांतकांत जिकडेतिकडे शहरांतून व साधारण लोकवस्तीच्या खेड्यांतूनहि स्वयंगतिका आपल्या मोकाट सुळसुळाटानें गर्जत असलेल्या दिसल्या तरी त्या काळीं त्यांचा पूर्णाभाव मला तिसवाडीचें करंबळी गांव जवळ व माझें राहतें स्थान कुस्पण ( केपें ) दूर करीत असे. करंबळीचे माझे पितृतुल्य चहाते कै. शंकरराव नाईक व त्यांचे बंधुवत पुत्र अनंत व कृष्ण यांच्या निरपेक्ष आग्रहावरून सुट्यांचा ' मोसम ' व रविवारचे दिवस पणजीच्या विद्यार्थीदशेंत करंबळी गांवांतच घालविले आहेत.

ते वर्ष नक्की स्मरत नाहीं, महिन्याचीहि तीच गत; पण तो दिवस मात्र रविवार होता, हें पक्कें आठवतें. त्या दिवशीं मी व शंकर नाईक करंबळी येथील त्यांच्या जुन्या घराच्या गच्चीवर बसून शिक्षणविषयक चर्चा करीत होतों. इतक्यांत माझी नजर मला एका सर्वथैव अपरिचित व अभूतपूर्व दृश्यावर एकाएकीं खिळली. शंकर नाईकहि तो प्रकार पाहूं लागले. पण त्यानें आश्चर्यचकित न होतां उलट ते मोठ्यानें हंसतच राहिले; कारण ज्या गोष्टीवर माझा प्रथमतःच दृष्टिक्षेप झाला होता, ती त्यांच्या नित्य परिचयाची होती. आपल्या बाह्य स्थितीपासून ते ती अवलोकित असल्यानें, त्यांना त्यापासून कांहींच नवलहि वाटलें नाहीं. माझ्यांत उद्भूत झालेल्या आश्चर्यानें मात्र ते आश्चर्यचकित झाले.

' एक खिस्ती गावडा तुळशीला प्रदक्षिणा घालीत सूर्याला नमस्कार करीत होता ' हें तें दृश्य होतें. बायबलाचा मीं अभ्यास केला होता. त्यांतील जुन्या व नव्या करारांचें ज्ञान मला अपरिचित नव्हतें. खिस्ती लोकांचा सूर्योपासनेशीं किंवा तुळशीचे आराधनेशीं कसलाच संबंध नाहीं, हें मला ज्ञात असल्यानें उपरोल्लेखित प्रकारानें माझें मन आश्चर्यसागरांत बुडून गेलें असल्यास अस्वाभाविक आहे काय ? पण माझ्या मनस्थितीचें कारण कळतांच नाईकांनीं जी विशेष माहिती मला पुरविली त्यामुळें तर माझें आश्चर्य दसपटीनें—शतपटीनें विकास पावलें.

ते म्हणालेः—करंबळी, चिंबल, धुळापी व गोमांतकांतील इतर ठिकाणींहि याच जातीचे ( मीं पाहिलेले ) अनेक खिस्ती गावडे आहेत. पण त्यांचा खिस्तीपणा नुसता नांवाचा आहे. जनन, लग्न व मरण या तीन संस्कारांसाठीं मात्र ते खिस्ती मठाकडे जात असतात; इतर सर्व गोष्टींत ते हिंदुत्वालाच बिलगून आहेत. त्यांचीं हिंदुदैवतें आहेत. ते प्रसाद घेत असतात. जत्रांत उपस्थित होतात, सधवा बायकांच्या गळ्यांत तर मंगळसूत्र आज कित्येक काळ सारखें विलसत आहे. मात्र वरील बाबतींत ते किरिस्तांवांशीं संबंध ठेवित असल्यानें हिंदु जात त्यांस जवळ करीत नाहीं.

' असें जर आहे तर त्यांना पुनरेव हिंदु धर्मात कां घेऊं नये ? ' अशी मी पृच्छा केली. पण ' हें काम धर्माधिकाऱ्यांचें आहे, तुम्हां विद्यार्थ्यांचें नव्हे ' असें म्हणून नाईक दुपारचा

... एक आश्रमीय शाखा ठेवून व तिचें धुरीणत्व ब्र. आनंद मूर्ती यांच्या ... दुसरीकडे संचारार्थ गेले.

तुकडीनें शुद्धीकार्यार्थ बजाविलेली सेवा बहुमोल आहे. गावढ्यांत वृद्धिंगत पावण्यास त्यांनीं व त्यांच्या सहकारी गुरुबंधूंनीं सहन केलेली कष्ट- हृदयी माणसांचें सुद्धां अंतःकरण विरघळून टाकील. जेवण नाहीं खाण नाहीं, ... नाहीं, सकाळीं रायवंदर तर सायंकाळीं चिंबल, आज नागझर तर उद्यां ... केरी तर मंगळवारीं ताळगांव, अशा हजारों हेलपाट्या, अशी एकसारखी ... करून केव्हां कोणतें संकट उपस्थित होईल याचा नेम नाहीं पण मसूर आश्रमांतून न' संभाळून अत्यंत चतुराईनें शुद्धि आक्रमणाचीं सूत्रें खेळविणारे श्रीसद्गुरु विनायक ... यांच्या तेजस्वी धडाडीनें व असामान्य धैर्यानें अखेर ता. २६ माहे फेब्रुवारी सन ... सकाळीं ( फाल्गुन शु. ६ शके १८४८ ) चिंबल येथें हजारों लोकांच्या सान्निध्यांत शुद्धीची मुहूर्तमेढ रोवली गेली. आश्रमाच्या तपश्चर्येमुळें "असाध्य तें साध्य झालें" दुंदुभी सर्वत्र गर्जू लागला, महाराज व आश्रम यांना धन्यवाद देण्यांत हिंदुधर्मीयांत सुरू झाली. या अनपेक्षित क्रांतीमुळें सर्वत्र आनंदाचें साम्राज्य माजलें. आश्रमाच्या असा हा सरळ, स्पष्ट व सत्य इतिहास आहे. नंतरच्या गोष्टी प्रस्तुत पुस्तकांतच जागीं संग्रहीत झाल्या असल्यानें त्यांच्या पुनरोच्चाराच्या भानगडींत न पडतां वाचकांची रजा घेतों.

---

## शुद्धीचा अकल्पित योग.

( लेखक—वामन नारायण पालेकर, डिचोली–गोंवा. )

[पो]र्तुगीज लोकांचे पाय गोव्यांत लागल्यापासून खिस्ती धर्मप्रसारास जी सुरवात झाली, त्याची तीव्र जाणीव पुढें पुढें भयंकर होत गेली; आणि पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धात व सोळाव्या [श]तकांत त्यांनीं आपल्या सत्तेच्या जोरावर धर्मप्रसाराचा जो अनन्वित कहर उडविला; बायका- [मु]लांचा जो निर्दयपणें अनुचारित छळ केला; हिंदु देवालयांची जी नासधूस केली; त्या त्यांच्या [रा]क्षसी कृत्यांच्या आठवणीनें पाषाणहृदयी मनुष्याच्या अंगावर शहारे येतील, इतकेंच नव्हे तर [सा]ष्ट, बारदेश आणि तीसवाडी या भागांत एकहि देऊळ राहूं दिलें नाहीं. आजसुद्धां साष्ट [बा]रदेशच्या आजुबाजुच्या खेड्यांनीं फिरल्यास शंभर खिस्त्यांच्या घरवस्तींत एक हिंदुचें घर [दि]सण्याची मारामार पडेल. अशा रीतीनें झालेले हिंदुधर्मावरील आघात, जसे पूर्वी ज्ञानेश्वर, [ना]मदेव, एकनाथ, तुकाराम, श्रीसमर्थ इत्यादि साधुसंतांनीं कळकळीच्या उपदेशांनीं लोकांच्या [अं]तःकरणांत धर्मजागृती केली, तसे हिंदुधर्माला भरपूर सहाय्य करण्याच्या उद्देशानें श्रीसद्गुरु [स]मर्थ सांप्रदायी परंपरा चालवून परधर्मांत खितपत पडलेल्या लाखोंशा पूर्व हिंदूंस पावन करून [घे]ण्याचें कार्य श्रीसद्गुरु विनायकबुवा मसूरकर यांनीं आपल्या ब्रह्मचारी आश्रमाकडून आरंभिलेलें [पा]हून फार समाधान वाटलें. गोमांतकांत बाटून खिस्ती झालेल्या लोकांचा शुद्धिसमारंभ घडून

" धर्मभास्करांची धर्मच्युति " काढून आणि त्यांच्यावर नाहक आळ घेऊन एकेरीवर येणें आमच्यानें होणार नाहीं. महाराष्ट्रांत दौऱ्यावर गेलेलें हिंदुसभेचें प्रचारक मंडळ गोमांतकीय शुद्धीचा १८९५ पर्यंतचा एक नवाच इतिहास बनवून त्याचा प्रसार करीत सुटलें आहे. त्यांनीं कितीहि नवीन इतिहास जरी डोक्यांतून निर्माण केला, तरी श्री. हेगडे देसाई व श्री. लवंदे यांनीं मसूरकरांपूर्वीं शुद्धिकरितां जितके प्रयत्न केले, तितके कोणींच केले नाहींत. आणि इतके प्रयत्न करूनहि गोमांतकांत शुद्धि शक्य नाहीं असाच त्यांनीं निष्कर्ष काढलेला होता. आणि गोमांतकाची परिस्थिति पाहतां तो नितांत सत्य होता. आज श्रेयाकरतां हपापून मसूरच्या आश्रमास शिव्या शापांची लाखोली वाहणारे वाचि--वीर त्या वेळीं कोठें दडून बसले होते याचा आज पत्ता तरी मिळेल काय? महाप्रयत्न करूनहि आपणांस अशक्य वाटणारी शुद्धि धर्मभास्कर विनायक महाराजांनीं मोठ्या धैर्यानें पार पाडली म्हणून ' भारत ' कार श्री. हेगडे देसाई यांनीं आपल्या पत्रांतून त्यांचें जाहीर अभिनंदन केलें. खऱ्या गुणाचा गौरव केला असतां ' भारत ' कारांनीं मसूराश्रमाचें वेतनीय वकील पत्र स्विकारलें आहे! विद्यार्थी ठेवण्याकरतां सरकार कडून आपणांस वीस खटले ओढवून घेतले, त्या सर्व खटल्यांतून सुमारें पंचवीस हजार रुपये भुर्दंड सोसला आणि सरकारच्या कोणत्याहि आमिषास बळी न पडतां ज्या महाभागानें गोमांतकीय हिंदूंच्या स्वाभिमानाची पराकाष्ठा सरकारच्या नजरेस आणिली, त्या परमवंद्य पुरुषावर आश्रमाकडून लांच घेतला असा आरोप ध्वनित करतांना ह्या वाचिवीरास कांहींच शरम वाटली नाहीं? एकाद्या फाटक्या हिंदूनें लांच घेतला, असें आश्रमानें ध्वनित केलें म्हणजे ज्यांना गोमांतकीयाच्या अभिमानाची उकळी फुटली, त्यांना असल्या वंद्य पुढाऱ्यानें लांच घेतला असें ध्वनित केल्यानें गोमांतकाचा उत्कर्ष होतो असें वाटलें कीं काय? का द्वेषानें अंध झाल्यानें त्यांची सारासार विचारशक्तीच नष्ट झाली? एकाद्या फाटक्या गोमांतकीयानें लांच घेतला हें विधान एकपट बदनामीकारक, तर ' भारत ' कारांनीं लांच घेतला हें विधान करतांना ज्यांना दिक्कत वाटत नाहीं, त्यांनीं आश्रमाची बदनामी करण्याचा प्रयत्न कां चालविला आहे, ह्याचें कारण कोणासहि सहज कळून येईल.

---

## गोव्यांत शक्य उद्योग.

( लेखक—स. बा. परांजपे. केमिस्ट, टोकिओ, जपान. )

वास्को डीगामा १४९८ मध्यें मलबार किनाऱ्यावर उतरून त्यानें कालिकोट व कोचीन येथील राजांकडून व्यापार करण्याच्या सवलती मिळविल्या. तेव्हांपासून पोर्च्युगीज लोकांचें लक्ष हिंदुस्थानाकडे वेधलें. उत्तरेकडे काश्मिर प्रांत जसा सृष्टिसौंदर्यानें नटला आहे, तसाच गोवा प्रांतहि सृष्टि सौंदर्याचा उत्कृष्ट नमुना आहे. या सौंदर्यांत समुद्र किनाऱ्यानें आणखी भर घातली आहे. सन १५१० मध्यें हा सुंदर गोवा प्रांत अलफनसो अलबुकर्क यानें विजापुरच्या सुलतानाकडून जिंकून घेतला. तो अद्याप पोर्च्युगीज लोकांच्या ताब्यांत आहे. ४०० वर्षें पूर्ण दास्यत्व उपभोगि- ल्यानंतर गोवा प्रांताला प्रजासत्ताक राज्याचे अधिकार निसर्गानें दिले; रक्ताचा एक थेंबहि न सांडतां स्वराज्याचे हक्क गोव्याला प्राप्त झाले; कारण पोर्च्युगीज राष्ट्रच स्वतंत्र झालें. लढाई न करतां स्वातंत्र्य प्राप्त झालेलें पृथ्वीवरील " गोवा प्रांत " हें पहिलें होय!

या कारखान्यांत आंब्याचा रस व आंब्याच्या फोडी डब्यांत भरण्याची सोय लवकरच होईल दिसतें. आंब्याप्रमाणें केळीं, काजू, पेरू वगैरे पदार्थांचे मुरंबेहि येथें तयार होतील.

तेलाचे धंदेः—गोव्यांत नारळाची लागवड पुष्कळ असल्यामुळें सुवासिक तेलें, वगैरे पदार्थ किफायतशीर भावानें तयार होतील.

*इतर किरकोळ धंदेः—गुलाल, उदबत्ती, बुका, पेपर मिंट, लेमन ड्रॉप्स, बिस्कीटें,* चाय ( या कामीं काजूच्या गिराचा चांगला उपयोग होईल. ) कॉफी, फेस पॉवडर, टूथपॉवडर, अ वगैरे जिन्नस होण्याजोगे आहेत. ह्यांपैकीं उदबत्तीचा धंदा फार महत्त्वाचा असून थो भांडवलावर चालण्याजोगा आहे.

औषधि वनस्पतीचे धंदेः—वनस्पतीचे टिकाऊ काढे अरिष्टें, आसवें, घनकषाय ( rutnocto ) वगैरे पदार्थ होण्याजोगे आहेत.

हातमागः—हातमागांचा प्रसार गोव्यांत अद्याप व्हावा तसा झाला नाहीं. नव हा एक नवीन किफायतशीर धंदा होण्याजोगा आहे. त्यांना काम शिकवून माग व पुरविलें असतां ते कापड काढून देतील.

सूत रंगविण्याचा कारखानाः—रेशीम, सूत रंगविण्याचा कारखाना गोव्यांत एक सुद्धां *अशा तऱ्हेचे कारखाने हातमागाला जोडून निघण्याजोगे आहेत.*

चिकाचे पडदेः—चिकाच्या पडद्यांचा खप गोव्यांत चांगला आहे. बांबूंची ल असल्यामुळें बांबू स्वस्त मिळतात. ह्याचे चिकाचे रंगीत किंवा साधे पडदे हात मागावर लवकर व थोडक्या मजूरींत तयार होतील. हा धंदा मोठ्या प्रमाणावर चालण्याजोगा आहे.

---

## लो० टिळक व शुद्धिकार्य.

( ले०—श्री. सदाशिव विनायक बापट, पुणें. )

'शुद्धि ' हा शब्दप्रचार आर्दी अलिकडील असून तो जुन्या ' पतित परावर्तन' समानार्थी अगर पर्यायवाचक शब्द आहे. श्रीस्वामी श्रद्धानंद यांनीं सुरू केलेल्या चळवळी हा शब्द महाराष्ट्रांतहि विशेष रीतीनें प्रचारांत येऊन रूढ झाला आहे. पण तत्पूर्वी त्याचें ' पतित परावर्तन ' या शब्दानें केलेलें आहे. म्हणून लोकमान्यांच्या बोलण्यांत अगर लि अर्थातच ' शुद्धि ' हा शब्द न येतां पतित परावर्तन हा शब्द येणें स्वाभाविक आ पतित परावर्तनास म्हणजे शुद्धिकार्यास लोकमान्यांचें मत पूर्णपणें अनुकूलच होतें. या फक्त दोनच उल्लेख खालीं देतोः—

( १ ).

जो तो आपल्या धर्माची संख्या वाढवितो आहे आणि आमचे शास्त्रीपंडित तर पतित परावर्तन योग्य कीं अयोग्य याचा वादविवादच करीत बसले आहेत. आमचे

नीं सांसळी सुटली आहे. मला, अशी खात्री आहे कीं, खिस्ती, मुसलमान या पेक्षांहि वैदिक साराचें काम आपल्या पूर्वजांनीं फार सुव्यवस्थित आणि नेटानें केलें आहे.

—" टिळक—सूक्ति संग्रह " ( सूक्ति ७८४ )

( २ )

" मुंबई येथें के० गजानन भास्कर वैद्य यांनीं हिंदु मिशनरी सोसायटी तर्फे प्रथम ता० ९ बर १९१७ रोजीं सकाळीं मिस डेव्हिस या खिस्ती बाईस व संध्याकाळीं मि. वहिद उद्दीन मुसलमान गृहस्थास विधिपूर्वक हिंदु करून घेतलें. या बाबतींत गजाननराव लिहितात, उद्र दिवशीं रात्रीं मुंबई स्टेशनावर अचानकपणें लोकमान्य टिळक यांची व आमची गांठ ी. तेव्हां गोपाळदास ( पूर्वीचे वहिद उद्दीन ) हे त्यांच्या पुढें हात जोडून उभे राहिले. म्हीं त्यांची ओळख करून दिली. ' त्यांना आम्हीं आज विधि पूर्वक हिंदू करून घेतलें आहे ' । तेव्हां आम्ही लोकमान्यांस निवेदित केलें तेव्हां ' विधि केला कीं नाहीं ' याची त्यांनीं बीं चौकशी केली व ' असा उद्योग व्हावयासच पाहिजे, पण विधी शिवाय कोणाला घेऊं ा, सर्व धर्मांत विधि आहेत, आपलाहि कांहीं विधि असणें अत्यंत जरूर आहे, त्या वाय कोणाला हिंदू करून घेऊं नका " असें आम्हांस त्यांनीं आस्थेनें बजावून सांगितलें त्यांचे आमच्यावर महदुपकार आहेत. "

—लो. टि. आठवणी—आख्यायिका, खंड तिसरा, पान २०४.

---

गोमांतकांतील

# खिस्ती गावड्यांच्या हिंदु चालीरिती.

( लेखक—श्री. रामचंद्र नारायण प्रभु लंवदे, रायचंदर गोवा. )

गोमांतकांत पोर्तुगीज सत्ता प्रस्थापित झाल्यापासून आजपर्यंत होऊन गेलेल्या ४०० वर्षांच्या काळांत राज्यकर्त्यांच्या खिस्ती धर्मानें गोमांतकाच्या मुळच्या हिंदुसमाजावर चांगलेंच आक्रमण ले आहे. हें पटवून देण्यासाठीं कोणा इतिहास संशोधकाची फारशी आवश्यकता लागणार नाहीं. ोमांतकाच्या लोकसंख्येचे आंकडेच या संबंधाची उत्कृष्ट साक्ष आज अगदीं हां हां म्हणतां देतील. गोमांतकाच्या समग्र लोकसंख्येचे साधारणतः हिंदू व खिस्ती असे दोन समसमान भाग डतात म्हणजे एकूण पांच लाख लोकां पैकीं अडीच लाख हिंदू व अडीच लाख खिस्ती अशी ी सारखी वाटणी आहे. दोन वर्षां पूर्वीं गोमांतकांत शुद्धीकार्याची जी प्रचंड लाट उसळली तिच्या योगानें या लोक संख्येच्या विभागणींत आतां बरेंच अंतर पडलें आहे. सुमारें आठ सहस्र खिस्ती लोकांनीं पुनश्च हिंदू धर्माचा स्वीकार केलेला असून त्या योगें हिंदूंची लोकसंख्या आठ सहस्रांनीं वाढली आहे. तर तितक्याच संख्येनें खिस्ती धर्मीयांची लोक संख्या साहजिकच घटली आहे. अर्थात् दोन्ही समाजांमध्यें सोळा सहस्रांचें मोठें थोरलें अंतर पडलें असून हिंदूंचें पारडें जड होऊन खालीं बसलें आहे, ही गोष्ट स्पष्ट आहे. या वरील आंकड्यांच्या दृष्टीनें विचार

सह्याः—

### कायदेमंडळाचे सभासद.

(१) रा. रा. लालजी नारायणजी (२) श्री. बी. आर. आंबेडकर (३) रा. जयरामदास दौलतराम (४) डब्ल्यु. एस. मुकादम (५) व्ही. ए. सुर्वे (६) रा. ब. काळे (७) नाल्भाई देसाई (८) एल्. एम्. देशपांडे (९) जे. सी. स्वामीनारायण (१०) नारायणदास बेचर (११) एन्. ई. नवले (१२) रावसाहेब बंडेकर (१३) नटवरलाल मुजुमदार (१४) अमृतलाल शेट (१५) एस्. जे. झुंझारराव (१६) राजमल लखीचंद (१७) जे. बी. देसाई (१८) बी. व्ही. जाधव (१९) कंबळी (२०) एफ्. जे. जिनवाला (२१) एन्. आर. गुंजाळ (२२) डॉ. दिक्षीत (२३) सरदार मुजुमदार (२४) आर. एस्. आसवले (२५) आर. जी. प्रधान. (२६) एस. ए. सरदेसाई (२७) एन्. जी. मोसले (२८) एस्. पी. लिंगाडे (२९) एन्. बी. चंद्रचूंड (३०) डोंगरसिंग पाटील (३१) रावबहादूर आंगडी (३२) एन्. व्ही. पाटसकर (३३) एच्. जे. अमीन (३४) पी. आर. चिकोडी.

### नगर पालिकेचे सभासद.

(१) डॉ. एन्. डी. सावरकर (२) एस्. एल्. सीलम (३) एल्. आर. तेरसी (४) आर. ए. मोळे (५) एस्. के. पुप्पाला (६) डॉ. एम्. बी. वेलकर.

* * *

(४) जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य (डॉ० कुर्तकोटी) ह्यांची गोवे सरकारास गेलेली तार:—

Governor General, Punjim, Goa.

Jagdguru Shankaracharya (Dr. Kurtakoti) regrets unjustifiable detention of our religious Shuddhi workers in your provinces at Punjim. Such unfair interference in legitimate work of our peaceful workers will create ill feelings in British India against Portugal Republic. His Holiness therefore desires your Excellency to investigate into matter immediately.

* * *

(५) गव्हर्नर जनरल साहेबांची मसूराश्रमास तार:—

To, Kshirsagar, Manager of Brahmacharyashram, Masur, Karad.

No. 50.

I am charged his Excellency Governor General that Hindus referred to in your telegram were not arrested but were at disposal of police for enquiries as police was given report their being in connection with persons who acted criminally threatening and coaching natives in case they do not follow Hinduism. This being done in opposition law and ab-olute liberty creeds which his Excellency desires and wants to be maintained.

Chief of the Cabinet,

To His Excellency The Governor General, Nova Goa.